सांख्यविवेकगभस्ति
पूर्ण उगवला ज्याचे चित्तीं ।
तेथ विकल्पाची अंधारी राती ।
कैशा रीतीं उरेल ॥
जें साराचें निजसार ।
जें गुह्य ज्ञानभांडार ।
जें कां विवेकरत्नाकर ।
तें सांख्य साचार उद्धवा ॥

—श्रीएकनाथ.

# अनुक्रमणिका

# हकीकत

प्रस्तुत खंडही आम्हांस ठराविक मुदतींत प्रसिद्ध करतां आला नाहीं याबद्दल आम्ही अत्यंत दिलगीर आहों. अपरिहार्य अडचणींची शिळी सबब पुढें करूं नये अशी आमची अत्यंत उत्कट इच्छा होती, परंतु लंगड्यानें वाट सांगावी आणि आंधळ्यानें चालावें, अशी स्थिति असली म्हणजे एका दिवसाचा रस्ता तोडण्यास चार दिवस लागावे यांत नवल कसलें? याकरितां या दिरंगाईबद्दल वाचकवर्ग आम्हांस क्षमा करील अशी आशा आहे.

आम्हीं आरंभिलेल्या या कार्यांत निरपेक्ष बुद्धीनें ज्यांनीं आम्हांस साहाय्य केलें, त्यांचे आभार मानणें युक्त आहे. कोणतेंही सत्कार्य आपलेंच आहे, असें समजून त्या कार्यांत मदत करणारे लोक आम्हां महाराष्ट्रीयांत थोडे तरी आढळतात आणि अशा सद्गृहस्थांच्या मदतीनें आणि स्वामीजींच्या आशीर्वादानें हें कार्य आम्ही शेवटास नेऊं असा भरंवसा आम्हांस आहे. अशा प्रकारच्या पुस्तकांचे भोक्ते, केव्हांही झालें तरी बेताचेच असावयाचे, असा सामान्य अनुभव आहे, आणि हा अनुभवच लेखक आणि प्रकाशक यांस निरुत्साह करण्यास कारणीभूत होत असतो.

आतां आणखीही एका प्रकारच्या लोकांचा उल्लेख करणें आवश्यक झालें आहे. पुस्तकें मागवून मग व्ही. पी. परत करणारा वाचकवर्ग आम्हां महाराष्ट्रीयांमध्यें उपेक्षा न करण्याइतका मोठा झाला आहे, हें आम्हां प्रकाशकांचें खरोखर मोठें दुर्दैवच आहे! अशा प्रकारच्या वाचकवर्गानें पुस्तकें न मागविलीं तर तेंच आम्हांस मोठें साहाय्य झालें असें समजून त्यांचे आम्ही आभारी होऊं.

अशा प्रकारच्या अनेक अडचणींस तोंड देऊन आम्हांस आमचा मार्ग काढावयाचा असल्यामुळें थोडा अधिक वेळ लागल्यास वर्गणीदारांनीं रागावूं नये अशी त्यांस विनंति आहे.

पुढील खंड मार्च महिन्यांत प्रसिद्ध होईल.

मुंबई,<br>ता. २५-११-१३.

**प्रकाशक**



# स्वामी विवेकानंद यांचे समग्र ग्रंथ



## तृतीय खंड

## वेदांतमताचें सामान्य निरीक्षण

[ हार्वर्ड युनिव्हर्सिटीच्या तत्त्वसंशोधक मंडळापुढें ता. २५ मार्च १८९६ रोजीं दिलेलें व्याख्यान ]

वेदान्त म्हणजे अद्वैत सिद्धांत अशी समजूत सध्या सर्वत्र झाली आहे; पण वेदान्त या शब्दानें केवळ अद्वैतसिद्धांताचाच बोध होत नसून त्याच्या पोटीं आर्यावर्तातील प्रचलित असलेल्या सर्व मतांचा आणि मतांतरांचा अंतर्भाव होतो. सध्याच्या कालींही हिंदुस्थानांत अनेक मतें आणि अनेक पंथ प्रचारांत आहेत. यांपैकीं द्वैतसिद्धांत ही अगदीं खालची पायरी असून अद्वैत ही अगदीं शेवटची पायरी आहे. तत्त्वदर्शनांची जी भव्य इमारत आर्यांनीं उभारली आहे तिचा तळमजला द्वैत हा असून अद्वैतसिद्धांत हा कळस आहे असें म्हणावयास हरकत नाहीं.

वेदान्त या शब्दाचा पदशः अर्थ वेदांचा शेवट असा आहे. वेद हे आर्यांचे धर्मग्रंथ असून त्यांत कर्मकांड व ज्ञानकांड असे दोन भाग आहेत. यांपैकीं कर्मकांडांत यज्ञयागादि आचार सांगितले असून ज्ञानकांडांत तत्त्वज्ञानाचें उद्घाटन केलें आहे. ज्ञानकांडांत उपनिषदांचा अंतर्भाव होतो; तथापि सर्व उपनिषदें कर्मकांडानंतर लिहिलीं गेलीं नसून कर्मकांडांतही कित्येक उपनिषद्भाग आढळतात. भगवद्गीता हा अगदीं स्वतंत्र ग्रंथ असतांही त्याचा अंतर्भाव उपनिषदांत करण्याचा परिपाठ पडला आहे. हीं सर्व उपनिषदें व गीता यांस सामग्र्येंकरून वेदान्त अशी संज्ञा आहे. ‘श्रुति’ या संज्ञेंत केवळ कर्म-

कांडाचाच अंतर्भाव होतो असें पाश्चात्य पंडित समजतात; पण आर्यावर्तात सध्या कर्मकांड बहुतांशीं प्रचारांतून गेलें असून श्रुति म्हणजे वेदान्त असाच अर्थ तेथें रूढ झाला आहे. एखाद्या दर्शनकाराला अथवा टीकाकाराला आपल्या मताच्या पुष्टीकरणासाठीं श्रुतीचा आधार द्यावयाचा असेल तर तो नेहमीं ज्ञानकांडाकडेच धांव घेतो. वेदान्त या शब्दानें ज्या उपनिषदांचा बोध होतो तीं सर्वच संहितेनंतर लिहिलीं गेलीं असें नाहीं. उदाहरणार्थ, ईश नांवाचें जें उपनिषद आहे तें यजुर्वेद संहितेपैकींच आहे. दुसरीं कित्येक उपनिषदें ब्राह्मण ग्रंथांतून आढळतात. याशिवाय कित्येक अगदीं स्वतंत्रपणेंही लिहिलेलीं आहेत. तथापि तींसुद्धां आरंभापासूनच स्वतंत्र ग्रंथ असतील असे म्हणवत नाहीं. कारण कित्येक ब्राह्मण-ग्रंथ कालाच्या उदरांत नष्ट झाले असल्याचें आढळून आलें आहे. कदाचित् त्यांपैकीं उपनिषद्भाग मात्र शिल्लक राहून बाकीचा भाग नष्ट झाला असण्याचा संभव आहे. उपनिषदांस आरण्यकें असेंहि दुसरें नांव आहे.

यावरून अनेक धर्मग्रंथांस समुच्चयेंकरून वेदान्त असें नांव आर्यांनीं दिलें आहे असें आपणांस आढळून येईल. पूर्वपरंपरेस अनुसरून ज्यास आपल्या विशिष्ट मताचें प्रतिपादन करावयाचें असेल अशा प्रत्येक आचार्यास स्वमताच्या पुष्टीकरणार्थ या वेदान्तग्रंथांकडे धांव घ्यावी लागते. वास्तविक पाहतां बौद्ध अथवा जैन हे अगदीं स्वतंत्र धर्म असतां त्यांचे आचार्यहि स्वतःस सोइस्कर वाटेल त्या वेळीं स्वमतपुष्टीसाठीं वेदान्तग्रंथांचे आधार घेतात. यावरून वेदान्तग्रंथांचें महत्त्व आर्यावर्तात किती मोठें समजलें जातें याचें आपणांस अनुमान होतें.

हिंदुस्थानांत सांप्रत अनेक मतें प्रचलित आहेत व या सर्वांची रचना जरी वेदान्तग्रंथांच्या आधारानें झाली आहे तरी त्या सर्वांनीं स्वमतदर्शक अशीं निरनिराळीं विशिष्ट नांवें धारण केलीं आहेत. व्यासमत हें यांपैकींच एक असून भगवान् व्यासांनीं स्वमतपुष्टीसाठीं वेदान्तग्रंथांचा जितका आधार घेतला आहे तितका दुसऱ्या कोणींहि घेतलेला नाहीं. त्याचप्रमाणें सांख्यन्यायादि मतें व वेदान्त यांची एकवाक्यता करण्याचा यत्नही श्रीव्यासांच्या पूर्वीं कोणीं केला नव्हता. भगवान् व्यासांनीं जीं वेदांतसूत्रें रचिलीं आहेत त्यांच्या आधारानेंच त्यानंतरचे सर्व वेदान्तग्रंथ लिहिले गेले आहेत. खुद्द या

व्याससूत्रांवरहि अनेक सिद्धांतकारांच्या अनेक टीका आहेत. सामान्यतः विचार करतां आर्यावर्तांत सध्या तीन प्रकारचीं मतें विशेष प्रचलित आहेत. या तीन मतांच्या प्रवर्तक आचार्यांनीं आपापल्या मतानुसार श्रीव्याससूत्रांवर टीका केल्या आहेत. या तीन मतांस द्वैत, विशिष्टाद्वैत व अद्वैत अशीं नांवें आहेत. द्वैत आणि विशिष्टाद्वैत या दोन मतांचे अनुयायी आर्यावर्तांत अधिक असून त्या मानानें खरे अद्वैतमतवादी कमी आहेत. आतां या तिन्ही मतांचा विचार आपणास करावयाचा आहे. हीं तिन्ही मतें जरी भिन्न आहेत तरी त्या सर्वांचा पाया एकच आहे ही गोष्ट विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे. तो पाया म्हटला म्हणजे सांख्यदर्शन हा होय. न्याय आणि वैशेषिक या दर्शनांशीं सांख्यदर्शनाचें बहुतांशीं साम्य असून त्यांत जो फरक आहे तो कांहीं क्षुल्लक बाबतींत मात्र आहे.

द्वैत, विशिष्टाद्वैत आणि अद्वैत या तिन्ही प्रकारच्या वेदान्त्यांचें तीन गोष्टींसंबंधीं मतैक्य आहे. परमेश्वराचें अस्तित्व या तिन्ही मतांस मान्य आहे. त्याचप्रमाणें वेदग्रंथ हे अपौरुषेय आहेत हेंहि त्यांस मान्य असून कल्पाच्या कल्पनेचा अनुवाद हीं तिन्हीं मतें करतात. आतां कल्प म्हणजे काय याचा विचार या ठिकाणीं अवश्य आहे. जी जी वस्तु या विश्वांत व्यक्तदशेस आली आहे त्या प्रत्येक वस्तूचें मूलद्रव्य आकाश हेंच आहे. त्याचप्रमाणें गुरुत्वाकर्षण, आकर्षण, प्रसरण अथवा सजीवपण या सर्वांच्या ठिकाणीं जी कांहीं शक्ति दृग्गोचर होते त्या सर्व प्रकारच्या शक्तीचें मूळ अधिष्ठान प्राण हेंच होय. प्राणाचा आघात आकाशावर झाला म्हणजे या दोहोंच्या संयोगानें विश्व दृश्य होऊं लागतें. विश्व हें नवीन निर्माण होत नसून अव्यक्तरूपांतून व्यक्तरूपांत मात्र येतें ही आर्यांची मुख्य उपपत्ति आहे. विश्व निर्माण होतें अशी जी कल्पना पाश्चात्यांत आहे तिचा अनुवाद करणारा असा एकही पंथ हिंदुस्थानांत नाहीं. विश्व निर्माण होणें म्हणजे तें नवीन निर्माण होत नसून पूर्वीच्या अव्यक्तदशेंतून व्यक्तदशेंत येतें असें आमचें म्हणणें आहे. कल्पास आरंभ होण्यापूर्वी आकाश अगदीं निष्पंद व अव्यक्त स्थितींत असतें. या स्थितीनंतर प्राणाचा त्याशीं संयोग होऊं लागतो व त्यामुळें एकामागून एक पदार्थ व्यक्त होऊं लागतात. याच रीतीनें झाडेंझुडपें, पशुपक्ष्यादि प्राणी, मनुष्यें आणि तारे व ग्रहादि आकाशस्थ गोल या सर्वांची उत्पत्ति झाली आहे. या व्यक्त

स्थितींत कांहीं काळ लोटल्यानंतर ही व्यक्तावस्था संपून अव्यक्तदशेस आरंभ होतो. ज्या क्रमानें हें सारें विश्व प्रथम उत्क्रांत झालें त्याच्या उलट क्रमानें तें अपक्रांत होऊं लागतें. स्थूल रूपाचें पृथक्करण होऊन तें अधिकाधिक सूक्ष्म होत होत शेवटीं आकाशरूप धारण करतें. त्याचप्रमाणें विश्वांत अनेक प्रकारें दृश्यमान होणाऱ्या शक्तीचेंही आवरण होत होत ती आपल्या मूळच्या प्राण-रूपांत प्रवेश करते. अशा रीतीनें ही अव्यक्तस्थिति कांहीं काळ राहिल्यानंतर तिच्या समावस्थेंत बिघाड होऊन नव्या कल्पास आरंभ होतो व सर्व विश्व पुन्हां पूर्वीच्या कल्पाप्रमाणें स्थूलरूपानें प्रतीत होऊं लागतें. विश्वाचीं मूलद्रव्यें जीं प्राण आणि आकाश या दोहोंचेंहि मूळ अधिष्ठान महत् हें आहे. कल्पा-रंभापूर्वी प्राण आणि आकाश हीं दोन्ही या महत्तत्त्वांत लीन असतात. महत्त-त्त्वांतून प्राण आणि आकाश हीं नवीन निर्माण होत नसून महत्तत्त्वच या दोन रूपांनीं प्रतीत होतें. कल्प आणि विश्वाची उत्पत्ति याबद्दल आम्हां आर्यांची उपपत्ति कोणत्या प्रकारची आहे हें यावरून आपल्या लक्ष्यांत येईल.

आतां मन, आत्मा आणि परमात्मा यांबद्दल ज्या कल्पना प्रचलित आहेत त्यांचा विचार करूं. या त्रयीबद्दल जगांत जितक्या प्रकारच्या उपपत्ति अस्ति-त्वांत आहेत त्या सर्वांस कमीअधिक प्रमाणानें सांख्यदर्शनाचा आधार आहे. सांख्यदर्शनाचें महत्त्व अशा रीतीनें सर्व तत्त्ववेत्त्यांस कबूल असल्यानें सांख्य-दर्शनाचें मत या बाबतींत काय आहे याचा प्रथम विचार करणें इष्ट आहे.

आपल्या इंद्रियद्वारा बाह्य जगाचें ज्ञान आपण करून घेतों त्या वेळीं त्या क्रियेंत तीन निरनिराळ्या क्रियांचा अंतर्भाव झालेला असतो असें सांख्यांचें मत आहे. उदाहरणार्थ, आपण पाहण्याची क्रिया करतों त्या वेळीं बाह्यवस्तूचें चित्र प्रथम आपल्या डोळ्यांवर चित्रित होतें. या बाह्य डोळ्यास करण अशी संज्ञा आहे. या बाह्य करणाच्या पाठीमागें एक दृग्ज्ञानतंतु ( optic nerve ) असून त्याचा गोलक त्याच्या पाठीमागें मेंदूंत आहे. या गोलकास व ज्ञान-तंतूस इंद्रिय असें नांव सांख्यांनीं दिलें आहे. बाह्यवस्तूचें ज्ञान होण्यास करण आणि इंद्रिय यांचा संयोग होणें अवश्य आहे. यांपैकीं एखादें साधन निष्क्रिय झालें तर बाह्यवस्तूचें ज्ञान होणार नाहीं. बाह्यवस्तूचें ज्ञान होण्यास या दोन साधनांशिवाय तिसऱ्याहि एका क्रियेची अपेक्षा असते. त्याकरितां मन आणि इंद्रिय यांचाहि संयोग होणें अवश्य असतें. करण आणि इंद्रिय यांच्या

द्वारा मनास जें ज्ञान प्राप्त होतें तें ज्ञान मन बुद्धीकडे पोहोंचवितें. बुद्धि म्हणजे मनाचेंच निश्चयात्मक स्वरूप. बाह्यवस्तूंची निवडानिवड करून ही वस्तु अमुक असा निश्चय करणें हें बुद्धीचें कार्य आहे. हा पदार्थ अमुक असा बुद्धीचा निश्चय झाला म्हणजे तो निश्चय बुद्धि मनाकडे परत पाठविते आणि त्याच वेळीं पुरुष–आत्मा–अहंकाररूप होऊन मनाकडे धांव घेतो. इतकी परंपरा पूर्ण झाली म्हणजे 'अमुक वस्तूचें ज्ञान मला झालें' असें आपण म्हणतों. विश्वांतील प्रत्येक वस्तूंत प्रत्येक क्षणीं बदल सुरू आहे ही गोष्ट अर्वाचीन भौतिकशास्त्रांस मान्य झाली आहे. विश्वांतील प्रत्येक वस्तु अस्थिर–केवळ स्पंदरूप–आहे असा सिद्धांत आमच्या आर्यतत्त्वज्ञांनींही स्थापित केला आहे. या बाबतींत आमच्या प्राचीन आणि सध्याच्या भौतिकशास्त्रांची एकवाक्यता आहे. ज्याप्रमाणें बाह्यविश्वांतील प्रत्येक वस्तु स्पंदरूप आहे त्याचप्रमाणें आमचें शरीर, मन आणि बुद्धि हींसुद्धां स्पंदरूपच आहेत. यांच्या घटकांतहि प्रत्येक क्षणीं बदल सुरू आहे. बाह्यवस्तूंचे स्पंद, मन आणि बुद्धि यांच्या द्वारा ज्या मूळरूपाकडे जातात तें मूळरूपहि अस्थिर असेल, तर 'हा पदार्थ अमुक' असा निश्चय करणें आपणांस शक्य नाहीं. कारण ज्याचा निश्चय करावयाचा तो पदार्थ अस्थिर, आणि ज्यानें निश्चय करावयाचा तें मूळरूप–अधिष्ठानही–अस्थिर. अशा अस्थिर अवस्थेंत निश्चय करणें शक्य नाहीं. यावरून बाह्यपदार्थांचे स्पंद जेथें चित्रित होतात तें मूळ अधिष्ठान स्थिर असलें पाहिजे हें उघड आहे. या स्थिर अधिष्ठानास पुरुष–आत्मा–असें नांव सांख्यांनीं दिलें आहे.

मनुष्यमात्रांत बुद्धिरूपानें व्यक्त होणारें तत्त्व महत्तत्त्वाचेंच एक व्यक्त रूप आहे असा सांख्यांचा सिद्धांत आहे. महत्तत्त्व म्हणजे विश्वांतील व्यक्त बुद्धीचें समवायी अथवा मूळरूप असा अर्थ समजावा. महत्तत्त्व स्पंदरूप झालें म्हणजे तें विचाररूप धारण करतें. विचारस्पंदांपैकीं कांहींचें रूपांतर इंद्रियादि सूक्ष्मपदार्थांत होतें व बाकीच्या स्पंदांचें रूपांतर होऊन त्यांतून जडपदार्थांचे परमाणू निर्माण होतात. अशा रीतीनें एकाच महत्तत्त्वांतून हें सारें विश्व नटलें आहे. जीतून हें महत्तत्त्व निर्माण होतें त्या स्थितीस अव्यक्त अथवा प्रकृति असें नांव सांख्यांनीं दिलें आहे. प्रकृतीच्याहि पलीकडे व तिजपासून अगदीं भिन्न असें पुरुषाचें रूप आहे असें सांख्यमत आहे. पुरुष

अथवा आत्मा हा सर्वांतर्यामी असून तो कोणत्याहि विशिष्ट गुणांनीं युक्त असा नाहीं. पुरुष स्वतः कोणत्याहि क्रियेचा कर्ता नसून तो केवळ साक्षी असतो. निरनिराळ्या रंगांचीं फुलें एकत्र करून त्यांच्या ढिगासमोर एखादा स्फटिक ठेवला तर त्या स्फटिकांत निरनिराळ्या रंगांचें मिश्रण दिसतें. स्फटिक शुद्ध शुभ्रवर्णाचा असतांहि तो अनेक रंगांनीं युक्त आहे असा भ्रम पाहणाराच्या मनांत उत्पन्न होतो. त्याचप्रमाणें पुरुषाकडे कोणत्याहि क्रियेचें कर्तृत्व नसतांहि तो सर्व क्रिया करीत आहेसें भासतें, हा भ्रम आहे असें सांख्यमत आहे. प्रकृति आणि पुरुष याजबद्दलच्या सांख्यांच्या कल्पना वेदांतमतास मान्य नाहींत. प्रकृति आणि पुरुष हीं स्वभावतःच भिन्नधर्मी असल्यामुळें या दोघांचें ऐक्य संभवत नाहीं असें वेदान्त्यांचें मत आहे. हीं दोन जर अगदीं भिन्नस्वभाव आहेत असें मानलें, तर तीं एकत्र कां व्हावीं आणि प्रकृतीची उपाधि पुरुषास कां लागावी, असे वेदान्त्यांचे प्रश्न आहेत. या प्रश्नांचें समाधानकारक उत्तर देतां येत नाहीं. याकरितां प्रकृति आणि पुरुष अथवा विश्व आणि परमात्मा हीं वस्तुतः एकरूपच आहेत असें वेदान्त्यांचें मत आहे. वेदान्तमताची अगदीं खालची पायरी जें द्वैतमत त्यासहि हा सिद्धांत मान्य आहे. परमेश्वर हा सूक्ष्म व स्थूल विश्वाचें कारण आहे असें द्वैतवादीही कबूल करतात. आतां ही गोष्ट ते प्रत्यक्ष कबूल न करतां पर्यायानें कबूल करतात हें मात्र खरें आहे. परमेश्वर, आत्मा आणि सृष्टि अशा त्रयीचें कायमचें अस्तित्व आहे असें द्वैतमताचें प्रतिपादन आहे. आत्मा आणि सृष्टि हीं परमेश्वराच्या देहासारखीं आहेत असें द्वैत्यांचें मत असल्यामुळें या तिहींचेंहि वस्तुतः ऐक्य आहे हें त्यांस मान्य आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. तथापि हीं तीन अनंतकालपर्यंत एकमेकांपासून विभक्तच राहावयाचीं असेंही त्यांचें म्हणणें आहे. कल्पाच्या सुरवातीबरोबर ही त्रयी सृष्टि, जीवात्मा आणि परमेश्वर या तीन रूपांनीं व्यक्त होते व कल्पाच्या अंतानंतर ती सूक्ष्म रूपांत राहते, आणि अशा रीतीनें कल्पाच्या आरंभीं अगर कल्पांतानंतरही या त्रयीचें ऐक्य केव्हांच होत नाहीं असें द्वैतमताचें प्रतिपादन आहे. द्वैतवाद्यांचें हें म्हणणें अद्वैतवाद्यांस मान्य नाहीं.

बहुतेक सर्व उपनिषदें अद्वैतमताचें समर्थन करणारीं असल्यामुळें अद्वैतमताची सर्व इमारत त्यांच्याच आधारावर उभारली गेली आहे. सर्व उपनि-

षदांचा रोंख पाहिला तर तीं जणुं काय एकाच प्रश्नाच्या उत्तराकरितां खटपट करीत आहेत असें वाटतें. जें कांहीं जाणलें असतां जाणण्यासारखें कांहींच उरत नाहीं असें ज्ञान कोणतें, या एकाच प्रश्नाच्या उत्तरासाठीं सर्व उपनिषदें निर्माण झालीं आहेत. एक शीत जाणलें असतां ज्याप्रमाणें खंडीभर भाताचें ज्ञान होतें, त्याचप्रमाणें जें एक जाणलें असतां या सृष्टीच्या कोड्याचा अत्यंत समाधानकारक उलगडा होईल, असें एक काय आहे याच्या शोधांत सर्व उपनिषदें गुंतलीं आहेत. ज्यांतून हें सर्व विश्व निर्माण होऊन अनेक प्रकारांनीं प्रतीत झालें आहे, त्या अनेक प्रकारांस सामान्य असें मूलरूप कोणतें हें ठरविण्यासाठीं अद्वैतमताचा जन्म झाला आहे. हें मूलरूप सांपडलें म्हणजे विश्वाचें आमूलाग्र अवलोकन झालें असें म्हणावयास हरकत नाहीं. विश्व जरी अनेक रूपांनीं नटल्यासारखें दिसत आहे, तरी वस्तुतः एकाच अस्तित्वानें हीं अनेक रूपें धारण केलीं आहेत, असें अद्वैताचें मुख्य प्रतिपादन आहे. प्रकृति म्हणून जें सांख्यतत्त्व आहे तें अद्वैतमतासहि मान्य आहे; पण प्रकृति ही परमात्म्यापासून विभक्त नसून परमात्माच प्रकृतिरूपानें नटला आहे असें अद्वैतमत आहे. विश्व, मनुष्य, जीवात्मा आणि इतर सर्व पदार्थ या रूपांनीं सत् हेंच दृग्गोचर झालें आहे. बुद्धि आणि महत् हींसुद्धां त्या सत्चींच रूपें आहेत. आतां येथें एक अशी शंका उद्भवते कीं, अद्वैत्यांची सत् वस्तु जर केवलरूप आहे, तर तिचें इतक्या प्रकारच्या विश्ववस्तूंत रूपांतर होतें हें कसें? कोणत्याहि प्रकारच्या विशिष्ट गुणांनीं अगर रूपानें युक्त नसलेलें रूप अनेक गुणांनीं आणि रूपांनीं व्यक्त कसें होतें? या प्रश्नाचें उत्तर अद्वैतवाद्यांनीं आपल्या विवर्तवादानें दिलें आहे. विवर्त म्हणजे दृश्याभास. दृष्टिभ्रमामुळें भलतेंच स्वरूप भासणें यास विवर्त असा अद्वैतमताचा पारिभाषिक शब्द आहे. मूळ प्रकृतीपासून उत्क्रांतीनें सध्याची अनेकविध सृष्टि निर्माण झाली आहे असें सांख्यांचें व द्वैतवाद्यांचें म्हणणें आहे. तसेंच परमेश्वरापासून ही चराचर सृष्टि निर्माण झाली असें मानणारे कांहीं द्वैतवादी व अद्वैतवादीही आहेत; आणि चराचर सृष्टि ही परमात्मरूपापासून उद्भवलीसें **दिसतें** **अथवा भासतें,** असें मत श्रीशंकराचार्यांचें आहे. हें अद्वैतमत आहे. परमात्मा या सर्व सृष्टीचें कारण आहे ही गोष्ट खरी; पण सृष्टि हा केवळ भास आहे. जर विश्व हा केवळ भास असेल तर त्याचा

प्रत्यक्ष अनुभव कसा होतो अशी शंका येथें उद्भवते. याचें उत्तर सर्परज्जु-न्यायानें अद्वैतवाद्यांनीं दिलें आहे. अर्धवट उजेड असलेल्या जागीं दोरीचा तुकडा पडला असतां, तो सर्प आहे असा भास होऊन तो भीतिप्रद होतो. वास्तविक दोरीनें सर्पाचें रूप घेतलेलें नसतांही केवळ भ्रमानें ज्याप्रमाणें सर्प-दर्शनाइतकी भीति वाटते, त्याचप्रमाणें ब्रह्म केवलरूप असतांहि त्याच्या ठिकाणीं विश्वाचा आविर्भाव होतोसा दिसतो. देश, काल आणि निमित्त अथवा नाम आणि रूप या उपाधींच्या योगानें ब्रह्म अनेकधा नटलें आहे असा भ्रम उत्पन्न होतो. नाम आणि रूप या उपाधींमुळें 'ही वस्तु अमुक' आणि 'ती तमुक' अशी भेददृष्टि उत्पन्न झाली आहे. नाम-रूपाची कल्पना सर्वथा नष्ट झाली तर भेददृष्टि नाहींशी होऊन सर्वत्र एकच केवलरूप आहे असा अनु-भव येईल. भ्रमकालीं दोरीवर सर्पाचा भास होतो, व भ्रमनिरास झाला म्हणजे सर्प दिसेनासा होतो. या ठिकाणीं सर्पाची उत्पत्ति केवळ भ्रमरूप आहे. वास्तविक पाहतां दोरीनें सर्पाचें रूप केव्हांही घेतलें नव्हतें अथवा भ्रमनिर-सनानंतर सर्प नष्ट झाला असेंही नाहीं. या ठिकाणीं नवीन कांहींच उत्पन्न अगर नष्ट झालें नसतांही सर्प उत्पन्न झाला आणि नष्ट झाला अशा दोन्ही क्रिया झाल्याचा प्रत्यय आल्यासारखा वाटतो. त्याचप्रमाणें विश्व निर्माण होत नसतां अथवा नष्ट होत नसतांही केवळ अज्ञानामुळें विश्वाचें अस्तित्व आहे असा भ्रम उत्पन्न होतो, आणि हा भ्रम शिल्लक असेपर्यंत ब्रह्मानुभव होत नाहीं. सर्प आहे असें वाटत आहे तोंपर्यंत भीति नष्ट होत नाहीं; तसेंच हें आहे. सर्पभ्रमाचा निरास झाला म्हणजे ज्याप्रमाणें खरी दोरी दिसते आणि सर्प नाश पावतो, त्याचप्रमाणें अज्ञान नष्ट झालें म्हणजे ब्रह्मानुभव होऊन विश्वाचें अस्तित्व भासेनासें होतें. केवलरूप वस्तूच्या ठिकाणीं असा भ्रम कां उत्पन्न होतो, या प्रश्नाचें उत्तर द्वैतमतानें मायावादानें दिलें आहे. माया म्हणजे अज्ञान हेंच या साऱ्या भ्रमाचें कारण आहे. या मायेला सत्य अथवा मिथ्या असें कांहीं निश्चित स्वरूपच नाहीं. ती आहे असेंही म्हणतां येत नाहीं अथवा ती नाहीं असेंहीं निश्चयानें सांगवत नाहीं. कारण तिला निश्चयात्मक अस्तित्व असतें तर ती कधीं नष्ट झालीच नसती. अस्तित्वाचें नास्तित्व होऊं शकत नाहीं. त्याचप्रमाणें तिला मुळींच अस्तित्व नसतें तर तिजमुळें भ्रमहि उत्पन्न झाला नसता. पण भ्रम होतो हें खरें आणि त्याचा निरास

होतो, तो नष्ट होतो हेंहि खरें. याकरितां मायेचें स्वरूप अनिर्वचनीय आहे, असा अद्वैतमताचा सिद्धांत आहे. याकरितां माया हीच या विश्वभासाचें कारण आहे. ब्रह्म सत् असल्यामुळें प्रत्येक वस्तूचें तें अधिष्ठान आहे. त्या वस्तूंतील 'असणेंपणा' ब्रह्मामुळें आहे. तसेंच 'ही वस्तु अमुक' असें नाम-रूप मायेमुळें त्या असणेंपणाच्या ठिकाणीं भासतें. नाम-रूपामुळें त्या वस्तूस विशिष्टत्व व निराळेपणा प्राप्त होतो. अशा रीतीनें एकाच सत् वस्तूवर मायेमुळें अनेक नाम-रूपांचा आरोप होऊन ही चराचर सृष्टि भासमान झाली आहे. प्रत्येक जीवात्मा वेगळा आहे, या कल्पनेस अद्वैतसिद्धांतांत थारा नाहीं, ही गोष्ट आतां आपल्या लक्ष्यांत आलीच असेल. प्रत्येक जीवात्मा वेगळा दिसतो याचें कारण माया आहे असें अद्वैतमताचें म्हणणें आहे. जर सारें अस्तित्व केवळ एकरूपच आहे तर 'मी,' 'तो,' 'तूं,' या द्वैतकल्पनांस थारा कोठें राहिला? आपण सर्व वस्तुतः एकरूपच आहों, द्वैतकल्पनांचा उदय झाला कीं 'मी' 'तो' 'तूं' यांचा उदय होतो आणि यांच्या उदयाबरोबरच दुर्गुणैकमूर्ति सैतानाचाही जन्म होतो. जगांत जें जें कांहीं 'वाईट या विशेषणानें ओळखलें जातें, त्या त्या प्रत्येकाचें मूळ द्वैतभावांतच आहे असें तुम्हांला निःसंशय आढळून येईल. 'मी अमुक' असा क्षुद्र द्वैतभाव स्वतःबद्दल माझ्या मनांत उत्पन्न झाला, कीं त्याच क्षणीं बाह्यसृष्टीशीं माझी ताटातूट होते— बाह्यसृष्टीपासून मी अलग होतों. असें झालें म्हणजे भीतीहि लगेच माझ्या हृदयांत प्रवेश करते. जेथें भीतीनें प्रवेश केला तेथें दुःखही यावें हें रास्तच आहे.

हा, तो, तूं, मी इत्यादि भावना क्षुद्र आणि आकुंचित आहेत. ज्या भावनेंत असल्या प्रकारचीं द्वंद्वें उरलीं नाहींत, तीच भावना अत्यंत विशाल—सर्वव्यापक—असून परमात्म्याचें रूपहि तेंच आहे. आकुंचित भावना दुःखाचें माहेरघर असून सर्वव्यापी भावना हें सुखाचें वसतिस्थान आहे.

विश्वांतील वस्तूंत जीं नाना रूपें आणि नाना नामें प्रतीत होतात, तीं सर्व क्षणभंगुर असून मनुष्यप्राण्याचें खरें स्वरूप त्यांमुळें आच्छादित झाल्यासारखें दिसतें. तथापि या आच्छादनाचें स्वरूप चिरस्थायी नाहीं हें लक्ष्यांत ठेवलें पाहिजे. या आच्छादनामुळें मनुष्यप्राण्याचें खरें स्वरूप वस्तुतः मुळींच बदलत नसून तें बदलल्यासारखा भास होतो. अत्यंत क्षुद्र जंतूपासून अत्यंत बुद्धि-

मान् मानवी प्राण्यापर्यंत सर्वांच्या अंतर्यामीं त्या एकच परमात्मरूपाचा वास आहे. मायेचें आवरण अधिक दाट असल्यामुळें क्षुद्रप्राण्यांतील ईश्वरत्व अधिक अंधुक दिसत असून, अत्यंत बुद्धिमान् प्राण्यांत हा पडदा कमी दाट असतो, इतकाच त्या दोघांमध्यें वास्तविक फरक आहे. प्रत्येक वस्तुमात्रांत ईश्वरत्व वास करीत आहे, या मूलभूत पायावरच जगांतील एकंदर नीतिसिद्धांतांची उभारणी झाली आहे. परक्यांस कधींहि दुःख देऊं नका. तुमचें स्वतःबद्दल जितकें प्रेम आहे तितकेंच तें परक्यांवरहि असूं द्या; कारण त्यांच्या आणि तुमच्या अंतर्यामीं एकाच परमात्मरूपाचा वास आहे. सर्व विश्व वस्तुतः एक-रूपत्व असतां त्या ठिकाणीं द्वैताची खोटी भावना उत्पन्न करून परक्यांस दुःख देणें ही कुबुद्धि आहे. परक्यांस दुःख देणें म्हणजे स्वतःस दुखविण्यासारखेंच आहे, आणि परक्यावर प्रेम करणें म्हणजे स्वतःस सुखी करणेंच होय.

एकंदर अद्वैतसिद्धांतांतील नीतितत्त्वांचें सार एकाच शब्दांत सांगावयाचें म्हटलें तर तें **अहंकारविस्मृति** या शब्दानें सांगतां येईल. एकाच देहांत सर्वस्व सांठविलें आहे असें मानणारा क्षुद्र अहंकार हाच एकंदर दुःखाचें मूलकारण आहे, असें अद्वैताचें सांगणें आहे. अहंकारामुळेंच माझ्या विश्व-रूपाचा विसर मला पडतो आणि या विश्वापासून मी एक वेगळा प्राणी आहें असा भ्रम माझ्या ठिकाणीं उत्पन्न होतो. असा भ्रम उद्भवला म्हणजे असूया, क्रोध इत्यादि भावना माझ्या अंतःकरणांत घर करूं लागतात. या भावना बळावल्या म्हणजे स्वतःच्या सुखासाठीं परक्याबरोबर युद्धें सुरू होतात आणि त्यामुळें दुःखाची प्राप्ति मात्र मला हटकून होते. ही अहंकारकल्पना नष्ट झाली म्हणजे हीं युद्धें बंद होऊन त्यांबरोबर दुःखांचीही समाप्ति होईल. या-साठीं अहंकाराचा त्याग अवश्य आहे. अत्यंत क्षुद्र अशा प्राण्यासाठींसुद्धां या आपल्या देहावर पाणी सोडण्याची आपली तयारी असली पाहिजे. इतकी ज्याची तयारी झाली असेल तो मनुष्य विश्वव्यापी होण्याच्या पंथास लागला असें अद्वैतसिद्धांतांचें सांगणें आहे. विश्वव्यापी होणें हेंच अद्वैतमताचें साध्य आहे. क्षुद्र प्राण्यासाठींही देहत्याग करण्याइतकी ज्याची तयारी झाली असेल, त्या मनुष्यावरील मायेचा—अज्ञानाचा—पडदा दूर होऊन त्यास स्वतःच्या पर-मात्मरूपाचा अनुभव होईल. या चालू देहांत असतांच स्वतःच्या विश्वव्यापक-पणाचा प्रत्यय त्याला येईल. या सर्व विश्वाचें अधिष्ठान आणि स्वतःचें खरें

स्वरूप काय आहे याचा प्रत्यय त्यास त्याच वेळीं येईल. अशा रीतीनें स्वतःच्या विश्वव्यापकतेचा प्रत्यय त्याला आला, तरी त्यामुळें त्याचा चालू देह नष्ट होईल असें मात्र नाहीं. चालू देह हा प्रारब्धकर्माचा असल्यामुळें त्या कर्माचा क्षय होई-पर्यंत चालू देहहि राहीलच. आत्मानुभवानंतर केवळ कर्मक्षयाकरितां ज्याचा देहबंध राहिला आहे अशा मनुष्याला जीवन्मुक्त म्हणतात. अनुभवानंतर देह शिल्लक राहिला तरी त्यामुळें तो पुन्हां मायाजालांत सांपडत नाहीं, आणि क्षुद्र अहंकारही त्याच्या ठिकाणीं पुन्हां उद्भवत नाहीं. मृगजलाच्या आभा-सानें फसलेल्या मनुष्यास पुन्हां मृगजलाचें दर्शन झालें असतां जसा तो पुन्हां फसत नाहीं, त्याचप्रमाणें विश्वव्यापी झालेला प्राणी मायाजालाच्या देखाव्यानें फसत नाहीं. जोंपर्यंत देह अवशिष्ट असेल तोंपर्यंत आपणा सामान्य मनुष्यांप्रमाणेंच त्यास हें जग दिसत राहील; पण त्याच्या दर्शनानें तो मोह मात्र पावणार नाहीं. ब्राह्मी स्थितींत प्राप्त झालेल्या जागृतीला मोहनिद्रा पुन्हां वश करूं शकत नाहीं. अशा रीतीनें ब्रह्मस्वरूपास प्राप्त झालेल्या ज्ञान्याच्या दृष्टीनें जगाचें अस्तित्वच नष्ट होतें. देहावसानापर्यंत जीवन्मुक्ताला जगाचा अनुभव होत राहिला, तरी जग म्हणजे दुःखाचें माहेरघर हा जो आपणा सामान्य मनुष्यांचा अनुभव, तो मात्र त्याच्या ठिकाणीं संभवणार नाहीं. जग म्हणजे सच्चिदानंदरूप असेंच तो म्हणेल. स्वतः सच्चिदानंदरूप होणें हेंच अद्वैत तत्त्वज्ञानाचें साध्य आहे.



# वेदान्त आणि मानवी संस्कृति



सांप्रतचें हिंदी राष्ट्र म्हणजे जित आणि दुःखीकष्टी लोकांचा एक समुदाय आहे, असें जडबुद्धीच्या लोकांस वाटतें. जगाच्या केवळ बाह्य देखाव्याकडे पाहूनच त्याजविषयींच्या केलेल्या अनुमानांत चूक व्हावी यांत नवल नाहीं. हिंदी राष्ट्र म्हणजे केवळ स्वप्नसृष्टींत भ्रमण करणाऱ्या तत्त्ववेत्त्यांचें राष्ट्र आहे असें या लोकांचें मत आहे. केवळ ऐहिकदृष्ट्या पाहिलें असतां हिंदी लोक जित आहेत हें खरें; तथापि धर्मज्ञानदृष्ट्या ते साऱ्या जगाचे जेते आहेत हें या लोकांच्या लक्ष्यांत येत नाहीं. आतां दुसऱ्या एका दृष्टीनें विचार करतां पाश्चात्यांस आणि पौर्वात्यांस एकमेकांच्या सहवासाचा फायदा करून घेतां येण्यासारखा आहे. पाश्चात्यांत रजोगुणाचें आधिक्य असल्यामुळें त्यांच्यांत चापल्य आणि उद्यमशीलता हीं अधिक आहेत. या गुणांस पौर्वात्यांच्या विचारशीलतेची आणि अंतर्मुखतेची जोड मिळाली तर त्यांत त्यांचें हितच आहे. त्याचप्रमाणें पाश्चात्यांच्या रजोगुणाचा संसर्ग पौर्वात्यांसही हितावहच होईल. आतां हा विचार बाजूला ठेवला तरीहि आणखी एक महत्त्वाचा प्रश्न उद्भवतो. जित आणि दुःखीकष्टी अशीं हिंदी आणि यहुदी यांचीं राष्ट्रें काल-चक्राच्या एवढ्या भयंकर वावटळींत अद्यापिहि टिकून राहिलीं कशीं ? हिंदी राष्ट्राच्या जन्मानंतर कित्येक राष्ट्रें ऊर्जितदशेस येऊन धुळीसही मिळून गेलीं. त्यांच्या नांवापलीकडे त्यांच्या अस्तित्वाचा आतां मागमूसही लागत नाहीं. अशीं स्थित्यंतरें होत असतां हिंदी राष्ट्रानें आपलें अस्तित्व आजपर्यंत कायम राखिलें तें कशाच्या बळावर याचाही विचार करावयास नको काय ? हिंदु लोक आज अगदीं निःशब्द आहेत हें खरें; पण ते अद्यापि अस्तित्वांत आहेत; आणि सांप्रतकाळीं यहुदी लोकांची संख्या पूर्वीच्या पालेस्टाइनमधील संख्येहूनहि अधिक आहे. हिंदु आणि यहुदी या लोकांच्या जिवटपणाचें कारण त्यांचें धार्मिक जीवन हेंच होय.

हिंदुतत्त्वज्ञानाचा प्रसार साऱ्या जगभर झाला आहे. देशकालानुरूप त्याच्या स्वरूपांत फरक पडला आहे ही गोष्ट खरी; तथापि साऱ्या जगांतील लोकांच्या आंगांत तें मुरून गेलेलें आहे हेंही खरें आहे. त्याचप्रमाणें पूर्व-

कालीं हिंदुस्थानाचा व्यापार आफ्रिकेपर्यंत पोहोंचला होता हेंही सिद्ध झालें आहे. ज्यावेळीं युरोप खंडाचें कोठें नांवहि ऐकूं येत नव्हतें, अशा वेळीं हिंदु लोकांनीं आपला संबंध साऱ्या जगाशीं जोडला होता. यावरून हिंदु लोक आपला देश सोडून बाहेर कोठेंच गेले नव्हते या आक्षेपास जागा उरत नाहीं. हिंदुस्थानावर ज्या ज्या वेळीं परकीयांनीं आपला अंमल बसविला, त्या त्या वेळीं त्या जेत्यांस ऐहिक आणि पारमार्थिक असा दोहों प्रकारचा अलभ्य लाभ झाला आहे हेंही लक्ष्यांत ठेवण्याजोगें आहे. त्यांस ऐहिक संपत्ति जशी पुष्कळ मिळाली, त्याचप्रमाणें त्यांच्या धर्मज्ञानांतहि अनुपमेय तत्त्वरत्नांची भर पडली आहे.

पाश्चात्यांच्या बुद्धीचा कल सामान्यतः ऐहिक सुखाकडे अधिक असतो. आपल्याला चैनीच्या वस्तू अधिक कशा मिळवितां येतील आणि त्यांचा उपभोग अधिक प्रमाणावर कसा घेतां येईल, या विचारांत पाश्चात्यांचें मन गढलेलें असतें. हिंदूंची मनोभूमिका याहून निराळ्या प्रकारची आहे. आपल्या गरजा दिवसेंदिवस कमी कशा करतां येतील याचा विचार ते करीत असतात.

वेदकालापासून हिंदु लोक ईश्वराच्या शोधांत गुंतले असल्याचें आढळून येतें. या शोधांत ते गुंतले असल्याचा पुरावा वेदग्रंथांतहि आढळून येतो. या शोधांत अनेक निरनिराळ्या पायऱ्यांवरून ते आरूढ होत गेले असल्याचें दिसून येतें. पूर्वजपूजा ही त्यांची अगदीं पहिली पायरी आहे. यानंतर अग्नि, इंद्र आणि वरुण यांची पूजा आढळून येते. वरुणास सर्व देवांत श्रेष्ठ मानलें आहे. प्रथम अनेक देवदेवतांची कल्पना प्रचलित होऊन शेवटीं सर्वव्यापी अशा एकाच ईश्वराची कल्पना उरावयाची, हा प्रकार आपणांस सर्व धर्मांच्या वाढींत अवलोकनांत येतो. मनुष्यें समाज करून राहूं लागलीं तेव्हां प्रथम लहान लहान टोळया उत्पन्न झाल्या. या टोळ्यांपैकीं प्रत्येकीचा परमेश्वर निराळा असावयाचा, आणि तो सर्वशक्तिमान् असावयाचा इतकाच अर्थ 'एक ईश्वर' या शब्दांनीं समजला जात असे. हा ईश्वर जगाचा उत्पन्नकर्ता, नियंता व सर्वसाक्षी आहे असा समज असे. अशा रीतीनें अनेक देवदेवतांची कल्पना संपुष्टांत येत येत एकेश्वराची कल्पना रूढ झाली; तथापि या एकेश्वराच्या कल्पनेनें हिंदूंचें मात्र समाधान झालें नाहीं. या कल्पनेनें अगदीं सामान्य मानवी बुद्धीचें मात्र समाधान होण्याजोगें आहे; पण केवळ ईश्वराच्या

शोधाकरितां ज्यांनीं आपलें सारें आयुष्य वेंचिलें त्यांचें समाधान या कल्पनेनें होणार नाहीं.

यानंतर परमेश्वराच्या अस्तित्वाचा शोध केवळ बाह्यजगांत भटकून लागणार नाहीं असें हिंदूंस आढळून आलें आणि ही बाह्यसृष्टि सोडून ते अंतःसृष्टीचा शोध करूं लागले. या सृष्टीच्या शोधाला सुरवात झाल्याबरोबर प्रथम अंतःसृष्टीच्या स्वरूपाबद्दल प्रश्न उद्भवतो. अंतःसृष्टीच्या अस्तित्वाचें स्वरूप काय आणि बाह्यसृष्टीला जसें प्रत्यक्ष अस्तित्व आहे तसें अंतःसृष्टीलाहि आहे कीं काय अशा प्रकारचे प्रश्न उद्भवतात. या प्रश्नांच्या उत्तराचा शोध आपण करूं लागलों म्हणजे अंतःसृष्टीच्या अस्तित्वाची जाणीव ' मी आहें ' एवढ्या भावनेंतच असते. सामान्य मनुष्याच्या दृष्टीला ' मी आहें ' एवढ्या जाणीवेपलीकडे अंतःसृष्टीचा शोध लागत नाहीं. असा शोध लागला व आत्मप्रत्यय येऊन स्वतःच्या खऱ्या स्वरूपाची ओळख त्याला पटली तर सर्व विश्वाचीहि ओळख त्याला होईल. स्वतःला जाणणें म्हणजेच विश्वाला जाणणें होय. स्वतःचें ज्ञान झाल्याशिवाय विश्वाचें ज्ञान होणें शक्य नाहीं. ' आरंभीं काय होतें ?' हा प्रश्न आपणांस ऋग्वेदांतही आढळतो. या प्रश्नाचें उत्तर वेदान्तानें क्रमशः दिलें आहे. आरंभीं आत्मा होता असें वेदान्ताचें उत्तर आहे. याचा अर्थ हाच कीं ज्याला आपण विश्वात्मा, केवलरूप अथवा परमात्मा या नांवांनीं ओळखतो तेंच जगाच्या आरंभीं होतें. त्यामुळें सर्व वस्तू दृश्यत्वास आल्या आहेत, येत आहेत व पुढेंही येतील.

' आरंभीं काय होतें ? ' या प्रश्नाचें उत्तर देत असतां त्याच वेळीं एकंदर नीतितत्त्वांचें मूळ काय या प्रश्नाचे उतरही आर्यतत्त्वज्ञांनीं देऊन टाकलें आहे. ' हत्या करूं नको; परपीडा करूं नको; चोरी करूं नको; स्वतःइतकेंच आपल्या शेजाऱ्यावरहि प्रेम कर ' असल्या प्रकारचे नीतिसिद्धांत सर्व धर्मांतून जागोजाग आढळतात. पण ' असें आम्हीं कां करावें ' असा प्रश्न कोणीं विचारला तर त्याचें उत्तर मात्र त्यांनीं दिलेलें नाहीं. ' माझ्या शेजाऱ्याला त्रास देण्यांत जर फायदा आहे असें मला वाटत असेल तर तसें मीं कां करूं नये ?' या प्रश्नाला समाधानकारक आणि बिनतोड उत्तर ख्रिस्ती धर्मानें दिलेलें नाहीं. जड अथवा बाह्यसृष्टि सोडून अंतःसृष्टींत विहार करणाऱ्या हिंदूंनींच या प्रश्नाचें अत्यंत समर्पक उत्तर दिलें आहे. अमुक करावें आणि

तमुक करूं नये अशा प्रकारच्या केवळ विधिनिषेधक वचनांनीं हिंदूंचें केव्हांही समाधान झालेंच नाहीं.

आत्मा हा केवलरूप ( Absolute ), सर्वव्यापी, सर्वांतरात्मा आणि अनंत आहे असा हिंदूंचा सिद्धांत आहे. अनंत अस्तित्वें एकाहून अधिक असणें शक्य नाहीं. ज्याला कोठेंही आणि कसल्याही प्रकारचा अंत नाहीं असें अस्तित्व एकच असलें पाहिजे. कारण अशीं अस्तित्वें दोन आहेत असें मानलें, तर तीं परस्परांस मर्यादित करतील आणि यामुळें 'अनंत' या संज्ञेस तीं पात्र राहणार नाहींत हें उघडच आहे. यासाठीं अनंतत्व एकच आहे असा अद्वैताचा सिद्धांत आहे. त्याचप्रमाणें प्रत्येक देशांत निराळा म्हणून भासमान होणारा जीवात्मा हाही अनंत परमात्म्याचा अंश आहे. याकरितां परक्याला पीडा देणें म्हणजे स्वतःलाच दुखविण्यासारखें झालें नाहीं काय? एकंदर नीतितत्त्वांच्या मुळांशीं हाच सिद्धांत ग्रथित असल्याचें तुम्हांस आढळून येईल.

मनुष्य आपल्या जीवनक्रमांत अनेक प्रकारच्या चुका करीत असतो व अशा रीतीनें चुका करतां करतां त्याला अखेरीस सत्य सांपडतें असा पुष्कळांचा समज आहे. मनुष्याचा मार्ग खोट्यांतून खऱ्याकडे जाण्याचा आहे असा या लोकांचा समज असतो; कारण कोणताहि मनुष्य जेव्हां एखाद्या नव्या कल्पनेचें ग्रहण करतो तेव्हां पूर्वीच्या कल्पनेचा त्याग तो अवश्य करतोच असें त्यांचें म्हणणें आहे. पण हा समज चुकीचा आहे. असत्याला सत्याचा मार्ग केव्हांही दाखवितां येणार नाहीं. असत्य तें चिरकाल असत्यच. त्याची सत्याशीं भेट होणें शक्य नाहीं. जीवात्मा आपल्या मूलरूपाकडे धांव घेत असतां वाटेंत अनेक ठिकाणीं मुक्काम करतो. त्याच्या मुक्कामाच्या अनेक जागा आहेत; व प्रत्येक मुक्कामावर थोडा वेळ विश्रांति घेऊन तो आपला मार्ग आक्रमण करतो. यांत अमुक मुक्काम खरा आणि दुसरा खोटा असा भेद मानणें चुकीचें आहे. सर्व मुक्काम त्यास सारखेच उपयुक्त असल्यामुळें सर्वच खरे आहेत. याकरितां मनुष्य खोट्यांतून खऱ्याकडे प्रवास करीत नसून अंधुक प्रकाशांतून अधिक प्रकाशांत—एका प्रकारच्या सत्यापासून दुसऱ्या प्रकारच्या सत्याकडे—प्रवास करीत आहे असें समजावें. उदाहरणार्थ, आपण असें समजूं कीं एक मनुष्य सूर्याकडे प्रवास करीत असून निरनिराळ्या मुक्कामांवरून तो त्या

बिंबांचीं छायाचित्रें घेत आहे. तो परत आल्यावर तीं निरनिराळीं छायाचित्रें आपण परस्परांशीं ताडून पाहिलीं तर तीं एकमेकांपासून किती तरी भिन्न दिसतील. पण असा भिन्नपणा प्रत्यक्ष दिसत असतांही त्यांतील अमुक खोटें असें आपल्याच्यानें म्हणवेल काय? सर्व चित्रें एकमेकांपासून भिन्न असलीं तरी तीं एकाच वस्तूचीं चित्रें असल्यामुळें सर्वच खरीं आहेत. त्यांत दिसणारा बदल भिन्न देशकालपरिस्थितीमुळें झाला आहे. याच रीतीनें भिन्न परिस्थितीमुळें एकच सत्य भिन्न मार्गांनीं प्रकट झालें आहे. हिंदूंनीं याच सिद्धांताची ओळख पक्की करून घेतली असल्यामुळें सर्वच धर्म सत्य आहेत असें ते जाणतात. एखाद्या रानटी टोळीच्या धर्मापासून तो थेट अद्वैतसिद्धांतापर्यंतचे सारे धर्म खरेच आहेत असें हिंदूंचें मत आहे. याच कारणामुळें केवळ भिन्नधर्मी म्हणून एखाद्याचा छळ झाला अशी गोष्ट हिंदुस्थानांत कधींही घडून आली नाहीं. परधर्माबद्दल अत्यंत सहिष्णुताच नव्हे, तर पूज्यबुद्धि दाखविणारे एकटे हिंदू लोकच या पृथ्वीच्या पाठीवर आहेत, हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. एका महंमदी फकिराच्या थडग्याकडे मुसलमान लोक सध्या ढुंकूनही पाहत नसतां हिंदु लोक त्याची पूजाअर्चा करतात! अशा प्रकारचीं अनेक उदाहरणें आजमितीस तुम्हांस हिंदुस्थानांत आढळून येतील.

ज्या एकाच्या शोधांत सारें जग गुंतलें आहे तें शोधून काढीपर्यंत स्वस्थ बसावयाचें नाहीं, अशी प्रतिज्ञाच जणूं काय हिंदूंनीं केली होती. प्रत्येक वस्तूचें मूलरूप शोधून काढण्याचा यत्न आजचीं युरोपियन भौतिकशास्त्रें करीत आहेत. ज्या परमाणूंतून अथवा अणूंतून एखाद्या पदार्थास आजचें दृश्यस्वरूप प्राप्त झालें आहे, त्या परमाणूचा अथवा अणूचा शोध लागला म्हणजे त्या शास्त्राचा पुढील मार्ग आपोआपच बंद होतो. त्याचप्रमाणें अनेकशः भासमान होणारे जीवात्मे एकाच परमात्म्यापासून उत्पन्न झाले आहेत असा शोध लागला म्हणजे आपल्या धर्मसंशोधनाचाही शेवट झालाच. हें सिद्ध झालें म्हणजे जें जें कांहीं दृश्यत्वास आलें आहे, तें तें त्या एकाचेंच स्वरूप आहे असें आपणास आढळून येईल. अशा रीतीनें भौतिकशास्त्रांस ज्याचा शोध लागला नाहीं त्याचा शोध अध्यात्मविद्येनें (metaphysics) लाविला आहे. थोडासा विचार केला तर अध्यात्मसिद्धांताच्या मदतीशिवाय भौतिकशास्त्रांत पुढें पाऊलच टाकतां येत नाहीं असें आपणांस

दिसून येईल. परमाणु या शब्दाची व्याख्या भौतिक शास्त्रांनीं कशी केली आहे ती पहा. ज्याला लांबी नाहीं आणि रुंदीही नाहीं असा कण, अशी त्यांची व्याख्या आहे. आतां अशा प्रकारचा कण आपल्यापाशीं असलेल्या इंद्रियांच्या साधनांनीं आपणांस गम्य होणार नाहीं हें उघड आहे. पण लांबी-रुंदी नसलेला कण, लांबीरुंदी असलेल्या पदार्थांची उत्पत्ति करतो असें तींच शास्त्रें आपणांस सांगतात! दुसरें असें कीं दोन परमाणू एकत्र होतात तेव्हां त्यांचा एकजीव करणारा मध्यस्थ कोणी तरी असला पाहिजे. हा मध्यस्थ कोण? हा मध्यस्थ तिसरा एखादा परमाणु आहे अशी कल्पना केली, तर पूर्वींच्या दोन परमाणूंच्या आघाताचा परिणाम या नव्यावर कोणत्या प्रकारचा झाला, हा प्रश्न शेवटीं शिल्लक उरतोच. असाच प्रकार प्रत्येक भौतिक शास्त्राच्या मुळाशीं तुम्हांस आढळून येईल. भूमितिशास्त्र घ्या. भूमितिशास्त्रानें बिंदु या शब्दाची व्याख्या काय केली आहे ती पहा. ज्याचे भाग पाडतां येत नाहींत अथवा ज्याला परिमाण नाहीं तो बिंदु त्याचप्रमाणें जिला लांबी मात्र आहे पण रुंदी नाहीं ती रेषा. आतां रेषा अथवा बिंदु. यांची व्याप्ति आपल्या बाह्येंद्रिय साधनांनीं आपणांस कधीं तरी प्रतीत होणार आहे काय? त्यांची व्याप्ति बाह्येंद्रियांपलीकडच्या मनानें मात्र जाणावयाची आहे. म्हणजे जड भौतिकशास्त्रालासुद्धां मानसशास्त्राचा आधार घ्यावा लागतो असें सिद्ध होतें. आपल्या विचारांची परंपरा आपण अशाच रीतीनें लांबविली, तर जगांतील प्रत्येक वस्तूला जें कांहीं स्वरूप आहे, तें आपणच आपल्या मनानें दिलें आहे असें आपणांस आढळून येईल. जगांतील प्रत्येक वस्तूस तिचें स्वतःचें असें कांहीं स्वरूप नसून, आपण आपल्याच मनानें तिच्यावर एखाद्या विशिष्ट रूपाचा आरोप केला आहे, असें आपणांस आढळून येईल. आपण आजच्या स्थितींत एखाद्या वस्तूचें कांहीं विशिष्ट रूप पाहत असतों. पण आपल्या सध्याच्या इंद्रियांहून निराळ्या अशा एखाद्या इंद्रियाची प्राप्ति आपणांस झाली, तर त्याच वस्तूच्या स्वरूपांत आपणांस भिन्नता दिसणार नाहीं काय? आजच्या स्थितींत माझ्या समोरील पदार्थ खुर्ची आहे असें मी म्हणतों; पण उद्यां माझ्या इंद्रियांत कांहीं कारणानें फेरबदल झाला, तर त्याच पदार्थास मी काहीं निराळेंच म्हणेन हें उघड आहे. यावरून दृश्य पदार्थाचें स्वरूप द्विधा आहे, असें आपणांस आढळून येईल. माझ्या इंद्रियांच्या बाहेर कांहीं

तरी असणें–अस्तित्व–हें एक रूप, आणि तें 'अमुक' असा नामरूपाचा आरोप मीं त्याजवर करतों हें त्याचें दुसरें स्वरूप. अशा रीतीनें विश्वांतील केवळ जडपदार्थांचाच विचार करावयाचा म्हटलें, तरी शेवटीं अध्यात्मविद्येचा आधार कसा घ्यावा लागतो हें आपल्या लक्ष्यांत येईल; आणि भौतिक-शास्त्रांचे शेवटचे सिद्धांत आणि अध्यात्मसिद्धांत एकच आहे अशी आपली खात्री होईल. ज्याचा शोध लावण्यासाठीं आज सारीं शास्त्रें धडपडत आहेत, त्याचा शोध आमच्या वेदान्तानें पूर्वींच लावून ठेविला आहे.



# श्रुतींतील तत्त्वज्ञानाची उत्क्रांति



जीवात्मा, परमेश्वर आणि अशाच प्रकारच्या दुसऱ्या आध्यात्मिक प्रश्नांचा विचार वेदांत कसा केला आहे, याचें सामान्य निरीक्षण आपणांस करावयाचें आहे. आपण प्रथम संहितापासूनच आरंभ करूं. मंत्र अथवा स्तोत्रें यांच्या एकत्र संग्रहास संहिता असें म्हणतात. केवळ आर्यावर्तांतीलच नव्हे तर सर्व जगांतील ग्रंथांत संहिता हा ग्रंथ प्राचीनतम आहे. त्याच्याही पूर्वींचे असे कांहीं वारीकसारीक लेख कोठें नसतील असें नाहीं; पण त्यांस ग्रंथ असें नांव देतां येणार नाहीं. ग्रंथ या नांवास पात्र असा हा जगांतील पहिलाच ग्रंथ होय असें म्हणावयास हरकत नाहीं. या ग्रंथांत आर्यांच्या कल्पना, आकांक्षा, चालीरीती इत्यादि अनेक प्रकारची माहिती भरलेली आहे.

अगदीं आरंभींच आपणांस एक विशेष गोष्ट आढळून येते. ती अशी कीं, संहितांत बहुतेक स्तुतिमंत्र असून त्यांत देवतांची स्तुति केली आहे. या देवताही अनेक आहेत. यांत इंद्र, वरुण, मित्र, पर्जन्य इत्यादि अनेक देवतांचीं नांवें आढळतात. त्याचप्रमाणें निरनिराळ्या देवतांस निरनिराळ्या प्रकारचें सामर्थ्य होतें, अशा प्रकारच्या कथा आणि कल्पनाहि त्यांत जागोजाग आढळतात. एका सर्पानें पाणी अडविल्यामुळें वृष्टि होत नसून इंद्र हा आपल्या वज्रानें त्यास मारतो व वृष्टि करतो व पर्जन्यानें तुष्ट झालेले लोक नंतर या इंद्राची स्तुति करून हवनीय द्रव्यांनीं त्याची पूजा करतात, अशा प्रकारच्या कल्पना या मंत्रांत आढळून येतात. इंद्राची पूजा म्हणजे यज्ञ अथवा हवन हेंच होय. यज्ञांत अग्नि प्रदीप्त करून त्यांत एखाद्या प्राण्याच्या मांसाच्या आहुती इंद्राप्रीत्यर्थ देत असत. त्याचप्रमाणें यज्ञाच्या वेळीं आर्य लोक सोमपानही करीत आणि तोच सोम इंद्रालाही अर्पण करीत. सोम नांवाची वनस्पति त्यावेळीं अत्यंत लोकविश्रुत होती असें दिसतें; पण ती वनस्पति कोणती याची माहिती आज कोणासही नाहीं. त्या वनस्पतीबद्दलच्या माहितीचा मागमूसही आतां उरला नाहीं. ती वनस्पति पिवळी असतां तींतून पांढऱ्या रंगाचा रस निघतो असें त्या वेळच्या वर्णनावरून आढळून येतें. या रसाचें नंतर आसव करीत असत. हें आसव मादक असे, असें त्याच्या

वर्णनावरून दिसून येतें. आर्य लोक हें आसव स्वतः पीत व तें इंद्रादि देवतागणालाही अर्पण करीत. कित्येक वेळां अतिशय सोमपान केल्यामुळें इंद्र धुंद झाला होता असेंही वर्णन आढळतें. त्याचप्रमाणें आर्यलोकही कित्येक वेळां अतिरिक्त सोमपान करीत होते असेंही वर्णन आहे. एके वेळीं अतिशय सोमपान करून इंद्र भलत्याच गोष्टी बरळूं लागल्याचें वर्णन केलें आहे. इंद्रासारखाच दुसरा वरुण नांवाचा एक देव आहे. तो अत्यंत शक्तिमान् असून आपल्या भक्तांचें संरक्षण करतो व भक्तही त्यास सोमरसाचें अर्पण करतात असें सांगितलें आहे. त्याचप्रमाणें एका युद्धदेवतेचें व दुसऱ्या अनेक प्रकारच्या देवतांचीं वर्णनें त्यांत आढळून येतात.

याप्रमाणें अनेक देवदेवता व अनेक दंतकथा यांचा अंतर्भाव संहितांत झाला असला, तरी या दंतकथांच्या मुळाशीं एक महत्त्वाची गोष्ट विशेषेंकरून आढळते, हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. ती गोष्ट ही कीं, प्रत्येक देवतेच्या वर्णनांत अनंतत्वाची कल्पना प्राधान्येंकरून गोंविली आहे. या अनंतत्वाचें वर्णन कित्येक स्थळीं आदित्य या शब्दानें केलें आहे; आणि दुसऱ्या कित्येक स्थळीं अनेक देवतांच्या गुणांत याही गुणाचें अस्तित्व असल्याचें सांगितलें आहे. उदाहरणार्थ, इंद्र ही देवता पहा. इंद्र हा शरीरधारी असून अत्यंत बलवान्, सुवर्णाचें चिलखत घालणारा, आपल्या भक्तांबरोबर अन्नपानादि व्यवहार करणारा, आणि त्यांच्या शत्रूंबरोबर लढणारा असा असल्याचें वर्णन आढळतें; आणि दुसऱ्या एखाद्या मंत्रांत तो सर्वव्यापी, सर्वशक्तिमान् आणि सर्वद्रष्टा असल्याचेंही वर्णन केलें आहे. याचप्रमाणें वरुणाचेंही वर्णन केलें आहे. वरुण हा वातावरणाचा व पाण्याचा अधिपति असल्याचें वर्णन एखाद्या जागीं केलें असतां, दुसऱ्या प्रसंगीं तोच सर्वव्यापी आहे असेंही सांगितलें आहे. वरुणाचें ज्यांत या दुसऱ्या प्रकारचें वर्णन केलें आहे असा एक उतारा मी आपणांस वाचून दाखवितों, म्हणजे त्यावरून माझ्या म्हणण्याचें तात्पर्य आपल्या लक्ष्यांत चांगलें येईल.

**“ हा सर्वशक्तिमान् व उंच स्थळीं राहणारा देव आपल्या अगदीं संनिध असल्याप्रमाणें आपलीं सर्व कृत्यें पाहतो. मनुष्यें आपलीं कृत्यें उघडकीस येऊं नयेत अशी इच्छा करीत असलीं तरी देवतांस तीं सारीं कळतात. उभा कोण राहतो आणि चालतो कोण व एका स्थळापासून दुसऱ्या स्थळीं चोरट्यासारखा**

कोण जातो; अथवा एखाद्या गुहेंत लपून कोण बसतो हें देवतांस समजतें. दोन मनुष्यें अगदीं एकांत–निर्मक्षिक–स्थलीं कांहीं बेत करीत असलीं, तरी वरुण तेथें असतोच आणि त्यांचे सर्व बेतही तो ऐकतो. ही सर्व पृथ्वी त्याचीच आहे, आणि अनंत आकाशही त्याचेंच आहे. दोन्ही समुद्र त्याच्या अंतरंगांतच आहेत. आकाशाच्याहि पलीकडच्या एखाद्या रहिवाशानें त्याच्या मर्यादेचें उल्लंघन करण्याचा यत्न केला, तथापि तेथेंही तो वरुणदेवाच्या तडाक्यांतून सुटणार नाहीं. वरुणराजाचे दूत आकाशांतून खालीं उतरून सर्व जगभर फिरत असतात आणि त्यांच्या सर्वद्रष्ट्या हजारों नेत्रांस पृथ्वीच्या अत्यंत लांबच्या कोंपऱ्यांतील वस्तूही दिसतात."

याचप्रमाणें दुसऱ्या देवतांचींही वाटतील तितकीं उदाहरणें देतां येतील. या सर्व देवतांच्या वर्णनाची एकच तऱ्हा आपणांस सर्वत्र आढळून येते. प्रथम मर्यादित अशा गुणांचा आरोप एखाद्या देवतेवर केला असून, नंतर तीच देवता अनंतस्वरूपाची असून तिच्यांत या सर्व विश्वाचा वास व ती सर्वसाक्षी आणि विश्वनियामक आहे असें तिचें वर्णन केलें असल्याचें आढळतें. वरुणाच्या वर्णनांत आणखीही एका कल्पनेचा उगम आढळून येतो; पण ही कल्पना उगमाबाहेर विस्तार पावली नाहीं तोंच तिचा उच्छेद झाला आहे, हेंही विशेषेंकरून लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. ही कल्पना भीतीची होय. आपण पातकी असून आपल्या पातकाबद्दल क्षमा करावी, अशा प्रकारची याचना वरुणापाशीं केल्याचें एका मंत्रांत आढळून येतें; पण पुढें असल्या कल्पनांचा अगदीं क्षय झाला आहे. असल्या भीतीच्या कल्पना आर्यांनीं आपल्या भूमींत कधींहि रुजूं दिल्या नाहींत. त्यांविरुद्ध आर्यांचा इतका कटाक्ष कां होता याचा उलगडा आपणांस पुढें हळूहळू होईल. या कल्पनांचा उगम त्या काळीं झाला होता, एवढेंच सध्या लक्षांत ठेवलें म्हणजे पुरे. पाप आणि भीति या कल्पना एकेश्वरी पंथवाल्यांच्या आहेत, ही गोष्ट आपणा सर्वांस ठाऊकच आहे. या कल्पनांच्या वेदकालीन अस्तित्वावरून एकेश्वरी मत वेदकालीं उगम पावूं पाहत होतें असें दिसतें. वेदांच्या पूर्वभागांत या एकेश्वरी कल्पनांचें अस्तित्व जिकडे तिकडे आढळून येतें; पण या मतानें आर्यांचें समाधान झालें नाहीं व या कल्पनांचा त्याग करून ते पुढें सरसावले. या कल्पना केवळ बालबुद्धीसच शोभणाऱ्या आहेत अशी

त्यांची खात्री झाल्याचें दिसतें. वेदांसंबंधानें युरोपियन लोकांनीं लिहिलेले लेख व टीका हीं वाचावयास घेतलीं असतां त्यांत या एकेश्वरी मताचा उल्लेख जागोजाग केलेला पाहून आम्हां हिंदूंस लेखकाच्या बालबुद्धीबद्दल खरोबर हंसूं आल्यावांचून राहत नाहीं. परमेश्वराबद्दलची श्रेष्ठतम कल्पना म्हणजे व्यक्तिविशिष्ट परमेश्वर ( Personal God ) हीच होय असें ज्यांस लहानपणापासून बाळकडू मिळालेलें आहे, त्यांच्या बुद्धीस पुढें सरसावण्याचा धीर झाला नाहीं यांत नवल नाहीं. पाप आणि भीति या कल्पना क्षुद्र आणि तत्त्ववेत्त्यांस व अत्यंत प्रगल्भ विचारांच्या मनुष्यास शोभणाऱ्या नाहींत, अशी आमच्या आर्यतत्त्ववेत्त्यांची लवकरच खात्री होऊन, त्यांनीं या कल्पनांचा एकदम त्याग केला आणि याहून उच्च दर्जाच्या सिद्धांतांकडे ते वळले. हे सिद्धांत सिद्ध करण्याच्या कामीं त्यांनीं आपल्या बुद्धीस आटोकाट ताण दिल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें. ‘सर्व विश्वाचें निवासस्थान’ आणि ‘सर्वांतर्यामी’ अशा प्रकारचीं विशेषणें त्यांनीं आपल्या ईश्वरास लाविलीं होतीं, तथापि एकेश्वराच्या अस्तित्वाची कल्पना त्यांच्या बुद्धीस रुचली नाहीं ही गोष्ट मात्र खरी. अगदीं सामान्य मानवी बुद्धीस मात्र ही कल्पना योग्य असून तत्त्ववेत्त्याला ती शोभणारी नाहीं असें त्यांस वाटलें. हिंदुतत्त्ववेत्ते निःसीम धैर्यवान् किंबहुना धीट होते हें कबूल केल्यावांचून गत्यंतर नाहीं. अमुक एका कल्पनेपलीकडे भरारी मारावयाची नाहीं अशा प्रकारची मर्यादा त्यांनीं स्वतःस कधींच लागू करून घेतली नाहीं. हें त्याचें असामान्य धैर्य खरोखर तारीफ करण्यासारखें आहे यांत संशय नाहीं. त्यांच्या बुद्धीची प्रतिभा इतकी प्रखर होती कीं, तिच्या एखाद्या किरणाच्या दर्शनानें मी मी म्हणविणारे पाश्चात्य पंडित दिपून जातात. भट्ट मोक्षमुल्लर यांनीं एका जागीं असें म्हटलें आहे कीं ‘अत्युच्च गिरिशिखराचा प्रवास निर्धास्त अंतःकरणानें करण्यास एकटे आर्यतत्त्ववेत्ते मात्र समर्थ आहेत. उत्तुंग शिखरावर श्वासोच्छ्वास करण्याची शक्ति फक्त त्यांच्याच फुफ्फुसांत आहे. इतरेजन तेथें गेले तर त्यांची छाती खचित फाटून जाईल.’ मोक्षमुल्लर भट्टांचे हे उद्गार अगदीं यथार्थ आहेत. स्वतःच्या विवेचकबुद्धीला त्यांनीं कधींहि लगाम घातला नाहीं. त्यांनीं तिला अगदीं स्वतंत्रपणें संचार करूं दिला आणि स्वतः ते तिच्या मागें गेले. एखादी सामान्य कल्पनाही आपणां मनुष्यांस किती प्रिय असते आणि तिला आपण कसे चिकटून बसत

असतों याचा विचार करा. एखाद्या सामान्य चालीरीतीविरुद्ध कांहीं करण्याचा प्रसंग आला तर, आपलें कृत्य चांगलें असलें तरी आपल्या मनाची स्थिति कशी होते हें लक्ष्यांत आणा; म्हणजे आमच्या प्राचीन तत्त्ववेत्त्यांचें धैर्य किती खंबीर होतें, याचा थोडासा अजमास तुम्हांस होईल. आपणांस इतर लोक काय म्हणतील आणि आपली किती निंदा होईल, याबद्दल यत्किंचित्हि काळजी न बाळगतां आणि जनरूढीच्या बागुलबुवास भीक न घालतां 'मनःपूतं समाचरेत्' असें वर्तन त्यांनीं केलें. स्वतःच्या सदसद्विवेकबुद्धीस जें योग्य वाटलें, त्याचा त्यांनीं निर्भय अंतःकरणानें उपदेश केला.

वेदकालीन तत्त्ववेत्त्यांच्या विचारसरणीचें परीक्षण सुरू करण्यापूर्वी दुसऱ्या एकदोन गोष्टींचा आपण प्रथम विचार करूं. वेदांतील प्रत्येक देवता आरंभीं सामान्य पदवीची अशी कल्पिलेली असून, पुढें तिचा दर्जा वाढत जाऊन ती अनंत शक्तिमान् अशा परमेश्वराच्या दर्जास पोहोंचविली असल्याचा उल्लेख अगोदर केलाच आहे. वेदांतील प्रत्येक देवतेस याप्रमाणें सामान्य पदवीपासून अत्युच्च दर्जापर्यंत तिच्या भजकांनीं तिला पोहोंचविलें असल्याचें आढळून येतें. वेदकालीन देवतांसंबंधीं ही एक विशेष गोष्ट असून तिजसंबंधीं विचार करणें अवश्य आहे. इतर राष्ट्रांतील धर्मांचा व दंतकथांचा विचार करतां त्यांची स्थिति याहून भिन्न आहे असें आढळून येतें. बॅबिलोनियन दंतकथांचा विचार करतां त्यांतही आरंभीं अनेक देवतांची कल्पना आढळून येते; पण पुढें ही कल्पना संपुष्टांत येत येत अनेक देवतांपैकीं एकच शिल्लक राहून तिला सर्वेश्वराची पदवी प्राप्त झाल्याचें दिसतें. त्याचप्रमाणें ग्रीक देवतांचीहि गोष्ट आहे. त्यांच्यापैकीं एकाच देवतेस अग्रेसरत्व प्राप्त होऊन ती सर्वेश्वराच्या सिंहासनावर आरूढ झाल्याचें व बाकी देवता नष्ट झाल्याचें आढळून येतें. वेदकालीन देवतांची गोष्ट याहून भिन्न आहे. त्यांच्यापैकीं एकही देवता नामशेष झाली नसून सर्वच परमशक्तिमानाच्या पदावर आरूढ झाल्या आहेत. वेदकालीन देवतांबद्दलचा हा विशेष मोक्षमुल्लर भट्टांच्या लक्ष्यांत आला होता; आणि पाश्चात्य एकेश्वरीमताहून हें मत भिन्न आहे अशा अभिप्रायानें त्यांनीं या आर्यमतास Henotheism असें विशिष्ट नांव दिलें आहे. पाश्चात्यांच्या आणि पौर्वात्यांच्या कल्पनांत असा फरक कशानें उत्पन्न झाला, याचें कारण शोधण्यास फार लांब जावयास नको. ज्या स्थलीं या देवतांस सर्वेश्वरत्वाचें

दान करण्यांत आलें आहे, त्या स्थलाच्या जवळच त्याचें कारणही देण्यांत आलें आहे. ज्याप्रमाणें ग्रीक आणि बॅबिलोनियन देवतांपैकीं शेवटीं एक-एकच शिल्लक उरली व तिला सर्वेश्वरत्व देण्यांत आलें, याचप्रमाणें बौद्ध आणि जैन यांनींही आपल्या महात्म्यांपैकीं एकाला सर्वेश्वरत्वाचें दान केलें आहे. बौद्धांचा गौतमबुद्ध आणि जैनांचा जिनेंद्र हे सर्वेश्वरत्वाच्या जागीं असून, बाकी देव-देवता त्यांच्या हस्तकाच्या जागीं योजिल्या आहेत. याप्रमाणें सर्व जग एकेश्वरी मताकडे धांव घेत असतां आर्यतत्त्वज्ञ मात्र येथेंच न थांबतां पुढें सरसावले. साऱ्या जगाच्या रीतीस अपवाद म्हटला म्हणजे आर्यतत्त्वज्ञांचाच होय. पण असें कां झालें याचें कारणही त्यांनीं दिलें आहे. तें कारण इतकें पटण्याजोगें आहे कीं आर्यावर्तांतील अनेक धार्मिक विचारांची वाढ त्यामुळें झाली; एवढेंच नव्हे तर पुढें जगांतील सर्व धर्मांतही त्यामुळें क्रांति घडून येईल यांत शंका नाहीं. '**एकं सत् विप्रा बहुधा वदंति !**' हेंच तें कारण. 'जें कांहीं आहे तें एकच आहे, ज्ञाते त्याला अनेक नांवें देतात.' असा त्याचा अर्थ आहे. एखाद्या विशिष्ट देवतेची स्तुति करतांना एखादा ऋषि अथवा मंत्रपाठक त्या देवतेला सर्वेश्वरत्वाचीं विशेषणें लावतो, तेव्हां तोहि वस्तुतः त्या एकाचीच स्तुति करीत असतो असें समजावें. त्या एकाला तो स्वतःच्या इच्छेप्रमाणें निराळें नांव देतो इतकेंच. 'जें कांहीं आहे तें एकच आहे, ज्ञाते त्याला निराळीं नांवें देतात.' हेंच तत्त्व या सर्व मंत्रांच्या मुळाशीं आहे. एकाच वस्तूला अनेक नांवें दिल्यानें त्या वस्तूच्या गुणधर्मांत फरक पडत नाहीं हें उघडच आहे '**एकं सत् विप्रा बहुधा वदंति ।**' या एकाच चरणानें एकंदर धर्मविचारांत प्रचंड क्रांति घडवून आणिली आहे. हिंदुस्थानांत धर्मच्छल असा कधीं झालाच नाहीं; आणि कोणाही मनुष्याला केवळ त्याच्या धर्ममतांमुळें कोणाकडूनही उपसर्ग पोहोंचला नाहीं, या गोष्टीचें तुम्हांस मोठें नवल वाटत असेल. केवळ धर्माकरितां म्हणून दुसऱ्या देशांत भयंकर रक्तपात झाले असतां हिंदुस्थान देश मात्र या पातकापासून अगदीं अलिप्त कसा राहिला, याचें तुम्हांस आश्चर्य वाटत असेल. ईश्वरवादी, निरीश्वरवादी, अद्वैती, द्वैती, एकेश्वरी इत्यादि अनेक पंथ या देशांत सुखासमाधानानें एकत्र राहिले आहेत. केवळ देहवादी अशा चार्वाकपंथाच्या लोकांसहि खुद्द ब्राह्मणांच्या मंदिरांत मज्जाव नसे; एवढेंच नव्हे, तर ब्राह्मणांच्या दैवतांविरुद्ध आणि परमेश्वराविरुद्धही संभाषणें करण्यास त्यांस

पूर्ण मुभा असे. परमेश्वरविषयक कल्पना म्हणजे निवळ बुद्धिभ्रम आहे–थोतांड आहे–अशा प्रकारचा उपदेश करीत चार्वाकपंथी लोक देशभर फिरत असत. ब्राह्मणांनीं आपल्या पोटाची खळगी भरण्याकरितां हीं खुळें उपस्थित केलीं आहेत, असें सांगत त्यांनीं साऱ्या देशभर खुशाल फिरावें. अशा पंथाच्या लोकांसही हिंदुस्थानांत कोणाकडून उपसर्ग लागला नाहीं. त्याचप्रमाणें खुद्द गौतम बुद्धाचीही गोष्ट आहे. तो जेथें जेथें जाई तेथें तेथें त्यानें ब्राह्मणी धर्माचा उच्छेद करण्याचा यत्न केला, एवढेंच नव्हे तर ब्राह्मणांस पूज्य अशा वस्तूंचाही नाश करण्यास त्यानें कमी केलें नाहीं, असें असतांही बुद्ध अगदीं वृद्धावस्थेपर्यंत खुशाल होता हें आपणांस माहीत आहेच. त्याचप्रमाणें जैन उपदेशक ब्राह्मणी देवतांचा आणि त्यांच्या परमेश्वरविषयक कल्पनांचा उपहास करीत साऱ्या देशभर खुशाल फिरत. परमेश्वराचें अस्तित्व मानणारे लोक खुळसट आहेत असें त्यांनीं म्हणावें. अशा रीतींचीं शेंकडों उदाहरणें दाखवितां येतील. मुसलमानी धर्माची वावटळ हिंदुस्थानांत येऊन पोहोंचण्यापूर्वी धर्मच्छल या शब्दाचा अर्थही हिंदु लोकांस ठाऊक नव्हता. धर्मच्छलाच्या गोष्टींचें ज्ञान त्यांस परकीयांपासून झालें. फार लांब कशाला, पण सध्याही ख्रिस्ती देवळें बांधण्यांत आणि ख्रिस्ती धर्माचा प्रसार करण्यांत हिंदु लोकांची किती तरी मदत होत आहे! धर्माच्या नांवानें हिंदुस्थानांत कधींहि रक्तपात झाला नाहीं. केवळ हिंदुधर्मासच ही गोष्ट लागू आहे असें नाहीं. तर आर्यावर्तांत जन्म पावलेल्या प्रत्येक धर्माला आणि पंथाला ही गोष्ट लागू आहे. परमतसहिष्णुता ही आर्यावर्तांतील लोकांच्या रोमरोमांत खिळून गेली आहे. मग त्यांचा धर्म अगर पंथ कोणताही असो. बौद्धधर्माचेंच उदाहरण आपण घेऊं. कांहीं बाबतींत बौद्धधर्म हा एक श्रेष्ठ धर्म आहे यांत शंका नाहीं; पण वेदान्त आणि बौद्धधर्म हे एकच आहेत हें म्हणणें अगदीं निरर्थक आहे. ख्रिस्ती धर्म आणि मुक्तिफौज यांत जें साम्य आहे, तेंच वेदान्त आणि बौद्ध धर्म यांत आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. बौद्ध धर्मांत कांहीं अत्युत्कृष्ट अशा गोष्टी आहेत; पण त्या ज्यांच्या हातीं पडल्या त्यांस त्यांचें रक्षण चांगल्या प्रकारें करतां आलें नाहीं. महात्म्यापासून निघालेलीं तत्त्वरत्नें गांवढ्यांच्या हातीं पडल्यासारखें झालें. मूळ कल्पना उत्कृष्ट–अगदीं अनुपमेय–होत्या; आणि त्या ज्यांच्या हातीं पडल्या, त्या लोकांजवळ उत्साहही पुष्कळ होता यांत शंका नाहीं.

तथापि त्या कल्पनांची योग्य जोपासना व्हावयास इतक्याच गोष्टी पुरेशा नाहींत. त्याकरितां विचार आणि बुद्धि यांचीहि जोड अवश्य पाहिजे. बौद्ध धर्माच्या कल्पनांत 'सर्वां भूतीं सदयता' ही कल्पना फार श्रेष्ठ आहे. भूतदयेची कल्पना गांवढ्यांच्या हातीं गेली कीं तिची माती होते, ही गोष्ट आपण नेहमीं लक्ष्यांत ठेवा. विद्वत्ता आणि बुद्धिमत्ता यांच्या साहाय्यानेंच अशा कल्पनांचें योग्य चीज होतें. अशा प्रकारचा हा बौद्ध धर्म हिंदुस्थानांत जन्म पावला आणि नंतर तो बाहेर देशीं पसरविण्यास त्या धर्माचे उपदेशक कारण झाले. परक्या देशांत आपल्या धर्माच्या प्रसाराकरितां जाणारे असे बौद्ध हेच पहिले उपदेशक होत. त्या वेळीं पृथ्वीवर जे कांहीं नामांकित देश होते, त्यांत बौद्ध धर्माचा प्रसार या बौद्ध भिक्षूंनीं अथवा उपदेशकांनीं केला; पण हें प्रसाराचें कार्य चालू असतां धर्मप्रसारासाठीं म्हणून रक्ताचा एकही बिंदु जमिनीवर पडला नाहीं, हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. चीज देशांत बौद्ध भिक्षूंचा किती छळ झाला हें आपणांस इतिहासावरून कळतें. एकामागून एक अशा दोन तीन चिनी बादशहांनीं हजारों बौद्ध भिक्षूंचा वध केला. यानंतर मात्र सारें पारडें फिरलें आणि बौद्ध धर्मास अनुकूल दिवस आले. भिक्षूंचा छळ करणारांचें पारिपत्य करावयास खुद्द बादशहा तयार झाला; पण खुद्द बौद्धभिक्षूंनींच त्यास तसें करूं दिलें नाहीं. याप्रमाणें हिंदुस्थानांतील सर्व धर्मांची परमतसहिष्णुता आहे; आणि त्यांच्या अंगीं ती उत्पन्न होण्याचें कारण '**एकं सत् विप्रा बहुधा वदंति ।**' हा चरणच होय. हाच चरण आपणही विशेषेंकरून लक्ष्यांत ठेवावा अशी मीं सूचना केली, त्याचेंही कारण हेंच आहे. आमच्या आर्य ऋषींनीं इंद्र, मित्र, वरुण इत्यादि अनेक नांवांनीं ज्याला संबोधिलें तें एकच आहे. नांवें अनेक असलीं तरी अभिप्रेत वस्तु एकच आहे.

वेद हे कधीं लिहिले गेले याचा निर्णय अद्यापि झालेला नाहीं. हा काल ८००० वर्षांपूर्वीचा असावा असा अजमास आहे. हा काळ अलीकडे ओढण्याचा कितीहि यत्न अर्वाचीन पंडितांनीं केला तरी तो आठनऊ हजार वर्षांच्या अलीकडे आणतां येत नाहीं. वेदग्रंथांतून उपलब्ध झालेलीं तत्त्वकुसुमें प्राचीन युगांतलीं असलीं तरी त्यांचा ताजेपणा मात्र अद्यापि पहिल्यासारखाच कायम आहे; इतकेंच नव्हे तर पूर्वीपेक्षांहि तीं आज अधिक प्रफुल्लित दिसत आहेत असें म्हणावयास हरकत नाहीं. कारण त्या काळीं मनुष्यप्राणी सध्याइतका

संस्कृत स्थितींत नव्हता! एखाद्या क्षुल्लक मतभेदासाठीं प्रत्यक्ष भावाच्याही नरडीचा घोंट घ्यावा, ही कला मनुष्यप्राणी त्या वेळीं शिकला नव्हता! क्षुल्लक वस्तूच्या लोभानें आपल्या हजारों बांधवांचा वध करून रक्ताच्या नद्या वाहविण्याचा धडा तेव्हां त्यांस मिळाला नव्हता! सुधारणेच्या नांवाखालीं स्वतःच्या बांधवांची कत्तल करण्याचें ज्ञान त्यांस त्या वेळीं नव्हतें. यामुळें वेदांतर्गत वचनांची किंमत पूर्वीपेक्षां सध्यां शतपट अधिक वाटूं लागली आहे. '**एकं सत् विप्रा बहुधा वदंति।**' हे शब्द प्रथम लिहिले गेले त्या काळापेक्षां सध्याच त्यांचा घोष अधिक उच्चारवानें करण्याची आवश्यकता उत्पन्न झाली आहे. हिंदु, बौद्ध, मुसलमान, ख्रिस्ती इत्यादि अनेक धर्म अस्तित्वांत असले, तरी त्या सर्वांचा परमात्मा एकच आहे हें नित्य लक्ष्यांत बाळगिलें पाहिजे. परका मनुष्य परधर्माचा म्हणून जो कोणी दुसऱ्याचा उपहास करतो, तो प्रत्यक्ष आपल्या परमेश्वराचाच उपहास करतो असें म्हटलें पाहिजे.

वेदकालीं एकेश्वरी मताचा उदय होऊं पाहत होता हें अगोदर सांगितलेंच आहे. तसेंच या मतानें प्रगल्भ बुद्धीचें समाधान होऊं शकत नाहीं, हेंहि अगोदर सांगितलेंच आहे. या सर्व दृश्य जगाचें कोडें एकेश्वरी मतानें सुटत नाहीं, किंबहुना तसें होणें अशक्य आहे, ही गोष्ट आर्यतत्त्वज्ञांच्या लक्षांत लवकरच आली आणि त्यांनीं त्या मताचा त्याग केला. परमेश्वर एकच असून तो विश्वाचा शास्ता आहे असें मानिल्यानें विश्वांतील अनेक कोडीं शेवटपर्यंत कोडींच राहतात. परमेश्वराच्या या कल्पनेनें तीं सुटत नाहींत; मग त्यांतून तो परमेश्वर विश्वबाह्य आहे असें मानल्यावर तर त्या पूर्वीच्या कोड्यांत आणखी कांहींची भरच पडते. तो परमेश्वर अत्यंत शक्तिमान् आणि मनास उन्नति देणारा आहे असेंहि घटकाभर गृहीत धरलें तरी हें कांहीं आमच्या कोड्याचें उत्तर नव्हे. आमच्यापुढें सध्या अत्यंत महत्त्वाचा असा जो प्रश्न आहे, आणि ज्याचें महत्त्व दिवसेंदिवस वाढतच जात आहे, त्या प्रश्नाचें समाधानकारक उत्तर या कल्पनेनें मिळत नाहीं. विश्व कसें उत्पन्न झालें? तें कोठून उत्पन्न झालें? त्याचें अस्तित्व कशाच्या आधारावर आहे? असें आमचे प्रश्न आहेत. या प्रश्नांच्या उत्तराकरितां आर्यतत्त्ववेत्त्यांनीं विलक्षण खटाटोप केल्याचें वेदमंत्रांवरून दिसून येतें. या प्रश्नांचीं उत्तरें त्यांनीं अनेक ठिकाणीं अनेक प्रकारचीं दिलीं आहेत. या सर्व मंत्रांत पुढील अर्थांचा जो

मंत्र आहे, त्यांत हें उत्तर जितक्या सुंदर आणि काव्यमय भाषेनें दिलें आहे तितकें तें दुसऱ्या कोठें दिलेलें नाहीं.

"त्या वेळीं कांहीं होतें असें नाहीं अथवा नव्हतें असेंही नाहीं; त्या वेळीं हवा, पाणी अथवा दुसरें कांहींच नव्हतें. या सर्वांवर आवरण कशाचें होतें? या सर्वांचें अधिष्ठान काय होतें? त्या वेळीं मृत्यु नव्हता अथवा मृत्युविरहित अवस्थाही नव्हती; तसेंच दिवस नव्हता अथवा रात्रही नव्हती."

या उताऱ्यांतील मूळची शोभा भाषांतरांत बहुतांशीं नष्ट झाली आहे. मूळच्या संस्कृत भाषेंतील शब्दांचे नुसते ध्वनीसुद्धां कर्णमनोहर आहेत. "त्या वेळीं सर्वांचें आवरण करणारा परमेश्वराचा श्वास मात्र होता, पण त्याला हालचाल नव्हती." "त्यांचें अस्तित्व केवलरूप होतें आणि त्याला हालचाल नव्हती." हें वाक्य अत्यंत महत्त्वाचें आणि विशेषेंकरून लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. याच वाक्यांतून आर्यांची विश्वोत्पत्तीची कल्पना पुढें कशी निर्माण झाली आणि हें सारें विश्व म्हणजे केवळ तरंगरूप आहे असें तत्त्ववेत्त्यांनीं कसें सिद्ध केलें, हें आपणांस या वाक्यावरून कळण्याजोगें आहे. हा सारा स्पंदसमूह अत्यंत सूक्ष्मरूप धारण करतो व कांहीं काल ही स्थिति टिकून राहते. अगोदर सांगितलेल्या मंत्रांत याच कालाच्या स्थितीचें वर्णन केलें आहे. हा तरंगसमूह त्या वेळीं अगदीं निष्पंदस्थितींत होता; आणि तो हालचाल करूं लागला तेव्हां तें सारें विश्व दृश्यमान झालें अशी आर्यांची उपपत्ति आहे. जें कांहीं दिसतें अथवा भासमान होतें, त्या प्रत्येकाचें अधिष्ठान हा स्पंदसमूह असून याबाहेर असें कांहींच नाहीं; तसेंच तो अत्यंत शांत आणि स्वतंत्र आहे अशी आर्यतत्त्वज्ञांची उपपत्ति आहे.

हिंदुस्थानांत अथवा त्यासारख्या एखाद्या उष्णकटिबंधांतील प्रदेशांत ज्या कोणीं प्रवास केला असेल, त्याच्या लक्ष्यांत तेथील हवामानासंबंधीं एक विशेष गोष्ट आली असेल. पावसाळा सुरू होण्याच्या सुमारास एखाद्या दिवशीं दशदिशा प्रथम धुंद होतात. त्या वेळीं कांहीं काळ सर्वत्र अगदीं सामसूम होऊन केवळ उदासीनतेचें साम्राज्य पसरतें; झाडें आणि वेली यांचे पल्लवसुद्धां अगदीं स्तब्ध—निष्पंद—झालेले दिसूं लागतात; भयंकर उकाडा होऊं लागतो; सर्व सृष्टि उष्णतेनें जणुं काय शिजत आहे असें वाटतें. नंतर थोड्याच वेळानें आकाशाच्या अनंत विस्तारांतील एखाद्या कोंपऱ्यांत एखादा लहानसा ढग

दिसूं लागतो; नंतर तास अर्ध्यातासाच्या आंतच त्या ढगाचा विस्तार वाढत वाढत इतका मोठा होतो कीं, तो सर्व आकाश व्यापून टाकतो; नंतर ढगांवर ढग येऊं लागतात; जणुं काय ढगांच्या एका थरावर दुसऱ्या ढगांचीं पुटेंच बसत आहेत! नंतर मुसळधार पावसास सुरुवात होऊन सर्वत्र पाणीच पाणी होऊन जातें; उदासीनता नाहींशी होऊन झाडें आणि वेली आनंदानें पुन्हां डोलूं लागतात; आणि सर्व सृष्टीला नवजीवन प्राप्त झाल्यासारखें दिसूं लागतें. हीच स्थिति प्रत्येक कल्पाचे वेळीं घडते असें वेदांनीं वर्णन केलें आहे. "आरंभीं उदासीनता मात्र होती" असें एक वेदवचन आहे; या एकाच वाक्यांत कल्पारंभींची स्थिति सूचित केली आहे. या एकाच वाक्यांत अनंत अर्थ भरून सांडत आहे. फक्त तीन-चार शब्दांत इतका अर्थ भरला असल्याचें उदाहरण तुम्हांस दुसरें एकही सांपडावयाचें नाहीं. तीन कवींनीं याच प्रकारच्या स्थितीचें वर्णन केल्याचें मला आठवतें. "उजेड नव्हे, पण अंधार मात्र व्यक्त झाला होता" असें मिल्टन कवीनें म्हटलें आहे. "अंधाराच्या अंगांत सुई बोचतां आली असती" असें वर्णन महाकवि कालिदासानें केलें आहे. पण यांतील एकाही वर्णनांत वेदवचनांतील स्वारस्य आणि काव्य नाहीं.

'**ऊर्मी**' हें सृष्टीचें मूलकारण आहे, असें वेदांत सांगितलें आहे. आरंभीं जें कांहीं होतें त्याचें रूपांतर ऊर्मींत झालें; आणि या ऊर्मीचें रूपांतर होऊन ती इच्छा या रूपानें व्यक्त झाली. सर्व उत्पत्ति इच्छेपासून झाली असून जें कांहीं दिसतें अथवा भासतें त्याचें अस्तित्व इच्छेमुळेंच आहे हें विशेषेंकरून लक्षांत ठेवण्यासारखें आहे. 'ऊर्मी' हा वेदान्त आणि बौद्धमताचा मुख्य आधारस्तंभ असून पुढील सर्व इमारत याच्याच आधारावर उभी राहिली आहे. पुढें हें मत जर्मनींत गेलें व त्याच्याच आधारावर सुप्रसिद्ध जर्मन पंडित शोपेनहॉर यानें आपलें दर्शन रचिलें आहे.

"मनाचें आद्य स्वरूप जी इच्छा ती आतां प्रथम उत्पन्न झाली. आपल्या प्रज्ञाबलानें आपलें अंतःकरण शोधणाऱ्या ऋषींस, व्यक्त आणि अव्यक्त यांस जोडणारा दुवा सांपडला!" या वचनांत या तत्त्वाची ओळख आपणांस प्रथमच होते. हाही एक विशेष ध्यानांत ठेवण्याजोगा मंत्र आहे. "कदाचित् त्याला स्वतःलाच याचें ज्ञान झालें नव्हतें" अशा अर्थाचें पद मंत्राच्या

शेवटीं आहे. ही भाषासुद्धां अत्यंत काव्यमय आहे; पण यांतील काव्यरसाचा विचार बाजूला ठेवला तर विश्वाचें कोडें बहुतांशीं उकलण्याच्या स्वरूपाला या वेळीं आलें होतें असें आढळून येईल. मंत्रद्रष्ट्या ऋषींचीं मनें या वेळीं किती परिणतावस्थेस पोहोंचलीं होतीं, तें येथें उघडपणें कळण्याजोगें आहे. सामान्य मनुष्यांचें समाधान जशा प्रकारच्या उत्तरांनीं होतें, तशा प्रकारच्या उत्तरांनीं या ऋषींचें समाधान झालें नाहीं तेंच बरोबर आहे असें उघड दिसतें. यापूर्वी एक एक देवता घेऊन तिचें अधिष्ठान सर्वत्र आहे, ती सर्वव्यापि आहे असे ते म्हणत होते. पण या एकेश्वरी कल्पनेनें त्यांच्या चित्ताचें समाधान झालें नाहीं. यानंतर एखादीं कल्पना घेऊन तिचा शक्य तितका विस्तार करावयाचा अशा प्रकारच्या पद्धतीचा स्वीकार त्यांनीं केला. एखादी विशिष्ट कल्पना प्रथम घेऊन ती सर्वांचें अधिष्ठान आहे, इतकेंच नव्हे, तर ती कल्पनाच स्वतः विश्वरूप झाली आहे असें ते म्हणूं लागले. प्राण हाच सर्वांचें अधिष्ठान असून एकंदर विश्वांत जेथें जेथें हालचाल दिसते तेथें तेथें प्राण व्यक्त झाला आहे असें ते म्हणूं लागले. प्राण हा केवळ मनुष्याच्या शरिरांतच असतो असें नाहीं; तर त्याची व्याप्ति सूर्य आणि चंद्र यांतही असून एकंदर विश्वाची मूळ चालकशक्ति प्राणच आहे असा त्यांनीं निश्चय केला. गा वेळीं जे मंत्र रचिले गेलें आहेत ते अत्यंत काव्यमय आणि चित्तास तल्लीन करून सोडणारे आहेत. एखाद्या वस्तूची कल्पना इतकी सुंदर रीतीनें व्यक्त झाली आहे कीं ती वस्तू जणुंकाय आपल्यासमोरच आहे असें वाटतें. यानंतर ‘इच्छा’ ही कल्पना उदय पावली; आणि तिचा विस्तारही पूर्वींच्या कल्पनांप्रमाणेंच वाढत जाऊन ती विश्वव्यापी झाली; तथापि या कल्पनेनेंही ऋषींचें समाधान झालें नाहीं, आणि सत्याचा शोध पुढें चालू झाला.

यानंतर या इच्छेसच मुख्य पद देण्यांत येऊन तीच सर्वांचें अधिष्ठान आहे, तिच्यांतच सर्व विश्व राहतें, तिजमुळेंच हे जीवात्मे उत्पन्न झाले, तीच सर्व शक्ति देणारी आहे, तिचेंच पूजन सर्व देवता करतात, जीवित आणि मृत्यु या तिच्याच छाया आहेत, तिचेंच स्तोत्र हिमालयाचीं हिमधवल शिखरें गात असतात आणि समुद्र आपल्या सकल जलाशयानें तिचाच जयजयकार करतो, अशा प्रकारचें तिचें वर्णन केलें आहे; पण या कल्पनेनेंही आर्यऋषींचें समाधान झालें नाहीं हें अगोदर सांगितलेंच आहे.

आतां या कोड्याचें समाधानकारक उत्तर कोठून मिळणार? आर्यतत्त्ववेत्त्यांचे येथवरचे सर्व प्रयत्न बाह्यवर्ती होते. या विश्वांतील वस्तुसमूहापैकीं एखाद्याकडून तरी समाधानकारक उत्तर मिळेल अशी अपेक्षा त्यांस होती. सूर्य, चंद्र, आणि तारे यांजपासून तों विश्वांतील क्षुल्लक पदार्थांपर्यंत सर्वांची चांचणी त्यांनीं घेतली; पण या सर्वांनीं एकच उत्तर दिलें. "आमचा नियंता आमच्या बाहेर कोठें तरी आहे," हेंच त्यांचें उत्तर. याहून अधिक समाधानकारक असें उत्तर त्यांस मिळालें नाहीं. हें विश्व करणारा कोणी तरी आहे असें मानलें तर एखाद्या कारागिराची कल्पना मनांत येते. एखाद्या कारागिरानें एखाद्या इमारतीचा नकाशा प्रथम चित्तांत तयार करावा आणि नंतर त्या चित्राबरहुकूम इमारत रचावी तशीच ही विश्वरचना झाली आहे काय? बाह्य जगांत कितीहि भटकलें तरी वरील प्रश्नास 'होय' असेंच उत्तर येतें; पण हें उत्तर तर्कशास्त्राच्या कसोटीस उतरणारें नाहीं. या उत्तरानें फार तर बालबुद्धीचें समाधान होईल. तथापि बाह्यवस्तुद्वारा परमेश्वराबद्दल जें कांहीं ज्ञान आपणांस होतें, तें इतकेंच कीं तो एक चतुर कारागीर असला पाहिजे; पण या ज्ञानानें विश्वाचें कोडें सुटलें असें म्हणतां येत नाहीं. परमेश्वरानें जर हें जग अनेक वस्तूंतून निर्माण केलें असें म्हटलें, तर त्या वस्तूंस परमेश्वरापूर्वीच अस्तित्व होतें असें म्हणणें भाग आहे. जग उत्पन्न करण्यास परमेश्वरास सुद्धां कांहीं वस्तूंची अपेक्षा लागावी हें त्याच्या सामर्थ्यास मोठें उणीव आणणारें आहे. सर्वसत्ताधारी आणि विश्व-उत्पन्नकर्ता असें ज्यास म्हणावयाचें त्याची शक्ति याप्रमाणें कांहीं वस्तूंनीं नियमित होते असें म्हणणें म्हणजे परमेश्वरावर भलत्याच दूषणाचा आरोप करण्यासारखें आहे. एकेश्वरी मतांतील भयंकर दोष हाच आहे. आपणांस एखादें घर बांधावयाचें असलें तर तें बांधण्यास लागण्यापूर्वी त्यास लागणाऱ्या सर्व वस्तूंची जुळवाजुळव आपण प्रथम करतों. प्रथम वस्तु आणि नंतर कारागीर ही परंपरा आपल्या सामान्य अनुभवांतील आहे. परमेश्वरानें विश्व रचिलें, या कल्पनेचा सरळ अर्थ असा होईल कीं, त्या वेळीं सिद्ध असलेल्या वस्तूंतून जितकें कांहीं करतां येण्यासारखें होतें तितकें त्यानें केलें; म्हणजे त्याचें सामर्थ्य वस्तूनें बद्ध झालें असें होत नाहीं काय? एकसत्ताधारी परमेश्वराची कल्पना म्हणजे वस्तूंच्या शक्तीनें ज्याची शक्ति बद्ध आहे–जो स्वतः स्वतंत्र नाहीं–असा विश्वाचा कारागीर. वेदकालीन ऋषींनींही इतकाच शोध

प्रथम लावला होता. ते सामान्य बुद्धीचे पुरुष असते तर ते कदाचित् येथेंच थांबले असते. सामान्य बुद्धीचे पुरुष विचार करतां करतां थकून याच मुक्कामावर विश्रांति घेत असल्याचें आपणांस नेहमीं आढळून येतें. आजपर्यंत इतर देशांत असाच प्रकार घडून आला असल्याचें आढळून येतें. इतर देशांतील बुद्धिमान् पुरुषांनीं हा मुक्काम उल्लंघून पुढें जाण्याचा यत्न केला. या मुक्कामावरच स्वस्थ बसून राहण्याचें त्यांच्या तरलबुद्धीस रुचलें नाहीं; पण त्यांच्या भोंवतालचा सामान्य लोकसमूह अजाण असल्यामुळें, त्यानें या पंडितांचा हिरमोड करून त्यांस पुढें जाऊं दिलें नाहीं; आणि यामुळें ते देश, धर्मज्ञानाच्या बाबतींत फारच मागसले; पण जगाच्या सुदैवानें आर्यऋषिवर्ग असल्या प्रकारच्या अडथळ्यांस भीक घालण्याइतका कमकुमत नव्हता. या विश्वाच्या कोड्याचा समाधानकारक उलगडा करण्याचा निश्चय त्यांनीं केला होता. बाह्यसृष्टीचा विचार कितीही केला तरी या कोड्याचा उलगडा होणें नाहीं, असा त्यांच्या बुद्धीचा निश्चय झाल्याबरोबर ते तेथेंच न थांबतां अंतःसृष्टीकडे वळले. आपणांस जगाचें जें कांहीं ज्ञान होतें, तें आपल्या चक्षुरादि बाह्येंद्रियांनीं होत नाहीं, ही गोष्ट अंतःसृष्टीच्या अभ्यासाबरोबर प्रथम त्यांच्या ध्यानीं आली. इंद्रियद्वारा भासमान होणाऱ्या सृष्टीच्या अभ्यासानें धर्मज्ञान आपणांस होणार नाहीं अशी त्यांची खात्री झाली. धर्मज्ञान प्राप्त होण्यास उणीव कशाची आहे याचा विचार ते करूं लागले. ही उणीव अंतर्बाह्य अशा दोन प्रकारची आहे, ही गोष्ट त्यांच्या लक्ष्यांत आली. " इंद्रियद्वारा प्राप्त होणाऱ्या संज्ञांच्या योगानें धर्मज्ञान तुम्हांस होणार नाहीं. नुसते यज्ञयाग करून प्राप्त होणारें ज्ञान केवळ जडविषयांचें ज्ञान आहे. जडविषयांच्या ज्ञानानें या विश्वाचें कारण सांपडणार नाहीं. जडविषयांपलीकडे असलेल्या पुरुषाची भेट मीं घेतली आहे, असें एक ऋषिवचन आहे.

अध्यात्मज्ञानाची वाढ जसजशी होत गेली, तसतशी तिजबरोबर दुसऱ्याही एका गोष्टीची वाढ झाली आहे; पण तिजसंबंधानें केवळ नामनिर्देशच मी आज करणार आहें; कारण त्या गोष्टीचा आपल्या प्रस्तुतच्या विषयाशीं फारसा संबंध नाहीं. यज्ञयागादि बाह्य उपकरणांची वाढही धर्मज्ञानाच्या वाढीबरोबरच झाली आहे. एकीकडे धर्मकल्पनांची वाढ गणितश्रेढीनें होत असतां त्याच वेळीं दुसऱ्या बाजूस यज्ञयागादि बाह्यविधींची वाढ भूमितिश्रेढीनें होत होती. कांहीं

आर्यऋषि अंतःसृष्टीच्या शोधांत गुंतून धर्माची वाढ करीत असतां दुसऱ्या बाजूनें बाह्यविधींचें भलें मोठें रान माजत चाललें होतें. हें रान शेवटीं इतकें वाढलें कीं त्यांतील हवा कोंडून हिंदु लोकांच्या जीवितासहि धोका येण्याजोगी परिस्थिति उत्पन्न होण्याच्या मार्गास लागली. हे बाह्यविधी आम्हां हिंदु लोकांच्या हाडींमासीं इतके खिळून गेले आहेत कीं, त्यांजमुळें आम्हांभोंवतीं कांहीं बंधनें उपजतच बांधलीं जाऊन आम्ही जन्मापासून गुलाम बनतों; पण असें असलें तरी या विधींस फांटा देण्यासाठीं कंबर बांधून सज्ज झालेला असाही एक पक्ष आरंभापासूनच दृष्टीस पडतो. अमक्या वेळींच आणि अमक्या प्रकारेंच जेवावें, अमक्याच प्रकारचा पोषाक करावा अथवा अमक्याच प्रकारें ईश्वर-पूजन करावें इत्यादि बाह्यविधींच्या योगानें केवळ जडपदार्थांबद्दलची आवड मात्र दिसून येते. इंद्रियतृप्ति हाच ज्यांना मोक्ष वाटतो त्यांना हे बाह्यविधी पुरेसे वाटतात. इंद्रियें सोडून पलीकडील प्रदेशांत भराऱ्या मारण्याची ज्यांस इच्छा आहे त्यांना हे बाह्यविधी शृंखलांसारखे वाटतात. बाह्यविधींची आवड ही इंद्रियसुखाच्या आवडीची द्योतक आहे, हाच आक्षेप बाह्यविधींविरुद्ध प्रथम पुढें करण्यांत आल्याचें आढळून येतें. वास्तविक विचार केला तर आम्हां मनुष्यांची उडी इंद्रियजन्य सुखापलीकडे फारशी कधीं जातच नाहीं. आमच्या संस्कृतीच्या आड येणारा हा मोठाच दोष आपणां मनुष्यांत आहे. धर्मज्ञानाची किंमत जोखण्याचा आपला कांटासुद्धां इंद्रियें हाच आहे. धर्म, ईश्वर आणि तत्त्वज्ञान यांजबद्दल कित्येक दिवस गोष्टी ऐकाव्या आणि शेवटीं म्हणावें "काय हो, हें शिकल्यापासून मला अधिक पैसे मिळूं लागतील काय? माझ्या सुखाची वृद्धि होईल काय? माझा अमुक रोग जाईल काय?" असे कित्येक लोक तुमच्या पाहण्यांत नेहमीं येत असतील. ज्या मनुष्याला इंद्रियजन्य सुखाच्या पलीकडे दुसरी कल्पनाही कधीं उद्भवली नाहीं त्याला असें वाटावें हें रास्तच आहे. मनुष्याच्या ठिकाणीं सामान्यपणें आढळून येणाऱ्या या लालसेवरून आमच्या ऋषींनीं एक नवा सिद्धांत शोधून काढिला आहे. इंद्रियजन्य सुखाची तृप्ति हेंच आमच्या अज्ञानाचें कारण आहे असा त्यांचा सिद्धांत आहे. सत्य आणि आम्ही यांची भेट न होण्यास हाच पडदा मध्यें आड पडला आहे. बाह्यविधींची आवड आणि तद्द्वारा इंद्रियांची तृप्ति यांमुळें सत्याच्या आड एक पडदा उत्पन्न होऊन तें आम्हांस दिसेनासें होतें. या सिद्धांताची स्थापना, हें

धर्मविजयाचें एक नवेंच तोरण बांधलें गेलें. आमच्या धर्मवीरांनीं ही एक मोठ्याच माऱ्याची जागा सर केली असें म्हणावयाला हरकत नाहीं. ही जागा त्यांनीं कशी सर केली आणि या ठिकाणावरून पुढें चाल करून मायेचें नवें राज्य त्यांनीं कसें उभारिलें, हा इतिहास अत्यंत ज्ञानप्रद आहे. माया आणि तिच्या स्वरूपाची उपपत्ति हा वेदान्तदुर्गांतील मुख्य बुरूज होय. सत्य तुमच्यापाशींच आहे–किंबहुना तुम्हीच सत्यस्वरूप आहां–पण मायेच्या पडद्यामुळें सत्यावर आवरण पडलें होतें. हा वेदांताचा अंतिम सिद्धांतही याच वेळेनंतर सिद्ध होण्याच्या मार्गास लागला.

या काळानंतर आमच्या प्राचीन आर्यांचें मन या नव्या उपपत्तीच्या शोधांत गुंतलें. बाह्यजगांत भटकून आणि बाह्यविधींच्या मागें लागून आपल्या प्रश्नास समाधानकारक उत्तर मिळणें शक्य नाहीं, ही गोष्ट त्यांस पूर्णपणें कळून चुकली. बाह्यसृष्टींत भटकण्यांत युगानुयुगें खर्च केलीं तरी त्याचा उपयोग यत्किंचितहि होणार नाहीं अशी त्यांची खात्री झाली. अशी खात्री झाल्यामुळें ते अर्थातच निराळ्या दिशेनें शोध करूं लागले. अंतःसृष्टीचा अभ्यास करीत असतां त्यांस असें समजलें कीं इंद्रियजन्य सुखाची लालसा ही सत्याला आवरणरूप होऊन बसते, आणि यामुळें आम्हांस सत्यदर्शन होत नाहीं. यज्ञयाग अथवा बाह्योपचारयुक्त पूजाविधि हे आवरण दूर करण्याचे मार्ग नव्हत अशीही त्यांची खात्री झाली. स्वतःच्या मनःशक्तीचा अभ्यास करून तिचें पृथक्करण करण्याचा व त्याच्या द्वारें स्वतःपाशींच सत्य शोधण्याचा अभ्यास त्यांनीं केला. वेदान्ततत्त्वज्ञानाच्या उदयाचा काल हाच होय. अंतःसृष्टीचा अभ्यास हेंच वेदान्ताचें प्रमुख अंग आहे. यानंतर हा शोध केवळ अंतःसृष्टिद्वारा चालू असल्याचें आपणांस आढळून येतें. एखाद्या विशिष्ट धर्ममार्गांत अथवा मतांत सत्य गुरफटून राहिलेलें नसून त्याचा शोध तुम्हांस तुमच्या अंतरंगांतच लागेल असें ते आरंभापासूनच म्हणूं लागले. बाह्यसृष्टींतील कोणत्याहि चमत्काराहून अत्यंत मोठा चमत्कार म्हणजे तुमचा आत्माच होय. सर्व ज्ञानाचें आदिभांडार तुमचा आत्माच आहे. जगांत सत् म्हणून जें कांहीं आहे, ज्यावर सर्व विश्वाचें अस्तित्व अवलंबून आहे, तें तुम्हांपाशींच आहे. त्याचा शोध तुम्हांस तुमच्या स्वतःच्या जवळच लागेल असें आर्यतत्त्ववेत्ते सांगूं लागले. यांत जिचा शोध लागणार नाहीं, ती वस्तु त्रैलोक्यां-

तहि कोठें नाहीं असें तुम्ही निश्चयानें समजा. अंतःसृष्टीचा अभ्यास वाढत चालला तसतशा या गोष्टी त्यांच्या लक्षांत येऊं लागल्या. बाह्यसृष्टि ही अंतःसृष्टीचें अस्पष्ट असें परावर्तन आहे, ही गोष्ट त्यांनीं यापुढें सिद्ध केली. विश्वबाह्य परमेश्वराच्या कल्पनेपासून आरंभ करून तो ईश्वर स्वतःच्या अंतर्गत भांडारांतच आहे, येथपर्यंतचा शोध त्यांनीं क्रमाक्रमानें लाविला. सृष्टीच्या बाहेर राहणाऱ्या परमेश्वरास त्यांनीं स्वतःच्या हृदयांतच राहावयास जागा दिली! या ठिकाणीं सर्व आत्म्यांचा परमात्मा आणि आमच्यांतील सत्यस्वरूप असा तोच आहे हें त्यांनीं सिद्ध केलें.

आर्यांच्या वेदान्ततत्त्वज्ञानाचे निरनिराळे भाग यथोचित रीतीनें लक्ष्यांत आणावयाचे असले तर त्याकरितां आरंभापासून सर्व सिद्धांतांचा मनःपूर्वक अभ्यासच केला पाहिजे. तें केवळ पुस्तकी ज्ञान नव्हे, ही गोष्ट प्रथम लक्ष्यांत बाळगली पाहिजे. वेदान्त म्हणजे एखाद्या विशिष्ट तत्त्वज्ञानपंथाचें पुस्तक असा अर्थ नाहीं. पाश्चात्य पंडित क्यांट अथवा हेगेल, यांनीं जशीं स्वतःचीं मतें प्रतिपादून आपल्या तत्त्वज्ञानाचे ग्रंथ तयार केले, तशी वेदान्ततत्त्वज्ञानाची गोष्ट नाहीं हें आरंभींच ध्यानांत ठेवलें पाहिजे. निरनिराळ्या काळीं अनेकांनीं अनेक ग्रंथ लिहून वेदान्ततत्त्वज्ञानास सांप्रतचें स्वरूप आणिलें आहे. कित्येक वेळां एखाद्या ग्रंथांत पांचपन्नास निरनिराळ्या गोष्टी एकत्र केल्या असल्याचें तुम्हांस आढळेल. त्यांत कांहीं विशेष प्रकारचा व्यवस्थितपणा असल्याचें दिसणार नाहीं. यदृच्छेनें उद्भवणाऱ्या विचारांचें तें एक टांचण असल्यासारखें दिसेल. कित्येक वेळां अनेक प्रकारच्या गैरलागू अशा विचारांच्या गर्दीत एखादें बिनमोल तत्त्वरत्न आढळून येईल. उपनिषद् ग्रंथांचा अभ्यास करीत असतां एक गोष्ट मात्र विशेषेंकरून आपल्या लक्ष्यांत आल्यावांचून रहाणार नाहीं. तीं ही कीं, उपनिषदांतील सर्व कल्पना एकामागून एक वाढत्या दर्जाच्या आहेत. आर्यतत्त्वज्ञांच्या मानसिक वाढीचा उपनिषदें हा एक नकाशाच आहे. मानसिक अवस्था ज्या क्रमानें बदलत गेल्या, त्याच क्रमानें त्या नमूद केल्या गेल्या आहेत. आरंभीं अगदीं असंशोधित कल्पना आढळून येतात. यानंतर त्या चाळल्या जाऊन त्यांचें जसजसें संशोधन होत गेलें, तसतशा एकाहून एक वरचढ अशा कल्पनांचीं मालिका आढळून येते; आणि सर्वांच्या शेवटीं वेदान्ततत्त्वरत्नें सांपडतात. येथेंच या सर्व तत्त्वज्ञानपरंपरेला वेदान्त अशी शास्त्रीय

पारिभाषिक संज्ञा प्राप्त होते. प्रथम देवदेवतांच्या शोधास आरंभ होतो आणि हा शोध वाढत वाढत सर्व विश्वाच्या मुळाशीं जातो. " सर्वत्र जें कांहीं भरलें आहे तें वास्तविक एकरूपच आहे आणि तें जाणलें असतां सर्व कांहीं जाणलें जातें " हा वेदान्तांतील शेवटचा सिद्धांत होय. '**यज्ज्ञात्वा नेह भूयोन्यज्ज्ञातव्यमवशिष्यंते ।**'



# रामायण



फार जुनीं अशीं दोन वीररसप्रधान काव्यें संस्कृत भाषेंत आहेत. संस्कृतांत दुसरींहि वीररसप्रधान काव्यें शेंकडों आहेत, पण हीं दोन विशेष महत्त्वाचीं आहेत. संस्कृत भाषा प्रचारांतून गेल्यास आज दोन हजारांवर वर्षें लोटून गेलीं आहेत, पण पुष्कळ संस्कृत साहित्य आजतागाईत राहिलें आहे. रामायण आणि महाभारत या दोन सुप्रसिद्ध काव्यांबद्दल थोडीशी माहिती आज आपणांस मला सांगावयाची आहे. आर्यांच्या चालीरीती, राहणी, त्यांची संस्कृति आणि त्या वेळची लोकस्थिति यांजबद्दल पुष्कळ माहिती या काव्यांवरून होण्यासारखी आहे. या दोन काव्यांपैकीं रामायण हें अधिक जुनें—सर्वांत जुनें—काव्य आहे. यांत श्रीरामचरित्राचें वर्णन आहे. यापूर्वींचीं अशींही कांहीं काव्यें संस्कृतांत आहेत. खुद्द वेद हेच एक प्रकारच्या विशेष छंदांत रचिले आहेत; पण रामायण हेंच सर्वत्र आद्यकाव्य म्हणून समजलें जातें.

वाल्मीकि या नांवाचा ऋषि या काव्याचा कर्ता आहे. यानंतरही दुसरीं कित्येक काव्यें या जुन्या कवीच्या नांवावर दडपलीं गेलीं; आणि पुढें पुढें तर ज्यांच्याशीं त्याचा यत्किंचितही संबंध नव्हता, अशा कवितांचें कर्तृत्व याच्या गळीं बांधण्याची सामान्य रूढीच पडली. या कवीचा नव्हे असा कांहीं प्रक्षिप्त भागही या काव्यांत असेल; पण तसें असलें तरी त्याच्या सुंदर रचनेंत कांहीं उणीव आलेली नसून त्याच्या योग्यतेचें असें दुसरें एकही काव्य जगांतील भाषांत नाहीं.

आर्यावर्तांत एक तरुण पुरुष पूर्वकाळीं होऊन गेला. लोकमान्य असें कुटुंबपोषणाचें एकही साधन त्याला उपलब्ध नव्हतें. शरिरानें तो धट्टाकट्टा आणि चपळ असल्यामुळें शेवटीं तो वाटमाऱ्याचा धंदा करूं लागला. एकटादुकटा वाटसरू गांठून त्याला लुबाडावें आणि या कर्मांवर प्राप्त होणाऱ्या पैशानें स्वतःचीं मातापितरें, स्त्री आणि मुलें यांचें पोषण करावें असा त्याचा जीवनक्रम सुरू झाला. कित्येक वर्षेंपर्यंत त्याचा हा धंदा अबाधित चालला असतां एके दिवशीं नारदमुनींची व त्याची रस्त्यांत गांठ पडली. आपल्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें त्यानें मुनींवरही हल्ला केला व त्यांजजवळील चीजवस्त तो मागूं लागला.

तेव्हां नारदमुनि म्हणाले, " अरे, कोणाहि मनुष्यास लुटणें अथवा त्याचा जीव घेणें हें महत्पाप आहे; तूं हें पापकर्म कां करतोस?" लुटारू म्हणाला, " माझ्या बायकापोरांचें पोषण करावयाला पैसा नको काय? तो मी याच रीतीनें मिळवीत असतों." मुनींनीं विचारलें, " अशा रीतीनें मिळविलेल्या पैशाचा उपभोग तीं घेतात; पण त्यापासून प्राप्त होणाऱ्या पापाचा वांटाही तीं घेतील काय?" वाटमाऱ्यानें उत्तर दिलें, " होय. तीं अवश्य घेतील, अशी माझी खात्री आहे." मुनि म्हणाले, " तर मग या झाडाशीं मला बांधून ठेवून तूं घरीं जा आणि आपल्या माणसांस याबद्दल विचारून ये. तुझ्या पापांतही तीं वांटेकरी होतील कीं नाहीं याची चौकशी कर." मुनींनीं सांगितल्याप्रमाणें तो वाटमाऱ्या आपल्या घरीं गेला व प्रथम आपल्या बापाला भेटून म्हणाला " बाबा, मी कुटुंबपोषण कोणत्या धंद्यावर करतों हें तुम्हांला ठाऊक आहे काय?" बाप म्हणाला, " नाहीं. ती चौकशी मला कशाला हवी?" लुटारू म्हणाला, " मी वाटमाऱ्याचा धंदा करतों. रस्त्यांतील एकट्यादुकट्या वाटसरास मी लुबाडून पैसा मिळवितों." बाप म्हणाला, " काय? तूं असलें भयंकर कर्म करतोस? मांगा, चल चालता हो येथून." लुटारू आपल्या आईकडे जाऊन तिला म्हणाला, " आई, तुम्हां सर्वांचा चरितार्थ मी कसा चालवितों हें तुला ठाऊक आहे का?" आईनें नकारार्थी उत्तर देतांच चोर म्हणाला, " वाटसरांस लुटून आणि त्यांचा जीव घेऊन मी कुटुंबपोषण करतों." आई म्हणाली, " काय भयंकर कर्म हें!" लुटारूनें विचारलें, " आई, माझ्या या पापाची वांटेकरीण तूं होशील का?" आईनें उत्तर दिलें, " मी तुझ्या पापाचा वांटा कां घ्यावा? वाईट काम करायला तुला मीं सांगितलें नाहीं; अथवा मीं स्वतःही केलें नाहीं." हें उत्तर ऐकून घेऊन तो आपल्या बायकोकडे जाऊन म्हणाला, " तुम्हां सर्वांच्या पोटाला घालण्याकरितां लागणारा पैसा मी कसा मिळवितों याची तुला माहिती आहे?" तिनेंही नकारार्थी उत्तर दिलें; तेव्हां तो म्हणाला, " मी वाटमाऱ्याचा धंदा करतों. आज कित्येक वर्षें मी वाटसरांस लुटीत असतों. तुम्ही जें अन्न खातां तें मी अशाच रीतीनें आजपर्यंत मिळवीत आलों आहें. आतां मला सांग बरें, या माझ्या पापाचाही वांटा तूं घेशील कीं नाहीं?" स्त्री म्हणाली, " कधींच नाहीं. तुम्ही यजमान आहां. भल्याबुऱ्या रीतीनें माझा सांभाळ करणें तुमचें कामच आहे."

हीं उत्तरें ऐकून बिचाऱ्या लुटारूचे डोळे खाडकन् उघडले. ज्यांच्यासाठीं आपण वाटमाऱ्याचें पापकर्म केलें, तीं आपलीं सोयरींधायरीं, खुद्द आई-बापही–आपल्या पापांत वांटेकरी होत नाहींत हें पाहून त्याला दुनियेची रीत पूर्णपणें कळून चुकली. ज्या ठिकाणीं नारदमुनींस त्यानें बांधून ठेविलें होतें, तेथें तो परत आला आणि मुनींस मुक्त करून त्यानें त्यांजपुढें साष्टांग दंडवत घातलें; आणि घरीं घडलेली सर्व हकीगत त्यांस सांगून तो म्हणाला, "मुनिमहाराज, आतां या संसाराच्या तापत्रयांतून माझी सुटका करा. मीं आतां यापुढें काय करावें याचा मला उपदेश करा." मुनि म्हणाले, "आतां हा वाटमाऱ्याचा धंदा सोड. तुझ्या कुटुंबांतील मनुष्यांचें प्रेम तुजवर कितपत आहे हें आतां तुला कळून चुकलें आहे. "**जन हें सुखाचें दिल्या घेतल्याचें। बा अंतकाळींचें नाहीं कोणी**" हें लक्ष्यांत ठेव. जोंवर आपणाजवळ थोडीफार संपत्ति असते, तोंवर प्रेम प्रेम म्हणून अनेक लोक आपल्याभोंवतीं गोळा होतात; पण आपली थैली रिकामी झाल्याबरोबर आपल्याजवळ माशीसुद्धां उभी रहावयाची नाहीं. यासाठीं असल्या पिशुनांची संगति सोडून दे, आणि जो तुझ्याबरोबर सर्वत्र आणि सर्वकाळ असतो आणि तुझ्या बऱ्यावाईट वेळींही तुला मोकलित नाहीं, त्याची संगत धर. त्याच्याबद्दलचें प्रेम हेंच खरोखर प्रेम या नांवास पात्र आहे. तें प्रेम मात्र तुला अधोगतीस जाऊं देणार नाहीं. जगांत तेंच प्रेम मात्र निरपेक्ष आहे. त्या प्रेमांत स्वार्थाचा लवलेशही नाहीं."

असा उपदेश करून नारदमुनींनीं त्याला राममंत्राचा उपदेश केला. तो लुटारूही त्या दिवसापासून आपला धंदा सोडून देऊन अरण्यांत निघून गेला. तेथें एकांतस्थलीं तो चिंतन आणि जप करूं लागला. शेवटीं त्याची वृत्ति इतकी तन्मय झाली कीं तो देहभान विसरला. अशा स्थितींत तो असतां मुंग्यांनीं त्याच्या शरीरावर वारूळ बांधलें, तरी त्याच्या चित्ताची एकाग्रता बालाग्रही ढळली नाहीं. पुढें कांहीं दिवस लोटल्यानंतर देववाणी झाली कीं "अहो सिद्ध, उठा." या ध्वनीनें तो एकदम जागा झाला आणि म्हणाला "सिद्ध? छे छे, मी सिद्ध कशाचा? मी तर वाटमाऱ्या आहें." पुन्हां वाणी झाली, "तूं वाटमाऱ्या नाहींस. तूं जीवन्मुक्त सिद्ध पुरुष आहेस. मुंग्यांनीं तुझ्या देहाभोंवतीं वारूळ बांधलें तरीसुद्धां तुझी वृत्ति ईशचिंतनांतून भ्रष्ट झाली नाहीं. या तुझ्या तपाच्या योगानें तुझें मागील पाप भस्म झालें आहे.

पूर्वीचा वाटमाऱ्या नष्ट होऊन त्या जागीं आतां वारुळांतून–वल्मीकांतून–एक नवा सिद्ध जन्मास आला आहे; याकरितां यापुढें तूं वाल्मीकि या नांवानें प्रसिद्धीस येशील." अशा रीतीनें वाटमाऱ्याचा ऋषि झाला.

या ऋषीला कवित्व प्राप्त झाल्याची हकीगतहि फार मनोरंजक आहे. एके दिवशीं हे ऋषि स्नानाकरितां गंगानदीवर जात असतां वाटेंत क्रीडा करीत असलेलें क्रौंच पक्ष्याचें एक जोडपें त्यांच्या नजरेस पडलें. तें जोडपें क्रीडा करीत व एकमेकांचें चुंबन घेत होतें. त्या जोडप्याकडे पाहून ऋषिवर्यांस फार आनंद झाला. इतक्यांत एक बाण सूंसूं करीत आला व नराच्या हृदयांत शिरून त्यानें त्याचा प्राण घेतला. नर मरून खालीं पडल्याबरोबर मादी त्याच्या शरीराभोंवतीं गरगर फिरून दुःखित होत्साती तारस्वरानें आक्रंदन करूं लागली. हा देखावा पाहून ऋषीचें मृदु अंतःकरण एकदम पाझरलें. त्यांनीं बाजूला वळून पाहिलें तों एक निषाद त्यांच्या नजरेस पडला. त्याला पाहतांक्षणींच ते एकदम बोलूं लागले, "**मा निषाद प्रतिष्ठां त्वमगमः शाश्वतीः समाः। यत्क्रौंचमिथुनादेकमवधीः काममोहितम्।**" भाषण संपल्यावर ऋषि आपल्याच मनाशीं त्याबद्दल विचार करूं लागले; "अशा प्रकारचें भाषण मीं पूर्वीं कधींही केलेलें नसतां आजच असें कसें झालें! माझ्या भाषेंत ही विशिष्ट रचना कोठून आली?" अशा प्रकारचे विचार त्यांच्या चित्तांत सुरू आहेत तोंच ती पूर्वीची वाणी पुन्हां बोलूं लागली. "भिऊं नको. तुला कवित्व प्राप्त झालें आहे. तूं बोललास ती छंदोबद्ध कविता आहे. आतां श्रीरामचरिताचें कविताबद्ध वर्णन कर. तें साऱ्या जगाला उपकारक होईल." संस्कृत भाषेंत कविता प्रथम निर्माण झाल्याची हकीगत अशी आहे. कविता प्रथम जन्मास आली ती सकरुण अंतःकरणांतून आली. वाल्मीकि ऋषि हे संस्कृत कवितेचे जनक होत. यानंतर त्यांनीं रामचरिताचें कविताबद्ध वर्णन केलें आणि तेंच पुढें रामायण या नांवानें प्रसिद्धीस आलें. ती रामायणकथा आतां थोडक्यांत सांगतों.

पूर्वकालीं अयोध्या नांवाची एक नगरी होती. सांप्रतही हें शहर अस्तित्वांत असून याच नांवानें प्रसिद्ध आहे. हिंदुस्थानच्या इंग्रजी नकाशांत Oudh म्हणून जो प्रांत दाखविला आहे त्यांत हें शहर आहे. या शहरीं एके काळीं दशरथ नांवाचा राजा राज्य करीत होता. त्या राजाला तीन राण्या होत्या; पण त्याला संतान नव्हतें. आमच्या पूर्वापार पद्धतीस अनुसरून राजानें पुत्र-

प्राप्तीसाठीं अनेक उपाय केले. पुढें त्याला चार पुत्र झाले. त्यांत राम हा सर्वांत वडील होता. पूर्वपद्धतीप्रमाणें राजानें आपल्या चारी पुत्रांस सर्व प्रकारच्या विद्येंत व कलांत तरबेज केलें. आपल्या पाठीमागें राज्याबद्दल आपल्या पुत्रांत तंटेभांडणें उपस्थित होऊं नयेत म्हणून राजे लोक आपल्या देखतच वडील पुत्रास राज्याभिषेक करीत असत. हा अभिषेक झाल्यानंतर त्या पुत्रास युवराज म्हणजे तरुण राजा अशी पदवी प्राप्त होई. या चालीप्रमाणें दशरथ राजानें आपल्या वडील पुत्रास यौवराज्य देण्याची तयारी केली.

त्याच वेळीं आर्यावर्तांत जनक नांवाचा दुसरा एक राजा होता. त्याला सीता या नांवाची एक अत्यंत लावण्यवती कन्या होती. सीतेची उत्पत्ति पृथ्वीपासून झाली होती. जमीन नांगरते वेळीं जो तास पडतो त्याला जुन्या संस्कृत भाषेंत सीता असें नांव आहे. उत्पत्तीचे नानाप्रकार जुन्या दंतकथांतून वर्णिल्याचें आढळून येतें. कोणा एखाद्याची उत्पत्ति केवळ पुरुषापासून होत असे; एखाद्याची मानवी आईबापांवांचून होत असे. कोणा एखाद्याचा जन्म यज्ञांतील अग्नीपासून झाल्याचें वर्णन आढळतें. तसेंच आणखी एखादा मेघांतून अवतरला असेंही वर्णन आहे. भारतीय पुराणग्रंथांतून अशा प्रकारच्या अनेक कथा गोंवल्या असल्याचें तुम्हांस आढळून येईल. सीता ही पृथ्वीची कन्या असल्यामुळें अत्यंत पवित्र होती. तिला जनक राजानें वाढविलें होतें. ती उपवर झाली तेव्हां जनक राजानें तिच्या विवाहाची तयारी केली.

हिंदुस्थानांत पूर्वी स्वयंवराची चाल होती. स्वयंवराचे वेळीं देशोदेशींचे राजे व राजपुत्र येत असत आणि कन्या त्यांपैकीं एखादा पसंत करीत असे. हातांत पुष्पमाला घेऊन राजकन्या सभामंडपांत फिरत असे व तिजबरोबर तिची सखी असून ती तिला प्रत्येक राजाबद्दल माहिती सांगत असे. राजकन्येस एखादा वर पसंत पडला म्हणजे तिनें आपल्या हातांतील माळ त्याच्या गळ्यांत घालावयाची व नंतर विवाहसमारंभ मोठ्या थाटानें व्हावयाचा अशी चाल असे.

सीतेला वरण्यास पुष्कळ राजकुमार अत्यंत उत्सुक झाले होते. सभा भरल्यावर तेथें हरधनु नांवाचें एक प्रचंड धनुष्य आणून ठेवलें; आणि जो कोणी तें धनुष्य मोडील त्यालाच सीता वरील असा पण लाविला. पुष्कळ राजपुत्रांनीं तें धनुष्य मोडण्यासाठीं आपली सर्व शक्ति खर्च केली; पण

त्यांच्यानें तें धनुष्य भंगवलें नाहीं. शेवटीं रामानें तें धनुष्य उचललें आणि सहज लीलेनें मोडून टाकिलें. नंतर दशरथपुत्र राम व सीता यांचा विवाह-समारंभ मोठ्या आनंदानें साजरा करण्यांत आला. आपल्या पत्नीला घेऊन राम राजधानीस परत आल्यानंतर त्याला यौवराज्याचा अभिषेक करण्याची तयारी दशरथ राजानें केली. समारंभाची कडेकोट तयारी केली होती आणि सर्वत्र आनंदीआनंद पसरला होता. इतक्यांत रामाची सापत्न माता कैकेयी हिनें त्या साऱ्या आनंदांत विरजण घातलें. पूर्वी एके वेळीं राजा दशरथानें तिला दोन वर देऊं केले होते; पण तिनें त्या वेळीं ते मागून घेतले नाहींत. तिला त्या वरांचें स्मरणही राहिलें नव्हतें; पण तिच्या एका दासीनें तें स्मरण तिला या वेळीं करून दिलें, आणि ते वर मागून घेण्याबद्दल सुचविलें. ती दासी अत्यंत दुष्ट स्वभावाची होती. कैकेयीचा भरत नांवाचा पुत्र होता, त्याला या वेळीं यौवराज्याभिषेक करून घेण्याबद्दल तिनें कैकेयीचें मन वळविलें. तिनें नानाप्रकारच्या गोष्टी कैकेयीस सांगून तिच्या मनांत भयंकर मत्सर उभा केला. मत्सराग्नीनें ती नुसती जळूं लागली. तिची इतकी स्थिति झाल्यानंतर, एका वरानें भरतास यौवराज्याभिषेक व दुसऱ्यानें रामाला चौदा वर्षें वनवास मागून घे असें त्या दासीनें तिला सांगितलें.

राम हा दशरथ राजाचा अगदीं जीव कीं प्राण होता. कैकेयीचें मागणें त्याच्या कानावर पडल्याबरोबर वज्राघात झाल्याप्रमाणें त्याची स्थिति झाली. वचनभंग करण्याची छाती त्याला होईना आणि रामालाही त्याला दूर करवेना. एकीकडे आड आणि दुसरीकडे विहीर अशी त्याची स्थिति झाली. पण या स्थितींतून रामानें त्याची मुक्तता केली. राम स्वतःच वनवासास जाण्यास तयार झाला. पित्यानें वचनभंग करावा यापेक्षां आपणच वनवास पत्करावा हें बरें, असा निश्चय करून तो वनवासास गेला, त्या वेळीं त्याची पत्नी सीता व धाकटा भाऊ लक्ष्मण हींही त्याजबरोबर गेलीं.

या वेळीं आर्यावर्तातील भयंकर अरण्यांतून अनेक जातींचे मूळचे रानटी लोक राहत असत. त्यांजबद्दल आर्यांस फारशी माहिती नसे, याच रानटी लोकांपैकीं एका जातीस त्यांनीं वानर असें नांव दिलें होतें. त्याचप्रमाणें या जातींपैकीं जी एक अत्यंत बलाढ्य जात होती, तिला त्यांनीं राक्षस असें नांव दिलें होतें.

राम, लक्ष्मण आणि सीता हीं ज्या वनांत गेलीं, त्यांत वानर आणि राक्षस यांची बरीच मोठी वस्ती होती. सीता रामाबरोबर जावयास निघाली तेव्हां राम तिला म्हणाला, "तूं सुखांत वाढलेली राजकुमारी; भीतीनें युक्त असा अरण्यवास तुला कसा करतां येईल?" सीतेनें उत्तर दिलें, "जेथें राम तेथें सीता. आतां माझें राजकुमारीपणा नष्ट झालें आहे. आतां जी स्थिति आपली तीच माझी." रामालाही मग तिचें मन मोडवलें नाहीं, व सीता त्याजबरोबर अरण्यांत गेली. याप्रमाणें सीता, राम आणि लक्ष्मण अशीं तिघें अरण्यांत शिरलीं व यमुना नदीच्या किनाऱ्यापर्यंत गेलीं. यमुनातटाकीं एक पर्णकुटिका बांधून त्यांत त्यांनीं वस्ती केली. रानांतील फळें जमा करून व हरणें वगैरे वनपशूंची शिकार करून तीं आपला उदरनिर्वाह करूं लागलीं. अशा रीतीनें कित्येक दिवस लोटल्यानंतर एक राक्षसी त्या ठिकाणीं आली. लंकेचा राजा रावण याची ती बहीण होती. सांप्रतच्या सिलोन बेटाला त्या वेळीं लंका असें नांव होतें. रावणाची बहीण त्या अरण्यांत इकडेतिकडे फिरत असतां सहजगत्या राम तिच्या नजरेस पडला. त्याचें तें मदनाला लाजविणारें रूप पाहून ती अगदीं मोहित झाली; परंतु राम हा अत्यंत पवित्र वर्तनाचा व एकपत्नीव्रत पाळणारा असल्यामुळें तिच्याकडे त्यानें मुळींच लक्ष्य दिलें नाहीं. हा अपमान तिला सहन न होऊन ती आपल्या बंधूकडे गेली आणि त्याजपाशीं तिनें सीतेच्या अलौकिक स्वरूपाचें वर्णन केलें.

राम हा अत्यंत शूर म्हणून प्रसिद्ध होता. त्या वेळच्या राक्षसांपैकीं कोणीही त्यास जिंकण्यास समर्थ नव्हता. रावणालाही या गोष्टीची माहिती होती.
त्यास जिंकण्यास समर्थ नव्हता. रावणालाही या गोष्टीची माहिती होती.
याकरितां रामाला जिंकून सीता मिळविणें शक्य नव्हतें; म्हणून कांहीं युक्ति योजून सीतेला हस्तगत करण्याचा त्यानें बेत केला. त्यानें दुसरा एक राक्षस आपल्या मदतीस घेतला. हा राक्षस मायावी विद्येंत फार प्रवीण होता. त्यानें सुंदर हरिणाचें रूप धारण केलें आणि रामाच्या पर्णकुटिकेजवळ जाऊन तो त्या रूपानें इकडेतिकडे बागडूं लागला. त्या हरिणाचें तें मनोहर रूप पाहून सीतेला फार हर्ष झाला, आणि त्याला धरून आणण्यासाठीं तिनें रामाची विनवणी केली. त्यास धरण्याकरितां रामही तावडतोब त्याच्या पाठीमागें गेला. जातांना त्यानें लक्ष्मणास सीतेच्या संरक्षणाकरितां म्हणून मागें ठेविलें. लक्ष्मणानें झोंपडीभोंवतीं अग्नीचें एक वर्तुळ तयार केलें आणि सीतेला म्हटलें,

"आज कांहीं तरी संकट येणार असें मला वाटत आहे. यासाठीं या वर्तुळा-बाहेर न येण्याची खबरदारी घ्या. याच्या बाहेर तुम्ही आल्यास तुमच्यावर काय प्रसंग ओढवेल तें सांगवत नाहीं." इकडे रामाचा बाण त्या हरिणास लागतांच त्याचा एकदम राक्षस होऊन तो मरून पडला.

त्याच वेळीं "लक्ष्मणा धांव" असा करुणस्वर झोंपडींत बसलेल्या सीतेला ऐकूं आला. तो ऐकून सीता फार घाबरून गेली आणि लक्ष्मणाला म्हणाली "भावोजी, हा त्यांचाच शब्द आहे. आपण लवकर त्यांच्या मदतीला जा." लक्ष्मणानें उत्तर दिलें, "हा रामाचा स्वर खचित नाहीं." पण सीतेनें फार विनविल्यामुळें लक्ष्मणाला वनांत जावें लागलें. लक्ष्मण फार दूर जातो न जातो तोंच रावण भिकाऱ्याच्या रूपानें झोंपडीजवळ आला व कांहीं दान करण्या-बद्दल सीतेची विनवणी करूं लागला. सीता म्हणाली, "थोडा वेळ थांब. घरांतील पुरुष बाहेर गेले आहेत; ते आले म्हणजे तुला भिक्षा घालीन." भिकारी म्हणाला, "मला इतकी भूक लागली आहे कीं आतां माझ्यानें दम धरवत नाहीं. तुमच्याजवळ जें काय असेल तेवढेंच मला पुरे." त्या वेळीं थोडीं रानफळें मात्र सीतेजवळ शिल्लक होतीं. तीं फळें सीता त्यास देऊं लागली, तेव्हां तो म्हणाला, "बाई, आणखी अलीकडे येऊन मला दान करा; माझ्या-जवळ येण्यास तुम्ही अनमान करूं नका; मी साधु आहें." त्याला तीं फळें देण्याकरितां सीतेला त्या अग्नीच्या वर्तुळाबाहेर यावें लागलें. ती बाहेर येतां-क्षणींच भिकाऱ्यानें आपलें विशाळ राक्षसीरूप प्रगट केलें आणि सीतेला उचलून त्यानें आपल्या रथांत घातलें व झपाट्यानें तो तेथून निघून गेला. गरीब बिचारी सीता! त्या वेळीं तिच्या मदतीला कोणीच नव्हतें. रावण घेऊन जात असतां तिनें आपल्या अंगावरील अलंकार काढून वाटेंत ठिकठिकाणीं टाकून दिले.

सीतेला घेऊन रावण निघाला तो थेट लंकेंत आला; आणि आपणास वरण्याबद्दल सीतेची मनधरणी करूं लागला. त्यानें अनेक प्रकारें तिची सम-जूत घालण्याचा व वस्त्राभरणांनीं तिला मोह पाडण्याचा यत्न केला. परंतु सीतादेवी पातिव्रत्याची केवळ मूर्तीच होती. तिनें रावणाबरोबर भाषणसुद्धां केलें नाहीं अथवा त्याजकडे पाहिलेंही नाहीं. अशा प्रकारच्या तिच्या वर्तनानें रावणास क्रोध येऊन त्यानें तिला एका वृक्षाखालीं नेऊन ठेवलें आणि आपली

राणी होण्याचें कबूल करीपर्यंत तिला निवाऱ्याच्या जागीं आणूं नये असा त्यानें सक्त हुकूम सोडला.

इकडे राम व लक्ष्मण पर्णकुटिकेंत परत येऊन पाहतात, तों सीता तेथें नाहीं. यामुळें दोघेही अत्यंत शोकाकुल झाले. सीतेचें काय झालें असावें याचा तर्क कोणालाच कांहीं करतां येईना. दोघेही झोंपडींतून बाहेर पडून अरण्यांत तिचा शोध करीत फिरूं लागले; पण तिचा मागमूसही त्यांस कोठें लागला नाहीं. फिरतां फिरतां त्यांना एका ठिकाणीं कांहीं वानर आढळले. त्यांत हनुमान् नांवाचा एक श्रेष्ठ वानर होता. हनुमान् हा दैवी प्रकृतीचा वानर असून तो तेथील वानरांचा अधिपति होता. सीतेला मुक्त करण्याच्या कार्यांत यानेंच रामाला मोठी मदत केली. रामाच्या ठिकाणीं त्याची निष्ठा इतकी प्रबल होती कीं खरा भक्त कसा असावा याचें उदाहरण म्हणून हनुमानाचें नांव लोक घेऊं लागले. परमेश्वराचा एकांतिक भक्त म्हणून मारुतीची पूजा हिंदुस्थानांत आजतागाईत सर्वत्र होत आहे. वानर, राक्षस इत्यादि अनेक प्रकारच्या रानटी जाती त्या काळीं हिंदुस्थानांत राहत होत्या. दक्षिण हिंदुस्थानांतील अरण्यांत हे लोक टोळयाटोळयांनीं राहत असत.

रामाला या वानरांपैकीं एक टोळी भेटली. आकाशमार्गें एक रथ गेला असल्याचें आपण पाहिलें, व त्या रथांत एक राक्षस आणि एक अत्यंत रूपवती स्त्री असून, ती शोकाकुल झाली होती असें त्यांनीं रामाला सांगितलें. ते म्हणाले, “ रथ इकडून गेला त्या वेळीं तिनें एक दागिना खालीं टाकला आहे, तो हा पहा. ” असें म्हणून त्यांनीं एक कंठाभरण रामाला दाखविलें. लक्ष्मणानें तें हातांत घेऊन म्हटलें, “ मला हा दागिना ओळखवत नाहीं. ” रामानें तो दागिना ओळखून म्हटलें, “ होय, खरोखर हा सीतेचाच अलंकार आहे.” सीता ही लक्ष्मणाच्या वडील भावाची बायको असल्यामुळें आर्यपद्धतीप्रमाणें तिच्याकडे पाहणें म्हणजे मोठें पाप आहे असें लक्ष्मणास वाटत होतें. याचमुळें तिचा अलंकार त्याला ओळखतां आला नाहीं. कारण तो अलंकार गळ्यांत घालण्याचा होता. आर्यांच्या प्राचीन पद्धतीचा हा एक मासला आहे. नंतर त्या वानरांनीं तो राक्षस कोण व कोठला राहाणारा याबद्दल सर्व माहिती रामाला सांगितली; आणि ते सर्व मिळून त्याच्या शोधाकरितां निघाले.

त्या वेळीं वानरांचा एक राजा वाली या नांवाचा होता. त्याचें व त्याचा भाऊ सुग्रीव याचें राज्याच्या बाबतींत युद्ध सुरू झालें होतें. रामानें सुग्रीवाचा पक्ष स्वीकारून त्याला मदत करण्याचें आश्वासन दिलें. सुग्रीवाचें राज्य वालीनें बळकाविलें होतें व त्याला हद्दपार केलें होतें. उलटपक्षीं सुग्रीवानें रामाला मदत करावी असें ठरलें. या सर्वांच्या मदतीनें सीतेचा शोध रामानें सर्वत्र केला; पण त्यास कोठेंहि थांग लागला नाहीं. शेवटीं हनुमानानें एकाच उड्डाणानें समुद्र उल्लंघून तो लंका बेटांत गेला, आणि तेथें सीतेच्या शोधासाठीं हिंडूं लागला; पण त्याला तेथेंही सीतेचा शोध लागला नाहीं.

लंकेचा राजा रावण हा फार बलाढ्य होता. त्यानें सर्व देवांना व दानवांना जिंकून आपल्या बंदिशाळेंत घातलें होतें; आणि शेंकडों रूपवती स्त्रिया धरून आणून त्यांस त्यानें भोगपत्न्या केल्या होत्या; यांच्या राहावयाच्या महालांतून हनुमान हिंडला. शेवटीं त्याला विचार सुचला कीं, सीता येथें असणें शक्य नाहीं. अशा जाग्यांत येऊन पडण्यापूर्वीं सीता प्राणत्याग करील. मग ती जागा सोडून देऊन हनुमान दुसरीकडे गेला. शेवटीं अशोकवनांत एका वृक्षाखालीं सीता बसली असल्याचें त्याला दिसलें. ती अत्यंत कृश झाली असून शोकसागरांत बुडाली होती. क्षितिजावर उगवलेल्या द्वितीयेच्या चंद्राप्रमाणें तिच्या लावण्याची अंशमात्र कला शिल्लक राहिली होती. हनुमानानें अत्यंत सूक्ष्म रूप धारण केलें आणि त्याच वृक्षावर तो बसून राहिला. मग कित्येक राक्षसिणी येऊन सीतेचें मन वळविण्याचा यत्न करूं लागल्या; पण तिनें नुमतें वरसुद्धां पाहिलें नाहीं.

त्या राक्षसी निघून गेल्यानंतर हनुमान झाडावरून खालीं उतरला व सीतेजवळ येऊन म्हणाला, "मी रामाचा दूत असून त्यानेंच मला आपला शोध करण्यासाठीं इकडे पाठविलें आहे." असें म्हणून बरोबर आणलेली आंगठी त्यानें तिला दाखविली. तो आणखी म्हणाला, "आपण कोठें आहां याची बरोबर माहिती रामाला मिळाली म्हणजे मोठें सैन्य घेऊन राम येईल व रावणास जिंकून आपणास सोडवून नेईल; तथापि आपली मर्जी असेल तर आपण माझ्या खांद्यावर बसावें, म्हणजे एकाच उडींत समुद्र उल्लंघून आपण रामाकडे नेईन." पण सीतेनें या म्हणण्यास रुकार दिला नाहीं; कारण ती निःसीम पतिव्रता होती. परक्या पुरुषाचा नुसता स्पर्शही तिला

सहन झाला नसता. तिनें आपल्या अंगावरील एक भूषण काढून तें हनुमानाजवळ दिलें व तें घेऊन तो परत आला.

हनुमानाकडून सर्व हकीगत ऐकून घेतल्यानंतर रामानें मोठें सैन्य जमा केलें; व कुच करून तो दक्षिणेकडे जावयास निघाला, व समुद्रापर्यंत आला. त्यानंतर लंकेच्या किनाऱ्यापर्यंत एक मोठा पूल बांधिला. त्याचें सेतुबंध असें नांव आजपर्यंत चालत आहे. अगदीं ओहटीच्या वेळीं हिंदुस्थानाच्या किनाऱ्यावरून लंकेच्या किनाऱ्यापर्यंत मध्यंतरीं वाळूचे बांध अध्यापिहि दिसतात आणि त्यांवरून लंकेपर्यंत जातां येतें.

राम हा परमेश्वराचा अवतार होता असा आमचा समज आहे. आम्हां हिंदु लोकांच्या समजाप्रमाणें राम हा ईश्वराचा सातवा अवतार होय. राम अवतारी होता म्हणूनच त्याच्या हातून एवढीं महत्कार्यें घडलीं असें आम्ही समजतों.

रामाच्या पक्षाचे कित्येक राक्षस आणि वानर यांनीं मोठमोठाल्या टेंकड्या खणून काढून समुद्रांत घातल्या व प्रचंड वृक्ष आणि धोंडे यांचे ढीग त्यावर घातले. अशा रीतीनें लंकेस जाण्याकरितां त्यांनीं वाट तयार केली. हें पुलाचें काम चालू असतां एक लहान खार वाळूंत प्रथम लोळून मग पुलाच्या जागीं जाऊन आपलें आंग झाडीत असे. अशा रीतीनें पुलाला भरणी घालण्याचें काम ती करीत होती. हें तिचें कृत्य पाहून वानरांस हंसूं कोसळलें. मोठमोठे डोंगर आणि अरण्याचीं अरण्यें जेथें गडप होत होतीं, त्या ठिकाणीं एक खार आपलें आंग झाडून त्यांतून पडणाऱ्या वाळूनें भर घालीत होती! हा देखावा पाहून कित्येक वानर एकसारखे हंसतच सुटले. रामानें तें खारीचें कृत्य पाहिलें तेव्हां तो म्हणाला, "त्या लहानग्या खारीची धन्य आहे. आपल्याच्यानें होईल तितकेंच काम ती मन लावून करीत आहे. यासाठीं मोठमोठ्या बलाढ्य वानरांइतकेंच तिचें थोरपण आहे यांत किमपि शंका नाहीं." असें म्हणून त्यानें तिच्या पाठीवरून आपला हात फिरविला. त्याच्या खुणा अद्यापिहि खारीच्या पाठीवर पट्ट्यांच्या रूपानें राहिल्या आहेत.

पुलाचें काम पुरें झाल्याबरोबर वानरांचें सर्व सैन्य घेऊन राम आणि लक्ष्मण लंकेवर चाल करून गेले. यानंतर कित्येक महिनेपर्यंत घनघोर युद्ध सुरू होतें, व त्यांत रक्ताच्या नद्या वाहिल्या असें वर्णन आहे. रामानें शेवटीं

रावणास जिंकून त्याचा वध केला, व त्याची राजधानी हस्तगत केली. या राजधानींत कित्येक मोठमोठाले राजवाडे असून त्यांचें सर्व सामान सोन्याचें होतें. मी लंकेंत गेलों होतों असें खेड्यापाड्यांतील लोकांस सांगितलें, तेव्हां तेथील घरें सोन्याचीं आहेत काय असा प्रश्न त्यांनीं केला. असो. रावणाची राजधानी याप्रमाणें हस्तगत केल्यानंतर रावणाचा बिभीषण नांवाचा एक भाऊ होता त्यास रामानें तेथील गादीवर बसविलें. या बिभीषणानें युद्धाचे वेळीं रामाला मोठी मदत केली होती.

नंतर सीतेला बरोबर घेऊन राम आपल्या अनुयायांसह लंका सोडून परत आला. वनवासाचीं चौदा वर्षें संपूर्ण झालीं तेव्हां रामाचा धाकटा भाऊ भरत त्याला येऊन भेटला व दशरथ मृत्यु पावल्याचें वृत्त त्याला कळवून राज्याचा स्वीकार करण्याविषयीं तो रामाला पुनःपुनः सांगूं लागला. राम वनवासांत असतांही भरतानें सिंहासनाचा स्वीकार केला नव्हता. त्या वेळीं रामाच्या पादुका सिंहासनावर ठेवून तो स्वतः प्रतिनिधि म्हणून कारभार पाहत होता. भरताच्या आग्रहावरून राम अयोध्येला आला व त्याच्या आणि प्रजाजनांच्या संमतीनें तो सिंहासनारूढ झाला. कांहीं दिवस गेल्यानंतर सीतेच्या पवित्रते-बद्दल लोकांत कुजबुज सुरू झाली. रावणाच्या घरीं असतां ती शुद्ध राहिली याबद्दल तिनें दिव्य करून खात्री केली पाहिजे असें लोक म्हणूं लागले. राम म्हणाला "सीता म्हणजे पातिव्रत्याची केवळ मूर्ति. तिला दिव्य कशाला पाहिजे ?" परंतु लोक अगदीं हट्टास पेटून तिनें दिव्य केलें पाहिजे असें म्हणूं लागले. प्रजाजनांचा संतोष राखणें हा रामाचा बाणा होता. त्यानेंहि लोकांच्या म्हणण्याप्रमाणें एक अग्निकुंड तयार करवून त्यांत अग्नि पेटविला, व सीतेनें त्यांत उडी टाकली. शीता नष्ट झाली असें वाटून रामाचें अंतःकरण तळमळूं लागलें, इतक्यांत सिंहासनावर बसलेल्या सीतेला घेऊन अग्निदेव स्वतः प्रगट झाला. हें दिव्य पाहून सर्व लोक अत्यंत आनंदित झाले व सर्व राज्यभर लोक सीतेला धन्यवाद देऊं लागले.

रामानें आपणास राज्याभिषेक करून घेतला त्या वेळीं त्या वेळच्या रीती-प्रमाणें त्यानें राज्यशासनाच्या बाबतींत कांहीं शपथा घेतल्या होत्या. प्रजा-जनांचा संतोष राखणें हें राजाचें पहिलें काम आहे असा समज त्यावेळीं होता. राजेलोकही लोकमतास अत्यंत मान देऊन स्वतःस प्रजेचे नोकर समजत

असत. सीतेच्या सहवासांत अत्यंत सुखाचा असा कांहीं काळ लोटल्यावर तिच्याबद्दल लोकांत पुन्हां कुरकुर सुरू झाली. राक्षसानें पळवून नेलेल्या सीतेचा त्याग रामानें केला पाहिजे असें लोक म्हणूं लागले.

लोकांचीं मनें राखण्याकरितां रामानें सीतेचा त्याग करून तिला वनांत पाठविलें. त्या वनांत वाल्मीकि ऋषि राहत होते. दुःखानें व्याप्त व अत्यंत निराश झालेली अशी ती सीता त्या ऋषींच्या नजरेस पडली. तिची सर्व हकीगत ऐकून घेऊन तिला त्यांनीं आपल्या आश्रमांत नेलें. सीता त्या वेळीं गरोदर होती, ती प्रसूत होऊन तिला दोन आवळेजावळे पुत्र झाले. त्यांचे लालनपालन वाल्मीकि ऋषींनीं केलें. स्वतःच्या कुलाबद्दल वगैरे कोणत्याहि प्रकारची माहिती त्यांनीं त्या पुत्रांस लागूं दिली नव्हती. त्यानंतर वाल्मीकि ऋषींनीं रामायण लिहिलें व त्यावरून एक नाटकही लिहिलें.

नाट्य आणि संगीत या कला हिंदुस्थानांत फार पवित्र मानल्या जातात. संगीत हा पांचवा वेदच होय अशी म्हण हिंदुस्थानांत आहे. एखादें प्रीतीचें अथवा दुसरें कसलेंहि गाणें असो, तें गात असतां गायक जर त्याशीं तल्लीन होऊन गेला तर त्याला मोक्ष मिळतो. त्याला जपतपादि दुसरीं साधनें कोणतींच नकोत. ध्यानादि साधनांनीं जें काहीं मिळवावयाचें तें तो गाण्यानें मिळवितो असा आमचा समज आहे.

वाल्मीकि ऋषींनीं रामचरिताचें वर्णन तयार करून तें रामाच्या पुत्रांना शिकविलें.

मोठमोठ्या राजांनीं अनेक प्रकारचे यज्ञ करण्याची चाल हिंदुस्थानांत पूर्वकालीं होती. त्या चालीला अनुसरून रामानेंही एक यज्ञ करण्याची तयारी केली. पण पत्नीशिवाय कोणताहि यज्ञ सांग होऊं शकत नाहीं. पत्नीला सहधर्मचारिणी असें म्हणतात. हिंदूंच्या गृहस्थाश्रमधर्माप्रमाणें प्रत्येकाला कित्येक यज्ञ करावे लागतात; परंतु ते सहधर्मचारिणीशिवाय पूर्ण व सशास्त्र होऊं शकत नाहींत.

रामानें यज्ञ आरंभिला त्या वेळीं त्याची पत्नी सीता त्याजपाशीं नव्हती; तेव्हां रामानें पुन्हां लग्न करावें अशी सूचना त्याला कोणी केली. पण राम एकपत्नीव्रती होता. तो म्हणाला, सीतेवांचून अन्य स्त्रीची योजना पत्नीच्या ठिकाणीं मी करणार नाहीं. मग सीतेची एक सुवर्णप्रतिमा करून तिची

योजना सहधर्मचारिणीच्या ठिकाणीं करण्यांत आली. याच समारंभांत एका नाटकाचीही योजना करण्यांत आली होती. यज्ञसमारंभासाठीं वाल्मीकि ऋषि आपल्या लव आणि कुश या शिष्यांसह आले होते. लव आणि कुश हे रामाचे पुत्र आहेत हें कोणाला ठाऊक नव्हतें. यज्ञमंडपांत एक रंगभूमि तयार करण्यांत आली होती. राम, त्याचे बंधू, दरबारी लोक व इतर प्रजाजन मिळून मोठा लोकसमूह नाटक पाहण्याकरितां जमला होता. वाल्मीकि ऋषींच्या सांगण्यावरून लव आणि कुश यांनीं रामचरिताचें गाणें म्हणण्यास आरंभ केला. त्यांच्या सुरूपतेनें व म्हणण्याच्या मोहक पद्धतीनें सर्व सभा अगदीं तटस्थ होऊन गेली होती. स्वतःच्या चरित्राचें पठण ऐकत असतां राम अगदीं तल्लीन होऊन गेला होता. शेवटीं सीतेच्या त्यागाचा भाग निघाला तेव्हां तर तो शोकानें अगदीं मूढ होऊन गेला. त्याची अशी दशा पाहून वाल्मीकि ऋषि म्हणाले, " रामा, असा बेहोष होऊं नको. मी तुला सीतेला भेटवितों. " मग त्यांच्या आज्ञेप्रमाणें सीता पुढें आली असतां रामानें तिला आलिंगन दिलें. सीतेची व रामाची याप्रमाणें भेट होत असतां सभेंत एक निराळीच कुरकुर सुरू झाली. सीतेनें दिव्य केलें नाहीं, याबद्दल कांहींजण पुन्हा बोलूं लागले. लोकांच्या या दुष्टपणानें सीता अगदीं त्रासून जाऊन म्हणाली, " पहा, हें दिव्य मी करीत आहें. " ती असें म्हणत आहे तोंच पृथ्वी दुभंग झाली व सीतेनें आपल्या मातेच्या उदरांत प्रवेश केला. अशा रीतीनें सीता गुप्त झालेली पाहून सर्व लोक अगदीं भयभीत व चकित झाले. रामाच्या दुःखाला तर पारावार राहिला नाहीं.

सीता गुप्त झाल्यानंतर रामाकडे देवांचा दूत आला व म्हणाला, " महाराज, आपला येथील कार्यभाग संपला आहे. आतां आपण पुन्हा वैकुंठास चलावें. " हें भाषण ऐकतांच रामाला स्वतःच्या मूलरूपाचें स्मरण झालें. त्यानें शरयु नदींत उडी घेतली. शरयु नदीच्या कांठींच अयोध्यानगर वसलेलें आहे.

याप्रमाणें या वीररसप्रधान काव्यांतील कथाभाग आहे. हें आर्यावर्तांतील अत्यंत जुनाट काव्य आहे. राम आणि सीता यांचीं चरित्रें आर्यावर्तांत आदर्शवत् मानली जातात. तेथील सर्व स्त्रिया सीतेची पूजा करीत असतात. एखाद्या स्त्रीची अत्यंत उत्कट इच्छा पाहिली तर सीता होण्याची असते. जी अत्यंत पवित्र आणि अत्यंत प्रेममय असतांही जिनें जन्मभर कष्ट सोसले,

त्या सीतेसारखें व्हावें, ही आमच्या आर्यस्त्रियांची अत्यंत मोठी इच्छा असते. राम आणि सीता यांच्या चरित्राचें सूक्ष्म अवलोकन केलें असतां पौर्वात्य आणि पाश्चात्य देशांतील लोकांच्या आदर्शकल्पनांत भेद कोणता आहे तो लक्ष्यांत येतो. शरीराला कष्ट कितीहि पडोत, दुःखें कितीहि प्राप्त होवोत आणि कोणतींहि संकटें येवोत, पण आपल्या दानतींत यत्किंचित्ही फरक होऊं द्याव-याचा नाहीं हा सीतेच्या वर्तनाचा आदर्श आर्यांनीं आपल्यापुढें ठेविला आहे. पाश्चात्य राष्ट्रांचा आदर्श कर्मप्रवणता हा आहे. एकसारखें कर्म करून आपला मोठेपणा स्थापन करा, असा पाश्चात्य संस्कृतीचा उपदेश आहे. पौर्वात्य संस्कृति याच्या उलट उपदेश करीत आहे. आपलें मोठेपण कष्ट सोसण्यांत आहे असें आर्यसंस्कृतीचें मत आहे. मनुष्याला किती भोग भोगणें शक्य आहे, हा प्रश्न पाश्चात्य राष्ट्रें सोडवीत आहेत. उलटपक्षीं मनुष्याला आपल्या गरजा किती कमी करतां येतील, हा प्रश्न आर्यभूमीनें सोडविला आहे. या दोन स्थिति परस्परांशीं अत्यंत विसदृश आहेत हें आपल्या लक्ष्यांत आलें असेलच. सीता हा हिंदु लोकांचा आदर्श आहे. आर्यभूमीच्या सर्व आकांक्षा एकत्र करून त्यांची मूर्ति निर्माण केली तर ती सीतेसारखी होईल. वस्तुतः सीता निर्माण झाली होती कीं नाहीं, राम खरोखर अस्तित्वांत होता कीं नाहीं, अथवा त्याचें चरित्र ही केवळ कवीची रचना आहे इत्यादि प्रश्नांशीं आपणांला कांहीं कर्तव्य नाहीं. आर्यांचा आदर्श कोणत्या प्रकारचा होता, आणि आपल्या संस्कृतीचा नमुना कोणत्या प्रकारचा असावा याचें उत्तम चित्र येथें आपणाला पहावयास सांप-डतें. एकंदर पुराणांपैकीं रामचरिताइतकें लोकमान्य झालेलें पुराण दुसरें एकही नाहीं. जनतेच्या अगदीं वरच्या थरापासून तों थेट तळापर्यंत या पुराणांतील रहस्य लोकांच्या हाडींमासीं खेळत आहे. सीता हें नांव सर्वतोमुखीं झालेलें आहे. सीता म्हणजे केवळ सौजन्य, शुद्धता आणि पातिव्रत्य यांची जिवंत मूर्तीच ! स्त्रीला शोभा देणारे जे जे गुण असावे असें आपणास वाटतें ते सर्व सीतेच्या ठायीं होते. एखाद्या स्त्रीला आशीर्वाद द्यावयाचा असला तर 'सीतेसारखी हो' असें म्हणतात. सांप्रतचें आर्यावर्त हें सीतेच्या मुलांसारखच आहे. सीते-सारखें होण्याचा यत्न आज कित्येक युगें तें करीत आहे. अनेक प्रकारचीं संकटें प्राप्त झालीं आणि जिवाचें अगदीं रान झालें तरी रामाविरुद्ध एक अक्षरही तिच्या तोंडून कधीं बाहेर पडलें नाहीं. जें जें कांहीं प्राप्त झालें तें तें कर्तव्य

समजून तिनें केलें. तिला वनवास प्राप्त व्हावा ही केवढ्या मोठ्या अन्यायाची गोष्ट आहे बरें ! पण अशा प्रसंगींसुद्धां क्रोध, असूयादि विकार तिला स्पर्श करू शकले नाहींत. प्रतिकार करण्याची इच्छासुद्धां तिला झाली नाहीं. आर्यांचा हाच आदर्श आहे ! हेंच त्यांचें ब्रीदवाक्य आहे ! भगवान् बुद्ध म्हणतात, "जर एखाद्यानें तुम्हांला कष्ट दिले आणि तुम्हीं त्याजवर सूड उगविला, तर तुमचे स्वतःचे कष्ट कमी झाले असें होत नाहीं; तर त्यामुळें जगांत दुष्टपणा मात्र अधिक वाढतो." सीता ही खरी आर्य स्त्री होती. दुःखाला प्रतिदुःख तिनें कधींही दिलें नाहीं.

पाश्चात्यांचा आदर्श आणि पौर्वात्यांचा आदर्श हे एकमेकांहून अत्यंत भिन्न आहेत. यांत खरा कोणता हें कोणीं सांगावें ? आपल्या सामर्थ्याचा प्रयत्न प्रत्यक्ष कृतीनें दाखविणें हें चांगलें, कीं संकटें सोसून गुप्त धैर्य धारण करणें अधिक चांगलें, याचें उत्तर कोणीं द्यावें ? दुःखाचा प्रतिकार करून त्याचा आवेग कमी करणें पाश्चात्यांस बरें वाटतें. उलटपक्षीं आर्यांचें म्हणणें असें आहे कीं, दुःख सोसूनच आम्हीं तें समूळ नष्ट करतों; इतकेंच नाहीं, तर आज दुःखरूप वाटणाऱ्या गोष्टी सोशिकपणामुळें आम्हांस आनंददायी होऊन बसतात. हे दोन्ही आदर्श मोठे आहेत असें आपण म्हणूंया. यांपैकीं अखेर कोण मारील हें कोणी सांगावें ? मानवकुलाचें खरें कल्याण करण्याचें सामर्थ्य कोणत्या आदर्शांत आहे, हें सांगण्याचें सामर्थ्य आपणांस नाहीं. मनुष्यमात्रांत आढळून येणारी पशुवृत्ति नाहींशीं करण्याचें यश कोणता आदर्श संपादील हें सांगणें आपल्या अधिकाराबाहेरचें आहे. एकसारखें कर्म करून पशुवृत्ति नाहींशी होईल कीं कष्ट सोसण्याची शक्ति वाढवून ती नाहींशी होईल, हें कोडें उकलण्याची खटपट करणें आजच्या स्थितींत तरी निष्फळ आहे.

या प्रश्नांचीं उत्तरें देणारा कोणी येईल तेव्हां येवो. पण तोंपर्यंत एकमेकांचे आदर्श पूर्ववत् राखण्याचें काम तरी आपण करूंया. त्यांचा नाश होणार नाहीं अशी खबरदारी आपण घेऊंया. जगांत वाईट म्हणून जें कांहीं असेल त्याचें समूळ उच्चाटन करावयाचें हा आपणा दोघांचाही उद्देश आहे. हें कार्य तुम्ही आपल्या विशिष्ट मार्गानें करीत आहां; तसेंच तें आमच्या मार्गानें आम्हांस करूं द्या. पाश्चात्यांनीं आमच्या मार्गाचा अंगिकार करावा असें माझें सांगणें नाहीं. साध्य एकच असलें म्हणून साधनें एकाच प्रकारचीं असलीं

पाहिजेत असें नाहीं. हिंदुस्थानाचें काय अथवा तुमचें काय, साध्य एकच आहे. यासाठीं "आपणा दोघांचें साध्य एकच आहे ही गोष्ट आम्हांस पटली." तें तुम्ही आपल्या विशिष्ट मार्गानें साध्य करा. ईश्वर तुम्हांला यश देवो, असा निरोप आर्यभूमीला आपण पाठवाल अशी मला आशा आहे.

आपले आदर्श निरनिराळे असले तरी साध्य एकच आहे व भेद दिसतो तो केवळ दृष्टिभ्रम आहे, एवढाच निरोप पूर्व आणि पश्चिम यांस पोहोंचविण्याचें कार्य देहपातापर्यंत मला करावयाचें आहे. अनेक प्रकारचे व्यूह आणि चक्रें यांच्या गर्दीतून आपणांस आपला मार्ग काढावयाचा आहे. आपण दोघेही वाटसरू आहों. याकरितां एकमेकांचें हित चिंतणें हेंच आपलें कर्तव्य आहे.



# महाभारत



आज आपणांस दुसऱ्या एका वीररसप्रधान काव्याविषयीं माहिती देण्याचा माझा विचार आहे. या दुसऱ्या काव्याला महाभारत असें नांव आहे. भरत-राजाच्या वंशांत उत्पन्न झालेल्या एका शाखेविषयींचा वृत्तांत या काव्यांत वर्णिला आहे. भरत हा दुष्यंत व शकुंतला यांचा पुत्र होय. महा म्हणजे मोठा आणि भारत म्हणजे हिंदुस्थान. भरत आणि त्याचे वंशज यांजपासून हिंदुस्थानाला भारत असें नांव प्राप्त झालें आहे. महाभारत म्हणजे मोठें हिंदुस्थान; अथवा मोठ्या भारतवंशाचा इतिहास असेंहि म्हणतां येईल. कुरूंचें प्राचीन राज्य हें या काव्याचें स्थल असून कौरव आणि पांडव यांज-मधील महायुद्ध हा या काव्याचा विषय होय. या काव्याचें स्थल विस्तारानें फार मोठें आहे असे नाहीं. हें काव्य हिंदुस्थानांत अत्यंत लोकप्रिय आहे. होमरची कविता ग्रीक लोकांना जितकी प्रिय तितकेंच हें काव्य आम्हां हिंदु लोकांच्या आवडीचें आहे. काल लोटत चालला तसतशी मूळच्या काव्यांत भर पडत गेली आणि शेवटीं त्याचा सुमारें एक लक्ष ग्रंथ झाला आहे. यांत अनेक गोष्टी, दंतकथा, तत्त्वज्ञानाचे विषय, कांहीं इतिहासाचे भाग आणि कित्येक विषयांवरील वादविवाद इत्यादिकांचा अंतर्भाव झालेला आहे. कालां-तरानें यांत अशा प्रकारची भर पडत जाऊन त्याचा प्रचंड ग्रंथ होत असतांहि मूळकथा जशीच्या तशीच राखिली गेली आहे.

धृतराष्ट्र आणि पंडु हे दोघे बंधु होते. राज्याबद्दल या दोन बंधूंच्या पुत्रांत जें भयंकर युद्ध झालें, तें या काव्याच्या मध्यबिंदूसारखें असून त्याभोंवतीं बाकीचा सर्व विस्तार झाला आहे.

आर्यांचे पूर्वज लहान लहान टोळ्यांनीं प्रथम हिंदुस्थानांत आले. त्यानंतर त्यांचा विस्तार हळुहळू वाढत जाऊन शेवटीं ते सर्व हिंदुस्थानचे राजे झाले. यानंतर तेथील सार्वभौमत्वासाठीं हें महायुद्ध एकाच कुटुंबाच्या दोन शाखांत झालें. भगवद्गीतेच्या आरंभीं रणभूमीचें आणि सैन्याच्या रचनेचें वगैरे वर्णन आहे, ही गोष्ट ज्यांनीं भगवद्गीता वाचली असेल, त्यांच्या लक्ष्यांत असेलच. तें वर्णन भारतीय युद्धासंबंधींचेंच आहे.

एका चक्रवर्ती राजाचे दोन पुत्र होते. वडील पुत्राचें नांव धृतराष्ट्र असें असून धाकट्याचें नांव पंडु असें होतें. धृद्रराष्ट्र हा जन्मतःच अंध होता. आंधळा, पांगळा, कमी अवयवाचा, क्षयरोगी अथवा दुसऱ्या कसल्याही दुर्धर रोगानें ग्रस्त असा पुत्र वारस होऊं शकत नाहीं, असा हिंदूंचा कायदा आहे. अशा प्रकारचा पुत्र फक्त पोटगीपुरताच वारस समजला जातो. या कारणामुळें धृतराष्ट्राला सिंहासन मिळालें नाहीं, त्याचा वडीलपणींचा हक्क बाजूस राहून पंडु सिंहासनारूढ झाला.

धृतराष्ट्राला शंभर पुत्र असून पंडूला पांच पुत्र होते. पंडुराजा तरुण असतांच मृत्यु पावला. यामुळें धृतराष्ट्र कुरुवंशाचा मुख्य म्हणून राजपदारूढ झाला व त्यानें आपल्या पुत्रांबरोबरच पंडुपुत्रांचेंही लालनपालन केलें. ते सर्व योग्य वयाचे होतांच त्यांस द्रोण गुरूंच्या हवालीं करण्यांत आलें. द्रोण हे वर्णानें ब्राह्मण असून क्षात्रविद्या त्यांस अवगत होती. द्रोणांनीं या राजपुत्रांस त्यांच्या दर्जाला व वर्णाला उचित अशा प्रकारच्या शस्त्रास्त्रविद्येंत निपुण केलें. अध्ययन समाप्त झाल्यानंतर धृतराष्ट्रानें युधिष्ठिरास राज्यासनावर बसविलें. युधिष्ठिर हा पंडुराजाचा वडिल मुलगा. युधिष्ठिराच्या आंगचे अतुल सद्गुण आणि त्याच्या बंधूंचें शौर्य व निष्ठा हीं पाहून धृतराष्ट्राच्या अंतःकरणांत मत्सरानें प्रवेश केला. दुर्योधन नांवाच्या आपल्या वडील मुलाच्या सांगण्यावरून धृतराष्ट्रानें कांहीं उत्सवानिमित्त पांडवांची रवानगी वारणावताला करून दिली. त्या गांवीं पांडवांस राहण्याकरितां म्हणून दुर्योधनानें एक गृह तयार करविलें होतें. हें घर लाख, राळ आणि ताग इत्यादि ज्वालाग्राही पदार्थांचें तयार केलें होतें. विदुर या नांवाचा धृतराष्ट्राचा एक सावत्र भाऊ होता. हा अत्यंत सुशील म्हणून प्रसिद्ध होता. लाक्षागृहाबद्दलची बातमी विदुरास समजतांच त्याच्या मनांत दुर्योधनाविषयीं प्रबळ शंका उत्पन्न झाली, आणि त्यानें पांडवांस त्याबद्दल आगाऊ सूचना देऊन ठेविली. विदुराच्या सूचनेप्रमाणें पांडवही सावध होऊन त्यांनीं त्या गृहांतून बाहेर पडण्याकरितां एक भुयार तयार करून ठेविलें. पांडव त्या गृहांत जाऊन राहिल्यावर एके दिवशीं त्याला कौरवांच्या पक्षाच्या एका मनुष्यानें आग लावली. सर्व घर जळून भस्म झालेलें पाहतांच कौरवांना अत्यंत हर्ष झाला. आपल्या मार्गांतील सर्व कांटे उपटले गेले असें त्यांस वाटलें. त्यानंतर त्यांनीं लवकरच युधिष्ठिराचें राज्यपद बळ-

काविलें. इकडे पांचही पांडव आपली माता कुंती हिच्यासह त्या घरांतून सुरक्षितपणें बाहेर पडून एका अरण्यांत पळून गेले. एका लहानशा गांवांत भिक्षा मागून ते आपला उदरनिर्वाह कसाबसा चालवूं लागले. त्यावेळीं ते आपणांस ब्राह्मणपुत्र म्हणवीत असत. त्या अरण्यांत भटकत असतां अनेक प्रकारचीं संकटें त्यांजवर कोसळलीं. परंतु प्रसंगावधान व शौर्य आणि सावधानता यांच्या बळावर त्या सर्वांतून ते पार पडले. अशा प्रकारें काळ कंठीत असतां एका नगरच्या राजकन्येचा स्वयंवरसमारंभ लवकरच होणार असल्याची बातमी त्यांस कळली.

हिंदुस्थानांत पूर्वकाळीं चालू असलेल्या स्वयंवरपद्धतीबद्दलची माहिती आपणांस यापूर्वी मीं दिलीच आहे. देशोदेशींचे राजे आणि राजपुत्र अशा समारंभास जमत असत; आणि राजकन्या हातांत पुष्पमाला घेऊन त्यांच्या सभेंत फिरून सर्वांचें निरीक्षण करीत असे, आणि त्यांतून जो तिला पसंत पडे त्यालाच ती वरीत असे. त्यावेळीं द्रुपदराज नांवाचा एक पांचाल देशाचा विख्यात राजा होता. त्याला द्रौपदी या नांवाची एक कन्या होती. सद्गुण आणि सौंदर्य यांबद्दल तिची कीर्ति सर्वत्र पसरली होती.

पुष्कळ वेळां हा स्वयंवरसमारंभ एखादा पण लावून होत असे. द्रौपदीच्या स्वयंवराच्या प्रसंगींही एक पण लाविला होता. मत्स्याच्या आकाराचें एक यंत्र उंचावर बांधलेलें होतें; त्याखालीं एक चक्र असून त्याला मध्यभागीं छिद्र होतें. हें चक्र एकसारखें गरगर फिरत राहील अशी योजना केली होती. या यंत्राच्या खालीं जमिनीवर पाण्यानें भरलेलें एक पीप ठेविलें होतें. त्या पाण्यांत पडलेल्या वरील मत्स्याच्या प्रतिबिंबाकडे पाहून जो कोणी वरील मत्स्याचा नेत्रभेद करील त्यासच द्रौपदी वरील असा पण या वेळीं लाविला होता. द्रौपदीला प्राप्त करून घेण्याकरितां त्या वेळचे देशोदेशींचे राजे व राजपुत्र आले होते; पण त्यांपैकीं कोणींही पण जिंकला नाहीं.

आमच्या आर्यावर्तांत चार वर्ण आहेत. ब्राह्मण वर्ण हा सर्वांतील श्रेष्ठ होय. त्यानंतर क्षत्रिय हा वर्ण असून त्यांत राजे व इतर धनुर्धारी यांचा समावेश होतो. तिसरा वर्ण वैश्य हा असून व्यापार हा त्यांचा मुख्य धंदा होय. चवथा वर्ण शूद्रांचा. यांनीं वरील तिन्ही वर्णांची सेवा करून आपला उदरनिर्वाह करावा. द्रुपद हा क्षत्रिय होता.

मत्स्यभेद कोणाच्यानेंही झाला नाहीं हें पाहून द्रुपदराजाचा पुत्र पुढें येऊन म्हणाला, "आतां क्षत्रिय कोणीच उरला नाहीं काय? कोणी उरला नाहीं असें दिसतें. तर आतां इतर वर्णांपैकीं कोणी वीर असेल तर त्यानें पुढें यावें. ब्राह्मण असो वा शूद्र असो; जो कोणी मत्स्यभेद करील त्याला द्रौपदी वरील."

पांच पांडवबंधू ब्राह्मणांच्या जागीं बसलेले होते. या पांच बंधूंपैकीं तिसऱ्याचें नांव अर्जुन असें असून तो मोठा धनुर्धर म्हणून प्रसिद्ध होता. द्रुपदराजाच्या मुलाचें भाषण ऐकून तो पुढें सरसावला. ब्राह्मण हे जात्या योद्धे नव्हत. त्यांची प्रकृति शांत आणि भित्री. वर्णाश्रमधर्माप्रमाणें पाहतां एखाद्या घातकशस्त्रास स्पर्श करणेंही त्यांस पातक वाटत असे. त्यांनीं शस्त्र कधींही धरूं नये अथवा कोणतेंही साहसाचें कृत्य करूं नये हीच त्यांची नीति. चिंतन, अध्ययन, अध्यापन आणि इंद्रियदमन करणें हाच त्यांचा धर्म. अशा व्यवसायाचे ब्राह्मण किती शांत आणि निरुपद्रवी असतील याची कल्पना करा. अर्जुन त्या वेळीं ब्राह्मणाच्या वेषांत होता. त्याला पुढें सरसावतांना पाहून ब्राह्मणांची मोठी तारांबळ उडाली. हा ब्राह्मण पुढें सरसावून क्षत्रियांचा क्रोध मात्र प्रज्वलित करणार असें त्यास वाटलें. क्षत्रियांचा क्रोध म्हणजे ब्राह्मणांचा निःपात असें त्यांस वाटलें. अर्जुनानें हें साहस करूं नये म्हणून त्यांनीं त्याला अनेक प्रकारें बोध करून पाहिला. पण अर्जुनानें त्याकडे लक्ष्य दिलें नाहीं. तो जातीचा क्षत्रिय होता. त्याला असला उपदेश कसा रुचणार! त्या यंत्रासन्निध जाऊन त्यानें अगदीं सुलभपणानें धनुष्य सज्ज केलें आणि निमिषार्धांत बाणानें मत्स्याचा डोळा फोडला.

अर्जुन याप्रमाणें विजयी होतांच द्रौपदीनें त्याच्या गळ्यांत माळ घातली. पण या त्याच्या कृत्यानें क्षत्रिय मंडळींत मोठी गडबड सुरू झाली. एखाद्या भटुरग्यानें असली अप्सरेसारखी स्त्री उपटावी आणि अनेक क्षत्रियांचा याप्रमाणें पाणउतारा करावा हें त्यांस खपलें नाहीं. या भटाला हें स्त्रीरत्न पचूं द्यावयाचें नाहीं, असा बेत करून ते त्याजवर तुटून पडले; पण त्या पांच बंधूंनीं त्यांस दाद न देतां द्रौपदीला घेऊन ते तेथून आपल्या घरीं परत आले.

ब्राह्मणांचें उदरनिर्वाहाचें मुख्य साधन भिक्षा हेंच असे. पांडव ब्राह्मणांच्या वेषानें राहत असल्यामुळें तेही भिक्षाटनास जात असत, आणि जें

कांहीं त्यांस मिळे त्यावर ते निर्वाह करीत असत. त्यांच्या आईचें नांव कुंती असें होतें. नेहमींप्रमाणें ते त्या दिवशींही घरीं जाऊन बाहेरूनच मोठ्यानें म्हणाले, "आई, आज आम्हांस अपूर्व भिक्षा मिळाली आहे." कुंती म्हणाली, "बरें बाबांनों, ती तुम्ही सर्वजण वांटून घ्या." असें म्हणत म्हणत ती बाहेर आली आणि पहाते तों ती सुंदर राजकन्या तिच्या दृष्टीस पडली. तिला पाहून कुंती म्हणाली, "अरे, माझ्या तोंडांतून काय हे चमत्कारिक शब्द बाहेर पडले!" मातेचा शब्द खालीं पडूं द्यावयाचा नाहीं असा पांचही जणांचा कृतनिश्चय होता. माता म्हणेल तें केलेंच पाहिजे अशी त्यांची प्रतिज्ञा होती. आपल्या मातेचा शब्द खरा करण्याकरितां त्या पांचही बंधूंनीं द्रौपदीशीं विवाह केला.

प्रत्येक मानवसमाजाची उत्क्रांति पायरीपायरीनें होत असते, हा सिद्धान्त आपणा सर्वांच्या अनुभवांतलाच आहे. प्रस्तुत काव्यांतही मानवसमाजाच्या उत्क्रांतीचे निरनिराळे आदर्श दिसून येतात. एकाच स्त्रीशीं पांचजणांनीं विवाह केला ही गोष्ट काव्यलेखनानें चोरून न ठेवितां स्पष्ट नमूद केली आहे खरी; तरी पण ती गोष्ट सकारण होती असें दाखविण्याचा यत्नही त्यानें केला आहे. ती मातेची आज्ञा होती आणि मातेची आज्ञा सर्वथा अनुल्लंघनीय आहे असें त्यानें ध्वनित केलें आहे. प्रत्येक राष्ट्राचा पूर्वापार इतिहास पाहिला तर अशा प्रकारची अनेकपतित्वाची चाल सर्व देशांत होती असें आपणांस आढ-ळून येतें. एखाद्या कुटुंबांतील तीन-चार भावांनीं एकाच स्त्रीशीं लग्न करण्याची चाल सर्व देशांत प्रचारांत होती. महाभारताच्या कालीं ही चाल नष्ट होत होती आणि पांडवबंधूंचें लग्न हें त्या चालीचा अवशेष होता असें दिसून येतें.

द्रौपदीचा भाऊ इकडे मोठ्या घोंटाळ्यांत पडला होता. ज्यानें पण जिंकून आपल्या भगिनीचें पाणिग्रहण केलें तो व त्याचे बंधू कोण असावे याचा तर्क त्याला होईना. त्यांजपाशीं रथ, घोडे अथवा इतर प्रकारची सामग्री कसलीच नव्हती. ते निवळ पादचारी होते. तो रात्रीच्या वेळीं त्यांच्या राहण्याच्या ठिकाणीं गेला आणि ते आपसांत काय बोलतात हें ऐकण्यासाठीं तो बाहेरच उभा राहिला. त्यांचे आपसांतील चाललेलें भाषण ऐकून ते खरोखर क्षत्रिय आहेत अशी त्याची खात्री झाली. घरीं येऊन त्यानें ती गोष्ट आपल्या पित्यास कळविली तेव्हां त्याला मोठा आनंद झाला.

अशा प्रकारचा विवाह विहित आहे कीं काय याबद्दल तेव्हांही मोठी भवति न भवति झाली; परंतु श्रीव्यासांनीं हा विवाह इष्ट आहे असें सांगितल्यावरून तो समारंभ पार पडला. द्रुपदराजानेंही श्रीव्यासांचें वचन मान्य करून द्रौपदीचा विवाह त्या पांच बंधूंशीं करून दिला.

यानंतर पांडव कांहीं काळ सुखासमाधानानें राहिले. त्यांचें सामर्थ्यही दिवसेंदिवस वाढत गेलें. त्यांचा नाश व्हावा म्हणून दुर्योधनानें व त्याच्या पक्षाच्या लोकांनीं अनेक प्रकारचे उपाय योजिले, परंतु त्यांचा कांहींच उपयोग झाला नाहीं. शेवटीं धृतराष्ट्रराजानें त्यांना राजधानीला बोलावून नेलें व त्यांच्याशीं आपल्या पुत्रांचा संधि करविला, व युधिष्ठिराला अर्धें राज्य दिलें. पांडवांनीं आपल्यारितां इंद्रप्रस्थ नांवाचें एक नवें शहर वसविलें आणि ते तेथें राहूं लागले. त्यांनीं आपल्या शौर्यानें आपल्या राज्याचा विस्तारही वाढविला. त्यानंतर राजा युधिष्ठिरानें एक राजसूय यज्ञ करण्याचा बेत केला. राजसूय यज्ञ हा सार्वभौमराजानें करावयाचा असे. यज्ञाच्या वेळीं सर्व मांडलिक राजे येऊन स्वतःच्या अंगमेहनतीनें यज्ञाच्या कार्यांत मदत करीत असत. यादवांचा अधिपति श्रीकृष्ण हा पांडवांचा मोठा मित्र असून शिवाय आप्त असल्यामुळें त्यालाही हा यज्ञाचा बेत पसंत पडला. परंतु यज्ञ शेवटास जाण्याच्या कामीं एक मोठा अडथळा होता. त्या वेळीं जरासंध या नांवाचा एक बलाढ्य राजा होता. शंभर राजे बळी देण्याचा त्यानें बेत केला होता, आणि यासाठीं त्यानें ८६ राजे बंदींत ठेवले होते. यज्ञसमारंभांत तो विघ्न आणील याकरितां त्याचा बंदोबस्त प्रथम करण्याचा सल्ला श्रीकृष्णानें पांडवांस दिला. श्रीकृष्ण, भीम आणि अर्जुन यांनीं त्यास युद्धास पाचारण केलें. चौदा दिवसपर्यंत भीमाचें व त्याचें मल्लयुद्ध होऊन शेवटीं जरासंध मारला गेला आणि त्यानें बंदींत ठेविलेल्या सर्व राजांस श्रीकृष्णानें मुक्त केलें.

यानंतर पांडवांपैकीं चौघेजण निरनिराळ्या दिशांनीं विजयाकरितां गेले. त्यांनीं कित्येक लढाया जिंकून कित्येक राजांस युधिष्ठिराच्या पायीं शरण आणलें. ते परत आले त्या वेळीं अपार संपत्ति त्यांनीं बरोबर आणली होती. याप्रमाणें त्या महायज्ञाला लागणाऱ्या सर्व सामग्रीची सिद्धता झाली.

यज्ञसमारंभाकरितां जिंकलेले सर्व राजे व जरासंधाच्या बंदिशाळेंतून मुक्त केलेले राजेही आले होते. त्या सर्वांनीं राजा युधिष्ठिराचें सार्वभौमत्व कबूल

केलें. यज्ञसमारंभाकरितां धृतराष्ट्रराजाला व त्याच्या पुत्रांनाही बोलाविलें होतें. समारंभाच्या समाप्तीच्या वेळीं राजा युधिष्ठिराला सार्वभौमत्वाचा अभिशेक झाला. याच वेळीं भावी महायुद्धाचें बीज पेरलें गेलें. यज्ञाचा तो अपूर्व समारंभ पाहून दुर्योधन मत्सरानें जळूं लागला. पांडवांचें वैभव आणि युधिष्ठिराचें सार्वभौमत्व त्याला सहन झालें नाहीं. पांडवांना कोणत्यातरी उपायानें गोत्यांत आणून त्यांचें वैभव हरण करण्याचा त्यानें निश्चय केला; कारण, युद्धांत त्यांना जिंकणें शक्य नाहीं, ही गोष्ट त्याला पक्की ठाऊक होती. याकरितां कांहीं कपट योजण्याचा निश्चय त्यानें केला. युधिष्ठिर राजाला द्यूत खेळण्याचा नाद होता. शकुनीबरोबर द्यूत खेळण्यासाठीं दुर्योधनानें त्याला पाचारण केलें. शकुनी हा दुर्योधनाचा मामा असून अत्यंत दुष्ट व कुटिल नीतीचा पुतळा म्हणून प्रसिद्ध होता. भारतीय महायुद्धांत जो रक्ताचा पाऊस पडला आणि जी भयंकर प्राणहानी झाली, तिचें पातक याच कपटपटूच्या माथीं आहे. असो. क्षत्रियाला युद्धांकरितां अथवा द्यूत खेळण्याकरितां कोणीं पाचारण केलें असतां त्यानें तें नाकारलें, तर त्याच्या क्षत्रियत्वास तें लांछन आहे असें त्या काळीं समजलें जात असे. युधिष्ठिर राजा सर्व गुणांचा अलंकार होता, असें महाभारतांत म्हटलें आहे. सर्व सज्जनांचा तो आदर्श होता. असें असतांही द्यूताकरितां दुर्योधनानें केलेलें पाचारण त्यास मान्य करावें लागलें. शकुनीनें द्यूत खेळण्याकरितां जे फांसे तयार केले होते त्यांत कपट होतें. युधिष्ठिराला ही गोष्ट ठाऊक नव्हती. यामुळें प्रत्येक डावांत त्याला हार खावी लागली. याप्रमाणें प्रत्येक डावाच्या वेळीं पण लावतां लावतां शकुनीनें त्याचें सर्वस्व हरण केलें. शेवटीं आपण स्वतः, आपले बंधू व द्रौपदी या सर्वांना त्यानें पणाला लाविलें. या डावांतही त्याला हार खावी लागली. त्यांचें सर्व वित्त कौरवांचें झालें. एवढेंच नव्हे तर त्यांचें जीवितही कौरवांच्या हातीं गेलें. त्या नीचांनीं बिचाऱ्या पांडवांचा अनेक प्रकारें उपहास केला. द्रौपदीचा जो अमानुष छळ त्यांनीं केला, त्यायोगें दगडालाही पाझर फुटला असता. शेवटीं आंधळ्या धृतराष्ट्राच्या मध्यस्थीनें ते मुक्त झाले व त्यांनीं आपल्या घरीं जाऊन राज्य करावें असें ठरलें; पण दुर्योधनाचें समाधान एवढ्यानें झालें नाहीं. त्यानें आणखी एक डाव खेळण्यास युधिष्ठिराला आव्हान केलें. या डावांत जो कोणी हार खाईल त्यानें बारा वर्षें वनवास व एक वर्ष अज्ञातवास

करावा असा पण लाविला होता. आज्ञातवास म्हणजे कोणींही त्यास ओळखूं नये अशा स्थितींत राहणें. अज्ञातवासाचे वेळीं त्याची ओळख कोणाला पटली तर त्यानें फिरून बारा वर्षें वनवास व एक वर्ष अज्ञातवास करावा अशीही एक अट त्यांत होती. हा शेवटचा डावही बिचाऱ्या युधिष्ठिराच्या अंगावर आला, आणि पणाप्रमाणें ते पांच बंधू आपल्या भार्येसह वनांत निघून गेले. बारा वर्षेंपर्यंत त्यांनीं वनवास केला. वनवासांत असतांहि त्यांनीं अनेक शौर्याचीं आणि परोपकाराचीं कृत्यें केली. त्या वेळीं त्यांनीं अनेक तीर्थयात्राहि केल्या. महाभारतांतील हा कथाभाग अत्यंत मनोरम असून यांत कित्येक अत्यंत सुरस आणि ज्ञानप्रद दंतकथा आणि गोष्टी यांचा संग्रह केला आहे. प्राचीन आर्यावर्तांतील अत्यंत सुंदर आणि उदात्त कथांच्या या संग्रहांत धार्मिक आणि आध्यात्मिक प्रमेयें जागोजाग विखुरलीं आहेत. पांडव वनवासांत असतां मोठमोठे ऋषि आणि महात्मे त्यांच्या भेटीकरतां येत असत, आणि अनेक कथा सांगून त्यांचें रंजन करून त्यांस उपदेशहि करीत. यायोगें त्यांचे वनवासाचे कष्ट पुष्कळ हलके झाले. यांपैकीं एकच गोष्ट तुम्हांस सांगतों.

अश्वपति या नांवाचा एक राजा आर्यावर्तांत पूर्वकाळीं होऊन गेला. त्याला सावित्री या नांवाची एक अत्यंत लावण्यवती आणि गुणवती कन्या होती. ब्राह्मणांच्या अत्यंत पवित्र मंत्रालाहि सावित्रीमंत्र असें नांव आहे. त्या कन्येचें पावित्र्य, जणुंकाय, तिच्या नांवानें दर्शित होत होतें! सावित्री उपवर झाली तेव्हां वरयोजना करण्याविषयीं तिच्या पित्यानें तिला सुचविलें. पूर्वकालीं राजकन्यांना लग्नाच्या बाबतींत पूर्ण स्वातंत्र्य होतें. आपणास पसंत पडेल त्या राजपुत्राशीं विवाह करण्यास त्यांना पूर्ण मोकळीक होती.

एका सुवर्णरथांत बसून सावित्री प्रवासाला निघाली. ती अनेक देश फिरली. तिच्याबरोबर संरक्षणार्थ कांहीं माणसें तिच्या पित्यानें दिलीं होतीं. तिनें निरनिराळे देश अवलोकन केले आणि कित्येक राजपुत्रही पाहिले; पण त्यापैकीं कोणीच तिच्या पसंतीला उतरला नाहीं. शेवटीं फिरतां फिरतां ती एका अरण्यांत आली. कित्येक अरण्यें पशूंसाठीं राखून ठेवण्याची चाल त्या काळीं हिंदुस्थानांत होती. त्या अरण्यांतील पशूंचा वध कोणींही करूं नये अशी ताकीद राजाकडून दिली जात असे. ज्या अरण्यांत सावित्री गेली होती तें अरण्य अशांपैकींच एक होतें. या अरण्यांतील पशू मनुष्याला भीत नसत.

सर्व प्रकारचे वनचर व जलचर मनुष्याबद्दलची भीति विसरले होते. तळ्यांतील मासेसुद्धां वर येऊन मनुष्याच्या हातांतून पदार्थ खात असत. हजारों वर्षेंपर्यंत त्या अरण्यांत कोणींही कधीं शिकार केली नव्हती. त्या अरण्यांत साधुपुरुष आणि वृद्ध वानप्रस्थ हे रहावयास जात असत. तेथील शांततेचा भंग केव्हांही होत नसे. फार काय सांगावें, पण अपराधी लोकही पळून येऊन त्या अरण्यांत सुरक्षित रहात असत. एखाद्याला आपल्या जीविताचा आणि संसाराचा कंटाळा आला तर तो त्या अरण्यांत जाऊन राहत असे. त्या ठिकाणीं अनेक सत्पुरुषाचीं दर्शनें घ्यावीं, त्यांजपासून धर्मज्ञान संपादावें आणि ध्यानधारणादि साधनांनीं उर्वरित आयुष्याचें सार्थक करावें अशा हेतूनें कित्येक लोक जात असत.

द्युमत्सेन या नांवाचा एक राजा होता. त्याच्या शत्रूंनीं त्याचें राज्य बळकावलें होतें. तो राजा अतिशय वृद्ध झाला होता व त्याची दृष्टीहि नाहींशी झाली होती. हा अंध राजा आपली पत्नी व पुत्र यांसह याच अरण्यांत येऊन राहिला होता. तेथें तपाचरणांत राहिलेलें आयुष्य तो घालवीत होता. त्याच्या मुलाचें नांव सत्यवान असें होतें.

फिरतां फिरतां सावित्री या राजाच्या झोंपडींत आली. अरण्यवासी सत्पुरुषांचा मान ठेवण्याची चाल त्या काळीं होती. एखादा राजा अथवा महाराजाही अरण्यांत आला आणि त्याच्या नजरेस एखादें झोंपडें पडलें तर आंत जाऊन त्यांतील रहिवाशांचें दर्शन घेतल्याशिवाय तो पुढें नसे. सत्पुरुषांचा एवढा मान त्या काळीं राखला जात असे. मी अमक्या ऋषींच्या कुळांतला असें सांगण्यांत एखाद्या सार्वभौमालाही मोठा अभिमान तेव्हां वाटत असे. आपला एखादा पूर्वज आश्रमवास करून कंदमुळांवर आपला निर्वाह करीत असे, ही गोष्ट तेव्हां मोठ्या अभिमानाची समजली जात असे. अमका ऋषि आमचा पूर्वज असें सांगण्यांत आजिमितीसही आम्हांला मोठा अभिमान वाटतो. धार्मिक बाबींना अशा प्रकारचा मान हिंदुस्थानांत अजूनही मिळतो. अशा प्रकारच्या एखाद्या आश्रमांत जाण्याचा प्रसंग एखाद्या राजाला आला, तर तो घोड्यावरून उतरून पादचारी होई. आपला रथ, घोडे वगैरे महत्त्व दाखविणारे पदार्थ आश्रमाच्या हद्दीच्या बाहेर तो ठेवीत असे. **'विनीतवेषेण प्रविष्टव्यानि तपोवनानि'** अशी भावना सर्व राजांच्या

हृदयांत वास करीत होती. एखादा मोठा शूर क्षत्रिय असला तरी क्षात्रदर्शक वस्तू बाहेर ठेवल्यावांचून तो आश्रमांत शिरावयाचा नाहीं. बाह्यतः तरी त्यानें शांतवृत्तीचा स्वीकार केलाच पाहिजे.

द्युमत्सेन राजाच्या आश्रमांत सावित्री आली, आणि राजाच्या सत्यवान नामक पुत्राला तिनें पाहिलें आणि तिचें प्रेम त्याच्यावर जडलें. त्या वेळेपर्यंत अनेक राजकुमार तिनें पाहिले होते, पण सत्यवानाला पाहिल्यानंतर मात्र तिचें मन तिच्या ताब्यांत राहिलें नाहीं.

आपला प्रवास संपवून सावित्री परत आली तेव्हां तिच्या पित्यानें तिला विचारलें, "बाळे, एखाद्या राजपुत्राला तूं पसंत केलेंस का?" सावित्रीनें होकारार्थी मान हालवितांच तिचा बाप म्हणाला, "काय त्या राजपुत्राचें नांव?" सावित्रीनें उत्तर दिलें, "ते आतां राजपुत्र नाहींत. त्यांच्या वडिलांचें नांव द्युमत्सेन असें असून त्यांच्या शत्रूंनीं त्यांचें राज्य हिरावून घेतलें आहे. त्यामुळें आपल्या पुत्रासह द्युमत्सेनांनीं अरण्यवास पत्करला आहे. द्युमत्सेनांचा पुत्र हल्लीं कंदमुळें आणून आपल्या मातापित्याचें पोषण करीत असतो."

त्यांचें भाषण याप्रमाणें चाललें आहे तों नारदमुनि तेथें आले. राजानें ही हकीगत मुनींच्या कानांवर घालून त्यांचा सल्ला विचारला. नारदमुनि म्हणाले, "राजा, आजपासून बारा महिन्यांनीं हा राजपुत्र मरण पावणार आहे. तुझ्या मुलीनें त्याला पसंत केलें ही फारच वाईट गोष्ट झाली आहे." राजानें हें मुनीचें म्हणणें सावित्रीला कळविलें आणि म्हटलें, "बाळे, विचार कर. अशा अल्पायु राजपुत्राशीं विवाह करून आपल्या जन्माचें तूं मातेरें करून घेणार काय? त्याजबद्दलचा आतां विचारच तूं करूं नको." सावित्री म्हणाली, "त्यांना मीं मनानें वरिलें आहे. आतां दुसऱ्याशीं विवाह करून मी पातिव्रत्यभंगाचें पातक कसें आचरूं? कुमारिकेनें पसंती एकदांच करावयाची असते. ती पसंती होऊन चुकल्यावर पुन्हां तिनें निराळा विचार करणेंसुद्धां पापाचरणच आहे." सावित्रीचा निश्चय दृढ आहे असें पाहून तिच्या बापानें तिचें लग्न सत्यवानाशीं करून दिलें. लग्न झाल्याबरोबर सावित्री अरण्यांत राहावयास गेली. सत्यवान कधीं मृत्यु पावणार हें सावित्रीला अगोदर कळलें होतें; पण त्याबद्दल तिनें कोणाजवळही उच्चार केला नव्हता. ती माहिती तिनें अत्यंत गुप्त राखली होती. कंदमुळें आणण्यासाठीं सत्यवान घनदाट अर-

ण्यांत जात असे. तेथें कंदमुळें व वाळलेल्या काटक्याकुटक्या गोळा करून तो आश्रमीं आला म्हणजे सावित्रीनें पाकनिष्पत्ति करावी असा क्रम चालू झाला. अशा रीतीनें त्यांचा काळ सुखानें जातां जातां तो भयंकर दिवस जवळ येत चालला, आणि आतां तर फक्त तीनच दिवसांचा अवकाश राहिला. त्या तीन रात्री सावित्री उपोषित राहिली. त्या तीन रात्री तिनें परमेश्वराच्या आराधनांत घालविल्या. तिच्या नेत्रांतून एकसारखा अश्रुपात होत होता. शेवटीं तो काळदिवस उगवला. त्या दिवशीं तिनें सत्यवानावर एकसारखी नजर ठेवली होती. सत्यवानाबरोबर अरण्यांत जावयास तिनें आपल्या सासूसासऱ्यांची परवानगी मागितली. त्यांनींही परवानगी दिल्यावरून ती त्या दिवशीं सत्यवानाबरोबर अरण्यांत गेली. एकाएकीं सत्यवानाला अस्वस्थता वाटूं लागली. त्याला भोंवळ येऊं लागली, तेव्हां तो सावित्रीला म्हणाला, "माझें डोकें जड होत आहेसें वाटतें. माझ्या डोळ्यांसही अंधारी येत आहे. मी येथेंच थोडा वेळ विश्रांति घेतों." हे शब्द कानीं पडतांच सावित्रीचें अंतःकरण अगदीं व्याकुळ होऊन गेलें. तथापि तसाच धीर धरून ती म्हणाली, "महाराज, माझ्या मांडीवर डोकें टेंकून थोडा वेळ विश्रांति घ्यावी." सावित्रीच्या मांडीवर डोके टेंकून सत्यवान पडतो न पडतो तोंच त्याची प्राणज्योति मंद होऊं लागली. सावित्रीनें त्याचें मस्तक हृदयाशीं धरलें. तिच्या डोळ्यांतून पाण्याच्या धारा एकसारख्या वाहूं लागल्या. त्या निर्जन अरण्यांत तिचें समाधान कोण करणार? सत्यवानाचे प्राण हरण करण्याकरितां येणाऱ्या यमदूतांच्या कृष्णछाया तिला दिसूं लागल्या. येत येत त्या छाया बऱ्याच जवळ आल्या; परंतु सावित्रीच्या भोंवतीं तीव्र पातिव्रत्याग्नीचें तेजोवलय पसरत असल्यामुळें त्या छाया तिच्या पतीच्या प्राणास स्पर्श करूं शकेनात. थोडा वेळ थांबून यमदूत परत गेले आणि ही सर्व हकीगत त्यांनीं यमाला कळविली.

दूतांनीं सांगितलेली हकीगत ऐकल्यानंतर यम स्वतः त्या ठिकाणीं आला. पृथ्वीवर मनुष्याची उत्पत्ति झाल्यावर जो पहिला मनुष्य मृत्यु पावला तोच यम झाला आहे. सर्वांचे प्राण हरण करून त्यांच्या बऱ्यावाईट कर्माप्रमाणें त्यांस गति देणें हें या देवतेचें काम आहे. यम स्वतः त्या ठिकाणीं आला व सावित्रीच्या जवळ येऊन उभा राहून म्हणाला, "मुली, तें शरीर आतां तुजपासून दूर कर. जो कोणी या जगांत जन्मास आला त्याला मृत्यु नेमले-

लाच आहे. मी यम त्याला नेण्यासाठीं आलों आहें." यमाच्या सांगण्याप्रमाणें सावित्रीनें आपल्या पतीचें मस्तक खालीं ठेवलें. यमानें त्याच्या प्राणाचें हरण केलें व तो चालूं लागला. थोड्याशा अंतरावर यम गेला इतक्यांत आपल्या पाठीमागें वाळलेल्या पाचोळ्यावर कोणाचीं पावलें वाजत आहेत असें वाटून त्यानें मागें वळून पाहिलें तों सावित्री त्याच्या नजरेस पडली; तेव्हां तो तिला म्हणाला, "मुली, तूं माझ्यामागें कां येतेस? मरण कोणाला सुटलें आहे काय?" सावित्री म्हणाली, "यमराज, मी आपल्यामागें येत नाहीं. पण पति जाईल तिकडे जाणें हें प्रत्येक पतिव्रतेचें कामच आहे. ज्याप्रमाणें मृत्यु पावणें हा प्रत्येक देहधाऱ्याचा धर्म आहे, त्याचप्रमाणें सदोदित पतिसमागमें असणें हाही कुलांगनेचा धर्मच नाहीं का? हा सनातनधर्म आहे. देशकालवर्तमानानें हा धर्म बाधित होत नाहीं." या तिच्या उत्तरानें संतोष पावून यम म्हणाला, "मुली, तुला हवा तर एक वर मागून घे. पण याचा प्राण मात्र तुला प्राप्त होणार नाहीं." सावित्री म्हणाली, "भगवान् यमधर्मा, मला कांहीं वर देण्याची आपली मर्जी असेल तर माझ्या सासऱ्याला दृष्टि द्या; आणि त्याला सुख प्राप्त व्हावें हें देणें आपण मला द्यावें." "तथास्तु. तुझी शुभ इच्छा तृप्त होवो." असें म्हणून यम पुढें चालूं लागला. पुन्हां त्याला पूर्वीप्रमाणेंच पावलांचा आवाज ऐकूं आला. पुन्हां मागें वळून तो म्हणाला, "बाळे, तूं अजूनही माझ्यामागून कां येतेस?" सावित्रीनें उत्तर दिलें, "महाराज, मी तरी काय करूं. माझे पाय आपोआपच आपल्यामागें चालूं लागतात. मागें फिरावें म्हणून मीं पुष्कळ यत्न केला; पण माझें मन आणि त्याबरोबरच माझें शरीरही आपल्यामागें येतें. माझा आत्मा या देहांतून अगोदरच बाहेर गेला आहे. माझ्या पतीच्या आत्म्याहून माझा आत्मा निराळा नाहीं. त्या माझ्या आत्म्यामागें माझें शरीर जातें त्याला मी काय करूं?" यम म्हणाला, "अहाहा! तुझे हे शब्द ऐकून मला आनंद होतो. आणखी एखादा वर हवा तर मागून घे; पण सत्यवान मात्र तुला परत मिळणार नाहीं." सावित्री म्हणाली, "देवा, तुझी मर्जी असेल तर माझ्या सासऱ्याचें सर्व वैभव पुन्हां प्राप्त होवो आणि तो पुन्हां राज्यासनावर बसो." यम म्हणाला, "मुली, तुझ्या इच्छेप्रमाणें होईल. पण आतां मात्र घरीं जाहो. जिवंत मनुष्यांनीं यमाबरोबर चालूं नये." असें म्हणून यम पुढें चालूं लागला. पुन्हां त्याला पूर्वीसारखाच

पावलांचा शब्द ऐकूं येऊं लागला. बिचारी सावित्री अजूनही त्याच्यामागें जात होती. यम पुन्हां मागें वळून म्हणाला, "बाळे सावित्री, आतां माझ्यामागें येऊन तुला कांहीं फलप्राप्ति होणार नाहीं." सावित्री म्हणाली, "माझ्या आत्म्याला घेऊन आपण जातां आणि मी मागें रहावें म्हणतां हें कसें? माझें शरीर आतां माझ्या ताब्यांत नाहीं." यम म्हणाला, "सावित्री, कल्पना कर कीं तुझा भर्ता अत्यंत पापी असला आणि त्याकरितां नरकवासाची शिक्षा त्याला होणार असली तर तूं त्याबरोबर कशी जाशील बरें?" सावित्रीनें उत्तर दिलें, "देवा, माझे पूज्य पति जेथें असतील तेथें जाणें हेंच माझें सुख; ते स्वर्गांत असोत अगर दुसऱ्या कोठें असोत; त्यांचें जें ठिकाण तेंच माझें पुण्यक्षेत्र; तीच माझी सुखभूमि." यम म्हणाला, "पुण्यशीले, तुझ्या भाषणानें मी संतुष्ट झालों आहें. आणखीही वर माग—पण मृत मनुष्यें जिवंत होत नसतात हें मात्र ध्यानांत धर." सावित्री म्हणाली, "आपली मर्जी असली तर माझ्या सासऱ्याचा वंशच्छेद होऊं नये एवढेंच माझें मागणें आहे. सत्यवानाला पुत्र होऊन त्यांना माझ्या सासऱ्याचें राज्य मिळावें." सावित्रीचें हें भाषण ऐकून हंसून यम म्हणाला, "प्रियकन्ये, तुझ्या इच्छेप्रमाणें होईल. जा. तुझा पति पुन्हां जिवंत होऊन त्याला पुत्र होतील. त्यांना राज्यासन प्राप्त होईल. बाळे, जा आतां घरीं. प्रेमाला वश न होणारा असा या जगांत कोण आहे? प्रेमावर साक्षात् मृत्यूही आपला अंमल गाजवूं शकत नाहीं. तुझ्यासारखें प्रेम मला इतर स्त्रियांच्या ठिकाणीं आजपर्यंत आढळलें नाहीं. खरें प्रेम हीच या जगांतील चिरस्थायी वस्तु आहे. मी प्रत्यक्ष मृत्यु असतां प्रेमाचा पाश माझ्यानेंही तोडवला नाहीं, इतकेंच लक्ष्यांत ठेव."

सावित्रीची कथा याप्रमाणें आहे. सावित्रीचें व्रत आचरणें हाच कित्ता आमच्या आर्यस्त्रियांपुढें ठेवलेला आहे. आपल्या प्रेमाच्या बळावर जिनें प्रत्यक्ष मृत्यूलाही जिंकलें, तिच्याचसारखें वर्तन आमच्या आर्यस्त्रियांनीं करावें अशी त्यांच्या जन्मभूमीची इच्छा आहे.

अशा प्रकारच्या शेंकडों सुंदर कथा महाभारतांत जागोजाग गोंविल्या आहेत. महाभारत हा जगांतल्या अत्युत्कृष्ट ग्रंथांतला एक ग्रंथ आहे हें मीं अगोदर सांगितलें आहे. त्याचीं एकंदर अठरा पर्वें अथवा भाग असून एकंदर ग्रंथ सुमारें एक लक्ष आहे.

आतां आपण आपल्या मुख्य विषयाकडे वळूं. पांडव वनवासास गेल्याचा भाग अगोदर सांगितलाच आहे. तेथेंही दुर्योधन त्यांच्या पाठीला हात धुऊन लागला होता. त्यांच्या नाशाकरितां त्यानें अनेक उपाय योजून पाहिले पण ते सर्व फुकट गेले.

अरण्यांतील त्यांच्या जीवनक्रमांतील एक कथा आपणांस सांगतों. अरण्यवासांत असतां एके दिवशीं धर्मराजा फार तृषाक्रांत झाला होता. त्यानें आपला बंधु नकुल यास पाणी आणण्याकरितां पाठविलें. जवळच एक सरोवर होतें तेथें तो गेला आणि आतां पाण्याला हात लावणार तोंच शेजारच्या एका वृक्षावरून त्याला पुढील शब्द ऐकूं आले. "अरे थांब, माझ्या प्रश्नांचें अगोदर उत्तर दे आणि नंतर पाण्याला स्पर्श कर." नकुलानें त्याकडे लक्ष्य न देतां तो सरोवरांतील पाणी प्याला आणि तेथेंच मृत होऊन पडला. बराच वेळ झाला तरी नकुल परत येत नाहींसें पाहून युधिष्ठिरानें सहदेवाला त्याच्या शोधासाठीं व पाणी आणण्यासाठीं पाठविलें. त्याच्या सांगण्याप्रमाणें सहदेव गेला आणि फिरतां फिरतां त्या सरोवरावर आला. तेथें येऊन पहातो तों आपला भाऊ मरून पडला असल्याचें त्यास दिसून आलें. आपल्या बंधूची ही स्थिति पाहून याला अत्यंत खेद झाला; पण तो तसाच पाणी आणण्याकरितां सरोवराकडे गेला. तेथें जातांच त्याला तेच शब्द पुन्हां ऐकूं आले. "मुला, माझ्या प्रश्नांचें उत्तर अगोदर दे आणि नंतर पाणी पी." त्यानेंही त्या शब्दांकडे लक्ष्य दिलें नाहीं. पाणी पिऊन सरोवराबाहेर येतांच तोहि मरून पडला. आपले दोघेही बंधू परत आले नाहींत असें पाहून युधिष्ठिरानें अर्जुन व भीम यांस पाठविलें; पण त्यांचीही तीच गत झाली. शेवटीं युधिष्ठिर स्वतः त्या सरोवरावर आला; आणि आपल्या बंधूंची ती अवस्था पाहून अत्यंत व्याकुल होऊन रुदन करूं लागला. इतक्यांत त्यालाही एक भाषण ऐकूं आलें. "मी एक यक्ष येथील रहिवासी आहें. मी बगळ्याच्या रूपानें येथें फिरून लहान लहान मत्स्य भक्षण करीत असतों. माझ्या शापामुळेंच तुझ्या भावांस मृत्यु प्राप्त झाला आहे. माझ्या प्रश्नांचीं उत्तरें तूं न देशील तर तुलाही त्यांच्याच पंथाला जावें लागेल. माझ्या प्रश्नांचीं उत्तरें देऊन मग लागेल तितकें पाणी पी अथवा घरींही घेऊन जा." युधिष्ठिर म्हणाला, आपण प्रश्न विचारावे. माझ्या बुद्धीप्रमाणें मी त्यांचीं उत्तरें देईन." यक्षानें

त्याला कित्येक प्रश्न विचारले असतां राजा युधिष्ठिरानें त्यांचीं समर्पक उत्तरें दिलीं. त्यांपैकीं एक प्रश्न असा होता :—" या जगांत अत्यंत मोठें आश्चर्य कोणतें ? " "आपल्या आजूबाजूला शेंकडों माणसें मरत असल्याचें प्रत्यहीं पाहत असतां आपण चिरंजीव आहों असें मनुष्याला वाटतें हेंच अत्यंत मोठें आश्चर्य." असें उत्तर राजा धर्मानें दिलें. दुसरा एक प्रश्न :—"धर्मरहस्य जाणण्याचा मार्ग कोणता ?" युधिष्ठिरानें उत्तर दिलें, "वादविवाद करून निश्चितार्थ समजत नाहीं. मतें अनेक आहेत. श्रुति स्मृति अनेक असून परस्परांस विरोधक दिसतात. ऋषिवचनांतही अशीच एकवाक्यता नाहीं. यासाठीं "**महाजनो येन गतः स पन्थाः ।**" अशा प्रकारचीं उत्तरें ऐकून यक्ष म्हणाला, "राजा, तुझीं उत्तरें ऐकून मला फार संतोष झाला आहे. मी यमधर्म असून तुझी परीक्षा पाहण्याकरितांच येथें आलों. तुझे बंधू खरोखर मृत झालेले नाहींत. माझ्या शापबलानें ते मृतवत् पडले आहेत इतकेंच. तूं अहिंसेचें तत्त्व पूर्णपणें पाळलें आहेस; तूं अजातशत्रु आहेस; त्या अर्थी तुझे बंधू तुला पुन्हां प्राप्त होवोत." यक्षानें असें म्हणतांच सर्व पांडव उठून उभे राहिले.

राजा युधिष्ठिराच्या स्वभावविशेषाची या गोष्टींत एक छटा दाखविली आहे. त्यानें दिलेल्या उत्तरांवरून तो केवळ सत्ताधीश राजा नसून खरोखर योगी आणि तत्त्ववेत्ता होता, असें दिसून येतें.

याच सुमारास त्यांच्या वनवासाचे दिवस संपत आले असल्यामुळें अज्ञातवासाकरितां विराट राजाच्या नगरांत जाण्याविषयीं यक्षानें त्यांस आज्ञा केली. त्याप्रमाणें निरनिराळे वेष घेऊन ते विराट राजाच्या घरीं गेले आणि त्याच्याच सेवेंत राहिले. युधिष्ठिर हा कंकभट होऊन राजाबरोबर द्यूत खेळण्यासाठीं राहिला. भीम पाकगृहांत योजिला जाऊन बल्लव झाला. अर्जुन बृहन्नडा होऊन राजकन्या उत्तरेला नृत्य शिकविण्याकरितां राहिला. नकुलाकडे अश्वशालेचें काम सोंपविण्यांत आलें. सहदेवाची योजना गोशालेकडे झाली. द्रौपदी दासी होऊन राणीच्या सेवेला राहिली. अशा रीतीनें विराट राजाच्या घरीं त्यांनीं आपल्या अज्ञातवासाचें वर्ष घालविलें. दुर्योधनानें अनेक प्रकारें त्यांचा शोध चालविला होता; पण त्याचे सर्व प्रयत्न फुकट गेले. तें वर्ष संपतें न संपतें तोंच ते पुन्हां प्रकट झाले.

त्यानंतर राजा युधिष्ठिरानें धृतराष्ट्राकडे शिष्टाई करण्याकरितां एक वकील पाठवून आपलें अर्धें राज्य आपणास परत द्यावें अशी त्याजपाशीं मागणी

केली. परंतु दुर्योधनानें युधिष्ठिराचें हें मागणें मनास आणलें नाहीं. पांडवांच्या बद्दल पक्का द्वेष त्याच्या मनांत भरला होता. त्यांच्या न्यायाच्या मागण्याकडेही त्यानें लक्ष्य दिलें नाहीं. अर्धें राज्य तर बाजूलाच राहिलें, पण एखादा प्रांत अथवा पांच गांवही त्यांस देण्याचें नाकारलें. युद्ध केल्याशिवाय एखादा गांव देणार नाहींच, पण सुईच्या अग्राइतकी भूमीही मी पांडवांस देणार नाहीं, असा स्पष्ट जबाब त्यानें वकिलाला दिला. त्याचा बाप धृतराष्ट्र यानेंही त्याची समजूत घालण्याचा पुष्कळ यत्न केला. पांडवांशीं समेट करण्याबद्दल त्यानें दुर्योधनाला अनेक प्रकारें उपदेश केला, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. नंतर यदुकुलश्रेष्ठ भगवान् श्रीकृष्ण यांनींही शिष्टाई केली. युद्ध करून व्यर्थ प्राणहानी होऊं नये म्हणून दुर्योधनपक्षीय शहाण्या मनुष्यांनींही त्याला सांगून पाहिलें; परंतु या सर्व प्रयत्नांस कांहीं यशःप्राप्ति झाली नाहीं. शेवटीं दोन्ही पक्षांनीं युद्धाची कडेकोट तयारी केली. आर्यावर्तांतील सर्व राष्ट्रांचे अधिपति या युद्धांत कोणत्याना कोणत्या पक्षाकडे सामील झाले होते.

पूर्वापार चालीप्रमाणें या युद्धास आरंभ झाला. त्या वेळींही युद्धाचे विशेष नियम असत. त्यांस अनुसरूनच तेव्हां युद्धें होत असत. युधिष्ठिरानें आपल्या पक्षाकडील सर्व राजांस बोलावणें करून आपल्या बाजूला येण्याविषयीं त्यांस विनंति केली. दोन पक्ष युद्धास सिद्ध झाले असतां त्यांपैकीं ज्याकडून प्रथम बोलावणें येईल त्याच्या बाजूला जावयाचें हा त्यावेळीं क्षात्रधर्म समजला जात असे. त्याप्रमाणें कौरव व पांडव यांजकडून बोलावणीं जातांच सर्व देशांतून राजेलोक या अथवा त्या पक्षाकडे जमा झाले. प्रथम बोलावणें येईल तिकडे जावयाचें अशी क्षात्रनीति असल्यामुळें कित्येक वेळां एक भाऊ एका पक्षाकडे व दुसरा दुसऱ्याकडे; अथवा बाप एका बाजूला व मुलगा दुसऱ्या बाजूला याप्रमाणेंही प्रकार घडून येई. त्या वेळची युद्धनीति सध्याहून फार भिन्न होती. त्यांतील कित्येक नियम सध्या आपणांस चमत्कारिक वाटण्यासारखे आहेत. सायंकाळ होऊन त्या दिवसाची लढाई संपली कीं परस्पर शत्रुभाव विसरायचा असा तेव्हां नियम असे. एकमेकांचे सैनिक खुशाल एकमेकांच्या तंबूंत जावयाचे, पण सकाळ झाली कीं पुन्हां लढाईची सुरुवात पूर्वीप्रमाणेंच निकरानें व्हावयाची. मुसलमानांची स्वारी हिंदुस्थानावर येईपर्यंत हिंदुस्थानांत अशाच प्रकारचे नियम अस्तित्वांत होते. त्याचप्रमाणें प्रत्येक

योद्धयानें समोरच्यापैकीं जो आपल्याच सारख्या हत्यारांनीं युक्त असेल त्याबरोबरच युद्ध करावें असा नियम होता. घोडेस्वारानें घोडेस्वाराबरोबरच युद्ध करावें, रथ्यानें रथ्याबरोबरच लढावें असा नियम असे. तसेंच हत्यारांना विष लावण्याची मनाई असे. शत्रु निजला असतां अथवा गैरसावध असतां त्यावर हल्ला करावयाचा नाहीं आणि त्याचप्रमाणें कोणत्याही प्रकारच्या कपटानें युद्ध करावयाचें नाहीं असाही नियम असे. अशाच प्रकारचे दुसरेही कित्येक नियम होते. यांपैकीं एखादा नियम कोणीं मोडला तर तें त्याच्या क्षत्रियत्वाला लांछनास्पद समजलें जात असे. सर्व क्षत्रियांना अशा प्रकारचें शिक्षण दिलें जात असे. मध्यआशियांतून परदेशीयांच्या स्वाऱ्या हिंदूंवर झाल्या, तेव्हां त्यांनीं आपल्या या नव्या शत्रूंशीं युद्ध करतांनाही हेच नियम पाळले होते. शत्रूचा पराभव होऊन तो परत जात असतां त्याची रवानगी करून देतांना त्यास नजरनजराणा द्यावयाचा, असें कित्येक वेळां घडलें आहे. कोणत्याही परकीय राज्यावर निष्कारण स्वारी करून तो देश बळकवावयाचा नाहीं अशी त्या वेळीं आर्यनीति होती. शत्रूचा एखादा मोठा मनुष्य आपल्या हातीं सांपडला तर त्याच्या इतमामाप्रमाणें त्याची रवानगी आर्यराजे करीत असत. मुसलमानांची स्वारी आल्यानंतर या सर्व गोष्टी बंद झाल्या. एखादा हिंदुराजा हातीं सांपडला असतां मुसलमानांनीं त्यास जिवंतही सोडलें नाहीं असें कित्येक वेळां घडलें आहे.

महाभारतीय युद्धाच्या काळीं केवळ धनुष्यबाण एवढेंच हत्यार नव्हतें हें लक्ष्यांत ठेवण्याजोगें आहे. शस्त्रांबरोबर अस्त्रांचाही उपयोग त्या वेळीं केला जात असे. अस्त्रें म्हणजे मंत्रयुक्त अशीं गुप्त शस्त्रेंच होत. मंत्रांचा उपयोग युद्धाच्या कामीं पुष्कळ होत असे. मंत्रांच्या सामर्थ्यानें एकटा मनुष्य लाखों लोकांबरोबर युद्ध करीत असे. अग्न्यस्त्राच्या प्रयोगानें लक्षावधि लोक जळून जातील, असा अग्नि एकटा मनुष्य पेटवूं शकत असे. पर्जन्यस्त्रानें मंत्रित केलेला एक बाण कोणीं फेकल्याबरोबर मुसळधार पाऊस पडत असे. त्या अस्त्रविद्येच्या वेळींही तोफांचा उपयोग युद्धांत करीत असत, हें विशेषेंकरून ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. तोफ हें अत्यंत जुनाट हत्यार आहे असें उघड दिसतें. चिनी लोकही पुरातनकाळीं या हत्याराचा उपयोग करीत असत. चिनी शहरांच्या भोवतालच्या भिंतींवरून कित्येक तोफा चढवून ठेवलेल्या

असत. चिनी लोक लोखंडाच्या जाड नळांतून भुतें आणि राक्षस कोंडून ठेवतात आणि त्याला विस्तव लावतांच हे राक्षस मोठाल्या आरोळ्या मारीत बाहेर पडतात व शत्रूच्या सैन्यांत शिरून पुष्कळ लोकांचा फडशा पाडतात असें इतर लोक त्या वेळीं समजत असत.

त्या वेळीं सैन्याला चतुरंगें असत. पदाति म्हणजे पायांवर उभें राहून लढणारे. तुरग म्हणजे घोडेस्वार. त्याचप्रमाणें हत्तीवर बसणारे योद्धे त्या वेळीं असत. एका सैन्यांत एक तुकडी नुसत्या हत्तींवरील योद्धयांचीच असावयाची. तींत शेंकडों हत्ती असत. त्यांच्यावर लोखंडाचें भक्कम चिलखत असे. त्याचप्रमाणें रथी म्हणजे रथांचा उपयोग करणारे योद्धेही असत. यांपैकीं रथ आणि हत्ती यांचा उपयोग सांप्रत होत नाहीं. या रथाचीं जुनाट चित्रें तुमच्याही पाहण्यांत आलीं असतील. याप्रमाणें प्रत्येक सैन्यांत चार प्रकारचे योद्धे त्या काळीं असत.

कौरव आणि पांडव यांजमधील युद्धास सुरवात झाली तेव्हां श्रीकृष्ण आपल्या पक्षाकडे असावा अशी दोघांचीही इच्छा होती. पण आपण हातांत शस्त्र धरणार नाहीं असें श्रीकृष्णानें सांगितलें. त्यानें युद्धांत अर्जुनाचें सारथ्य स्वीकारलें होतें, आणि दुर्योधनाला आपलें सैन्य दिलें होतें.

कुरुक्षेत्राच्या विस्तीर्ण रणमैदानावर या युद्धास प्रारंभ झाला. या युद्धांत भीष्म, द्रोण, कर्ण, दुर्योधन, त्याचे सर्व भाऊ आणि दुसरे कित्येक योद्धे व भाऊबंद प्राणास मुकले. दोन्ही पक्षांचा भयंकर नाश या युद्धांत झाला. एकंदर अठरा दिवस हें युद्ध चालू होतें. दोन्ही पक्षांकडे मिळून अठरा अक्षौहिणी सैन्य या युद्धांत गुंतलें होतें. यांपैकीं फारच थोडे लोक वांचले. शेवटीं दुर्योधन मरण पावला त्या वेळीं हें युद्ध समाप्त होऊन पांडवांचा जय झाला. या युद्धानें सारा देश शोकसागरांत बुडून गेला होता. गांधारी राणी व इतर स्त्रिया यांच्या रुदनानें दशदिशा दुःखित झाल्या. लक्षावधि स्त्रिया अनाथ झाल्या.

या युद्धांत एक गोष्ट मात्र चिरस्मरणीय अशी घडली आहे. भगवद्गीता हें अमरकाव्य ज्या प्रसंगीं अवनीतलावर अवतीर्ण झालें, तो प्रसंग याच युद्धांतला आहे. याच्या तोडीस बसविण्यासारखा दुसरा ग्रंथ भरतभूमींत अजून निर्माण झाला नाहीं. आम्हां हिंदु लोकांचा हा परमपवित्र आणि परमपूज्य ग्रंथ आहे. भगवान् श्रीकृष्ण आणि अर्जुन यांचा संवाद यांत आहे.

कुरुक्षेत्राच्या रणमैदानावर दोन्ही सैन्यें एकत्र जमलीं असतां हा अक्षय्य ग्रंथ निपजला. ज्यांनीं गीता वाचली नसेल त्यांनीं ती एकवार तरी अवश्य वाचावी, अशी माझी विनंति आहे. तुम्हां अमेरिकन लोकांवर या ग्रंथाचा किती परिणाम झाला आहे याची थोडीतरी कल्पना तुम्हांस झाली तर खरोखर आश्चर्यानें तुम्ही थक्क व्हाल! प्रख्यात अमेरिकन तत्त्ववेत्ता इमरसन याच्या ठिकाणीं गीतेनेंच स्फूर्ति निर्माण केली! तो एके वेळीं कार्लाईल यास भेटावयास गेला असतां त्यानें इमरसनला गीतेची एक प्रत नजर केली. या लहानशा पुस्ताकानेंच अमेरिकेंत मोठी क्रांति घडवून आणिली आहे. अमेरिकेंतील अनेक प्रकारच्या चळवळींचें मूळ गीतेंतच आहे.

भगवान् श्रीकृष्ण हे गीतेंतील प्रमुख पुरुष होत. ज्याप्रमाणें भगवान् येशु खिस्त हा परमेश्वराचाच अवतार आहे असें तुम्ही समजतां, त्याप्रमाणेंच आम्ही हिंदुलोक परमेश्वरानें कित्येक अवतार धारण केले असें समजतों. अवतार एक दोनच झाले असें नसून, ज्या ज्या वेळीं पृथ्वीवर अधर्म माजतो त्या त्या वेळीं परमेश्वर अवतार घेऊन, सज्जनांचें रक्षण आणि दुष्टांचें निर्दलन करतो असें आम्ही समजतों. असे अवतार आजपर्यंत पुष्कळ झाले आहेत. परमेश्वराच्या या सर्व अवतारांत श्रीकृष्ण हाच अधिक पूज्य समजला जातो. इतर अवतारांच्या भक्तांपेक्षां कृष्णभक्तांची संख्याच हिंदुस्थानांत अधिक आहे. भगवान् श्रीकृष्ण हा पूर्णावतार होता असा आमचा समज आहे. बुद्ध वगैरे इतर अवतार त्यागी होते. त्यामुळें संसारी लोकांबद्दल त्यांच्या चित्तांत फारशी अनुकंपा नव्हती. ते स्वतः संन्यस्त वृत्तीचे असल्यामुळें संसारी मनुष्यांबद्दल त्यांच्या मनांत सहानुभूति उद्भवणें शक्यच नव्हतें. पण श्रीकृष्णाची गोष्ट याहून वेगळी आहे तो स्वतः संसारी होता. त्यागी नसून भोगी होता. तो स्वतः राज्यकर्ता होता. त्याला मुलेंबाळें होतीं. सर्व प्रकारचे आप्तसंबंधी आणि मित्र त्याला होते. या सर्वांमध्यें राहून आणि या सर्वांचे वेगवेगळे संबंध लक्ष्यांत आणून त्यानें आम्हा संसारी लोकांस उपदेश केला, इतकेंच नव्हे तर त्या उपदेशाचा प्रत्यक्ष आचार कसा असतो हेंहि त्यानें स्वतःच्या उदाहरणानें आम्हांस शिकविलें. आम्हां संसारी मनुष्यांस कर्म करणें भाग आहे हें जाणून त्यानें आम्हांस कर्मरहस्य सांगितलें. '**कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः। स बुद्धिमान् मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत्**' हें त्यानें

सांगितलेलें कर्मरहस्य. कर्म करीत असतांही अकर्माची शांति आणि कर्म करीत नसतांही अत्यंत कर्मप्रवणता अंगीं कशी आणावी हें त्यानें आम्हांस स्वतःच्या उदाहरणानें शिकविलें. कर्म करीत असतांही तें अनासक्त चित्तानें केलें—कर्मफलाची इच्छा ठेविली नाहीं—म्हणजे त्याजपासून उद्भवणारीं सुखदुःखें भोगण्याचेंही कारण नाहीं, हें त्यानें शिकविलें आणि आचरूनही दाखविलें. 'तुम्ही स्वतः शुद्ध आणि मुक्त आहां. तुम्ही केवळ साक्षी आहां. दुःखाची प्राप्ति कर्मामुळें होत नसून फलासक्तीमुळें होते.' हा त्याच्या सांगण्यांतील मुख्य मुद्दा आहे. पैसा मिळवावासा वाटत असेल तर खुशाल पैसा मिळवा. तो मिळविण्याकरितां हवा तितका उद्योग करा, पण त्या पैशाशीं एकजीव होऊन बसूं नका. याचप्रमाणें आईबाप, बायकामुलें, इष्टमित्र, गणगोत, कीर्ति इत्यादिकांबद्दलही समजावें. चित्तांत आसक्ति ठेवावयाची ती फक्त परमेश्वराबद्दलच ठेवावयाची. इष्टमित्रादिकांसाठीं कर्म करा; त्यांजवर प्रेम असूंद्या; त्यांच्या बऱ्यासाठींही झटा; इतकेंच काय पण त्यांच्या कार्यासाठीं एक वेळ सोडून शंभर वेळ प्राणत्याग करावा लागला तरी करा; पण हें करीत असतांही त्यांजबद्दल आसक्ति ठेवूं नका. या आपल्या मेहनतीचें फळ अमुक प्रकारचें मिळावें अशी इच्छा ठेवूं नका. हें भगवान् श्रीकृष्णाचें सांगणें आहे. त्याचें सर्व चरित्र म्हणजे या उपदेशाचें जिवंत उदाहरण आहे.

भगवान् श्रीकृष्णाचें चरित्र ज्यांत लिहिलें आहे तें पुस्तक लिहिलें गेल्याला हजरों वर्षांचा काळ लोटून गेला आहे. कृष्णचरित्राच्या कांहीं भागाचें ख्रिस्तचरित्राशीं अत्यंत साम्य आहे. भगवान् श्रीकृष्णाचा जन्म राजकुलांत झाला. कंस या नांवाचा एक अत्यंत जुलमी राजा त्या कालीं होता. श्रीकृष्ण हा त्याच्या बहिणीचा मुलगा. त्याच्या बहिणीचा मुलगा त्याचा वध करील असें भविष्य त्याला सांगितलें होतें. बहिणीच्या सर्व मुलांना ठार मारावें असा हुकूम त्यानें केला होता. आपली बहीण आणि तिचा पति यांस त्यानें तुरुंगांत ठेवलें होतें. भगवानाचा जन्म तुरुंगांतच झाला; त्या वेळीं मोठा प्रकाश पडला आणि तें तान्हें मूल म्हणालें, "मी जगाचा प्रकाश आहें; जगाच्या कल्याणासाठीं मीं जन्म घेतला आहे." भगवान् श्रीकृष्णाला गोपाळ असें नांव आहे. गोकुळांत त्यानें गाई राखल्या. त्या वेळच्या मोठमोठ्या ऋषींनीं 'हा परमेश्वराचा अवतार' असें म्हणून त्याला वंदन केलें. भगवान् श्रीकृष्ण आणि भगवान् ख्रिस्त यांच्या

चरित्रांतील साम्य येथेंच संपतें. यानंतरचीं त्यांचीं चरित्रें एकमेकांहून निराळ्या दिशांनीं गेलीं आहेत. भगवान् श्रीकृष्णानें कंसराजाचा वध केला, तथापि स्वतः सिंहासनाचा स्वीकार केला नाहीं. आपणांस सिंहासन असावें या हेतूनें त्यानें तें कर्म केलेंच नव्हतें. दुष्टांचा नाश करणें एवढाच त्याचा कार्यभाग होता आणि तो त्यानें केला. तेथेंच त्याचें कर्तव्य संपलें.

महाभारतीय युद्धांत भीष्मपितामहांनीं दहा दिवस सेनापत्य केलें आणि नंतर ते जखमी होऊन पडले. युद्ध संपल्यानंतरही ते जिवंत होते. त्यांनीं राजा युधिष्ठिराला अनेक विषयांवर उपदेश केला. राजांचें कर्तव्य काय, चातुर्वर्ण्याचें कर्तव्य काय, प्रत्येकाच्या जीवनक्रमांतील चार आश्रम, विवाह, गृहस्थाश्रमाचे नियम आणि दानादि क्रिया इत्यादि अनेक विषयांसंबंधीं त्यांनीं युधिष्ठिराला उपदेश केला. पूर्वकालीन ऋषि आणि महात्मे यांच्या उपदेशाचें रहस्य या उपदेशाच्याद्वारें त्यांनीं युधिष्ठिराला कथन केलें. सांख्यदर्शन, योग आणि इतर दर्शनें यांचा ऊहापोह त्यांनीं केला. त्याचप्रमाणें अनेक राजे आणि ऋषी यांजबद्दलच्या कथाही त्यांनीं सांगितल्या. या कथाभागाला एकंदर ग्रंथाचा चतुर्थांश खर्ची पडला आहे. आर्यांची संस्कृति, त्यांचे कायदे व त्यांची नीति यांजबद्दल या कथाभागावरून बरेंच अनुमान होण्याजोगें आहे. यानंतर युधिष्ठिराला लवकरच राज्याभिषेक झाला; तथापि या युद्धांत जो भयंकर प्राणनाश झाला, त्यामुळें त्याचें चित्त बरेंच अस्वस्थ असे. नंतर व्यासांच्या सांगण्यावरून त्यानें अश्वमेध नांवाचा एक महायज्ञ केला.

युद्ध संपल्यानंतर धृतराष्ट्र पंधरा वर्षें राजधानींत होता. युधिष्ठिर आणि त्याचे चौघे भाऊ याच्या आज्ञेंत वागत असत व त्याचा मानमरातब त्यांनीं चांगला राखला होता. नंतर सर्व कारभार युधिष्ठिराकडे सोंपवून तो आपली पत्नी गांधारी व पांडवांची माता कुंती यांसह अरण्यवासांत जाऊन राहिला.

युधिष्ठिराला सिंहासनावर बसून छत्तीस वर्षें झाल्यावर भगवान् श्रीकृष्णांनीं अवतारकार्य संपविल्याची बातमी त्याला समजली. त्याचें सर्व वर्तन श्रीकृष्णाच्या सांगण्याप्रमाणें होत असे. ती बातमी ऐकून अर्जुन द्वारकेला गेला व परत येऊन ती बातमी खरी असल्याचें त्यानें युधिष्ठिराला सांगितलें. कृष्णाच्या निर्वाणाच्या अगोदर सर्व यादवकुलाचाही संहार झाला होता. कृष्णनिर्वाणाची बातमी ऐकून युधिष्ठिर, अर्जुन व दुसरे पांडव यांस परमावधीचें

दुःख झालें. आतां आपला काळही समीप येत चालला असें त्यांस वाटलें. त्यांनीं सर्व राजभूषणांचा आणि राज्याचाही त्याग करून अर्जुनाचा नातू परीक्षित् यास सिंहासनावर बसविलें, व ते हिमालयाकडे चालते झाले. येथें त्यांनीं महाप्रस्थान ठेवलें. महाप्रस्थान म्हणजे एक प्रकारचा संन्यासच होय. वृद्धपणीं सर्व राजांनीं संन्यासग्रहण करावें अशी चाल हिंदुस्थानांत होती. ही चाल केवळ राजापुरतीच होती असें नाहीं. प्रत्येक वृद्ध गृहस्थ बहुधा संन्यासी होत असे. ज्याची संसारावरील आसक्ति सुटली असेल, असा वृद्ध गृहस्थ हिमालयाकडे जाई व अन्नपाणी न घेतां एकसारखा चालत राही. शेवटीं चालतां चालतां देह थकला म्हणजे तो कोठें तरी खालीं पडे. चालत असतां परमेश्वराशिवाय दुसरा कोणताही विचार तो मनांत आणीत नसे.

नंतर अनेक देवदेवता व ऋषी युधिष्ठिराकडे आले व त्यांनीं युधिष्ठिराला स्वर्गाला जाण्याबद्दल सांगितलें. हिमालपर्वताच्या अतिशय उंच शिखरापलीकडे मेरुपर्वत असून त्या पर्वताच्या शिखरावर स्वर्गलोक आहे. मानवदेही असतां कोणीही तेथें जाऊं शकत नाहीं. त्या ठिकाणीं फक्त देवांची वस्ती आहे. देवांनींच युधिष्ठिराला तेथें राहावयास बोलविलें.

देवांच्या आज्ञेप्रमाणें पांच पांडव व द्रौपदी यांनीं वल्कलें नेसून मेरुपर्वताचा मार्ग धरला. ते मार्ग चालत असतां एक कुत्रा त्यांजबरोबर चालूं लागला. चालतां चालतां हिमालयाच्या उत्तुंग शिखरांजवळ तीं सर्व आलीं तेथून त्यांस मेरुपर्वताचें दर्शन झालें. बर्फांतून तीं पुढें चालूं लागलीं. चालतां चालतां द्रौपदी एकदम खालीं पडली व गतप्राण झाली. युधिष्ठिर सर्वांच्या आघाडीस चालला होता, त्याला हाक मारून भीम म्हणाला, “द्रौपदीचा देहपात झाला.” हें ऐकून युधिष्ठिराला फार वाईट वाटलें; पण त्यानें मागें पाहिलें नाहीं. तो म्हणाला, “आतां कृष्णदर्शनाकरितां आपण जात आहों. आतां मागें पाहायला वेळ नाहीं. पुढें चालूं लाग. पुढें थोड्या वेळानें सर्वांत धाकटा भाऊ सहदेव पडला. भीमानें ती गोष्ट युधिष्ठिराला सांगतांच तो म्हणाला, “पुढें चल.”

अशा रीतीनें युधिष्ठिराचे चौघे भाऊ एकामागें एक पडत गेले व शेवटीं तो एकटाच पुढें चालूं लागला. भावांच्या मृत्यूमुळें तो हताश झाला नाहीं. पुढें चालतां चालतां त्यानें सहज मागें वळून पाहिलें तों पूर्वीचा कुत्रा अद्या-

पिही आपल्यामागें येत असल्याचें त्याला आढळून आलें. बर्फाचे पर्वत तुडवीत तुडवीत राजा युधिष्ठिर व तो कुत्रा असे चालूं लागले. चालतां चालतां ते मेरुपर्वतापाशीं येऊन पोहोंचले. त्या ठिकाणीं स्वर्गीय घंटांचा नाद त्यांस ऐकूं येऊं लागला. देवांनीं युधिष्ठिरावर पुष्पवृष्टि केली. नंतर इंद्राचा रथ खालीं आला व आंत बसलेला इंद्र म्हणाला, "महाराज, या रथांत आरूढ व्हावें. सदेह स्वर्गवास भोगण्याचा अधिकार फक्त आपलाच आहे." पण आपले बंधू व पत्नी यांशिवाय स्वर्गवास पत्करण्याचें युधिष्ठिर कबूल करीना. तेव्हां ती सर्व मंडळी अगोदरच पुढें गेली आहे असें इंद्रानें त्याला सांगितलें; तेव्हां तो कुत्र्याकडे वळून म्हणाला, "बाळा, चल रथांत बैस." हें ऐकून इंद्र चकित होऊन म्हणाला, "काय कुत्र्याला रथांत बसवितां ? छे, छे. कुत्रा स्वर्गांत कसा जाईल ? महाराज, हें आपण भलतेंच काय आरंभिलें आहे ? आपणास बुद्धिभ्रंश तर झाला नाहीं ? आपण सर्व मानवकुलांत श्रेष्ठ आहां. आपण सदेह स्वर्गास जावें हें योग्यच आहे; पण कुत्रा तेथें कसा प्रवेश करील ?" युधिष्ठिर म्हणाला, "तो बिचारा येथवर मजबरोबर आला. येथवर त्यानें मला आपल्या सोबतीचा लाभ दिला. बर्फातून आणि अनेक प्रकारच्या संकटांस न जुमानतां तो मजबरोबर आला. माझ्या भावांनीं आणि पत्नीनें मला सोडिलें, त्या वेळीं त्यानेंच मला साथ दिली, आतां त्याचा त्याग मी कसा करूं ?" इंद्र म्हणाला, "हें भलतेंच कसें होईल ? कुत्रीं बरोबर घेऊन येणारांस स्वर्गाचीं द्वारें उघडलीं जात नाहींत. यासाठीं त्याला आतां येथेंच राहूं द्या. त्याला मागें ठेवण्यांत कांही पाप नाहीं." युधिष्ठिर निक्षून म्हणाला, "त्याच्याशिवाय मी स्वर्गास जाणार नाहीं. ज्यानें संकटाचे वेळींसुद्धां माझी पाठ सोडली नाहीं, त्याचा त्याग प्राणांतींही मी करणार नाहीं. स्वर्गभोग मला नकोत. अकर्म करून मिळणारे भोग मी त्याज्य समजतों." इंद्र म्हणाला, "हा कुत्रा फार पापी आहे. जन्मभर यानें हिंसा केली आहे. दुसऱ्यांचा जीव घेऊन यानें आपला जीव बचावला आहे. जर तो स्वर्गाला जावा अशी आपली इच्छा असेल तर त्याला एकच उपाय आहे. आपण अत्यंत पुण्यशील आहां. आपण आपलें सर्व पुण्य त्याला देत असलां व त्याचें पाप घेत असलां तर मात्र तो स्वर्गाला जाईल." युधिष्ठिरानें उत्तर दिलें, "ही फार चांगली तोड आहे. या गोष्टीला मी कबूल आहें. आपण या कुत्र्याला घेऊन स्वर्गास जा."

युधिष्ठिराच्या तोंडून हे शब्द बाहेर पडतात न पडतात तोंच तो कुत्रा यमधर्माच्या रूपानें प्रकट होऊन म्हणाला, " राजा, तुझी धन्य असो ! तुझ्या इतका अहंभाव विसरलेला दुसरा मनुष्य मीं पाहिला नाहीं. यःकश्चित् कुत्र्या-साठीं स्वर्गभोगही टाकायला तूं तयार झालास, इतकेंच नव्हे तर त्याला स्वर्ग देण्यासाठीं तूं नरकवास भोगावयासही तयार झालास. धन्य ! धन्य !! तुझ्या जन्माचें सार्थक झालें ! ! ! सर्वभूतीं दया कशी ठेवावी हें तूंच आपल्या उदाहर-णानें सर्वांना शिकविलेंस ! तुझ्यासारख्यासाठीं स्वर्गद्वारें बंद कशीं होतील ? स्वर्गच काय, पण त्याहूनही उत्तमोत्तम लोक तुझ्या वासाकरितांच निर्माण झाले आहेत. तुझ्या राहण्यानें ते लोकच धन्य होतील. तूं त्या लोकांचा जेता आहेस. "

नंतर इंद्र, यमधर्म, युधिष्ठिर आणि इतर देव रथारूढ होऊन स्वर्गाला गेले. तेथें युधिष्ठिरानें स्वर्गगेचें स्नान केलें. नंतर देवाचा देह त्याला प्राप्त झाला. तेथें त्याच्या बंधूंची व त्याची गांठ पडून ते सर्व अमर होऊन राहिले, आणि सर्व सुखमय झालें.

याप्रमाणें महाभारतांतील कथाभाग आहे. सद्गुणांचा विजय आणि दुर्गुणांचा पाडाव हें यांतील मुख्य रहस्य आहे.

महाभारतांतील महावीरांची उदात्त दानत जशी भगवान् श्रीव्यासांनीं आपल्या अमोघ वाणीनें मुळांत दाखविली आहे, तशी आपल्यापुढें मांडणें मला केवळ अशक्य आहे. सदुपदेश आणि पुत्रस्नेह यांच्या द्वंद्वांत सांपड-लेला आंधळा, वृद्ध आणि दुबळा धृतराष्ट्र, धीर पुरुषाला उचित अशा दान-तीचा पितामह भीष्म; उदार आणि महात्मा क्षत्रियकुलावतंस राजा युधिष्ठिर; त्याचे शूर आणि एकनिष्ठ बंधू; महाज्ञानी भगवान् श्रीकृष्ण; त्याचप्रमाणें पतिनिष्ठ राणी गांधारी; वात्सल्ययुक्त कुंती, पतिपरायण आणि सर्व प्रकारच्या संकटांत एकनिष्ठ असणारी द्रौपदी; इत्यादि शेंकडों पात्रें यथास्थित रंगविण्याला श्रीव्यासांसारखीच बुद्धिमत्ता पाहिजे. त्यांचें योग्य वर्णन करणें माझ्या शक्ती-बाहेरचें काम आहे. आमच्या पूर्वजांनीं जर कांहीं चिरकाल टिकणारा वारसा मागें ठेवला असेल तर तो रामायण आणि महाभारत यांतील शेंकडों स्त्रीपुरु-षांचा आदर्श हाच होय. आज हजारों वर्षें हा वारसदारीचा हक्क आम्ही

उराशीं बाळगून ठेवला आहे. हिंदु राष्ट्राची नीति आणि उपदेश यांचा पाया हे दोनच ग्रंथ होत. आर्यांचा जीवनक्रम आणि सद्गुण ज्यांत एकत्र सांठविलेले आहेत असे हे दोन विश्वकोशच आहेत. मानवकुलाची अत्युच्च संस्कृति कोणत्या प्रकारची असावी हें दाखविणारे हे दोनच आदर्श होत. यांत दाखविलेल्या मार्गानें आपल्या संस्कृतीची रचना करण्याचा यत्न करावा, इतकीही योग्यता मध्यांच्या मानवजातीस प्राप्त झाल्याचें दिसत नाहीं.



# सांख्यदर्शन

## उपोद्घात

आपल्या इंद्रियांच्या द्वारानें जें आपणांस जाणतां येतें व जें आपण विश्व या संज्ञेनें ओळखतों, तें उपाधीनें बद्ध असून त्यापलीकडे काय आहे हें जाणण्याचें साधन आपणांस नाहीं. आपल्या विश्वांतील अत्यंत दूरचे असे तारे आपण दृष्टीनें पाहूं शकतों. त्यांचें अस्तित्व दृष्टीनें जाणतां येतें; पण दुसरे कित्येक तारे असे आहेत कीं ते आपल्या दृष्टिपथांत अद्याप आलेले नाहींत. त्यांचें अस्तित्व आपण मनानें व बुद्धीनें जाणूं शकतों. गणिताच्या योगानें अशा ताऱ्यांचें अस्तित्व व त्यांच्या गती यांचें ज्ञान आपणांस होऊं शकतें. पण हें विश्व दृश्यत्वास येऊन आपल्या प्रत्यक्ष ज्ञानाचा विषय होण्याच्या अगोदर काय स्थिति असावी, अथवा हें दृश्य विश्व नाहींसें झालें तर पुढें काय स्थिति होईल, याची कल्पना आपणांस करितां येत नाहीं. दृश्य विश्वाच्या आधीं काय असेल व नंतर काय होईल हें जाणण्याचीं साधनें आपणांस उपलब्ध नाहींत. विश्व दृश्यत्वास आलें म्हणजे तें आपल्या इंद्रियांच्या आटोक्यांत येतें व त्यामुळें त्याच्या अस्तित्वाचें ज्ञान आपणांस होऊं शकतें. पण अदृश्यस्थिति ही इंद्रियांच्या आटोक्याबाहेरील स्थिति आहे. या अज्ञेय आणि अज्ञात स्थितीचाच शोध आतां आपणांस करावयाचा आहे. या अज्ञेय आणि अज्ञात स्थितीचें जें ज्ञान त्यांतून धर्माचीं उत्पत्ति झाली आहे. आपल्या या जगांत ज्या ज्ञानाला आपण धर्म अशी संज्ञा दिली आहे तें ज्ञान याच अज्ञेय व अज्ञात स्थितींतून प्राप्त झालें आहे. धर्मज्ञानाचा प्रदेश वस्तुतः इंद्रियांपलीकडे आहे. ही गोष्ट केवळ जड इंद्रियांसच लागू आहे असें नाहीं. आपली विवेचकबुद्धि जेथपर्यंत पोहोंचूं शकते त्याही मर्यादेपलीकडे धर्मज्ञानाचा प्रदेश आहे. आपली विवेचकबुद्धि कितीही तीव्र झाली तरी ती या प्रदेशांत जाऊं शकत नाहीं. एखाद्या अत्यंत मनोरम प्रदेशांत आपण गेलों असतां आपणांस तेथील देखाव्यानें अननुभूत आनंद होतो. हा आनंद कसा होतो आणि कां होतो याचा पत्ता आपल्या विवेचकबुद्धीच्या बळावर आपणांस कधीं तरी लावतां येईल काय ? आनंद कां झाला असा प्रश्न आपणांस कोणीं केला तर, 'देखावा पाहून' इतकेंच उत्तर फार तर आपणांस देतां येईल. त्याचप्रमाणें विवेचकबुद्धीच्या

पलीकडील प्रदेश हा एक प्रकारचा देखावा आहे. तें एक प्रकारचें स्वप्न आहे. या देखाव्यांत आपण प्रवेश केला तर आपली विवेचकबुद्धि केव्हां आणि कोठें हरवली याचा पत्ताही आपणास लागणार नाहीं. त्या ठिकाणच्या देखाव्याचा अनुभव आपणांस होईल; पण तो देखावा 'जाणला' असें मात्र आपणांस म्हणतां यावयाचें नाहीं. कारण जें कांहीं 'जाणावयाचें' तें विवेकचबुद्धीच्या मर्यादेंत असणारच. यासाठीं हा प्रदेश 'जाणावयाचा' नसून 'अनुभवावयाचा' आहे. मनुष्याचा जन्म या पृथ्वीवर प्रथम झाला, तेव्हांपासून तो या धर्मज्ञानाच्या शोधार्थ भटकत असावा असें मला वाटतें. साऱ्या जगाचा आरंभापासूनचा इतिहास आपण धुंडाळून पाहिला, तर त्यांत धर्माच्या शोधार्थ भटकणारीं माणसें नव्हतीं असा थोडासाही काळ सांपडणार नाहीं. बुद्धीच्या पलीकडच्या प्रदेशांत काय आहे याच्या शोधार्थ धडपडणारीं माणसें मनुष्यवस्तीच्या आरंभींच्या काळापासूनच असलीं पाहिजेत. आपण आपल्या एकट्याच्याच देहापुरता म्हणजे पिंडापुरता विचार केला तर त्यांत विचार उत्पन्न होतो हें आपणांस कळतें; पण तो विचार कोठून आणि कसा उत्पन्न होतो हें आपणांस कळत नाहीं. तसेंच तो कोठें आणि केव्हां जातो हेंही आपणांस अज्ञातच आहे. तो उत्पन्न झाला म्हणजे त्याच्या अस्तित्वाचा मात्र बोध होतो; पण त्याचा आदि आणि अंत यांचा सुगावा आपणांस लागत नाहीं. त्याचप्रमाणें ब्रह्मांडाचें अस्तित्व असेपर्यंत त्याचा बोध आपणास होतो; पण ब्रह्मांड दृश्य होण्यापूर्वी काय स्थिति होती अगर तें नष्ट झालें तर काय स्थिति होईल याचें ज्ञान आपणांस होत नाहीं. पिंड आणि ब्रह्मांड यांची उत्पत्ति, स्थिति आणि लय हीं एकाच प्रकारानें होत असावी काय? विचार उत्पन्न झाला, भासला आणि त्याचा लय झाला. या परंपरेपैकीं मधल्या अस्तित्वाचा मात्र बोध आपणांस होतो. पहिला आणि शेवटचा असे दोन्ही दुवे आपणांस अज्ञात आणि अज्ञेय आहेत. ही एका पिंडाची गोष्ट झाली. त्याप्रमाणें ब्रह्मांड दिसतें तोंपर्यंत तें आपणांस ज्ञात होतें; पण त्याचाही पहिला व शेवटचा दुवा आपणांस अज्ञात आणि अज्ञेय आहे. जणुंकाय पिंड आणि ब्रह्मांड यांचें आदिमध्यावसान एकाच प्रकारें होतें.

धर्मज्ञानाची प्राप्ति बाह्यसृष्टीच्या अभ्यासानें होत नसून अंतःसृष्टीच्या अभ्यासानें होते असें आर्यतत्त्ववेत्त्यांचें म्हणणें आहे. आपलें हें मत ते कशा

रीतीनें सिद्ध करतात हें तुम्हांला सांगण्याचा माझा उद्देश आहे. धर्मविचार मनुष्यमात्राच्या ठिकाणीं अवश्य असतोच असें मला वाटतें. तो त्याच्या प्रकृतीशींच इतका एकरूप होऊन बसला आहे कीं तो सोडून देणें त्याला शक्यच नाहीं. ज्याप्रमाणें देहादि इंद्रियें हीं त्याच्या जीविताला आवश्यक आहेत, त्याचप्रमाणें धर्मविचारही त्याला आवश्यकच आहे. देह गेला, मन नष्ट झालें, विचारसामर्थ्य लोपलें आणि जीवित संपलें तरच धर्मविचारही बंद पडेल. एखादा तरी विचार उत्पन्न होत आहे तोंपर्यंत बरेंवाईट आणि पापपुण्य इत्यादि द्वंद्वांतून मनाला मुक्त करणें शक्यच नाहीं; आणि हें द्वंद्व–भांडण–शिल्लक असेपर्यंत कोणत्या तरी प्रकारचा धर्म त्याला आवश्यक आहेच. यामुळेंच जगांत अनेक धर्मांची उत्पत्ति झाली आहे. या अनेक धर्मांत प्रचलित असणाऱ्या अनेक प्रकारच्या विचारपरंपरांची यथायोग्य संगति लावणें हें अत्यंत बिकट कर्म आहे ही गोष्ट खरी; तथापि धर्मज्ञानसंपादनाचा यत्न करणें म्हणजे मृगजलाचा पाठलाग करण्यासारखेंच आहे असें जें आपणांपैकीं पुष्कळांस वाटतें तें मात्र बरोबर नाहीं. धर्मविचारांत कितीही घोंटाळा असला आणि परस्परविरोधाचा दृश्याभास असला, तरी या घोटाळ्याच्या पोटांत अत्यंत एकतानता आहे. एखाद्या तंतुवाद्यांतील पांचसहा तारा प्रत्येकीं निरनिराळा सूर काढीत असल्या, तरी ज्याप्रमाणें त्या सर्व सुरांचा एकमेळ असतो, त्याप्रमाणेंच या अनेक धर्मविचारांचीही बाब आहे. त्यांतील एकतानतेच्या रसाचा आस्वाद घेण्याला कान मात्र तयार केले पाहिजेत.

सध्याच्या काळीं धर्मज्ञानासंबंधीं एक विशेष प्रश्न उपस्थित झाला आहे; आणि त्याचा विचार प्रथम करणें अवश्य आहे. "विश्वाच्या उत्पत्तीच्या आरंभीं काय होतें आणि विश्व नष्ट झाल्यावर काय होईल, हें जर आपणांस सांगतां येत नाहीं–विश्व या मध्याचें आद्यवसान जर आपणांस अज्ञात आहे असें मानलें–, तर या अज्ञात प्रदेशांत भटकत फिरण्याचें आम्हांस प्रयोजन तरी काय आहे? सध्याच्या काळीं तर हा प्रश्न विशेषच जोरानें उपस्थित झाला आहे. जें कांहीं समोर दिसतें त्यांतून शक्य तितक्या मोठ्या सुखाची प्राप्ति करून घेऊन स्वस्थ राहणें वावगें आहे काय? अथांग समुद्राच्या पोटांत बुड्या मारण्यांत, दम कोंडण्यापेक्षां अधिक फायदा तो काय होणार? 'खाना पीना सुखसे सोना' हेंच आपणांस युक्त नाहीं काय?

फार झालें तर कांहीं थोडा परोपकार करावा.” अशा प्रकारच्या विचारमालिकेचे ध्वनी आणि प्रतिध्वनि सर्वत्र उमटत आहेत. फार झालें तर थोडा फार परोपकार करा; यांतच सर्व धर्म आला, असें सांगणारे लोक जिकडे तिकडे आहेत. त्यांच्या सांगण्याच्या तऱ्हा वेगवेगळ्या असतील, पण सर्वांचा मथितार्थ पाहिला तर हाच. एखाद्या मोठ्या पंडितापासून तों ‘दादा बाबा’ करूं लागलेल्या पोरापर्यंत सर्वांचे विचार याच किंमतीचे आहेत. “चैन करा, परोपकार करा, यापलीकडचा विचार करून डोकें फिरविण्यांत हांशील नाहीं.” हेंच धर्मज्ञान सध्या सर्वत्र पसंत पडत चाललें आहे. हें मत सध्या इतक्या उच्च घोषानें ऐकूं येतें कीं बाकीचे ध्वनी त्यापुढें रद्द झाले आहेत; यामुळें हेंच मत खरें असलें पाहिजे असा भ्रम पुष्कळांस पडतो; पण आनंदाची गोष्ट इतकीच कीं या पलीकडचा विचार करणें आम्हांस भागच पडतें. तोंडानें नाहीं नाहीं म्हणत असतांही अंतःकरण पलीकडच्या प्रदेशांत अनिवार्यपणें ओढ घेत असतें. तुम्ही आपल्या मनाची कितीही समजूत घातली तरी हा विचार तें सोडून देतच नाहीं. इंद्रियजन्यसुखांचा उपभोग कितीही मोठ्या प्रमाणावर आणि कितीही काल घेतला तरी इंद्रियांची तृष्णा कधींही शांत होत नाहीं; आणि ‘मला कशाची तरी गरज आहे,’ ही जाणीवही नष्ट होत नाहीं. यामुळें समजून अथवा न समजतांही आपणांपैकीं प्रत्येक जण गरजेच्या पलीकडे जाण्याचा–मुक्त होण्याचा–यत्न करीत असतो. गरजेच्या पलीकडे जाईपर्यंत मनुष्याच्या यत्नांस खळ पडत नाहीं.

दृश्य अथवा व्यक्त झालेलें विश्व, हें अव्यक्त अस्तित्वाचा एक भाग आहे. एकंदर अस्तित्वापैकीं फारच थोडा प्रदेश आपल्या इंद्रियांच्या द्वारा आपल्या आटोक्यांत येतो आणि आपण त्यास दृश्य विश्व असें नांव देतों. बाकीचा मोठा भाग–किंबहुना अनंत भाग–आपल्या इंद्रियांच्या जाणिवेच्या पलीकडे आहे. विश्वाचें कोडें सोडवावयाचें म्हटलें तर एकंदर अस्तित्व अवलोकनांत आणल्यावांचून या लहानशा भागाच्या कोड्याचा उलगडा करणें शक्य नाहीं. दृश्य विश्वाच्या पलीकडच्या स्थितींत प्रवेश केल्यावांचून दृश्य विश्वाचें कोडें सोडविणें अशक्य आहे. सॉक्रेटिसाबद्दल एक दंतकथा प्रसिद्ध आहे. एके वेळीं ग्रीस देशांत प्रवास करणारा एक ब्राह्मण त्याला भेटला. त्या वेळीं सॉक्रेटीस त्याला म्हणाला, “मनुष्याला स्वतःस अत्यंत कल्याणप्रद असा अभ्यासाचा विषय

म्हटला म्हणजे मनुष्य हाच होय." त्यावर त्या ब्राह्मणानें त्याला म्हटलें, " परमेश्वराची ओळख झाल्याखेरीज मनुष्याची खरी ओळख होणें शक्यच नाहीं." आपल्या जीवनक्रमाचें कोडें सोडवावयाचें असेल तर प्रथम परमेश्वराची भेट घेणें अवश्य आहे. परमेश्वराचें स्वरूप अनेकांस आजतागाईत अज्ञात राहिलें आहे. कित्येकांच्या मतें तें अज्ञेयच आहे; दुसरे कित्येक म्हणतात कीं तें केवलरूप आहे; आणखी कित्येक त्यास अनंत असेंही नांव देतात. त्याला तुम्ही नांव कोणतेंही द्या. अमुक एका नांवांतच कांहीं विशेष महत्त्व आहे असें नाहीं. मुख्य मुद्दा इतकाच कीं, मानवी जीविताचें अगम्य म्हणून वाटणारें कोडें सोडविण्यास त्यापलीकडील अनंत जीवितांत प्रवेश करणें भाग आहे. आपल्या दृष्टीनें दृश्य अथवा ज्ञेय असें जें आपलें जीवित, त्याचा अर्थ बरोबर समजण्यास, अनंतजीविताचा आधार घेतला पाहिजे हें म्हणणें विवेचकबुद्धीच्या विरुद्ध नाहीं. एखाद्या सामान्य शास्त्राचा अभ्यास करावयाचा म्हटला तरी त्यांत देखील, मी म्हणतों या तत्त्वाचा अंगीकार अवश्य करावा लागतो, असें आपल्या लक्ष्यांत येईल. एखादें जडशास्त्रच आपण उदाहरणार्थ घेऊं. रसायनशास्त्राचा अभ्यास पूर्णपणें करावयाचा आपला बेत असला, तर दृश्य पदार्थांच्या पृथक्करणापासून सुरवात करून शेवटीं अदृश्यपदार्थांच्या स्वरूपाच्या अभ्यासाकडे आपणांस वळावें लागतें. शेवटीं हें जडरूप सूक्ष्म होत होत इतकें सूक्ष्म होतें कीं त्याचा जडपणा नष्ट होऊन जातो; आणि त्याची पुरती ओळख आपणांस करून घ्यावयाची असली तर, त्याच्या अदृश्यरूपाकडे धांव घेऊन तेथें त्याचा पाठलाग करण्यावांचून दुसरें गत्यंतर आपणास उरत नाहीं. या ठिकाणीं भौतिक शास्त्राचें रूपांतर आध्यात्मिक विद्येंत होतें. जडविषयांचें रूप सूक्ष्म झालें म्हणजे त्याच्या भौतिकशास्त्राचें रूपांतर अध्यात्मशास्त्रांत व्हावें हें योग्यच आहे.

कोणत्याही रीतीनें विचार केला तरी, अध्यात्मविद्येच्या प्रदेशांत कधीं ना कधीं प्रवेश केल्यावांचून गत्यंतर नाहीं, ही गोष्ट आपल्या लक्ष्यांत येईल. यापलीकडच्या प्रदेशांत मनुष्यानें कधींच प्रवेश केला नाहीं तर, त्याचें जीवन एखाद्या वालुकामय प्रदेशासारखें उजाड आणि रखरखीत होईल. वृक्षलतादिकांच्या अस्तित्वाच्या अभावीं, एखादा प्रदेश ज्याप्रमाणें भयाण आणि रुक्ष वाटतो, त्याचप्रमाणें अध्यात्माच्या राज्यांत ज्यानें चुकूनही कधीं पाऊल टाकलें

नसेल त्याचें जीवित भयाण आणि रुक्ष होईल. आपल्यासमोर दिसतें आहे तेवढ्यांतच शक्य तितकी चैन भोगून तृप्त रहा, असा उपदेश करणें हें काम फार सोपें आहे. घोडे, गाढवें, कुत्रीं आणि इतर जनावरें हेंच करीत असतात. दृश्याच्या पलीकडच्या भानगडींत तीं कधींही पडत नाहींत; खावें, प्यावें, आणि संतुष्ट असावें इतकेंच तींही जाणतात; पण यामुळेंच त्यांना आपण जनावरें म्हणतों हेंही लक्ष्यांत बाळगणें अवश्य आहे. आपणही जर त्यांच्याच नमुन्यानें वागूं लागलों, तर मानवकुलाची पीछेहाट होऊन तें आपल्या पूर्व पशुवृत्तीस जाईल हें उघड आहे. '**धर्मेण हीनाः पशुभिः समानाः**' असें एक सुभाषित प्रसिद्ध आहे. मनुष्य आणि पशु यांतील खरा फरक म्हटला तर इतकाच. दृश्याच्या पलीकडे पशु कधींही जात नाहीं. यासाठींच मनुष्याची दृष्टि साहजिकपणें वरच्या दिशेकडे असते आणि पशूची अधोमुखी असते. मनुष्यानें सदोदित ऊर्ध्वगतिक असावें म्हणूनच त्याची दृष्टि ऊर्ध्वगतिक आहे. मनुष्यानें पूर्णत्व पावावें, गरजेच्या पलीकडे जावें, स्वतंत्र व्हावें, मुक्त व्हावें, हाच त्याच्या जीवितक्रमाचा हेतु आहे. यालाच सामान्य भाषेंत परमेश्वराची भेट घेणें असें आपण म्हणतों. आपल्या जन्माचा हेतु काय आहे हें जितक्या लवकर आपल्या लक्ष्यांत येईल तितकें बरें नाहीं काय ? हें ज्या वेळीं आपल्या लक्ष्यांत येईल, त्याच वेळीं आपण आपला जन्म सफळ होण्याच्या मार्गाला लागलों असें म्हणतां येईल. मुक्तिपथ शक्य तितक्या त्वरेनें आक्रमण करूं लागणें हेंच आपणांस श्रेयस्कर आणि आपल्या मनुष्यत्वास भूषणास्पद आहे. आपली खरी किंमत यावरच अवलंबून आहे. तुमच्या खिशांत कितीही पैसा खुळखुळत असला, तुम्हीं कितीही भपकेबाज पोषाख केला, अथवा एखाद्या टोलेजंग राजवाड्यांत राहिलां, तरी तुम्हांला कवडीचीहि खरी किंमत नाहीं. अध्यात्मविद्येच्या राज्यांत तुमचें जें कांहीं वजन होईल तीच तुमची खरी किंमत ! '**सुन्ना पेरो रुप्या पेरो पेरो पित्तलकी तार। रुपिया गजका रेसम पेरो नहीं जीवनकी आस ॥**' हें साधुवचन नित्य लक्ष्यांत बाळगून तदनुरूप वर्तन ठेवणें, हेंच आपल्या मनुष्यत्वास योग्य आहे; हेंच आपल्या सर्व प्रकारच्या उन्नतीचें मूळ आहे. आपली जडविषयक उन्नति असो अथवा बौद्धिक उन्नति असो, तिच्या वाढीला आध्यात्मिक बळाची आवश्यकता आहे. पुढें सरसावण्यास जो उत्साह लागतो, तोसुद्धां आध्यात्मिक बळाच्या साहाय्या-

वांचून प्राप्त होणार नाहीं; आणि मानव कुलाची कोणत्याच प्रकारची उन्नतीही होणें शक्य नाहीं. '**सामर्थ्य आहे चळवळीचें । जो जो करील त्याचें । परंतु आधीं भगवंताचें । अधिष्ठान पाहिजे ॥**' असें संतांचें अनुभवाचें सांगणें आहे.

धर्म कांहीं राजवाड्यांत अथवा एखाद्या विशिष्ट प्रकारच्या घरांत राहतो असें नाहीं. धर्मासंबंधीं कोणीही कांहीं बोलूं लागला तर त्याजविरुद्ध एक मोठा आक्षेप वारंवार ऐकण्यांत येत असतो. "धर्म कशाला हवा? त्यानें आमचें अधिक बरें तें काय होणार? धर्म गरीबांना श्रीमंत करील काय?' या गोष्टी धर्माच्यानें होणार नाहींत असेंही घटकाभर घेऊन चाललों, तरी यामुळें धर्माला कांहीं उणेपणा येतो काय? धर्माच्यामुळें हीं कार्यें न झालीं तरी त्यामुळें धर्म खोटा ठरतो काय? तुम्ही एखाद्या लहान मुलाला रात्रीच्या वेळीं कांहीं तारे आणि ग्रह दाखवीत असलां आणि मध्येंच त्या मुलानें जर तुम्हाला म्हटलें कीं 'हें समजल्यानें मला कांहीं खाऊ मिळेल काय?' तर तुम्ही त्यावर काय उत्तर द्याल बरें? 'नाहीं' असेंच तुम्हांला म्हणावें लागेल. यावर तुम्हांला तो म्हणेल कीं हें सारें ज्ञान फुकट आहे. मुलांचा हा स्वभावच आहे. साऱ्या विश्वाची किंमत तीं आपल्या खाऊच्या पुड्याशीं तोलून करतात. साऱ्या विश्वाच्या ज्ञानाहून खडीसाखरेच्या एका खड्याची किंमत त्यांस अधिक वाटते. इसापनीतींत एक कोंबड्याची गोष्ट लिहिली आहे. एक कोंबडा एके वेळीं उकिरड्यावर फिरत असतां त्याला एक हिरा सांपडला. तेव्हां त्याकडे पाहून कोंबडा म्हणाला, 'अरे, तूं कितीहि चमकलास तरी जोंधळ्याच्या एका सडक्या दाण्याची किंमत तुजहून अधिक आहे.' हें भाषण कोंबड्याला शोभण्यासारखेंच आहे. पण अनेक पावसाळे ज्यांवरून गेले आहेत अशा वयोवृद्ध मनुष्यांनींही या कोंबड्याची अथवा लहान मुलाची बरोबरी करण्याची हांव बाळगावी हें त्यांस लांछनास्पद नाहीं काय? निरनिराळ्या वस्तू जोखण्यास कांटे आणि वजनेंही निरनिराळीं लागतात हें लक्षांत ठेविलें पाहिजे. अनंत ज्ञानाचा विस्तार अजमावण्याला कांटाही अनंत पाहिजे. बिंदुवत् जगाच्या मापानें अनंत विस्तार मापूं पाहणें खचित शहाणपणाचें नाहीं. धर्मज्ञान हें केवळ चालू जीवितापुरतेंच उपयोगी आहे असें नाहीं. धर्मज्ञान मनुष्याच्या अस्तित्वाबरोबर सर्वकाळ टिकणारें आहे. पूर्वजन्मीं तें त्याजबरोबर होतें, चालू जन्मीं आहे आणि पुढील जन्मींही तें त्याजबरोबर

रहाणारच. ज्या योगानें अनंत जीवात्म्याचा संबंध अनंत परमात्म्याशीं घडतो तें धर्मज्ञानही अनंतच आहे. तें अमुक क्षणीं आहे आणि अमुक क्षणीं नाहीं असें कधींही होत नाहीं. असें आहे तर क्षणैक टिकणाऱ्या जीविताच्या मापानें त्याची योग्यता ठरवूं पाहाणें तर्कशास्त्रास तरी अनुसरून आहे काय? आपल्या चालू जीविताला त्याचा प्रत्यक्ष उपयोग किती होईल हें पाहून त्यावरून धर्मज्ञानाची किंमत करणें, हें बालबुद्धीचें आणि अदूरदृष्टीचें लक्षण आहे. असो. पण धर्माच्या बाजूनें हें केवळ निषेधार्थक उत्तर झालें. आतां या प्रश्नाला दुसरी एक बाजू आहे तिचा विचार करूं.

धर्मज्ञानाचा खरोखर निश्चयात्मक असा कांहीं उपयोग आहे काय? या प्रश्नाला आम्ही अत्यंत निश्चयात्मक रीतीनें होय असें उत्तर देतों. मनुष्याला चिरकालिक जीवन देणें हें धर्माचें कार्य आहे. मनुष्याला सध्यां जी कांहीं स्थिति प्राप्त झाली आहे ती धर्मज्ञानामुळेंच असून या स्थितींतून त्याला ईश्वरत्वापर्यंत वर नेणें हेंही धर्माचेंच काम आहे. धर्मज्ञानाचा उपयोग काय असा प्रश्न करणारांस आम्ही निश्चयात्मक उत्तर असें देतों कीं तुम्हांस तें ईश्वरत्व प्राप्त करून देईल. धर्म जर उद्यां या जगांतून सर्वथैव नष्ट झाला तर काय उरेल? त्यांतील मनुष्येंही नष्ट होऊन जग म्हणजे केवळ पशूंचें साम्राज्य होईल. जंगलांत हिंडणारे पशू आणि अशा स्थितींतलीं माणसें यांत कसलाच फरक उरणार नाहीं. केवळ इंद्रियांच्या वासना तृप्त करीत बसणें हेंच मनुष्याचें साध्य नाहीं. मानवी जीविताचा हा हेतूच नाहीं. स्वतः शुद्ध ज्ञानरूप होणें हें तुमचें साध्य आहे. आपण सूक्ष्म दृष्टीनें सृष्टीचें अवलोकन केलें, तर पशूला इंद्रियसुखांत ज्या तृप्तीचा लाभ होतो तशी तृप्ति, मनुष्याला केवळ त्याच सुखानें प्राप्त होत नाहीं असें आपणांस आढळून येईल. जड इंद्रियांनीं तृप्ति एकसारखी होत राहिली तरी, कशाची तरी उणीव त्याच्या मनाला भासत असते. ही उणीव बुद्धिगत असते. यासाठीं बुद्धीची तृप्ति कोणत्या मार्गानें होईल याचा विचार तो करीत असतो. पशूच्या इंद्रियजन्य आनंदाहून हा बुद्धिजन्य आनंद अधिक श्रेष्ठ आहे. आतां, याहूनही मोठा असा एक आनंदाचा प्रकार आहे, तो आत्मानंद होय. बुद्धिजन्य आनंदाहून हा अधिक श्रेष्ठ आहे. ज्या अर्थी हा शेवटला प्रकार सर्वांत अधिक श्रेष्ठ आहे, त्या अर्थी तो आनंद ज्या ज्ञानानें प्राप्त होईल तें ज्ञान सर्व प्रकारच्या ज्ञानांत श्रेष्ठ आहे असें

म्हणावयास काय हरकत आहे? याला अध्यात्मज्ञान असें नांव आहे. अध्यात्मविद्या ही सर्व विद्यांत श्रेष्ठ असून मनुष्याचें खरें कल्याण करण्याचें सामर्थ्य तिजमध्यें आहे. या जगांत लौकिक ज्ञानाचे जे कांहीं प्रकार आपण पाहतों ते सर्व केवळ छायारूप आहेत. खऱ्या ज्ञानाचें अस्पष्ट प्रतिबिंब मात्र त्यांत पडलें आहे. वास्तविक त्यांची किंमत याहून अधिक नाहीं.

आतां आणखीही एका प्रश्नाचा विचार करावयाचा आहे. आपल्या या एकंदर जीविताचें आणि त्यांतील अनेक प्रकारच्या धडपडींचें अंतिम साध्य काय आहे? मनुष्यजातीनें एकसारखें सुधारत असावें हाच मानवी जीविताचा हेतु आहे असें कित्येक म्हणतात. त्यांच्या मतें पूर्णत्व अशी कांहीं स्थिति नसून मनुष्याच्या जीविताचा तो हेतूही नाहीं. त्यांच्या या म्हणण्याचा अर्थ काय हेंही लक्ष्यांत येणें खरोखर कठीण आहे. त्याला कांहींही अर्थ असला अगर नसला तरी हें म्हणणें तर्काला रुचत नाहीं हें मात्र खरें. एकसारखी एकाच दिशेनें गति होणें कधीं तरी शक्य आहे काय? आपण एखादी सरळ रेषा एकसारखी एकाच दिशेनें वाढवीत गेलों तर ती वर्तुलाकार होऊन पुनः पूर्वस्थळीं परत येईल. हीच गोष्ट आपल्या जीवितासही लागू आहे. मनुष्यप्राणी परमेश्वरापासून निघाला असून, त्याची खटपट परमेश्वराकडे जाण्याकरितांच चालू आहे. याप्रमाणें आदि व अंतीं परमेश्वर, आणि मध्यें मानवी जीवित अशी स्थिति आहे. तुमच्या ज्या कांहीं खटपटी अनंतकाल चालू आहेत, अथवा ज्या अनंतकाल चालू राहतील, त्या सर्व या मधल्या स्थितींतील असून त्यांचें अंतिम साध्य परमेश्वराची भेट हेंच आहे.

या गोष्टी कबूल केल्या तरी आणखीही एक प्रश्न उद्भवतो. धर्मज्ञानाच्या बाबतींत ज्या कांहीं गोष्टी सत्य म्हणून आजपर्यंत ठरल्या आहेत, त्यांहून कांहीं नव्या सत्य गोष्टींचा शोध आपणांस लागणार आहे काय? या प्रश्नाला होय आणि नाहीं असें दुहेरी उत्तर देतां येतें. धर्मज्ञानाच्या बाबतींत आतां कांहीं नवा शोध लावतां येणार आहे असें नाहीं. जाणावयासारखें जें कांहीं आहे तें सर्व पूर्वींच जाणलें गेलें आहे. मनुष्य आणि परमेश्वर हे एकरूपच आहेत, असें जगांतील सर्व धर्म सांगत आहेत. आम्हीं दाखविलेल्या मार्गानें तुम्ही गेल्यास तुम्ही परमेश्वररूप व्हाल असें सर्व धर्म म्हणत आहेत. परमेश्वराशीं एकरूपत्व सिद्ध झालें म्हणजे त्या दृष्टीनें कांहीं करावयाचें शिल्लक उरत नाहीं;

आणि या साठीं त्या दृष्टीनें अधिक शोध लागावयाचा शिल्लक आहे असेंही नाहीं. हें एकरूप सिद्ध करणें याचेंच नांव ज्ञान. आपणा सर्वांस स्त्री आणि पुरुष या भेददृष्टीनें मी पाहात आहें, इतकेंच नव्हे तर प्रत्येक व्यक्ति ही निरनिराळी आहे अशा दृष्टीनें पाहात आहें; ही माझ्या दृष्टींतील अनेकता आहे. आतां तुम्हां सर्वांस एकाच कोटींत घालून मनुष्यप्राणी असें नांव मीं तुम्हांस दिलें तर ती शास्त्रीय दृष्टि झाली. येथें पहिली पूर्ण भेदाची दृष्टि होती, ती मावळून त्या जागीं एका प्रकारची एकात्मक दृष्टि उत्पन्न झाली. रसायनशास्त्राची दिशा पाहिली तरी ती अशीच आहे. दृष्टीनें दिसणाऱ्या प्रत्येक संकीर्ण पदार्थांचे घटक प्रथम शोधून काढून, नंतर शक्य असेल तर त्या घटकांचें एकच मूलद्रव्य शोधून काढण्याकरितां, रसायनशास्त्री खटपट करतात. ज्या एका मूलद्रव्यांतून ही सारी जडसृष्टि निर्माण झाली आहे तें मूलद्रव्य त्यांस सांपडण्याची वेळही कदाचित् येईल. अशी वेळ आली म्हणजे रसायनशास्त्र पूर्ण झालें असें म्हणण्यास हरकत नाहीं. हाच न्याय धर्मशास्त्रालाही पूर्णपणें लागू पडतो. सर्व सृष्टि एकाच मूलरूपांतून व्यक्त झाली आहे असें आपणांस सिद्ध करतां आलें म्हणजे धर्मशास्त्र पूर्ण झालें असें होईल. त्यानंतर धर्मशास्त्राची वाढ होण्यास मार्गच नाहीं हें उघड आहे.

आतां यावर एक प्रश्न असा उपस्थित होतो कीं, या दृश्य विविधतेंत एकात्मता—एकरूप—सांपडणें शक्य आहे काय? आमच्या आर्यावर्तांत अशा प्रकारचा यत्न अत्यंत प्राचीनकालापासून चालू होता. तत्त्वज्ञान आणि धर्माचें शास्त्रीय स्वरूप यांचें उद्घाटन करण्याचा यत्न हिंदुस्थानांत अत्यंत प्राचीनकालापासून चालू होता. धर्म आणि तत्त्वज्ञान या बाबी परस्पराभिन्न आहेत असा तुम्हां पाश्चात्यांचा समज आहे. पाश्चात्य देशांत धर्म हा केवळ मताचा प्रश्न समजला जातो, पण हिंदु लोकांनीं असा भेद आरंभापासून कधीं केलेला नाहीं. तत्त्वज्ञान, शास्त्र आणि अनुभव यांच्या पायावरच त्यांनीं आपलीं धर्ममतें रचिलीं आहेत. आमच्या मतें धर्म आणि तत्त्वज्ञान यांची जोडी फुटणें शक्यच नाहीं. हीं दोन एकाच सनातन धर्माचीं अंगें असून त्यांच्या योग्य मिश्रणानेंच पूर्ण धर्म निर्माण होतो. विवेचकबुद्धि आणि सशास्त्ररीतीनें सत्य म्हणून ठरलेल्या गोष्टी यांजपासून तत्त्वज्ञान विसंगत असतां कामा नये; आणि तसेंच या तिहींच्या योग्य मिलाफानेंच धर्माचीं तत्त्वें पक्कीं केलीं पाहि-

जेत, असें आम्हां हिंदु लोकांचें प्राचीनकालापासून मत आहे. मी जें विवेचन पुढें करणार आहें, त्यांत आपणांस सांख्यशास्त्राची माहिती प्रथम देण्याचा माझा विचार आहे. सांख्यदर्शन हें केवळ आर्यावर्तांतीलच नव्हे तर साऱ्या जगांतील जुनें दर्शन आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. या दर्शनाचे आद्य प्रवर्तक श्रीकपिल मुनि हे होत. हिंदुस्थानांत यानंतर अनेक दर्शनें आणि मतें अस्तित्वांत आलीं; तथापि या सर्वांच्या मुळांशीं श्रीकपिलांचें सांख्यदर्शन हेंच आहे. या दृष्टीनें पाहतां जगांतील एकंदर दर्शनांचे आद्यजनक कपिल हेच आहेत असें म्हणावयास हरकत नाहीं. कपिल मुनींनंतर जे अनेक दर्शनकार झाले, त्यांनीं इतर बाबतींत अनेक निराळीं मतें प्रतिपादन केलीं असलीं तरी, सूक्ष्मेंद्रियसिद्धांतांच्या बाबतींत आणि विश्वोत्पत्तीसंबंधीं त्यांनीं कपिलांचाच अनुवाद केला आहे.

सांख्यदर्शनाबद्दल प्रथम माहिती देऊन नंतर सांख्यदर्शनांतूनच वेदान्ताची उत्पत्ति कशी झाली आणि सांख्यमतानें दर्शित केलेल्या सिद्धांतांपलीकडे वेदान्तानें भरारी कशी मारली हें आपणांस दाखविण्याचा माझा विचार आहे. विश्वाची उत्पत्ति आणि रचना यांजबद्दल सांख्यमत आणि वेदान्त यांची एकवाक्यता आहे; पण सांख्यमताचें द्वैतमतदर्शक पर्यवसान वेदान्तानें कबूल न करतां तो पुढें सारसावला; आणि त्यानें सर्व विश्वाची एकात्मता सिद्ध करण्याचा यत्न केला. धर्म आणि भौतिकशास्त्रें यांचें कार्य वस्तुतः एकच आहे. सर्व विश्वाची एकात्मता सिद्ध करणें हेंच दोहोंचेंही कार्य आहे. वेदान्तानें हें कार्य कसें संपादिलें आहे हेंच मला आपणांस दाखवावयाचें आहे.



## प्रकरण १ लें.

### विश्व-रचना

सांख्यदर्शनाच्या आरंभींच आपणांस दोन विशिष्ट शब्दांचा विचार अवश्य केला पाहिजे. ते दोन शब्द पिंड आणि ब्रह्मांड असे आहेत. पिंड म्हणजे अंतःसृष्टि आणि ब्रह्मांड म्हणजे बाह्य विश्व. या दोहोंतून जे कांहीं अनुभव आपणांस प्राप्त होतात त्यांमुळें आपला सत्याचा मार्ग प्रकाशित होतो. पिंडाच्या अथवा अंतःसृष्टीच्या अनुभवांतून सूक्ष्मेंद्रियशास्त्र ( Psychology ), अतींद्रियशास्त्र ( Metaphysics ) आणि धर्मशास्त्र हीं निर्माण झालीं आहेत. त्याचप्रमाणें ब्रह्मांडाच्या अनुभवांतून सर्व प्रकारचीं भौतिकशास्त्रें निर्माण झालीं आहेत. सत्य म्हटलें म्हणजे तें या दोन्ही सृष्टींतील अनुभवांशीं सुसंगत असलें पाहिजे. पिंडांत जे कांहीं अनुभव येतील त्यांची सत्यता ब्रह्मांडांतील अनुभवांनीं पटली पाहिजे. तसेंच ब्रह्मांडांतील अनुभवांची सत्यता पिंडांतील अनुभवांशीं मिळती असली पाहिजे. अशा रीतीनें या दोन्ही सृष्टींतील अनुभव परस्परांशीं विसंवादी न होतां उलट एकमेकांस पोषक झाले पाहिजेत. जडसृष्टींत जें कांहीं सत्य म्हणून अनुभवास येतें, त्याचीच हुबेहूब प्रतिमा सूक्ष्म अथवा अंतःसृष्टींत सांपडली पाहिजे; आणि त्याचप्रमाणें अंतःसृष्टींतील सूक्ष्म अनुभवाचें स्थूलरूप, ब्रह्मांडांत सांपडलें पाहिजे. थोडक्यांत सांगावयाचें म्हटलें तर जें पिंडीं तेंच ब्रह्मांडीं आणि जें ब्रह्मांडीं तेंच पिंडीं असून त्या दोहोंत नेहमीं अभेद असला पाहिजे; पण हा केवळ तात्त्विकदृष्ट्या विचार झाला. प्रत्यक्ष अनुभव याहून उलट येतो. जगाचा इतिहास पाहिला तर या दोन सत्य वस्तूंचा अनेक वेळां तंटा झाला असल्याचें आढळून येतें. जगाच्या इतिहासांत एक काळ असा येऊन गेला कीं त्या वेळीं अंतःसृष्टिशास्त्राचा वरपगडा होऊन बाह्यसृष्टिशास्त्रावर तें वर्चस्व गाजवूं पाहत होतें. दोन दिवस सासूचे आणि दोन सुनेचे या न्यायानें सध्याच्या काळीं हें पारडें फिरलें असून, भौतिकशास्त्रांचा सर्वत्र जयजयकार होत आहे, आणि धर्मशास्त्र मागें पडत आहे. पूर्वी एके वेळीं धर्मशास्त्र सर्वसत्ताधारी होऊं पाहत होतें. तें म्हणेल तें कारण, आणि बांधील तें तोरण असें होण्याचा तो काळ होता; पण पुढें भौतिकशास्त्रांच्या उन्नतीचा काळ आला, तेव्हां त्यांनीं धर्मशास्त्रावर हल्ले करून त्याच्या किल्ल्यांतील माऱ्याच्या अशा

बऱ्याच जागा त्यांनीं सर केल्या. सूक्ष्मेंद्रियशास्त्र व अतींद्रियशास्त्र यांचें बरे-चसे सिद्धांत खोटे आहेत असें अर्वाचीन भौतिकशास्त्रें सिद्ध करूं लागलीं. मी स्वतः या दोन्ही विद्यांत प्रवीण आहें असें नाहीं; तथापि त्यांचें जें तुटपुंजें ज्ञान मला आहे, त्यावरून या दोन्ही शास्त्रांतील मुख्य तत्त्वांत विरोध नसून त्यांत एकवाक्यता आहे असें मला आढळून आलें आहे.

सर्व विद्यांत मी प्रवीण आहें असें म्हणावयाचा अधिकार कोणाही एकाच व्यक्तीला प्राप्त होत नाहीं. सर्व भौतिकशास्त्रांत व धार्मिकशास्त्रांतही प्राविण्य मिळविणें एकाच व्यक्तीला शक्य नाहीं. जी गोष्ट एका व्यक्तीला तीच सर्व राष्ट्रालाही लागू पडते. ज्ञानाच्या अनंत शाखांत सारखेंच प्राविण्य मिळविणें ही गोष्ट एका राष्ट्रालाही शक्य नाहीं. सर्व प्रकारच्या विद्यांत नवे नवे शोध लावून, त्या पूर्णत्वास आणण्याचें कार्य एखादें राष्ट्र अथवा मानवकुलांतील एखादी शाखा करूं म्हणेल, तर तसें करणें शक्य नाहीं असें आढळून येईल. सध्याच्या काळीं युरोपियन राष्ट्रांनीं भौतिकशास्त्रांत अत्यंत प्राविण्य मिळविलें आहे ही गोष्ट खरी; पण जुन्या काळचे युरोपियन लोक धर्मशास्त्राच्या बाबतींत आंधळे राहिले हेंही खरें आहे. त्याचप्रमाणें पौर्वात्य राष्ट्रें भौतिकशास्त्रांच्या बाबतींत अगदीं मागसलेलीं आहेत हें जसें खरें आहे, तसेंच त्यांनीं धर्मशास्त्राच्या बाबतींत अत्यंत प्राविण्य मिळविलें आहे हेंही खरें आहे. यामुळेंच पौर्वात्यांच्या कित्येक उपपत्ती, पाश्चात्यांच्या भौतिकशास्त्रांच्या उपपत्तींशीं जुळत नाहींत, एवढेंच नव्हे तर पाश्चात्यांच्या सूक्ष्मेंद्रियशास्त्रांच्या सिद्धांतांशींही त्या जुळत नाहींत. पौर्वात्यांचे कित्येक सिद्धांत पाश्चात्य पंडितांस आक्षेपार्ह वाटतात. याप्रमाणें अनेक प्रकारचे मतभेद दिसत असले तरी प्रत्येकाच्या बुडाशीं सत्य आहे; आणि सत्य म्हटलें म्हणजे तें कोणत्याही शास्त्रांतील असलें तरी वस्तुतः एकरूपच असलें पाहिजे, हेंही लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. सत्य अनेक प्रकारांनीं प्रगट झालें तरी त्यामुळें त्या प्रकारांत विरोध असण्याचें कारण नाहीं. पिंडसृष्टींतील सिद्धांत आणि ब्रह्मांडांतील सिद्धांत हे एकमेकांचे विरोधक नसून पोषक असले पाहिजेत.

**ब्रह्मांडावरून पिंड । अथवा पिंडावरून ब्रह्मांड ।**
**अर्धोर्ध पाहतां निवाड । कळों येतो ॥ १ ॥**

**बीज फोडून आणिलें मना । तेथें फळ तों दिसेना ।**
**वाढत वाढत पुढें नाना । फळें येती ॥ २ ॥**
**फळ फोडितां बीज दिसे । बीज फोडितां फळ नसे ।**
**तैसा विचार असे । पिंडब्रह्मांडीं ॥ ३ ॥**

विश्वाची उत्पत्ति आणि त्याची रचना यांजबद्दल अर्वाचीन ज्योतिर्विद आणि इतर भौतिकशास्त्रज्ञ यांचे सिद्धांत काय आहेत यांची थोडीबहुत माहिती आपणांस आहे. त्याचप्रमाणें या शास्त्रांच्या सिद्धांतांमुळें जुन्या धर्मशास्त्रज्ञांची काय दशा झाली हेंही आपणांस ठाऊक आहेच. भौतिकशास्त्राचा एक एक नवा शोध प्रसिद्ध होऊं लागला तसतसे जुन्या इमारतीचे धोंडे ढासळूं लागले. प्रत्येक नवा शोध म्हणजे जणुंकाय एक कुलपी गोळाच! जुन्या पंडितांनीं स्वसंरक्षणार्थ अनेक प्रकारचे उपाय योजिले व शास्त्रांचे शोध बंद पाडण्याकरितां सुचतील ते उपाय त्यांनीं वेळोवेळीं करून पाहिले; पण त्यांत त्यांना यश आलें नाहीं.

विश्वाची उत्पत्ति आणि तिच्याशीं संलग्न असलेले दुसरे विषय यांजबद्दल पौर्वात्य शास्त्रज्ञांचें सूक्ष्मेंद्रियशास्त्र काय म्हणतें, याचा आपण प्रथम विचार करूं. पाश्चात्य भौतिकशास्त्रांनीं अगदीं अलीकडे जे सिद्धांत स्थापन केले आहेत, त्यांशीं आमच्या पौर्वात्य पंडितांचे सिद्धांत तंतोतंत जुळतात, हें पाहून तुम्हांला खरोखरच नवल वाटेल. ज्या ठिकाणीं कांहीं सिद्धांतांत उणेपणा आढळेल, तेथें तो उणेपणा अर्वाचीन भौतिकशास्त्रांच्या बाजूस असून पौर्वात्य शास्त्रज्ञ त्या बाबतींत पुढें गेले आहेत असें तुम्हांस आढळून येईल. निसर्ग ( Nature ) हा शब्द आपल्या बऱ्याच परिचयाचा आहे. याशीं समानार्थक असे दोन शब्द प्राचीन आर्यतत्त्ववेत्त्यांनीं योजिले आहेत. ते दोन शब्द प्रकृति आणि अव्यक्त हे होत. यांपैकीं प्रकृति हा शब्द इंग्रजी Nature (निसर्ग) याच्या बराच जवळ जवळ आहे. अव्यक्त हा शास्त्रीय पारिभाषिक शब्द आहे. याचा अर्थ 'जें व्यक्त झालेलें नाहीं—नामरूपाला आलेलें नाहीं—तें,' असा आहे. अव्यक्त म्हणजे मूळरूप. या मूळ अव्यक्त स्थितींतून व्यक्त म्हणजे विश्व दिसूं लागलें. परमाणु आणि अणु, जडतत्त्वें आणि शक्ति व तसेंच मन आणि बुद्धि हीं सारीं अव्यक्तांतून व्यक्त झालीं आहेत. मन आणि बुद्धि हींसुद्धां जडपदार्थांचींच सूक्ष्मतर रूपें आहेत, ही गोष्ट आर्य-

तत्त्ववेत्त्यांनीं हजारों वर्षांमागें नमूद करून ठेवली आहे. ही गोष्ट खरोखर अत्यंत आश्चर्याची आणि कौतुकास्पद आहे. आजच्या काळचे आपले भौतिकशास्त्रज्ञही हीच गोष्ट सिद्ध करूं पाहत आहेत. ज्या परमाणूंचा हा स्थूल देह बनला आहे, त्याच परमाणूंच्या सूक्ष्मतर रूपांतून मन आणि बुद्धि हीं निर्माण झालीं आहेत, हेंच ते सिद्ध करूं पहात आहेत. त्याचप्रमाणें विचार हासुद्धां जड आहे. हीं सारीं दृश्यरूपें अव्यक्तांतूनच निर्माण झालीं आहेत असें हळूहळू आपल्या प्रत्ययास येईल.

आतां अव्यक्त म्हणजे काय याचा विचार करणें अवश्य आहे. अव्यक्त म्हणजे गुणत्रयाची साम्यावस्था असा अर्थ आहे. या तीन गुणांस सत्त्व, रज आणि तम अशीं नांवें आहेत. तम हें शक्तीचें अगदीं कनिष्ठ प्रतीचें रूप असून आकर्षण हें त्याचें कार्य आहे; रजोगुण हें त्याहून उच्च प्रतीचें रूप असून प्रतिसारण हें याचें कार्य आहे; आणि सत्त्व हें सर्वांत उच्च प्रतीचें रूप असून, रज आणि तम या दोन गुणांच्या कार्यावर ताबा ठेवणें हें त्याचें कार्य आहे. ज्या वेळीं रज आणि तम या दोन गुणांवर सत्त्वगुणांचा पूर्ण ताबा असतो, त्यावेळीं ते दोन्ही गूण पूर्ण साम्यावस्थेंत असतात. अशा वेळीं ते व्यक्त होत नसल्यामुळें विश्वालाही दृश्य स्वरूप नसतें; आणि दृश्य स्वरूपाच्या अभावीं नाना आकार आणि निरनिराळीं नामें यांसही अस्तित्व नसतें; परंतु ही साम्यावस्था बिघडल्याबरोबर, या दोन गुणांपैकीं एक अधिक उच्छृंखल होतो. एक गुण अधिक उच्छृंखल झाल्याबरोबर, दुसराही पूर्वींची साम्यावस्था स्थापन करण्याचा यत्न करूं लागतो. अशा रीतीनें आकर्षण आणि प्रतिसारण हीं सुरू होतात. हीं सुरू झालीं म्हणजे मूलशक्तीला गति प्राप्त होते, आणि गतीबरोबर विश्व उत्क्रांत होऊं लागतें. विश्वाची ही अवस्था प्रत्येक प्रलयाच्या काळीं होत असते. एका वेळीं गुणत्रयाच्या अवस्थेंत बिघाड होऊं लागून त्यांत शक्तीच्या कमीअधिकपणाची सरमिसळ होऊं लागते व विश्व व्यक्त होतें. यानंतर ही व्यक्तावस्था पूर्वींच्या साम्यावस्थेला परत जाण्याची खटपट करूं लागते, व हळूहळू ही खटपट सफळ होण्याची वेळ येऊं लागते; ती पूर्ण सफळ झाल्याबरोबर पूर्वींची साम्यावस्था प्राप्त होऊन विश्व पुन्हां मूळच्या अव्यक्त स्थितींत परत जातें. अशी अव्यक्तावस्था कांहीं काळ राहिली म्हणजे पुन्हां या गुणत्रयाची घडी बिघडते व साम्यावस्थेंतून मुक्त झालेली खलशक्ति उच्छृंखल होऊन विश्व

पुन्हां व्यक्त होतें. ज्याप्रमाणें समुद्राच्या शांततेचा भंग झाला असतां त्यावर लहानमोठ्या लाटा उत्पन्न होऊन, निरनिराळा आकार कांहीं काळ धारण करतात, त्याचप्रमाणें गुणत्रयसमुद्राच्या शांतीचा भंग झाला म्हणजे, लाटांप्रमाणेंच अनेक आकार त्यावर दिसूं लागतात. ज्याप्रमाणें समुद्रावरील लाट त्याच्या सपाटीपासून वर उठून कांहीं काळ विशिष्ट आकार धारण करते, व पुन्हां थोड्या वेळानें तो आकार टाकून देऊन सपाटीशीं एकरूप होते, त्याचप्रमाणें, गुणत्रयसमुद्रावर अनेक लाटा उत्पन्न होऊन अनेक आकारांनीं कांहीं काळ दृश्यस्वरूपास येतात, व कांहीं वेळानें पुन्हां आपल्या मूळच्या अधिष्ठानाला परत जातात. या रीतीनें या विश्वाची घडामोड क्रमानें सुरू आहे.

कित्येक प्राचीन तत्त्ववेत्त्यांचें मत असें आहे कीं सारें विश्व एकसमयावच्छेदेंकरून अव्यक्तांतून व्यक्त होतें आणि पुन्हां तें अव्यक्तांतही एकाच वेळीं प्रवेश करतें. दुसऱ्या कित्येकांचें मत याहून वेगळें आहे. त्यांच्या मतें या प्रचंड विश्वांत अनेक मालिका आहेत. आपली ही पृथ्वी जींत आहे ती सूर्याभोंवतीं फिरणारी एक ग्रहमाला आहे. याचप्रमाणें अनेक माला या विश्वांत असून त्यांपैकीं एखादी माला अव्यक्तांत गेली असतां, बाकीच्या माला सुरू असतात. सर्व विश्व एकाच वेळीं अव्यक्त अथवा व्यक्त होत नसून, त्यांतील निरनिराळ्या ग्रहमालांमध्यें वेगवेगळी घडामोड निरनिराळ्या वेळीं चालू असते. आपली ही सूर्याभोंवतालची ग्रहमाला उद्यां अव्यक्तांत गेली, तरी बाकीच्या माला व्यक्तदशेंत राहतील. दुसरें मत पहिल्याहून मला अधिक ग्राह्य वाटतें. निरनिराळ्या मालांच्या व्यक्ताव्यक्ततेचा संबंध एकमेकींशीं नसून, प्रत्येकींतील घडामोड स्वतंत्रपणेंच होत असते, हें मत मला अधिक तर्कसंमत वाटतें. याप्रमाणें या मतांत भेद दिसत असला, तरी मुख्य गोष्टीबद्दल दोघांचीही एकवाक्यता आहे, हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. आपण जें जें कांहीं पाहतों तें प्रकृतीच असून तीच व्यक्त आणि अव्यक्त होत असते; या मूलभूत सिद्धांताबद्दलचा मतभेद नाहीं. प्रकृति एकवेळ व्यक्त होऊन पुन्हां अव्यक्तांत परत गेली म्हणजे एक कल्प होतो. आमच्या आर्यतत्त्ववेत्त्यांनीं याच स्थितीला परमात्म्याचा उच्छ्वास आणि श्वास अशीं नांवें दिलीं आहेत. परमेश्वर उच्छ्वास सोडतो त्या वेळीं विश्व व्यक्त होतें, व त्यानें श्वास आंत घेतला म्हणजे त्याबरोबर जणूं काय तें त्याच्या हृदयांत परत जातें! विश्व अव्यक्त स्थितींत परत

गेलें म्हणजे तें नष्ट होतें असें मात्र समजूं नये. त्या स्थितींतही त्याचें अस्तित्व शिल्लक असतेंच; पण तें सूक्ष्मरूपानें असतें इतकेंच. या सूक्ष्मरूपाला कारणरूप असा संस्कृत पारिभाषिक शब्द आहे. विश्वाच्या कारणरूप अस्तित्वाच्या वेळींही निमित्त-काल-देश ही उपाधि शिल्लक असतेच. मात्र तीही अव्यक्तदशेंत असते. विश्व दृश्य अथवा व्यक्तस्थितींत येऊं लागलें म्हणजे तें ज्या प्रकारानें उत्क्रांत होत जातें, त्याच प्रकारच्या उलट दिशेनें तें अव्यक्त दशेंत प्रतिक्रांत होतें. अशा रीतीनें उत्क्रांतीमागून प्रतिक्रांति (Involution) व प्रतिक्रांतीमागून पुन्हां उत्क्रांति असें रहाटगाडगें अनंतकाल चालू आहे. यासाठीं 'आरंभ' असा शब्द जेथें येईल तेथें फक्त कल्पाचा आरंभ असा अर्थ समजावा.

विश्वांतील वस्तूंच्या अगदीं बाह्यभागाला 'जड' (Gross) अशी संज्ञा सध्याच्या काळीं आपण दिली आहे. प्राचीन आर्यतत्त्ववेत्त्यांनीं या शब्दाऐवजीं 'भूत' या शब्दाची योजना केली आहे. भूतें म्हणजे जडतत्त्वें. या भूतांपैकीं एक प्रमुख अथवा मूलरूप असून त्यापासून बाकीचीं सर्व निर्माण झालीं आहेत. या प्रमुख भूताला आकाश असें नांव आहे. अर्वाचीन भौतिकशास्त्रज्ञांनीं ज्या इथर (Ether) या पदार्थाची कल्पना केली आहे, त्याचें साम्य आकाश या भूताशीं बरेंचसें आहे, तथापि आकाश या शब्दांत अंतर्भूत होणारा सर्व अर्थ 'ईथर' या शब्दानें व्यक्त होत नाहीं. आकाश हें जडतत्त्वाचें पहिलें रूप असून त्यांतून सर्व जडविश्वाची उत्पत्ति झाली आहे. विश्व व्यक्तदशेला येतें त्या वेळीं आकाशाला दुसऱ्याही एका तत्त्वाची जोड मिळालेली असते. हें दुसरें तत्त्व प्राण होय. प्राण या शब्दाच्या अर्थाचा उलगडा आपणांस पुढें हळूहळू होईल. जोंवर विश्व व्यक्तदशेंत असतें तोंवर प्राण आणि आकाश यांचा संयोगही कायम असतो. विश्वांत जी जी म्हणून जडवस्तु अस्तित्वांत आहे, ती आकाश आणि प्राण यांच्या संयोगानेंच उत्पन्न झाली आहे. कल्पांताच्या वेळीं या सर्व वस्तूंचें रूपांतर होऊं लागून, त्यांतील तत्त्वें, प्राण आणि आकाश या आपल्या मूलरूपांत प्रविष्ट होतात. ऋग्वेदांत या स्थितीचें वर्णन एका सूक्तांत फारच सुंदर रीतीनें केलें आहे. हें वर्णन अत्यंत काव्यमय आणि हृदयंगम आहे. "ज्या वेळीं अस्तित्व अथवा नास्तित्व यांपैकीं कांहींच नव्हतें, आणि ज्या वेळीं केवळ अंधारावर अंधाराचीं पुटें

वसत होतीं त्या वेळीं कोणाचें अस्तित्व होतें?" असा प्रश्न करून ऋग्वेदानें त्याचें उत्तर आपणच दिलें आहे.

नासदासीन्नोसदासीत्तदानीं नासीद्रजोनोव्योमापरोयत् ।
किमावरीवः कुहकस्य शर्मन्नम्भः किमासीद्गहनंगभीरम् ॥ १ ॥
न मृत्युरासीदमृतं न तर्हि न राज्या अह्न आसीत्प्रकेतः ।
आनीदवातं स्वधया तदेकं तस्माद्धान्यन्नपरः किंचनास ॥ २ ॥
तमआसीत्तमसागूळ्हमग्रे प्रकेतं सलिलं सर्वमाइदम् ।
तुच्छ्येनाभ्वपि हितं यदासीत्तपसस्तन्महिनाजायतैकम् ॥ ३ ॥
कामस्तदग्रे समवर्तताधिमनसो रेतःप्रथमंयदासीत् ।
सतोबंधुमसतिनिरविन्दन्हृदिप्रतीष्याकुवयोमनीषा ॥ ४ ॥
तिरश्चीनोविततोरश्मिरेषामधःस्विदासी ३ दुपरिस्विदासी ३ त् ।
रेतोधाआसन्महिमानआसन्त्स्वधाअवस्तात्प्रयतिःपरस्तात् ॥ ५ ॥
कोअद्धावेदकइहप्रवोचत्कुतआजाताकुतइयंविसृष्टिः ।
अर्वाग्देवाअस्यविसर्जनेनाथाको वेदयतआबभूव ॥ ६ ॥
इयंविसृष्टिर्यतआबभूवयदिवादधेयदिवान ।
यो अस्याध्यक्षः परमेव्योमन्त्सोअङ्गवेदयदिवानवेद ॥ ७ ॥

[ ऋग्वेद, मंडळ १०, सू. १२९. ]

"तें ( नित्य असणारें ) त्या वेळीं अगदीं निष्पंद स्थितींत होतें." त्या निष्पंदावस्थेंत प्राण आणि आकाश हींही होतीं. त्यांचें अस्तित्वही मूळच्या निष्पंदरूपांत होतें. ही अवस्था अगदीं निष्पंद असल्यामुळें विश्वाला दृश्यरूप नव्हतें. याच स्थितीला अव्यक्त असें नांव आहे. अव्यक्त या शब्दाचा अर्थ निष्पंद अथवा हालचाल नसलेली स्थिति असा आहे. नव्या कल्पाला सुरवात होण्याच्या वेळीं या अव्यक्तस्थितीच्या साम्यावस्थेंत बिघाड होऊन ती स्पंद पावूं लागते. त्या वेळीं प्राणशक्तीचे धक्के आकाशावर एकामागून एक आदळूं लागतात. आकाशाला असे धक्के बसूं लागले म्हणजे त्याच्या विरलावस्थेंत फारच फरक होऊं लागून, तेथें घनीभवनाची म्हणजे घट्ट होण्याची क्रिया सुरू होते; आणि आकुंचन व प्रसरण अशा शक्तीच्या दोन क्रिया सुरू होऊन

परमाणूंची उत्पत्ति होऊं लागते; नंतर या परमाणूंपैकीं कित्येकांचा संयोग होऊन त्यांतून अणू निर्माण होतात. या अणूंपासूनच पुढें विश्वांतील सर्व जडपदार्थांची उत्पत्ति झाली आहे.

विश्वोत्पत्तीसंबंधींच्या या श्रुतिवचनांचें इंग्रजी भाषांतर पुष्कळांनीं कांहीं विलक्षण प्रकारचें केलें आहे. प्राचीन आर्यतत्त्ववेत्त्यांचें हृद्गत यांस ठाऊक नसतें. अधिकारी पुरुषांनीं लिहिलेलीं भाष्यें यांनीं पाहिलेलीं नसतात. भाषांतर करतांना भाष्यांचें साहाय्य हे घेत नाहींत, आणि स्वतःच रहस्य जाणण्याची पात्रता तर यांच्या आंगीं नसते. 'वायु', 'तेज' इत्यादि शब्दांचीं भाषांतरें ते 'हवा', 'विस्तव' या लौकिक अर्थाच्या इंग्रजी शब्दांनीं करतात. मूळ संहितेवरील भाष्य त्यांनीं पाहिलें असतें तर बरोबर अर्थ त्यांच्या लक्ष्यांत आला असता. प्राणाचा आघात आकाशावर होऊं लागला म्हणजे त्यायोगानें तें स्पंद पावूं लागतें. या स्पंदांस वायु असें नांव आहे. आकाशस्पंद हेंच वायूचें म्हणजे हालचालीचें पहिलें स्वरूप. या वायुरूपांतून पुढें विरल स्वरूपाचे जडपदार्थ निर्माण होतात. पाण्याची वाफ अत्यंत उष्ण असली म्हणजे तिला दृश्यरूप नसतें, पण तीच थंड होऊं लागली म्हणजे तिच्यांतील अणूंचें घनीभवन होऊन ती दिसूं लागते; तथापि या स्थितींत ती दिसत असली तरी तिचे अणू विरल असतात. त्याचप्रमाणें आकाशावर प्रथम सूक्ष्म स्पंद उमटतात; व नंतर त्यांचें घनीभवन होऊं लागून त्यांतून विरल स्वरूपाचे जडपदार्थांचे अणू निर्माण होतात. आकाशस्पंद अधिक झपाट्याचे होऊं लागले म्हणजे त्यामुळें जी उष्णता उत्पन्न होते तिला तेज असें नांव आहे. यानंतर विरल स्वरूपाचीं जडद्रव्यें हळूहळू थंडावत जाऊन प्रवाही स्वरूपाचीं होतात. या प्रवाहरूप जड अणूंस आप असें नांव आहे. हेच अणू अधिक घनीभूत झाले म्हणजे ते अधिक घट्ट होतात; या त्यांच्या स्वरूपास पृथ्वी असें नांव आहे. ज्याप्रमाणें अदृश्य स्थितींतील वाफेचें घनीभवन झालें म्हणजे तींतून प्रवाही पाणी निर्माण होतें व त्याच पाण्याच्या अधिक घनीभवनानें त्याचें बर्फ होतें, त्याचप्रमाणें आकाशाचीं रूपें बदलत बदलत पृथ्वीच्या घनरूपापर्यंत तें पोहोंचतें. प्रथम केवळ आकाशतत्व असतें. तें स्पंदरूप झालें म्हणजे वायु निर्माण होतो. या स्पंदांमुळें जी उष्णता उत्पन्न होते, तें तेज; तेजानंतर आकाश प्रवाही होतें, तें आप; आणि तें अधिक घट्ट झालें

म्हणजे त्या रूपाला पृथ्वी हें नांव प्राप्त होतें. प्रत्येक कल्पाच्या आरंभीं अशा क्रमानें विश्व व्यक्त होऊं लागतें, आणि कल्पाचा अंत होऊं लागला म्हणजे याच्या उलट क्रमानें तें परत अव्यक्तावस्थेला जातें. कल्पांताच्या वेळीं घन पदार्थांचें रूपांतर होऊन ते प्रवाही बनतात. नंतर प्रवाही पदार्थ विरल व उष्ण होऊन त्यांचें तेज बनतें. त्या तेजाचा वायु बनतो, व त्या स्थितींत अणूंचें पृथक्करण होतें. इतकी क्रिया पूर्ण झाली म्हणजे गुणत्रयाची साम्यावस्था होऊन स्पंद बंद होऊं लागतात व ते थांबत थांबत शेवटीं पूर्णपणें बंद होतात; आणि सर्व विश्व अगदीं निष्पंदावस्थेंतील आपल्या कारणरूपांत प्रविष्ट होतें. आपल्या या पृथ्वीचें व ती ज्या भोंवतीं फिरत आहे त्या सूर्याचें रूपांतर हळूहळू सुरू असून, ही घन पृथ्वी वितळून प्रथम प्रवाही होईल व शेवटीं वायुरूप होईल असा सिद्धांत अर्वाचीन ज्योतिषशास्त्रानें सिद्ध केला असल्याचें आपणांस ठाऊक आहेच.

आकाशावांचून एकटा प्राण कार्यकारी होऊं शकत नाहीं. स्पंद म्हणजे हालचाल उत्पन्न करणें हेंच प्राणाचें कार्य आहे. प्राणशक्तीच्या स्वरूपाबद्दल याहून अधिक माहिती आपणांस होऊं शकत नाहीं. जेथें कोणत्याही प्रकारची हालचाल दिसेल तेथें तें प्राणशक्तीचेंच स्वरूप आहे असें समजावें. त्याचप्रमाणें प्रत्येक आकाराची जडवस्तु हें आकाशाचें स्वरूप आहे असें समजावें. प्राण-शक्तीला स्वतंत्र असें अस्तित्व असूं शकत नाहीं; अथवा दुसऱ्या कोणत्या तरी पदार्थाच्या साहाय्याशिवाय ती कार्यकारीही होऊं शकत नाहीं. त्याचप्रमाणें ती कोणत्याही प्रकारच्या स्वरूपांत असली तरी आकाशाशीं संलग्न असल्या-शिवाय ती एकाकी राहूं शकत नाहीं. अव्यक्तदशेंत ती अगदीं निष्पंदा-वस्थेंत असतांही आकाशाशीं संयुक्त असते; आणि विश्व व्यक्त झाल्यावरही ती गुरुत्वाकर्षणादि अनेक रूपांनीं प्रकट झाली, तरीसुद्धां पदार्थांशीं म्हणजे वस्तुतः आकाशाशीं ती संयुक्तच असते. शक्ति आणि पदार्थ यांस अन्योन्याश्रय आहे. शक्तीवांचून पदार्थ अथवा पदार्थावांचून शक्ति अशा एकाकी स्थितींत तीं कधींही आपणांस आढळत नाहींत. विश्वांत आढळून येणारीं दृश्य शक्तीचीं रूपें आणि प्रत्यक्ष दिसणारे पदार्थ हीं अनुक्रमें प्राण आणि आकाश यांचींच जडरूपें आहेत. पदार्थ आणि त्यांतील शक्ति यांची प्रतिक्रांति होऊन तीं अव्यक्तावस्थेस परत गेलीं, म्हणजे त्यांस आकाश आणि प्राण या मूलसंज्ञा

प्राप्त होतात. प्राण याला इंग्रजींत Life or Vital Energy ( जीव किंवा जिवटपणा ) असें नांव देतां येईल; तथापि मनुष्यांतला जीव तेवढाच कायतो प्राण असें मात्र समजूं नये. मनुष्यांतील जीव अथवा जिवटपणा, हा प्राणशक्तीच्या अनेक प्रकारांपैकीं एक प्रकार आहे इतकेंच; तसेंच आत्मा आणि प्राण हेही अगदीं वेगळे आहेत, हें अवश्य लक्ष्यांत ठेवावें. प्राण आणि आकाश यांपासून सर्व विश्व उत्पन्न झालें असून त्याला आरंभ आणि शेवट नाहीं, ही गोष्ट आतां आपल्या लक्ष्यांत पक्केपणीं आली असेल. अमुक वेळीं विश्व प्रथम निर्माण झालें असें नाहीं; अथवा अमुक वेळीं तें नष्ट होईल असेंही नाहीं. त्याला आरंभ असा कधीं झालाच नाहीं, आणि त्याचा अंतही कधीं होणार नाहीं. तें अनाद्यंत आहे.

आतां यापुढें जो एक प्रश्न उपस्थित होतो, त्याचा विचार विशेष सूक्ष्म बुद्धीनें केला पाहिजे. कांहीं युरोपियन तत्त्ववेत्त्यांचें म्हणणें असें आहे कीं, जगाचें अस्तित्व द्रष्ट्याच्या अस्तित्वावर अवलंबून आहे, ‘मी’ आहें म्हणून जग आहे; जर ‘मी’ नष्ट झालों तर जगही नष्ट होईल; हें त्यांचें म्हणणें अधिक स्पष्ट करून सांगितलें पाहिजे. जगांतील सर्व मनुष्य व पशुपक्षी इत्यादि सजीव, सेंद्रिय व ज्यांना जाणीव आहे असे प्राणी जर नष्ट झाले तर जगही अदृश्य होईल. जगाला पाहणारा–जाणणारा–कोणीतरी आहे म्हणून जग आहे; आणि जाणणाराच्या अभावीं जगही नष्ट होईल. हें मत समजण्यास थोडेंसें कठीण आहे व यामुळें तें विसंगत वाटतें हें खरें; पण या त्यांच्या म्हणण्यांत पुष्कळ तथ्य आहे हें आपणास पुढें हळूहळू कळून येईल; तथापि खुद्द या तत्त्ववेत्त्यांसही या आपल्या मताची उभारणी, सूक्ष्मेंद्रियशास्त्राच्या आधारानें करतां आली नाहीं. या आपल्या म्हणण्याला सूक्ष्मेंद्रियशास्त्राचा कांहीं आधार आहे कीं नाहीं, याचा विचार त्यांनीं केलेला दिसत नाहीं. त्यांनीं जें तत्त्व प्रतिपादिलें आहे तें केवळ तत्त्वदृष्टीनें बरोबर आहे; पण त्याची सिद्धि सशास्त्र रीतीनें त्यांना करतां आली नाहीं. यावरून या तत्त्वाची फक्त पुसट कल्पना मात्र त्यांस आली असावी असें वाटतें.

या युरोपियन तत्त्ववेत्त्यांच्या म्हणण्याचा विचार करण्यापूर्वीं, आमच्या प्राचीन आर्यतत्त्ववेत्त्यांच्या आणखी एका मताचा विचार प्रथम करणें अवश्य आहे. हें त्यांचें मत नवख्या मनुष्याला आरंभीं थोडेंसें चमत्कारिक

वाटण्याचा संभव आहे. सर्व सृष्टि भूतांपासून उत्पन्न झाली आहे, असें त्यांचें मत असल्याचें अगोदर सांगितलेंच आहे. ज्या भूतांपासून ही सृष्टि निर्माण झाली, तीं भूतें, त्यांहून सूक्ष्मतर अशा पदार्थांपासून निर्माण झालीं आहेत. भूतें हीं जडस्वभाव आहेत. दृश्यरूपाला आलेला असा प्रत्येक जडपदार्थ, सूक्ष्मरूपाच्या कित्येक अणूंपासून निर्माण झालेला असतो असा नियम आहे. याच नियमाला अनुसरून जडभूतें हींसुद्धां स्वतःहून अधिक सूक्ष्म अशा अणूंपासून निर्माण झालीं असलीं पाहिजेत, हें उघड आहे. या सूक्ष्मरूपाच्या अणूंस तन्मात्रें असें म्हणतात. आपण एखादें फूल हुंगलें तर आपणास त्याचा वास समजतो. अशा वेळीं आपल्या नाकाशीं दुसऱ्या कसल्यातरी पदार्थाचा संयोग झाला असला पाहिजे हें उघड आहे. फूल आपणापासून थोडें लांब असलें, तरी त्याचा वास आपणांस येतो. तें फूल आपली जागा सोडून आपणाकडे आलेलें नसतें. तें जागच्या जागींच असतां, त्याचा वास मात्र आपणांस येतो हें कसें ? याचें कारण असें कीं त्या फुलांतून वास असलेले असे सूक्ष्म अणू बाहेर पडतात, आणि त्यांचा संयोग आपल्या घ्राणेंद्रियाशीं होतांच त्याचें अस्तित्व आपल्या लक्ष्यांत येतें.

या सूक्ष्मरूपाच्या अणूंस तन्मात्रें असें नांव आहे. फुलांतून बाहेर पडणारे हे अणू, इतक्या सूक्ष्म स्वरूपाचे असतात कीं, सारा दिवसभर ते त्यांतून एकसारखे बाहेर पडत राहिले, तरी त्या फुलांत कोणत्याहि प्रकारचा उणेपणा उत्पन्न झाल्याचें आपल्या नजरेस येणार नाहीं. याचप्रमाणें उष्णता, तेज इत्यादिकांचीं तन्मात्रें आहेत. तन्मात्रें हीं अणूरूप असून तीं स्वतः परमाणूंपासून बनलीं आहेत. परमाणूचा आकार किती मोठा असावा, याबद्दल अनेक पंडितांच्या अनेक कल्पना आहेत. तथापि त्या केवळ कल्पनाच असून त्यांचें सत्यत्व अद्यापि सिद्ध झालें नसल्यामुळें, त्यांजबद्दल अधिक विचार करण्याचें प्रयोजन आपणांस नाहीं. प्रत्येक जडपदार्थ अत्यंत सूक्ष्म अशा स्वरूपाच्या अणूंपासून बनला आहे, इतकें आपणास समजलें म्हणजे पुरे. कोणत्याही पदार्थाचें जें कांहीं बाह्यस्वरूप आपणांस दिसतें, तें जडस्वरूप असून, जडतत्त्वांपासून निर्माण झालें आहे. यानंतर त्या पदार्थाच्या अंतःस्वरूपाची ओळख आपणांस आपल्या अंतरिंद्रियांनीं होते. ज्या अणूंपासून तो पदार्थ बनला असेल, त्या अणूंचा संयोग आपलें नाक, डोळे, कान इत्यादिकांशीं झाला, म्हणजे त्या

इंद्रियांच्या द्वारें आंतील ज्ञानतंतूंचा स्पंद होऊन तो मनाकडे जातो. आपण एखाद्या पदार्थाकडे पाहतों त्यावेळीं, त्या पदार्थांतील तेजाचे किरण आकाशावर ( Ether ) स्पंद निर्माण करीत असतात, व ते स्पंद आपल्या दृग्ज्ञानतंतूला ( Optic nerve ) स्पर्श करून तेथें स्पंदांची उत्पत्ति करतात. आकाशावर प्रकाशकिरणानें उत्पन्न केलेला स्पंद आपणांस दिसत नाहीं. तथापि तेथला स्पंद माझ्या दृग्ज्ञानतंतूवर येऊन आदळल्यावांचून, त्या प्रकाशकिरणांचें ज्ञान मला होणार नाहीं. याचप्रमाणें आपल्या कर्णेंद्रियाचीही गोष्ट आहे. ध्वनीचे स्पंद आपल्या दृष्टीनें आपणांस दिसत नाहींत; तथापि त्या स्पंदांचा संयोग आपल्या कर्णेंद्रियांशीं झाल्यावांचून, आपणांस ध्वनी ऐकूं येणार नाहीं. आकाशावरील स्पंद तन्मात्रांनीं निर्माण केलेला असतो. आतां हीं तन्मात्रें कशीं निर्माण होतात याचा विचार केला पाहिजे. आमच्या आर्यतत्त्वज्ञांनीं या प्रश्नाचें जें उत्तर दिलें आहे, तें ऐकून तुम्हांला खरोखर फार आश्चर्य वाटेल. अहंकार हीं तन्मात्रें उत्पन्न करतो असें त्यांचें उत्तर आहे. अहंकारामुळें ( Self-consciousness ) तन्मात्रें आणि इंद्रियें उत्पन्न होतात. आतां, इंद्रियें म्हणजे काय याचा विचार करूं.

उदाहरणार्थ, आपण आपल्या डोळ्यांसंबंधीं पाहिलें, तर केवळ जड डोळा पाहण्याची क्रिया करीत नाहीं, असें आपणांस आढळून येईल. जर पाहण्याची क्रिया डोळ्यांमुळें घडत असती, तर मृत मनुष्येंही पाहूं शकलीं असतीं; कारण, देहांतून आत्मा निघून गेला, तरी जड डोळ्यांत त्यामुळें कांहीं कमीपणा आलेला असतो असें नाहीं; पण मृत मनुष्यें पाहूं शकत नाहींत हें आपणास ठाऊक आहेच. यावरून पाहण्याची क्रिया केवळ डोळ्यांमुळें होत नाहीं असें उघड दिसतें. त्या मृत मनुष्यांतून जें कांहीं बाहेर निघून गेलें, त्याच्याच ठिकाणीं या क्रियेचा कर्तेपणा असला पाहिजे हें उघड आहे. तोच खरा द्रष्टा असून डोळे हें त्याचें बाह्यसाधन असलें पाहिजे.

या द्रष्ट्याला इंद्रिय असें म्हणतात. इंद्रिय नष्ट झालें म्हणजे बाहेरील जडसाधनांचा कांहींच उपयोग नाहीं. याचप्रमाणें नाक हें एक साधन असून, त्याचेंही एक निराळें इंद्रिय आहे. अर्वाचीन इंद्रियविज्ञानशास्त्रांत या इंद्रियांना गोलक ( Centres ) असें नांव दिलें आहे. हे गोलक मेंदूंत असून खरीं इंद्रियें हींच होत. आपल्या देहावरील डोळे, कान इत्यादि अवयव हे केवळ साधनरूप आहेत; आणि इंद्रियें, हीं खरीं ज्ञानसाधनें आहेत.

आतां प्रत्येक प्रकारच्या क्रियेकरितां निरनिराळ्या इंद्रियांची योजना कां केली आहे याचा विचार करूं. डोळे, कान, नाक इत्यादि अवयवांकरितां निरनिराळीं इंद्रियें कां असावीं? जर सर्वांचें मिळून एकच इंद्रिय असतें तर काय बिघडलें असतें? या प्रश्नाचा विचार थोड्याशा विस्तारानें केला पाहिजे. मी आपणांशीं भाषण करीत आहें; आणि आपण तें ऐकत आहां. या वेळीं आजूबाजूला काय चाललें आहे याचें ज्ञान तुम्हांस होत नाहीं; कारण, तुमचें मन सध्या कर्णेंद्रियाशीं संलग्न असल्यामुळें, इतर इंद्रियांपासून सध्या तें विभक्त झालें आहे. जर निरनिराळ्या क्रिया करणारें इंद्रिय एकच असतें, तर पाहणें, ऐकणें, वास घेणें इत्यादि अनेक क्रिया आपणांस एकाच वेळीं करतां आल्या असत्या; इतकेंच नव्हे, तर या क्रिया एकमेकांपासून भिन्नपणें करणें आपणांस अशक्यच झालें असतें. याकरितां प्रत्येक क्रियेला वेगळें इंद्रिय असावें हें अत्यंत जरूरीचें आहे. या गोष्टी अर्वाचीन इंद्रियविज्ञानशास्त्रानें प्रत्यक्ष सिद्ध केल्या आहेत. आपणांस एकाच वेळीं, पाहण्याची व बोलण्याची अशा दोन क्रिया करतां येतात ही गोष्ट खरी; पण त्याचें कारण त्या दोन क्रियांचें इंद्रिय एक आहे हें नसून, आपलें मन एकाच वेळीं त्या दोन इंद्रियांशीं संलग्न राहूं शकतें, हें आहे. आपले बाह्य अवयव हे केवळ जडपदार्थांचे बनलेले आहेत. कान, डोळे, नाक इत्यादि आपले अवयव पहा; हें सर्व जड अणूंपासून निर्माण झाले आहेत; आणि आपलीं इंद्रियें हीं त्याहून सूक्ष्म अणूंपासून बनलेलीं आहेत. त्यांचें स्थान देहाच्या आंत असून, बाह्य अवयवांचें चालकत्व या इंद्रियांकडे अथवा गोलकांकडे आहे. आपलें हें सारें शरीर जड अथवा स्थूल अणूंपासून बनलेलें असून, त्यांत प्राणशक्तीच्या स्थूल अथवा दृश्यरूपाचा प्रत्यय येतो; आणि अंतरिंद्रियें हीं सूक्ष्म अणूंपासून बनलीं असून, त्यांतून वावरणारी प्राणशक्ति, ही सूक्ष्म स्वरूपाची असते. हीं सर्व इंद्रियें आणि अंतःकरण मिळून प्रत्येक मनुष्याचा लिंग अथवा सूक्ष्मदेह बनलेला असतो.

सूक्ष्मदेहालाही आकार आहे. कारण, प्रत्येक जडपदार्थाला आकार असलाच पाहिजे असा नियम आहे. हा देह आपणांस न दिसण्याइतका सूक्ष्म असला, तरी तो ज्या अणूंचा बनला आहे ते जडच आहेत. इंद्रियांच्या पाठीमागें आपलें मन आहे. चित्त वृत्तिरूप अथवा चंचल झालें म्हणजे त्यास मन अशी संज्ञा प्राप्त होते. एकाद्या शांत असलेल्या तळ्यांत आपण धोंडा

फेंकला, तर ताबडतोब त्या ठिकाणीं क्रिया आणि प्रतिक्रिया निर्माण होऊन पृष्ठभागाचा क्षोभ होतो, आणि त्यावर तरंग अथवा स्पंद उद्भवूं लागतात. धोंडा आंत पडल्याबरोबर पाण्याचे कांहीं बिंदू एकदम विभक्त होतात; पण कांहीं क्षण गेले न गेले तोंच ते एकत्र होऊन, धोंड्याच्या क्रियेला प्रतिक्रिया करूं लागतात. धोंड्यामुळें पाण्यावर ज्याप्रमाणें तरंग उद्भवतात, त्याचप्रमाणें बाह्य वस्तूच्या आघातानें चित्तावर तरंग उद्भवतात. या तरंगरूप चित्ताला मन अशी संज्ञा आहे. यानंतर चित्त प्रतिक्रिया करूं लागतें; म्हणजे स्थिरावूं लागतें. या प्रतिक्रियेच्या रूपाला बुद्धि अशी संज्ञा आहे. बुद्धीच्याही पाठीमागें आणखी एक अधिष्ठान आहे; हें अधिष्ठान चित्ताच्या सर्व क्रियांना व्यापून असतें; या अधिष्ठानाला अहंकार अशी संज्ञा आहे. स्वतःची जाणीव असणें हें अहंकाराचें स्वरूप आहे. 'मी आहें' असें आपणांस प्रत्येक क्षणीं वाटत असतें; ही जाणीव राहणें हेंच अहंकाराचें स्वरूप. या अहंकाराच्या पाठीमागें महत् नांवाचें तत्त्व आहे; यालाच बुद्धि असेंही नांव केव्हांकेव्हां देतात. अव्यक्त प्रकृति व्यक्तत्वास आली तेव्हां तिनें जें अगदीं पहिलें रूप धारण केलें, तें महत् हेंच होय. प्रकृतीचीं जितकीं स्वरूपें आपणांस आढळतात, त्या सर्वांत महत् हें स्वरूप श्रेष्ठतम आहे. या महत्तत्त्वाच्या पाठीमागें पुरुष असून त्यालाच आत्मा असेंही नांव आहे. पुरुष अथवा आत्मा हा सदैव शुद्ध आणि पूर्ण असा असून, सर्वांचा द्रष्टा तोच आहे, व ही सारी प्रकृति त्याच्याकरितांच नटली आहे. पुरुष स्वतः केवळ साक्षिरूप असून, तो प्रकृतीचे हे अनेक व्यक्त प्रकार अवलोकन करीत असतो. पुरुष स्वतः कोणत्याही कारणानें अशुद्ध होत नाहीं; परंतु अध्यासामुळें तो अशुद्ध आहेसा भासतो. अध्यास म्हणजे परावर्तन. ज्याप्रमाणें शुभ्र रंगाच्या स्फटिकासमोर तांबड्या रंगाचें फूल धरलें असतां तो स्फटिक जसा तांबडा आहेसा भासतो, त्याचप्रमाणें प्रकृतीच्या प्रतिबिंबामुळें पुरुष अनेक प्रकारचा आहे असा भास होतो. तांबड्या अथवा निळ्या फुलामुळें ज्याप्रमाणें शुभ्र स्फटिकाच्या रंगांत वस्तुतः फरक होत नाहीं, अथवा त्या फुलाच्या रंगाचा लेप त्याला होत नाहीं, त्याचप्रमाणें, प्रकृतीच्या वारंवार बदलणाऱ्या रूपामुळें पुरुषही बदलत नाहीं. पुरुष अनेक आहेत असें सांख्यमत आहे. हे सर्व पुरुष वस्तुतः अत्यंत शुद्ध आणि पूर्ण असून जडपदार्थांच्या संयोगामुळें ते अशुद्ध भासतात. प्रकृतीचे जे हे अनंत प्रकारचे खेळ सुरू आहेत

याचें कारण काय ? पुरुषाच्या करमणुकीकरितां व कल्याणाकरितां हे सर्व खेळ ती करीत आहे. हे सर्व खेळ पाहून पुरुषानें स्वतःचें पूर्णत्व ओळखावें, हाच तिचा उद्देश आहे. हा सर्व विश्वरूप ग्रंथ प्रकृतीनें लिहिला आहे. पुरुषानें हा ग्रंथ वाचावा आणि सर्वद्रष्टा आणि सर्वशक्तिमान् व्हावें इतकाच तिचा हेतु आहे. वस्तुतः तो सर्वद्रष्टा आणि सर्वशक्तिमान् असा आहेच; पण ही ओळख तो विसरला आहे. ही स्वतःची ओळख त्याला पटावी हा प्रकृतीचा उद्देश आहे. यासाठींच हा विश्वग्रंथ तिनें निर्माण केला आहे. आतां तुम्हांला एक मुद्द्याची गोष्ट येथें सांगणें इष्ट आहे; ती ही कीं, परमेश्वराच्या अस्तित्वासंबंधीं जी तुमची कल्पना आहे, ती आमच्या आर्यतत्त्ववेत्त्यांस मान्य नाहीं. परमेश्वर हा या सर्व विश्वाचा उत्पन्नकर्ता आहे अशी तुमची समजूत आहे. ही कल्पना आद्य दर्शनकार श्रीकपिल यांस मान्य नाहीं. विश्वनिर्माणकर्त्या परमेश्वराचें अस्तित्वच त्यांस मान्य नाहीं. विश्वाचा एकटा निर्माणकर्ता असा व्यक्तिविशिष्ट परमेश्वर आहे असें मानण्याची जरुरीच नाहीं असें त्यांचें मत आहे. हें कार्य करण्यास प्रकृतीच समर्थ आहे. परमेश्वरानें अनेक प्रकारच्या वस्तू जमविल्या आणि त्यांचें विश्व निर्माण केलें, ही कल्पना सर्वथैव त्याज्य आहे असें त्यांचें म्हणणें आहे. कांहीं कारण नसतां परमेश्वरानें उठावें आणि हें विश्व निर्माण करण्याचा धंदा करावा, ही कल्पना अत्यंत पोरकट आहे—पोरकटपणाची ही अगदीं कमाल आहे. विश्वबाह्य परमेश्वराची कल्पना कपिलमुनींना मान्य नसली, तरी ते शुद्ध निरीश्वरवादीही नाहींत हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. परमेश्वराचें अस्तित्व त्यांस मान्य आहे, पण त्याबद्दलची त्यांची उपपत्ति निराळी आहे. त्यांचें म्हणणें असें आहे कीं, आपण सर्व मुक्त होण्याकरितां खटपट करीत आहों; आणि जो मनुष्य मुक्त होतो, तो त्याची इच्छा असल्यास त्या चालू कल्पापुरता प्रकृतीशीं तादात्म्य पावून राहतो; व नव्या कल्पाच्या वेळीं सर्वज्ञ आणि सर्वशक्तिमान् या रूपानें अवतरतो आणि विश्वाचा शास्ताही होतो. त्या कल्पापुरतें विश्वनियमनाचें कार्य त्याजकडे येतें. या दृष्टीनें त्याला विश्वनियामक परमेश्वर असें पाहिजे तर म्हणावें. अशा रीतीनें तुमच्या-आमच्यासारख्या सामान्य मनुष्यासही कालेंकरून परमेश्वरत्व प्राप्त होईल. अशा रीतीनें प्रत्येक कल्पाला परमेश्वर निराळा असतो, आणि ईश्वरत्व ही चिरकाल टिकणारी स्थिति नाहीं, असें श्रीकपिलांचें म्हणणें आहे. चिरकाल

टिकणारें सर्वज्ञत्व आणि सर्वशक्तिमत्त्व असणारा, आणि चिरकाल राहणारा असा परमेश्वर असणें शक्य नाहीं असें त्यांचें मत आहे. असा परमेश्वर आहे असेंही घटकाभर गृहीत धरलें, तर मुक्त अथवा बद्ध यांपैकीं कोणत्यातरी अवस्थेंत तो असला पाहिजे हें उघड आहे. जर तो मुक्त स्थितींत आहे असें म्हटलें, तर त्या स्थितींत तो विश्वाची उत्पत्ति करणार नाहीं हें उघड आहे. कारण, विश्वाची उत्पत्ति त्यानें कां करावी, याला कांहीं कारण सांगतां येत नाहीं. तो मुक्त म्हणजे पूर्णावस्थेंत असतां तेथें कसल्याही प्रकारची इच्छा उद्भवण्याचा संभवच नाहीं. तसेंच तो बद्ध आहे असें म्हटलें, तर अर्थातच विश्वोत्पत्तीचें कार्य त्याच्यानें होणार नाहीं. तो स्वतःच अपूर्ण आणि बद्ध असतां विश्व उत्पन्न करील हें संभवतच नाहीं. यामुळें चिरकाल टिकणारा, सर्वशक्तिमान् आणि सर्वज्ञ असा परमेश्वर म्हणून कोणीं नाहीं; त्याचें अस्तित्व शक्यच नाहीं; याकरितां श्रुतींत जेथें परमेश्वर असा शब्द आला असेल, तेथें तो पूर्णात्म्याला अनुलक्षून वापरला आहे असें समजावें, असें श्रीकपिलांचें म्हणणें आहे. सर्व आत्मे वस्तुतः एकरूप आहेत असें सांख्यदर्शनकार मानीत नाहींत. सर्व आत्मे ब्रह्माच्या ठिकाणीं एकरूप होतात असें वेदांताचें मत आहे; परंतु सांख्यदर्शनकार कपिलमुनि हे या दृष्टीनें द्वैतवादी आहेत, असें म्हणावयास हरकत नाहीं. दर्शनकार या नात्यानें त्यांनीं विश्वाची जी उपपत्ति लावली आहे तिची योग्यता निःसंशय फार मोठीं आहे. श्रीकपिलमुनि हे आद्य दर्शनकार असून, त्यांच्या पाठीमागून जितकीं दर्शनें अस्तित्वांत आलीं, त्यांच्या कर्त्यांनीं कपिलमताचा आधार अनेक प्रकारें घेतला आहे. यावरून यांची योग्यता केवढी आहे याचें अनुमान होईल.

मुक्ति ही सर्व जीवात्म्यांच्या हक्काची बाब असून सर्वांना ती प्राप्त होईल असें सांख्यदर्शनाचें मत आहे. सर्वशक्तिमत्त्व आणि सर्वसाक्षित्व अमक्याला मिळावें आणि तमक्याला मिळूं नये असें नाहीं. हीं मिळविण्याचा हक्क जितका एकाला, तितकाच दुसऱ्याला, आणि तितकाच सर्वांना आहे. आतां येथें एक प्रश्न असा उद्भवतो कीं जीवात्म्यांना बंधन केव्हांपासून प्राप्त झालें? हें बंधन अनादि आहे असें या प्रश्नाचें उत्तर सांख्यांनीं दिलें आहे; पण हें बंधन जर अनादि आहे असें म्हटलें, तर तें अनंतही असलें पाहिजे असें म्हणणें ओघानेंच प्राप्त होतें. जर हें बंधन अनंत असेल तर त्यांतून आमची मुक्तता

होणें शक्य नाहीं, हेंही उघडच आहे. ही अडचण श्रीकपिलांनीं कशी दूर केली आहे तें पाहूं. प्रकृति जरी अनादि आहे तरी हें अनादित्व अखंड आहे असें नाहीं. पुरुषाचें अथवा आत्म्याचें अनादित्व ज्याप्रमाणें अखंड स्वरूपाचें आहे, त्याप्रमाणें प्रकृतीचें अनादित्व अखंड नाहीं; कारण, प्रकृति ही कांहीं एकच व्यक्ति नाहीं; ती समष्टिरूप आहे. आपण एखाद्या नदीच्या प्रवाहाकडे पाहिलें तर, प्रत्येक क्षणीं प्रवाहाला नवें पाणी येऊन मिळत आहे असें आपणांस दिसेल. पाण्याचे हजारों बिंदू प्रत्येक क्षणीं नवे येत आहेत आणि पूर्वीचे बिंदू पुढें निघून जात आहेत, असें आपणांस आढळून येईल. हे हजारों बिंदू मिळूनच नदीचा प्रवाह बनला आहे. प्रवाह एकसारखा चालू असला तरी त्यांत हजारों बिंदूंची अदलाबदल होत असतेच. प्रवाहाचें प्रवाहत्व कायम राहूनही त्यांत अदलाबदल होत असते. त्याचप्रमाणें प्रकृतीच्या प्रवाहांत क्षणोक्षणीं बदल होत असतो; पण पुरुषाची अथवा आत्म्याची गोष्ट याहून वेगळी आहे. त्याच्या स्वरूपांत कोणत्याही काळीं बल होत नाहीं. त्याचें रूप सर्वत्र आणि सर्व काळीं एकसारखेंच आहे. यामुळें प्रकृतीनें उपस्थित केलेल्या बंधनांतून आत्मा मोकळा होऊं शकतो. अगोदर सांगितलेल्या अडचणींचें निवारण सांख्यांनीं याप्रमाणें केलें आहे.

सांख्यांच्या सूक्ष्मेंद्रियशास्त्राची ( Psychology ) आणखीही एक विशिष्ट उपपत्ति आहे. ज्या विशिष्ट तत्त्वांस अनुसरून एका मनुष्यदेहाची रचना होते, त्याच तत्त्वांस अनुसरून सर्व विश्वाची रचना झाली आहे असें एक विशिष्ट सांख्यमत आहे. पिंड आणि ब्रह्मांड हीं तत्त्वतः एकाच स्वरूपाचीं आहेत. ज्याप्रमाणें एका नरदेहांत मनसंज्ञक विशिष्ट इंद्रिय आढळून येतें, त्याचप्रमाणें सर्व विश्वाचें—विश्वव्यापक—असें एक मन आहे. कल्पारंभीं विश्व व्यक्तदशेला येऊं लागतें तेव्हां महत्तत्त्व (बुद्धि) प्रथम उदय पावते व पाठीमागून क्रमानें विश्व उदय पावतें. “**प्रकृतेर्महांस्ततोऽहंकारस्तस्माद्गणश्च षोडशकः । तस्मादपि षोडशकात्पंचभ्यः पंचभूतानि**”॥ ‘प्रकृतीपासून महत्तत्त्व उत्पन्न होतें; महत्तत्त्वापासून अहंकार होतो; अहंकारापासून अकरा इंद्रियें व पंचतन्मात्रें या सोळा तत्त्वांचा समुदाय निर्माण होतो; आणि या सोळा तत्त्वांपैकीं पंचतन्मात्रांपासून आकाशादि पंचभूतें होतात.’ अशा रीतीनें विश्व हें एक प्रचंड शरीरच आहे असें श्रीकपिलांचें मत आहे. आपणांस

जें कांहीं प्रत्यक्ष दिसत आहे, तीं सारीं जड-शरीरें असून त्यांच्यामागें सूक्ष्मदेह आहेत. त्या सूक्ष्मदेहांच्या मागें विश्वव्यापक अहंकार व त्या अहंकाराच्या मागें महत् ( विश्वव्यापकबुद्धि ) आहे. हीं सारीं प्रकृतीच्या आधीन असून प्रकृतींतूनच तीं निर्माण झालीं आहेत. प्रकृतीच्या मर्यादेबाहेरचें असें एकही तत्त्व यांत नाहीं. आपण सर्व मनुष्यें त्या विश्वव्यापक अहंकाराचींच रूपें आहोंत. आपणां सर्वांचीं मनें त्या महत्तत्त्वांतून निर्माण झालीं आहेत. महत्तत्त्व हें एखाद्या मोठ्या खजिन्यासारखें असून त्यांतून लागेल तेवढा भाग घेऊन आपण आपलीं मनें बनविलीं आहेत; आणि त्यांतून थोडथोडा भाग प्रत्यहीं आपण शोषीत असतों. आपल्या अंतरिंद्रियांस लागणारीं द्रव्यें आपण विश्वांतून घेत असतों; पण आपल्या जडशरीराला लागणारीं द्रव्यें मात्र, आपणांस आपल्या मातापितरांकडून मिळत असतात असें सांख्यमत आहे. आनुवंशिक संस्कार आणि पुनर्जन्म या दोन्ही उपपत्तींचा अंतर्भाव या सांख्यमतांत झाला आहे. स्वतःचें शरीर बनविण्याकरितां जीवात्म्याला जीं द्रव्यें लागतात, तीं त्याला आनुवंशिक संस्कारांनुरूप मातापितरांपासून प्राप्त होतात.

विश्वोत्पत्तीच्या क्रियेंत उत्क्रांति आणि प्रतिक्रांति अशा दोन क्रियांचा अंतर्भाव होतो, हा सांख्यांचा सिद्धांत आपल्या ध्यानीं आला असेलच. या सिद्धांताबद्दल आतां आपणांस विचार करावयाचा आहे. अव्यक्त प्रकृतींतून सर्व विश्व उत्क्रांत होतें, आणि कल्पाच्या शेवटीं प्रतिक्रांति होऊन तें अव्यक्तांत जातें. अहंकाराचा थोडातरी अंश असल्यावांचून कोणत्याही पदार्थाला अस्तित्व असणें शक्यच नाहीं, असें सांख्यांचें मत आहे. विश्वांत जें जें कांहीं दृश्यत्वाला आलें आहे त्याचें मूलद्रव्य अहंकार हेंच होय. या मताचा विस्तारपूर्वक विचार आपण पुढें करूंच; पण या मताची सिद्धि सांख्यमतानुयायी कशी करतात याचें थोडें दिग्दर्शन करणें वावगें नाहीं. माझ्या समोरील या मेजाकडे मी पाहतों त्या वेळीं त्याचे प्रकाशकिरण माझ्या डोळ्यांकडे धांव घेतात. डोळ्यांच्या द्वारें ते दृगिंद्रियाकडे रवाना होतात आणि तेथून त्यांची रवानगी मनाकडे होते, इतकी क्रिया पूर्ण झाली म्हणजे मनाची प्रतिक्रिया सुरू होते, व त्यानें त्या पदार्थाबद्दल जो कांहीं निश्चय केला असेल, त्याला अनुरूप असें नांव मी त्या पदार्थाला देतों आणि 'हें मेज' असें मी म्हणतों. माझ्यासमोरील पदार्थाचें—त्याचें स्वतःचें असें—रूप काय आहे हें मला माहीत

नाहीं. त्या पदार्थाच्या स्वतःच्या रूपाची ओळख मला कधीं होतच नाहीं. त्याचें रूप व नांव हें मीं त्याला माझ्या मनाच्या इच्छेप्रमाणें दिलेलें असतें. एखाद्या शांत तळ्यांत आपण धोंडा टाकला असतां त्याच्या पृष्ठभागावर येणाऱ्या लाटा आपणांस दिसतात. तसेंच आपल्या चित्तांत बाहेरील एखादा पदार्थ जाऊन आदळला म्हणजे त्याजवर लाटा उठतात; व त्या जशा आकाराच्या असतील तसा आकार आपणांस समोर दिसूं लागतो. अशाच रीतीनें या समोरील भिंतीकडे मीं पाहिलें, तर माझ्या चित्तांत जो कांहीं आकार असेल तोच मला दिसेल. वस्तुतः बाह्यपदार्थाचें स्वरूप काय आहे हें मला ठाऊक नाहीं. हें समजणें शक्यच नाहीं. त्याचें ज्ञान मला व्हावें अशी इच्छा माझ्या मनांत उद्भवल्याबरोबर माझा अहंकार जागृत होतो व त्या वस्तूला लागणारी सर्व सामग्री तो निर्माण करतो. त्या सामग्रींतून मी तो पदार्थ निर्माण करतों आणि 'मीं अमुक पाहिलें' असें म्हणतों. माझ्या डोळ्यांवर पडलेल्या प्रतिबिंबाला लागणारी सर्व सामग्री मीं माझ्या मनांतूनच निर्माण करून दिलेली असते. आतां येथें बाह्यपदार्थाचें काम तरी काय आणि तो स्वतः कोणती क्रिया करतो असा प्रश्न उद्भवतो. त्याचें उत्तर असें कीं, बाह्यपदार्थ हा माझ्या अंतरिंद्रियांना चालन देण्याचें एक साधन मात्र होतो. धोंडा तळ्यांत पडला म्हणजे जशा त्याजवर लाटा उठतात, त्याचप्रमाणें बाह्यपदार्थ हा माझ्या चित्तावर लाटा उठविण्याचें मात्र कार्य करतो. त्या लाटा उत्पन्न झाल्या म्हणजे माझें मन त्यांकडे पाहूं लागतें, व त्या क्षणीं तें जो आकार धारण करतें तो मला दिसतो. याचा अर्थ असा कीं, मी स्वतःच जो आकार निर्माण करतों व तो मी पाहत असतों. आतां येथें आणखीही एक प्रश्न उद्भवतो तो असा कीं, जर हे सारे आकार आपणच आपल्या मनानें बनविले आहेत, तर त्यांत साम्य कसें उत्पन्न होतें? आपण सर्व व्यक्ति निरनिराळ्या आहों, त्याअर्थी आपले सर्व आकारही निरनिराळे कां होऊं नयेत? 'झाड' असा शब्द उच्चारल्याबरोबर आपणा सर्वांच्या मनांत एकाच विशिष्ट आकाराची उत्पत्ति कशी होते? याचें कारण असें कीं, आपण सारे विश्वरूप मनाचेच अंश आहों. आपणांपैकीं प्रत्येकामध्यें एकच महत्तत्त्वाचा अंश आहे. ज्याला मन म्हणून इंद्रियाची प्राप्ति झाली असेल त्याला ती वस्तु तशीच दिसेल; आणि ज्याला मनाची प्राप्ति झाली नसेल त्याला ती दिसणार नाहीं. आपल्या प्रश्नाचें उत्तर

सांख्यमतानें याप्रमाणें दिलें आहे. यावरून असें सिद्ध होतें कीं, हें विश्व अस्तित्वांत आल्यापासून महत्तत्त्व म्हणजे विश्वव्यापी मनही अस्तित्वांत आहे. त्याला अस्तित्व नाहीं असा एक क्षणही नव्हता. प्रत्येक मानवी प्राण्याला आणि प्रत्येक सजीव प्राण्यालाही या विश्वव्यापी मनाचा अंश मिळालेला आहे, आणि तें महत्तत्त्व सदोदित राहणारें असल्यामुळें तो अंश त्याला सदोदित मिळत राहतो.



## प्रकरण २ रें

# प्रकृति आणि पुरुष

विश्वरचनेंत ज्या पदार्थांचा अंतर्भाव होतो त्यांचा व्यक्तिशः विचार आपणांस करावयाचा आहे. विश्वाचें कारण प्रकृति आहे हें पूर्वी सांगितल्याचें आपणांस आठवत असेलच. याकरितां प्रकृतीचें स्वरूप काय आहे याबद्दल प्रथम विचार करणें इष्ट आहे. प्रकृति हें विश्वाचें समवायी रूप आहे असें सांख्यांचें म्हणणें आहे. सत्त्व, रज आणि तम हे तिन्ही गुण समतोल होऊन विश्व अव्यक्तदशेंत गेलें म्हणजे विश्वाच्या त्या स्वरूपाला प्रकृति असें नांव प्राप्त होतें. त्या स्थितींत प्रकृतींतील सर्व तत्त्वें समतोल स्थितींत असतात. पूर्ण समतोल अवस्थेंत कोणतीही गति असत नाहीं हें उघडच आहे. यत्किंचित्‌ही गति अथवा हालचाल नसणें हीच समतोलपणाची खूण आहे; तेथें गति अथवा हालचाल उत्पन्न झाली म्हणजे प्रतीत होऊं लागतें. आपण जें जें कांहीं पाहतों, ज्याला ज्याला आपण स्पर्श करूं शकतों अथवा ज्याचें ज्ञान आपणांस आपल्या कर्मेंद्रियद्वारा होतें, तो प्रत्येक पदार्थ जडवस्तु आणि गति यांचें मिश्रण आहे. ज्या वेळीं प्रकृति आपल्या मूलरूपांत म्हणजे अव्यक्त स्थितींत असते, त्या वेळीं तेथें पूर्ण समतोलपणा आणि निष्पंदावस्था असल्यामुळें ती अविनाशी असते. आपण प्राकृत लोक 'नाश' हा शब्द ज्या क्रियेला लावतों तिचें शास्त्रीय स्वरूप 'विघटना' हेंच होय. एखाद्या पदार्थांतील घटकांची विघटना झाली म्हणजे तो पदार्थ नाश पावला असें आपण म्हणतों. कोणत्याही पदार्थाला मर्यादा असल्यावांचून त्याचा नाश होऊं शकत नाहीं. अमर्याद पदार्थांत विघटना होणें शक्य नाहीं, असा सांख्यांचा सिद्धांत आहे. त्याचप्रमाणें 'अणु' हें पदार्थांचें मूलरूप नव्हे, असेंही सांख्यांचें मत आहे. दृश्यावस्थेंतील प्रत्येक पदार्थ परमाणूंपासूनच निर्माण झाला आहे हें खरें; पण परमाणु हें शेवटचें अथवा मूलरूप नव्हे. केवळ परमाणूंतूनच विश्व निर्माण झालेलें नाहीं. परमाणु हें स्वरूप मूलरूपापासून दुसऱ्या अगर तिसऱ्या पायरीचें स्वरूप आहे. मूलरूपांत मिश्रणें होऊन त्यापासून परमाणू बनतात आणि परमाणूंचें पुनर्मिश्रण होऊन त्यांतून विश्वांतील अनेक पदार्थ निर्माण होतात. अर्वाचीन शास्त्रांनीं जे कांहीं सिद्धांत स्थापित केले

आहेत त्यांवरून त्या शास्त्रांचा कलही हळुहळू हाच सिद्धांत सांगण्याकडे होत आहेसें दिसतें. आपल्या अर्वाचीन शास्त्रांनीं अगदीं शेवटचा म्हणून शोधून काढलेला पदार्थ Ether (आकाश) हा होय. या ईथरचें स्वरूप काय आहे? तोही अनेक परमाणूंचा बनला आहे असें म्हटलें तर, परमाणूंपासून विश्व बनलें आहे, हा तुमचा सिद्धांत सिद्ध होत नाहीं. आपली हवा ही परमाणूंपासून बनली आहे असें समजूं; हे परमाणू कोठें राहतात याचा विचार केला असतां ते ईथरमध्येंच तरंगत असतात असें म्हटलें पाहिजे. कारण, ईथर हा सर्वव्यापी, सर्वांतरात्मा आणि सर्वसाक्षी असा आहे. याकरितां हवेचे परमाणूसुद्धां ईथरमध्येंच तरंगत असले पाहिजेत हें उघड आहे. आतां अशा स्वरूपाचा ईथरसुद्धां जर परमाणूंचा बनला आहे असें मानलें, तर त्याच्या दोन परमाणूंमध्यें पोकळी शिल्लक असलीच पाहिजे. ही पोकळी कशानें भरली आहे? ही पोकळी दुसऱ्या कसल्यातरी परमाणूंनीं भरली आहे असें मानलें, तर त्या दुसऱ्या दोन परमाणूंतही ही पोकळी शिल्लक राहीलच. ती कशानें भरली असें म्हणावयाचें? त्यासाठीं विरलतर स्वरूपाचा ईथर अस्तित्वांत आहे असें मनलें, तरी पूर्वीची प्रश्नपरंपरा शिल्लक उरतेच. अशा रीतीनें विचार करतां करतां परमाणूंचा शेवट असा केव्हांच होत नाहीं. अशा प्रकारच्या वादपद्धतीला अनवस्था असें नांव सांख्यांनीं दिलें आहे. सिद्धांत अंतिम स्वरूपापर्यंत न पोहोंचणें याला अनवस्था असें म्हणतात. या विवेचनावरून परमाणू हें विश्वरचनेचें आदिकरण आहे हा सिद्धांत सिद्ध होऊं शकत नाहीं, हें आपल्या लक्ष्यांत आलेंच असेल.

प्रकृति ही चिरकालवासी असून, तें अनेक जडवस्तूचे समवायीरूप आहे; आणि विश्वांत जितक्या वस्तू प्रतीत होतात, तितक्या साऱ्यांचीं कारणें प्रकृतींत अंतर्भूत झालीं आहेत. आतां कारण या शब्दाचा अर्थ काय याचा विचार करणें अवश्य आहे. प्रत्यक्ष अथवा दृश्यस्थितीचें जें विरल अथवा सूक्ष्मरूप, तें त्या दृश्यस्थितीचें कारण असें आपण म्हणतों. कारण आणि कार्य यांत जो फरक असतो तो फक्त, स्वरूपाचाच असतो. आतां नाश या शब्दाचा अर्थ काय? नाश या शब्दाचा शास्त्रीय अर्थ म्हणजे कारणरूपाला परत जाणें असा आहे. ज्या मूल द्रव्यांचे घटक एकत्र मिळून एखादा पदार्थ बनला असेल, तीं द्रव्यें आपल्या मूळच्या स्थितींत परत गेलीं, म्हणजे त्या दृश्य पदार्थाचा

नाश झाला असें आपण म्हणतों. नाश म्हणजे कारणरूपांत लय होणें इतकाच खरा अर्थ आहे. कोणत्याही वस्तूचा आत्यंतिक नाश कधीं होऊंच शकत नाहीं. आपल्या अर्वाचीन भौतिकशास्त्रकारांनीं हा सिद्धांत इतक्या चोख रीतीनें सिद्ध केला आहे कीं, त्याबद्दल कसलाच वाद उरलेला नाहीं. ‘नाश म्हणजे कारणरूपाला परत जाणें’ असें जें श्रीकपिलांनीं कित्येक युगांपूर्वी म्हटलें, तेंच सध्याचीं भौतिकशास्त्रें अक्षरशः म्हणत आहेत! स्थूलरूपांतून सूक्ष्मरूपांत लय पावणें इतकाच अर्थ नाश या शब्दाचा आहे! कोणत्याही पदार्थाचा आत्यंतिक नाश कधींही होत नसून त्याचें रूपांतर मात्र होतें, ही गोष्ट प्रत्यक्ष प्रयोगानें रसायनशास्त्री तुम्हांस दाखवूं शकतात. जर एखाद्या कांचेच्या नळींत जळती मेणबत्ती व कॉस्टिक सोड्याची कांडी घालून मेणबत्ती अखेर-पर्यंत जळूं दिली, व नंतर कॉस्टिकची कांडी वजन केली, तर ती पूर्वीपेक्षां वजनानें वाढली असल्याचें आढळून येईल, आणि ही वाढ बरोबर मेणबत्तीच्या वजनाइतकीच आहे असें निदर्शनास येईल. यावरून मेणबत्ती कोठें गेली—कशी नाश पावली—तें आपल्या लक्ष्यांत येईल. मेणबत्तीचें स्थूलरूप नष्ट होऊन ती हळुहळू सूक्ष्मरूप धारण करीत होती आणि त्या सूक्ष्मरूपानें ती कास्टिकच्या पोटांत प्रवेश करीत होती हें अगदीं उघड झालें. यावरून कोणत्याही वस्तूचा आत्यंतिक नाश कधींही होत नाहीं; पण तिचें फक्त अधिक सूक्ष्म-रूपांत—कारणरूपांत—रूपांतर मात्र होतें, हें निःसंशय सिद्ध होतें. आज आपल्या शास्त्रीय ज्ञानाची वाढ इतकी झाली आहे कीं, एखादी वस्तु पूर्णत्वानें नाश पावते असें म्हणणारा कोणी भेटलाच, तर जनदृष्टीनें त्याची बोळवण वेड्यांच्या इस्पितळांत करावी लागेल. अक्षरशत्रू लोकांवांचून असे शब्द सध्याच्या काळीं कोणीही उच्चारणार नाहीं. आमच्या प्राचीन तत्त्ववेत्त्यांनीं त्या काळीं जें कांहीं सांगितलें, त्याचीच पुनरावृत्ति अर्वाचीन ज्ञानमार्ग करीत आहे ही गोष्ट मोठ्या आश्चर्याची म्हटली पाहिजे! प्राचीन तत्त्ववेत्त्यांनीं अंतःसृष्टीचा अभ्यास करून विश्वरचनेसंबंधीं सिद्धांत प्रस्थापित केले. त्यांनीं विशेषतः मनाचा अभ्यास करून हे शोध लावले आहेत. अर्वाचीन भौतिक शास्त्रकार, जडविश्वाचा अभ्यास करीत आहेत. मनाच्या निरनिराळ्या शक्ती आपल्या प्रत्ययाला येतात, त्यांचें पृथक्करण करून व त्यांचा अभ्यास करून प्राचीन तत्त्वज्ञांनीं जे सिद्धांत ठरविले, तेच सिद्धांत अर्वाचीन

पंडित जडसृष्टीच्या अभ्यासानें ठरवूं पाहत आहेत. मार्ग परस्परभिन्न असले, तरी दोघांचा शेवटचा मुक्काम एकच आहे; ही गोष्ट आपल्या लक्ष्यांत आलीच असेल.

नव्या कल्पाला आरंभ होतो, त्यावेळीं अव्यक्त प्रकृति प्रथम महत् या रूपानें प्रकट होते हें आरंभीं सांगितलेंच आहे. याला आपण विश्वबुद्धि असें नांव देऊं. महत्तत्त्व या शब्दाचा पदशः अर्थ मोठें तत्त्व असा आहे. विश्वबुद्धि हें प्रकृतीचें पहिलें व्यक्तरूप आहे. महत्तत्त्व म्हणजे स्वतःची जाणीव अथवा अहंकार असेंही कोणी म्हणतात; परंतु तो अर्थ चुकीचा आहे. अहंकार हें महत्तत्त्वाचें एक रूप आहे ही गोष्ट खरी; पण महत्तत्त्व म्हणजे अहंकार नव्हे. अहंकार हा महत्तत्त्वाचा भाग मात्र आहे. महत्तत्त्व हें विश्वव्यापी असून, अहंकार हा व्यक्तिव्यापी आहे. महत्तत्त्वाचे खेळ साऱ्या विश्वांत चालतात, आणि अहंकाराचे खेळ एकाच देहांत प्रत्ययाला येतात. अहंकार, विचाराक्षमस्थिति ( Sub-consciousness ) आणि संवेदनातीत स्थिति ( Super-consciousness ), या सर्वांवर महत्तत्त्वाचें आवरण आहे. महत्तत्त्व या सर्वांपलीकडचें असून हीं त्याचींच रूपें आहेत. आपल्या या सृष्टींत अनेक प्रकारच्या घडामोडी प्रत्यहीं चालू आहेत; यांपैकीं कित्येक आपल्या नजरेसमोर घडत असतात आणि त्या आपणांस जाणतां येतात. दुसऱ्या कित्येक इतक्या सूक्ष्मस्वरूपाच्या असतात कीं, त्या मानवी इंद्रियांच्या आटोक्यांत येणें शक्यच नाहीं. या सूक्ष्म घडामोडीही महत्तत्त्वच करीत असतें. याशिवाय दुसऱ्या कित्येक घडामोडी अशा स्वरूपाच्या असतात कीं, त्या आपलें मन अथवा आपली तारतम्यबुद्धि यांच्या आटोक्यांत येऊं शकत नाहींत. या अनेक प्रकारच्या कार्यपरंपरांचा अंतर्भाव महत्तत्त्वांतच झालेला आहे. महत्तत्त्वांतून या घडामोडी कशा होतात, याचें अधिक स्पष्टीकरण करण्यासाठीं एकाच व्यक्तीचें उदाहरण घेऊं.

महत्तत्त्वापासून अहंकार निर्माण होतो. महत्तत्त्व आणि अहंकार हीं दोन्ही जडच आहेत. जडदेह आणि मन यांत जो फरक आहे तो फक्त परिमाणाचा —कमीअधिकपणाचा आहे. त्यांच्या स्वरूपांत गुणमूलक फरक मुळींच नाहीं. एकाच पदार्थांतून हीं दोन्हीं निर्माण झालीं असल्यामुळें त्यांच्यांत गुणमूलक फरक असणें शक्य नाहीं. त्यांपैकीं एकाचें स्वरूप स्थूल असून दुसऱ्याचें

सूक्ष्म आहे, इतकाच काय तो फरक त्यांमध्यें आहे. यांपैकीं सूक्ष्म स्वरूप प्रथम निर्माण होतें आणि नंतर त्याचेंच स्थूलरूप होतें. इंद्रियविज्ञानशास्त्रानें अर्वाचीन काळीं जे कांहीं शोध लावले आहेत त्यांचा मतितार्थही हाच आहे. मन आणि देह यांत गुणमूलक फरक असणें मूलतःच अशक्य असल्यामुळें, सांख्यांचा हा सिद्धांत एकदम कबूल करण्यास नड नाहीं. दुसरें असें कीं, इंद्रियविज्ञानशास्त्राचीही संमति त्याला आहे. अशा स्थितींत ही गोष्ट नाकबूल करून, निरर्थक डोकें पिकविण्याचें कारण आपणांस नाहीं. मनाचें स्वरूप मेंदूच्या स्वरूपाहून निराळें आहे असें कित्येक म्हणतात. पण त्यांचें म्हणणें ऐकून घेऊन त्यावर वादविवाद करणें म्हणजे, व्यर्थ कालक्षेप करून आपणांस निष्कारण त्रास करून घेण्यापलीकडे त्यांत कांहींच फायदा नाहीं. महत्तत्त्वापासून अहंकार होतो हें अगोदर सांगितलेंच आहे. अहंकार हें अत्यंत सूक्ष्म असें जडरूप आहे. अहंकारापासून दोन प्रकारचे समुदाय निर्माण होतात. यापैकीं एका समुदायांतून इंद्रियें निर्माण होतात. इंद्रियांत दोन प्रकार आहेत; ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें. शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध यांचें ज्ञान ज्यांच्या द्वारा होतें तीं ज्ञानेंद्रियें; आणि हस्तपादादि इंद्रियें हीं कर्मेंद्रियें होत. आपल्या जड देहावर दिसणारीं इंद्रियें—कान, डोळे इत्यादि—हीं खरीं इंद्रियें नव्हत हें मागें एकवार सांगितलेंच आहे. खरीं इंद्रियें म्हणजे मेंदूतील गोलक होत. अहंकाराच्या स्वरूपांत बदल होऊन त्यांतून हे गोलक निर्माण झाले आहेत. त्याचप्रमाणें त्या गोलकाशीं संलग्न असलेले ज्ञानतंतूही अहंकारांतूनच निर्माण झाले आहेत. अहंकाराच्या दुसऱ्या प्रकारच्या समुदायांतून पंचतन्मात्रें निर्माण होतात. तन्मात्रांचे स्वरूप अत्यंत सूक्ष्म असून तीं जड आहेत. तन्मात्रें दृष्टीनें पाहणें शक्य नाहीं; तथापि त्यांच्या अस्तित्वाचें ज्ञान आपणांस होतें. फुलांतून वासाचे कण बाहेर पडतात व त्यांचा वास आपणांस येतो; पण ते कण आपणांस दिसणें शक्य नाहीं. तन्मात्रांच्या स्वरूपाचें सविस्तर विवेचन पूर्वीं एकवार झालेंच आहे. अहंकारापासून पांच तन्मात्रें निर्माण होतात; आणि या पांच तन्मात्रांपासून पंचमहाभूतें निर्माण होतात; व या पंचमहाभूतांपासून हवा, पाणी, पृथ्वी इत्यादि दृश्य वस्तू निर्माण होतात. सृष्टींत जें कांहीं आपण पाहूं शकतों, अथवा कोणत्याही इंद्रियांच्या साहाय्यानें ज्याचें अस्तित्व आपणांस जाणतां येतें, तें सर्व पंचमहाभूतांतूनच निर्माण झालें आहे.

हें सर्व तुम्ही उत्तम रीतीनें चित्तावर बिंबवून घ्या. हें यथार्थ रीतीनें चित्ताला पटणें फार कठीण आहे. विशेषतः तुम्हां पाश्चात्यांमध्यें मन आणि जडवस्तु यांसंबंधीं इतक्या कांहीं विचित्र कल्पना भरल्या आहेत कीं, त्या नाहींशा होऊन त्यांच्या जागीं या नव्या कल्पनांचा प्रवेश होणें अत्यंत बिकट कर्म आहे. पाश्चात्य तत्त्वज्ञानपद्धतीशीं माझा प्रथम परिचय झाल्यामुळें मला स्वतःला ही विचारमालिका समजावून घेणें फारच जड गेलें.

येथपर्यंत एका व्यक्तीच्या अथवा व्यष्टीच्या देहरचनेचा विचार झाला. हीच सर्व विचारपरंपरा विश्वरचनेलाही लागू आहे. विश्वांत भासमान होणाऱ्या वस्तूंचीं नामरूपें काढून टाकून त्यांचा एक प्रचंड विस्तार कल्पिला, तर त्या रूपाला अव्यक्त असें नांव देतां येईल. प्रत्यक्ष दिसणारें रूप आणि त्यामुळें प्राप्त होणारें नाम हीं वजा केलीं, तर केवळ 'वस्तु' इतकीच संज्ञा शिल्लक राहील. या अव्यक्तरूपांत घडामोड सुरू झाली म्हणजे जें पहिलें रूप त्यांतून व्यक्त होतें त्याचें नांव महत् असें आहे. ज्याप्रमाणें दुधाचें दहीं बनतें व त्यांतून पुढें लोणी निघतें, त्याचप्रमाणें अव्यक्तांतून महत् बनतें व महत्तत्त्वापासून बुद्धि आणि अहंकार हीं निर्माण होतात. महत्तत्त्वांतून हीं बनतात असें म्हटलें म्हणून महत्तत्त्वांत व त्यांच्यांत गुणमूलक असा कांहीं फरक पडतो असें मात्र समजूं नये; कारण, महत्तत्त्वानेंच हीं रूपें धारण केलेलीं आहेत. महत्तत्त्वाचें रूप सूक्ष्म असतें व त्या मानानें या दोन तत्त्वांचें रूप अधिक स्थूल असतें, इतकेंच. अशा रीतीनें हें सारें विश्व क्रमाक्रमानें प्रतीत झालें आहे. याचें अगदीं पहिलें अथवा मूलरूप म्हटलें म्हणजे प्रकृति—अव्यक्त—हें होय; त्यापासून विश्वव्यापि महत् निर्माण होतें व महत्पासून विश्वव्यापी अहंकार निर्माण होतो; व या अहंकारांतून दोन प्रकारचा तत्त्वसमूह निर्माण होतो. या तत्त्वसमूहाच्या एका प्रकारांतून सर्व ज्ञानेंद्रियें निर्माण होतात; व दुसऱ्या प्रकारांतून तन्मात्रें निर्माण होतात. तन्मात्रांपासून महाभूतें निर्माण होतात आणि महाभूतांपासून हें सारें विश्व निर्माण होतें. विश्वरचनेचा नकाशा सांख्यांनीं याप्रमाणें काढला आहे. जी रचना ब्रह्मांडांत दृग्गोचर होते, तीच पिंडांतही असते असें सांख्यांचें मत आहे.

ज्या क्रमानें हें विश्व व्यक्त होतें, त्याच क्रमानें एक व्यक्तीहि—पिंड—व्यक्त होतें असें सांख्यमत आहे. मनुष्यही प्रथम अव्यक्तदशेंतच असतो; म्हणजे त्यांत

त्या वेळीं प्रकृतीचा अंशच अव्यक्तदशेंत असतो. या मानवी प्रकृतींतून मानवी महत् म्हणजे बुद्धि प्रथम व्यक्त होते. ही बुद्धि म्हणजे महत्तत्त्वाचा अथवा विश्वव्यापी बुद्धीचा अंशच आहे. या मानवी बुद्धींतून मानवी अहंकार निर्माण होतो. या अहंकारांतून त्या व्यक्तीच्या ठिकाणीं दिसून येणारीं इंद्रियें आणि तन्मात्रा असे दोन प्रकार निर्माण होतात. तन्मात्रांपासून स्थूल देह बनतो. आपण ही सारी रचना विशेषेंकरून लक्ष्यांत ठेवावी अशी सूचना आगाऊ देऊन ठेवणें इष्ट आहे; कारण, वेदांताच्या पुढील भव्य इमारतीचा हा पाया आहे. दुसरें असें कीं, जगांत जितकीं दर्शनें आज अस्तित्वांत आहेत त्या सर्व दर्शनांचासुद्धां हाच पाया आहे; याकरितां सांख्यांची विश्वरचनेची मीमांसा आपण उत्तम रीतीनें समजून घ्यावी व नीट ध्यानांत ठेवावी अशी सूचना मीं मुद्दाम दिली आहे. कोणत्याना कोणत्या रीतीनें सांख्यदर्शनाचा आधार या जगांतील प्रत्येक तत्त्ववेत्त्यानें घेतला आहे. श्रीकपिलांचें थोडें अथवा फार ऋण ज्यानें घेतलें नाहीं असा एकही पंडित या पृथ्वीतलावर आपणांस सांपडणार नाहीं. पायथागोरास या नांवाचा एक प्रवासी हिंदुस्थानांत आला व त्यानें सांख्यमताचा अभ्यास करून तें दर्शन ग्रीक लोकांस दिलें. कांहीं काळानें तें अलेक्झांड्रियाकडे गेलें आणि त्यानंतर कांहीं काळानें त्याच्याच पायावर एक नवा पंथही उपस्थित झाला. या पंथाच्या मतांत ख्रिस्ती व हिंदु या तत्त्वज्ञानांचें मिश्रण सांपडतें. या पंथाला Gnostic असें नांव आहे. अशा रीतीनें या दर्शनाच्या ज्या दोन शाखा झाल्या, त्यांपैकीं एक युरोप व अलेक्झांड्रियाकडे गेली व दुसरी हिंदुस्थानांत राहिली. जी शाखा हिंदुस्थानांत राहिली तिच्या पायावर दुसरीं अनेक दर्शनें तेथें जन्माला आलीं व श्रीव्यासांचें दर्शन हें त्यांपैकींच एक आहे. शुद्ध विवेचकबुद्धीनें दाखविलेल्या मार्गावर आरूढ होऊन विश्वाच्या कोड्याचा ज्यांत समाधानकारक रीतीनें उलगडा केला आहे असें हें पहिलें दर्शन होय. श्रीकपिल यांची योग्यता आद्य दर्शनकार या नात्यानें फारच मोठी आहे यांत संशय नाहीं. जगांतील कोणीही तत्त्वदर्शी असो, त्यानें या आद्य गुरूंच्या चरणीं मस्तक वाहावें हें त्यास योग्य आहे. तत्त्वज्ञानाच्या या आद्य प्रणेत्याचें म्हणणें ऐकून घेऊन त्याला योग्य मानाचें स्थान देणें आपलें कर्तव्य आहे, हें आपण अवश्य ध्यानांत ठेवलें पाहिजे. जगांतील तत्त्वज्ञांच्या पंक्तींत मेरुमण्याच्या जागीं विराजमान होणाऱ्या या नरश्रेष्ठाच्या नांवाचा उल्लेख श्रुतीं-

तही सांपडतो. **'सिद्धानां कपिलो मुनिः'** असा उल्लेख करून भगवान् श्रीकृष्णांनीं त्यांना परमेश्वरत्वाची पदवी अर्पण केली आहे ! त्यांच्या या तीव्र ज्ञानदृष्टीचें कौतुक जेवढें करावें तेवढें थोडेंच. योगाभ्यासानें अतींद्रियज्ञानाची प्राप्ति होते असें योग्यांचें म्हणणें आहे. हें त्यांचें म्हणणें खरें आहे हें सिद्ध करण्यास श्रीकपिलांसारख्या विभूती पुराव्यादाखलच आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. श्रीकपिलांच्या वेळीं दुर्बिणीं नव्हत्या अथवा सूक्ष्मदर्शकयंत्रेंही नव्हतीं; असें असतांही, त्यांनीं सूक्ष्मतम पदार्थांचे शोध कसे लावले ही मोठी विचार करण्यासारखी गोष्ट आहे. त्यांची पृथक्करणपद्धति किती निर्दोष आणि परिपूर्ण होती हें पाहिलें, म्हणजे त्यांना अतींद्रिय दृष्टि प्राप्त झाली होती असेंच म्हटलें पाहिजे ! असो.

आतां पिंडरचनेकडे पुन्हां वळूं. ज्या पद्धतीनें ब्रह्मांडरचना झाली आहे, त्याच पद्धतीनें पिंडरचना झाली आहे; याबद्दल आपण विचार केलाच आहे. त्याच्या ठिकाणींही प्रकृति प्रथम अव्यक्त—समतोल—असते. त्यानंतर या साम्यावस्थेंत बिघाड होतो व प्रकृति व्यक्त होऊं लागते. प्रकृतीचें पहिलें स्वरूप महत् हेंच आहे. पिंडांतील हें महत् म्हणजे ब्रह्मांडांतील महत्तत्त्वाचाच एक स्फुलिंग आहे. स्फुलिंगासारख्या या महत्तत्त्वांतून अहंकार निर्माण होतो. अहंकाराच्या एका भागांतून आज्ञावाहक व स्पर्शवाहक असे दोन प्रकारचे ज्ञानतंतू निर्माण होतात; आणि दुसऱ्यांतून जीं तन्मात्रें निर्माण होतात, त्यांपासून जडशरीर बनतें. सुप्रसिद्ध जर्मन पंडित शोपेनहॉर यांचें मत व वेदांतमत यांत जो एक फरक आहे तो येथें सांगणें इष्ट आहे. शोपेनहॉरच्या मतें, 'इच्छा' ( Desire or will ) हेंच विश्वाचें आदिकारण आहे. 'जगावें' अशी इच्छा आपल्या हृदयांत जागृत असते तीमुळेंच आपण व्यक्तत्वास येतों असें शोपेनहॉरचें मत आहे. अद्वैतसिद्धांताला हें मत मान्य नाहीं. त्यांच्या मतें महत् हेंच विश्वाचें कारण आहे. इच्छा हें स्वतंत्र रूप नाहीं; तें केवळ परावर्तित रूप आहे. अहंकारांतून इच्छा उद्भवते. तिचें अस्तित्व अहंकारावर अवलंबून आहे; आणि अहंकार हा स्वतःहून अधिक मोठ्या रूपांतून निर्माण झाला आहे. हें मोठें रूप म्हणजे महत्तत्त्व हेंच होय. अव्यक्त प्रकृतीचें पहिलें व्यक्त रूप महत् हें आहे.

महत्तत्त्वाचा जो सूक्ष्म अंश पिंडांत—मानवदेहांत—प्रगट झाला त्याचें स्वरूप यथास्थित रीतीनें समजावून घेणें फार महत्त्वाचें आहे. पिंडांतील

महत्तत्त्वांपासून अहंकार उत्पन्न झाला असून, तो ज्या अनेक प्रकारच्या घडामोडी करतो त्यांपासून हें आपलें शरीर निर्माण झालें आहे. विचाराक्षमबुद्धि (Sub-consciousness), विचारवती बुद्धि (Consciousness) आणि विचारातीतबुद्धि (Super-consciousness), हीं जीं बुद्धीचीं त्रिविधरूपें आपल्या प्रत्ययास येतात, त्यांचा अंतर्भाव, या महत्तत्त्वांशाच्या पोटींच झाला आहे. हीं तिन्ही रूपें महत्तत्त्वांतून निर्माण झालीं आहेत. आतां या तीन प्रकारांचें वास्तविक स्वरूप काय आहे याचा विचार करूं. विचाराक्षम बुद्धि पशुवर्गांत आढळून येते. तिला आपण उपजतबुद्धि असें म्हणतों. पशूंच्या सर्व क्रिया उपजतबुद्धीनें होत असतात. पशूंच्या सर्व क्रिया ठराविकपणें होत असतात असें आपण पाहतों. विचाराक्षमबुद्धि बहुधा कधीं चुकत नाहीं. स्वतःच्या संरक्षणासाठीं युक्त काय आणि अयुक्त काय याचें ज्ञान पशूला उपजतबुद्धीनें होतें; आणि हें ज्ञान चुकीचें असतें असें बहुधा कधींच आढळून येत नाहीं. पशु अरण्यांत चरत असला, तरी त्याला विषारी वनस्पति कोणती आणि खाण्यासारखी कोणती याचें ज्ञान उपजतबुद्धीनें होतें. याप्रमाणें उपजतबुद्धि फारशा चुका करीत नसली, तरी तिचें क्षेत्र अत्यंत मर्यादित आहे हेंही विसरतां कामा नये. ती ठराविक मर्यादेचें उल्लंघन करूं शकत नाहीं, यामुळें पशूचे व्यवहारही अत्यंत मर्यादित असतात; म्हणजे त्याची सारी हालचाल निर्जीव यंत्राप्रमाणें चालते असें म्हणावयास हरकत नाहीं. यानंतरच्या स्थितींत ज्ञानाची अधिक उच्च दशा आढळून येते. या दशेंतील बुद्धि अधिक उच्च दर्जाची असते ही गोष्ट खरी; तथापि तिच्या हातून चुकाही अधिक होतात हें लक्ष्यांत ठेवलें पाहिजे. तिचें क्षेत्र अधिक विस्तृत असतें, आणि तिच्या कार्यक्षमतेच्या वाढीचें प्रमाणही अल्प असतें. हिला आपण विवेचकबुद्धि (Reason) या नांवानें ओळखतों. विचाराक्षमबुद्धीचें--उपजतबुद्धीचें--क्षेत्र मर्यादित पण तिचें कार्य अचूक असतें; आणि विवेचकबुद्धीचें क्षेत्र विस्तृत पण तिच्या हातून चुकाही अधिक होतात. बुद्धीच्या या दोन प्रकारांहून निराळा असा आणखी तिसराही एक प्रकार आहे. . हा प्रकार फक्त योग्यांच्या ठिकाणीं आढळून येतो. हिला आपण विचारातीतबुद्धि (Super-consciousness) असें नांव देऊं. बुद्धीची ही स्थिति अभ्यासानें योगी आपल्या ठिकाणीं आणतात. उपजतबुद्धि ज्याप्रमाणें कधीं चुका करीत

नाहीं, त्याचप्रमाणें विचारातीतबुद्धिही कधीं चुकत नाहीं. किंबहुना या बाबतींत विचारातीतबुद्धि उपजतबुद्धीहून अधिक अचूक आहे, आणि तिचें क्षेत्र विवेचकबुद्धीच्या क्षेत्राहून अधिक विस्तृत आहे; इतकें कीं त्या क्षेत्राला मर्यादा नाहीं. विचारातीतबुद्धि ही बुद्धीची अत्युच्च स्थिति आहे. ज्याप्रमाणें महत्तत्त्वाचीं हीं तीन रूपें एका मनुष्यांत—पिंडांत—दृग्गोचर होतात, त्याचप्रमाणें या तत्त्वाचीं हीं तीन रूपें ब्रह्मांडांतही भरून राहिलीं आहेत.

आतां येथें एका नाजुक प्रश्नाचा विचार आपणांस करावयाचा आहे. सर्व दृष्टींनीं परिपूर्ण अशा परमेश्वरानें जर हें विश्व निर्माण केलें आहे, तर त्यांत अपूर्णता कां आढळते ? असा प्रश्न वारंवार पुढें येत असतो; याकरितां त्याचा विचार करणें अवश्य आहे. अस्तित्वाचा जो लहानसा भाग आपल्या विवेचकबुद्धीच्या आटोक्यांत येतो, त्याला आपण विश्व या संज्ञेनें ओळखतों. आपली दृष्टि जितक्या लांबवर आपणांस पोहोंचवितां येते अथवा आपल्या विवेचकबुद्धीला आटोकाट ताण देऊन तिच्या द्वारा ज्याबद्दल आपणांस कांहीं कल्पना करतां येते, त्यांतच आपल्या विश्वाचा अंतर्भाव होतो. या मर्यादेच्या बाहेर काय आहे याचा शोध आपणांस लागत नाहीं. विश्वाचा विस्तार कितीही मोठा झाला तरी त्याला आपल्या बुद्धीची मर्यादा आहे हें लक्ष्यांत आणलें म्हणजे वरीलसारखा प्रश्नच उपस्थित करतां येत नाहीं असें आपणांस आढळून येईल. एखाद्या मोठ्या वस्तूचा एखादा लहानसा तुकडा आपण हातीं घेतला तर तो अपूर्ण दिसावा हें रास्तच आहे. हें विश्व अपूर्ण आहे असें आपणांस वाटतें. याचें कारण आपण त्याच्या ठिकाणीं अपूर्णत्वाचा मिथ्यारोप करतों हेंच होय. आपला हा आरोप मिथ्या कसा आहे तें आतां पाहूं. विवेचकबुद्धीचें स्वरूप काय आहे ? आपण ज्याला ज्ञान असें नांव देतों त्या ज्ञानाचें स्वरूप तरी काय आहे ? ज्ञान म्हणजे सादृश्य अथवा साधर्म्य. आपण रस्त्यांत गेलों आणि समोर दोन पायांचा आणि डोकें वर करून चालणारा असा एक प्राणी पाहिला; त्या प्राण्याचें दर्शन झाल्याबरोबर तो ‘मनुष्य’ आहे, असें ज्ञान आपणांस होतें. आपण पूर्वी अनेक मनुष्यें पाहिलेलीं असतात आणि त्यांच्या प्रतिमा आपल्या मनःपटावर चित्रित झालेल्या असतात. ज्या वेळीं आपण तो प्राणी पाहिला, त्याच वेळीं त्याचें सादृश्य आपल्या चित्तांत असलेल्या कांहीं विशिष्ट प्रतिमांशीं आहे असें आपणांस आढ-

रून आलें, आणि त्या सादृश्यावर तो प्राणी 'मनुष्य' आहे असें आपण जाणलें. ज्या ज्या वेळीं बाह्यपदार्थांचें सादृश्य आपल्या अंतरंगांत आपणांस चटकन् सांपडतें, त्या त्या वेळीं तो पदार्थ अमुक असें ज्ञान आपणांस चटकन् होऊन आपलें समाधान ताबडतोब होतें. बाह्यप्रतिमांचें सादृश्य आपल्या अंतःकरणांत सांपडणें या स्थितीला ज्ञान होणें असें आपण म्हणतों. अनंत कालापासून अनंत संस्कार आणि अनंत प्रतिमा आपण आपल्या चित्तांत सांठवीत आलों आहों. चालू काळीं कोणतीही प्रतिमा आपणांसमोर आली म्हणजे तिचें सादृश्य आपण आपल्या चित्तांत शोधूं लागतों; व तें सांपडलें म्हणजे त्या बाह्यप्रतिमेचें ज्ञान आपणांस झालें असें आपण म्हणतों. ज्ञान होणें याचा खरा अर्थ, बाह्यवस्तूचें सादृश्य आपल्या चित्तांत शोधून काढणें इतकाच आहे. 'ज्ञान मिळविण्याची खटपट' या शब्दांचा शास्त्रीय अर्थ म्हटला म्हणजे 'स्वतःच्या चित्तांतील वस्तु शोधून काढणें हाच आहे. कांहीं युरोपीय पंडितांचें मत असें आहे कीं, मनुष्य जन्माला येतो तेव्हां त्याचें मन अगदीं कोरें असतें; पण हें म्हणणें बरोबर नाहीं; कारण, जर मनुष्याचें मन अगदीं कोरें असेल, तर त्याला कोणत्याही वस्तूचें ज्ञान होणें शक्य नाहीं. ज्ञान याचा अर्थ बाह्यवस्तूचें सादृष्य चित्तांतील भांडारांत शोधून काढणें असा आहे. ज्ञान बाहेरून कोठून येणारी वस्तु नाहीं. त्या अर्थीं अगदीं कोऱ्या मनाच्या मनुष्याला जगांतील कोणत्याच वस्तूचें ज्ञान होणें संभवत नाहीं. सादृष्य पाहण्याकरितां त्याच्या चित्तांत अनेक वस्तूंचा निधि अगोदरच असला पाहिजे. एखादें मूल अगदीं कोऱ्या मनानें जन्माला आलें अशी कल्पना केली, तर त्याला या जगांतील एकाही वस्तूचें ज्ञान करून घेणें अशक्य होईल. ज्ञान ही कांहीं हस्त्याहस्त्यांनीं प्राप्त करून घेण्याची चीज आहे असेंही नाहीं. याकरितां त्याच्याजवळ अनेकवस्तुसंग्रह अगोदरच सिद्ध असला पाहिजे हें सिद्ध होतें. ज्याप्रमाणें सृष्टि अनाद्यनंत आहे, त्याचप्रमाणें ज्ञानही अनाद्यनंत आहे. मनुष्याच्या जन्माबरोबर ज्ञान मिळविण्याचा आरंभ होतो असें नाहीं. हा सिद्धांत कबूल करण्यावांचून गत्यंतरच नाहीं. या सिद्धांतांत कोठेंहि पळवाट राहत नाहीं. ज्याप्रमाणें गणितशास्त्राचे सिद्धांत त्रिकालाबाधित असतात, व ज्याप्रमाणें ते कबूल केल्यावांचून गत्यंतर उरतच नाहीं, त्याचप्रमाणें हा सिद्धांतही कालस्थलातीत आहे. स्पेन्सर आणि दुसरे कांहीं पाश्चात्य

पंडित यांनांही ही गोष्ट बहुतांशीं पटली आहे. पूर्वज्ञानाचा सांठा अगोदर तयार असल्याशिवाय नवी ज्ञानप्राप्ति करून घेणें शक्य नाहीं; आणि याच-करितां मूल जन्माला येतें त्या वेळीं ज्ञाननिधि तें बरोबर घेऊन येतें असें त्यांचेंही मत आहे. कारण आणि कार्य हीं सदैव एकरूप असतात. कारणाचे धर्म आणि कार्याचे धर्म यांत गुणमूलक फरक कधींही असत नाहीं. अदृश्य अथवा सूक्ष्म स्थितींतील पदार्थाचें रूपांतर होऊन तो व्यक्त अथवा स्थूल झाला म्हणजे पहिल्याला कारण आणि दुसऱ्याला कार्य अशीं नांवें आपण देतों. नांवें निराळीं झालीं तरी त्यामुळें त्यांच्यांतील धर्मांत कांहीं बदल होतो असें नाहीं. हा सिद्धांत स्पेन्सर व तदनुयायी इतर पंडित यांनीं कबूल केला आहे. आतां पाश्चात्य पंडितांच्या व आमच्या प्राचीन आर्यतत्त्वज्ञांच्या मतांत जो फरक उरला आहे तो इतकाच कीं, मूल जन्माला येतांना जे पूर्वानुभव तें बरोबर घेऊन येतें ते अनुभव त्याला आनुवंशिक संस्कारांनीं प्राप्त झालेले असतात असें पाश्चात्य पंडितांचें मत आहे. ते त्याचे स्वतःचे पूर्वानुभव नसून, त्याच्या आजापणजाला जे अनुभव प्राप्त झालेले असतात तेच परंपरेनें मुलापर्यंत उतरतात, असें त्यांचें म्हणणें आहे; पण हें त्यांचें म्हणणें चुकीचें आहे असें निःसंशयपणें ठरण्याची वेळ लवकरच येईल; किंबहुना या आनुवंशिक संस्कारांच्या उपपत्तीवर निकराचे हल्ले आजच त्यांपैकीं कित्येक करूं लागले आहेत. आनुवंशिक संस्कारांची उपपत्ति ठीक आहे; पण ती अपुरी आहे; आजा-पणजाचे संस्कार मुलापर्यंत येतात ही गोष्ट खरी; पण ती कायिक संस्कारांस मात्र लागू आहे. देहरचनेचें विशिष्टत्व, पणजाकडून आजाकडे, आजाकडून बापाकडे व बापाकडून मुलाकडे याप्रमाणें परंपरेनें प्राप्त होतें ही गोष्ट खरी आहे; पण ही परंपरा मानसिक संस्कारांस मात्र लागू पडत नाहीं. मनुष्याची वर्तणूक त्याच्या आजूबाजूच्या परिस्थितीला धरून असते असें आपण नित्य पाहतों. त्याच्या दानतींतील विशिष्ट संस्कार परिस्थित्यनुरूप जागृत झालेले असतात असा आपणांस नित्य अनुभव येतो. जर त्याची दानत त्याला आनु-वंशिक संस्कारांस अनुसरून प्राप्त झाली असेल, तर तिच्यांत परिस्थितीला अनुसरून फेरबदल कां व्हावा? मुलाच्या दानतींत फक्त त्याच्या आजा-पणजाचेच विशेष गुण कां दिसत नाहींत? अनेक प्रकारच्या कारणांचे परि-णाम मनुष्याच्या दानतीवर घडत असतात; व त्यांपैकींच परिस्थिति हेंही

एक मोठें कारण आहे. आमच्या प्राचीन आर्यतत्त्ववेत्त्यांचें म्हणणें असें आहे कीं, आपल्याभोंवतीं जी कांहीं परिस्थिति असते ती आपणच निर्माण केलेली आहे. आपल्या स्वतःच्या पूर्वसंस्कारांस अनुसरून ही परिस्थिति बनलेली आहे. थोडक्यांत इतकेंच सांगावयाचें कीं, आपल्या परिस्थितीशीं अथवा दानतीशीं दुसऱ्यांच्या संस्कारांचा यत्किंचित्‌ही संबंध नसून ती आपल्याच संस्कारानुरूप झालेली आहे.

ज्ञान या शब्दाचा शास्त्रीय दृष्टया काय अर्थ आहे हें आतां आपल्या लक्ष्यांत आलेंच असेल. पूर्वानुभवाशीं नवा अनुभव ताडून पाहणें या क्रियेला ज्ञान अशी संज्ञा आहे. नवी प्रतिमा जुन्या प्रतिमांशीं ताडून पाहण्याची आपली क्रिया सदैव चालू असते; नवीचें साम्य जुन्याशीं आढळून आलें म्हणजे नव्या प्रतिमेची ओळख आपणांस पटली असें होतें. नव्या प्रतिमेची अगर अनुभवाची ओळख जुन्यांच्या द्वारें पटणें याचेंच नांव ज्ञान. ज्ञान या शब्दाला याहून अधिक अर्थ नाहीं. असें असेल तर एका प्रतिमेचें पूर्ण ज्ञान करून घेण्यासाठीं तिच्याच जातीच्या दुसऱ्या अनेक प्रतिमांशीं ती ताडून पाहावयास नको काय? असें करणें हें अवश्यच आहे; कारण, तसें न केलें तर आपलें पूर्ण समाधान व्हावयाचें नाहीं. आपण असें समजूं कीं, एक गोटी आपल्या अवलोकनांत आली; आतां तिचें सांगोपांग ज्ञान आपणांस करून घ्यावयाचें असेल, तर आपल्या चित्तांतील अनेक गोट्यांच्या मालिकेशीं ती आपण ताडून पाहतों; त्यांच्याशीं असलेलें तिचें साम्य अथवा वैषम्य यांचा विचार आपण करतों; आणि शेवटीं ती वस्तु अमुक अशी आपली खात्री झाली म्हणजे आपलें समाधान होतें. रोजच्या संवयीमुळें हे निरनिराळे दुवे आपल्या लक्ष्यांत येत नाहींत; पण ही सारी क्रिया प्रत्येक वेळीं याप्रमाणेंच घडत असते.

आतां आपण आपल्या पूर्वीच्या प्रश्नाकडे वळूं. विश्वांत अपूर्णता कां आढळते याच्या शोधार्थ आपण निघालों होतों, हें आपणांस आठवत असेलच. आपण विश्वाबद्दल विचार करूं लागलों असतां तें अनेक प्रकारें अपूर्ण आहे असें आपणांस वाटत असतें. याचें कारण असें कीं, या विचाराला सुरवात झाली म्हणजे विश्वाचें व्यक्तरूप तेवढेंच आपल्या मनश्चक्षूंपुढें दिसूं लागतें. त्याचें अगोदरचें अथवा नंतरचें रूप आपल्या ध्यानांत येत नाहीं; यामुळें त्याच्याशीं

ताडून पाहण्यास, त्याच्या जातीचा कोणताच पदार्थ आपल्या चित्तांत तयार नसतो. यामुळें विश्व म्हणजे एक मोठें कोडें आहे असें आपणांस वाटत असतें. कारण, ज्ञान म्हणजे ताडून पाहण्याची क्रिया. ही क्रिया संपादण्यास विश्वाच्या जातीचे अनेक पदार्थ आपल्या मनांत तयार असावयास पाहिजेत; पण तसें नसल्यामुळें आपल्या विवेचकबुद्धीचीही गडबड उडते व ती अगदीं गांगरून जाते यांत नवल काय? विश्वाच्या एखाद्या भागाकडे—जगाकडे—पाहून त्याचें ज्ञान करून घ्यावयाचें असा विचार उद्भूत झाल्याबरोबर आपली विवेचकबुद्धि पुढें सरसावून, त्याच्याशीं साम्य असलेले पदार्थ चित्तांत कोठें आहेत याचा शोध करूं लागते; आणि तसे पदार्थ तिला सांपडले नाहींत म्हणजे तिची तारांबळ उडते व ती अधिकाअधिक धांवाधांव करूं लागते. बुद्धीच्या अशा स्थितींत जग दुष्ट आहे, वाईट आहे, भयप्रद आहे, असें आपण म्हणूं लागतों. जग चांगलें आहे असेंही आपण केव्हां केव्हां म्हणतों; तथापि एकंदरीनें तें अपूर्ण आहे अशी आपली खात्री असते. विश्वाशीं सदृश असे पदार्थ आपल्या चित्तांत आपणांस सांपडले, तर विश्वाचें समाधानकारक ज्ञान आपणांस करून घेतां येईल. ही स्थिति प्राप्त करून घेणें असेल, तर आपणांस विश्वाच्या बाहेर गेलें पाहिजे. त्याचप्रमाणें या लहानशा देहांत भासमान होणाऱ्या अहंकारापलीकडेही आपणांस गेलें पाहिजे. हीं दोन्ही मार्गें टाकून ज्या वेळीं आपण पलीकडे जाऊं, त्याच वेळीं या विश्वाच्या कोड्याचा उलगडा आपणांस होईल. विश्वानें घालून दिलेल्या मर्यादेबाहेर आणि या क्षुद्र अहंकारापलीकडे जाण्याची विद्या साध्य होईपर्यंत या कोड्याचा उलगडा होणें नाहीं. तोंपर्यंत बाकीच्या कितीहि खटपटी आपण केल्या तरी त्या व्यर्थ होतील. ज्ञान म्हणजे चित्तांतील सदृश वस्तूंशीं साम्य सांपडणें हेंच. आपल्या देहांत प्रत्ययास येणारें अहंकारी चैतन्य हा महत्तत्त्वाचा एक स्फुलिंगमात्र आहे. अशा स्थितींत विश्वाचा एखादा लहानसा भाग मात्र तद्द्वारा आपल्या प्रत्ययाला येतो. त्याचप्रमाणें ज्यांतून हें सारें विश्व उदित झालें आहे, तें महत्तत्त्व अथवा सामान्य भाषेंत ज्याला आपण परमेश्वर या नांवानें ओळखतों, त्याचेंही ज्ञान सध्याच्या स्थितींत सामर्थ्येंकरून आपणांस होत नाहीं. आपल्या साऱ्या खटपटीनें त्याची जी कांहीं प्रतिमा आपण पहातों ती अगदीं अपुऱ्या स्वरूपाची असते. मनुष्यप्राणी म्हटला म्हणजे तो मर्यादित

असावयाचाच; आणि तो तसा असल्यामुळें त्यांत पडणारें प्रतिबिंबही आपोआपच मर्यादित होतें. महत्तत्त्वाची एखादी ठिणगी मात्र तेथें व्यक्त होते, आणि बाकीचा अनंत विस्तार बाहेर राहतो. भगवान् श्रीकृष्ण म्हणतात, "**विष्टभ्याहमिदं कृत्स्नं एकांशेन स्थितो जगत्** । ( गीता १०. ४२ ) मी इतका मोठा आहें कीं, हें सारें विश्व माझा एक अंशमात्र आहे." आपणांस परमेश्वर अपूर्णसा कां वाटतो याचें कारण आतां आपल्या लक्ष्यांत पूर्णपणें आलें असेल. आपण स्वतःच्या अपूर्णत्वाचा आरोप त्याजवर करीत असतों. आणि आपल्या सध्याच्या स्थितींत त्याचें वास्तविक ज्ञान आपणांस होणें ही गोष्टच अशक्य आहे. त्याचें ज्ञान आपणांस करून घ्यावयाचें असेल, तर विवेचकबुद्धीनें आणि क्षुद्र अहंकारानें आंखून दिलेल्या मर्यादेचें उल्लंघन करून जाण्याशिवाय दुसरा एकही मार्ग आपणांस मोकळा नाहीं. "**यदा ते मोहकलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यति । तदा गंतासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्यच** ।" (गीता २. ५२. ), "**त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन । निर्द्वंद्वो नित्यसत्त्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान्** ॥" ( गीता २. ४५ ). इत्यादि श्रुतिवचनें हेंच आपणांस पुनःपुनः सांगत आहेत. विचार जेथून उद्भवतात त्यापलीकडील प्रदेशांत प्रवेश केल्यावांचून विश्वाचें खरें ज्ञान आपणांस होणार नाहीं. शास्त्रांचें काम म्हटलें म्हणजे, त्रिगुणात्मक प्रकृतीनें उत्पन्न केलेल्या विश्वाचें ज्ञान सांगावयाचें इतकेंच आहे. तीं आपणांस त्रिगुणांपलीकडे नेऊं शकत नाहींत; तीं आपणांस गुणातीत करूं शकत नाहींत आणि आपण गुणातीत झालों तरच विश्वांत सर्वत्र एकात्मभाव आहे हें आपणांस समजेल.

आतांपर्यंत केलेल्या विवेचनावरून पिंड आणि ब्रह्मांड यांची रचना एकाच प्रकारें झाली असल्याचें दिसून येईल. त्याचप्रमाणें पिंडरचनेंतील एक लहानसा विशिष्ट अंश मात्र आपल्या जाणिवेंत येतो, हेंही आपल्या लक्ष्यांत आलेंच असेल. विचाराक्षमस्थिति अथवा विचारातीतस्थिति यांजबद्दल आपणांस कांहींच जाणीव होत नाहीं. जींत अहंकारजागृति असते अशा स्थितीची मात्र ओळख आपणांस आहे. 'मी पापी आहें' असें एखादा मनुष्य म्हणाला, तर हें त्याचें म्हणणें निवळ मूर्खपणाचें नाहीं काय ? ज्याला स्वतःची पूर्ण ओळख झाली नाहीं, त्यानें स्वतःबद्दल 'मी अमुक आहें' असें म्हणावें हें मूर्खत्व नव्हे तर काय ? स्वतःबद्दलचें संपूर्ण ज्ञान त्याला झालेलें नाहीं. स्वतांतील फक्त

एकाच भागाची माहिती त्याला आहे. त्याच्या मनोभूमिकेपैकीं फक्त एकाच भागाचें ज्ञान त्याला होतें. हीच स्थिति विश्वालाही लागू आहे. विवेचक-बुद्धीचा आधार घेऊन आपण विश्वाच्या शोधाला निघालों, तर त्याच्या फक्त एकाच स्थितीचा शोध आपणांस लागेल; पण प्रकृतीची मर्यादा या एकाच भागांत संपते असें नाहीं. विचाराक्षमस्थिति, विचारातीतस्थिति आणि विचार-वतीस्थिति या तिहींचाही अंतर्भाव प्रकृतीच्या सीमेंतच आहे. त्याचप्रमाणें पिंडांत व्यक्त झालेला महत्तत्त्वाचा अंश, ब्रह्मांडांत प्रकट झालेलें महत्तत्त्व, व त्यानंतर त्या तत्त्वांत घडून आलेल्या फेरफारामुळें बनलेले अनेक पदार्थ, या सर्वांचा अंनर्भाव प्रकृतींतच झालेला आहे.

आतां प्रकृतींत उत्क्रांति आणि प्रतिक्रांति या कशा उत्पन्न होतात याचा विचार करणें अवश्य आहे. आतांपर्यंत केलेल्या विवेचनावरून प्रकृति ही स्वभावतःच जड आहे ही गोष्ट आपल्या लक्ष्यांत आली असेल. प्रकृति नियमबद्ध, मिश्रस्वरूप व जड आहे. मन, बुद्धि आणि इच्छा हीं सारीं जड-स्वभाव आहेत. असें असतांही त्यांत चैतन्य दिसतें तें कोठलें? या सर्वां-पलीकडे असलेला, व ज्याला पुरुष असें नांव सांख्यशास्त्रांत दिलें आहे, त्याच्या चैतन्याचें हें सारें प्रतिबिंब आहे; जडपदार्थांतील चैतन्य हें पुरुषाचें प्रतिबिंब मात्र आहे. प्रकृतींत जे अनेक फेरफार—उत्क्रांति, प्रतिक्रांति इत्यादि—घडत आहेत त्या सर्वांचें कारण हा पुरुष आहे; तथापि कांहीं विशिष्ट हेतूनें तो हें सारें घडवून आणीत आहें असें मात्र समजूं नये. पुरुष निर्हेतुक आहे; तथापि पुरुषाच्या साहाय्यावांचून एकटी प्रकृति जड आहे हेंही विसरतां कामा नये. या दृष्टीनें विचार केला म्हणजे पुरुष हाच विश्वनियंता व परमे-श्वर आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. ‘परमेश्वराला इच्छा झाली आणि त्यानें सृष्टि निर्माण केली’ असेंही कोणीकोणी म्हणतात. सामान्य व्याव-हारिक दृष्टीनें हें म्हणणें वावगें आहे असें नाहीं. पण व्यवहारापलीकडे पाहाव-याचें म्हटलें म्हणजे, हें म्हणणें अशास्त्र आहे असें कबूल करणें भाग पडतें. इच्छा ही प्रकृतीपासून तिसरी किंवा चौथी पायरी आहे. इच्छा उत्पन्न होण्या-पूर्वीच दुसरे दोनतीन पदार्थ निर्माण झाले आहेत. ज़र इच्छेमुळें हें सर्व विश्व निर्माण झालें असें म्हणावयाचें, तर तिच्या अगोदरचे दोनतीन पदार्थ कोणीं निर्माण केले? इच्छा हें शुद्धरूप नसून मिश्ररूप आहे; आणि प्रत्येक

मिश्ररूप प्रकृतीपासून निर्माण झालेलें आहे. इच्छेमुळें प्रकृति निर्माण झालेली नाहीं. याकरितां परमेश्वराच्या इच्छेनें विश्व निर्माण झालें हें म्हणणें तर्कशास्त्राला संमत नाहीं. केवळ पिंडापुरता विचार केला, तर इच्छा हा अहंकाराचा एक लहानसा भाग आहे असें आपल्या लक्ष्यांत येईल. इच्छेमुळें आपल्या मेंदूंत चलनवलन उत्पन्न होतें असें कित्येक म्हणतात; पण हें म्हणणेंही चुकीचें आहे. तसें असतें तर आपल्या इच्छेप्रमाणें मेंदूची क्रिया आपणांस बंद करतां आली असती. ती तशी बंद करतां येत नाहीं त्याअर्थी त्या क्रियेचें इच्छा हें कारण असणें संभवत नाहीं. आपलें हृदय उडविण्याची क्रिया कोण करतो ? ती क्रियाही इच्छेमुळें उद्भवलेली नाहीं; कारण तसें असतें तर आपलें हृदयही आपणांस आपल्या इच्छेप्रमाणें थांबवितां आलें असतें. केवळ आपल्या इच्छेमुळें आपल्या शरीरांतील हालचाली होतात असें नाहीं. आपल्या शरीरांत अनेक हालचाली सुरू ठेवणारी जी कांहीं शक्ति आहे, तिच्या अनेक अंगांपैकीं इच्छा हेंही एक अंग आहे. आपल्या शरिराला चलनवलन देणारी शक्ति प्रकट होण्याचीं जीं अनेक द्वारें आहेत, त्यांपैकीं इच्छा हेंही एक द्वार आहे. ज्याप्रमाणें पिंडांत इच्छेचा वास आहे, त्याचप्रमाणें ब्रह्मांडांतही इच्छेचा वास आहे; पण ती इच्छा म्हणजे ब्रह्मांडाच्या अनेक अंगांपैकीं एक अंग मात्र आहे. इच्छेनें हें सारें विश्व नियंत्रित होत नाहीं. यामुळें इच्छेच्या उपपत्तीनें विश्वाच्या कोड्याचा उलगडा होणें शक्य नाहीं. माझ्या इच्छेनें माझा देह चालतो असें आपण समजूं. अशा वेळीं माझ्या देहांत जर कोठें कमी अधिकपणा झाला, तर तो माझाच अपराध नव्हे काय ? अशा वेळीं जर मी अकांडतांडव करूं लागलों तर तसें करणें आपण न्याय्य म्हणाल काय ? त्याचप्रमाणें केवळ इच्छेमुळेंच विश्व निर्माण झालें, आणि तें इच्छेनेंच चाललें आहे असें म्हटलें, तर त्यांतील कमी अधिकपणाबद्दल तक्रार करावयाला जागा कोठें राहिली ? किंबहुना त्यांत कमी अधिकपणा पाहणें हा माझाच अपराध नव्हे काय ? इच्छा हें पुरुषाचें रूप नव्हे, अथवा बुद्धि हेंही त्याचें रूप नव्हे; कारण, बुद्धि हें मिश्ररूप आहे. बुद्धि ही जडपदार्थाच्या संयोगावांचून उत्पन्न होऊं शकत नाहीं. पिंडांतील हा जडपदार्थ म्हणजे मेंदू हाच होय. ज्या ज्या ठिकाणीं कोणत्याना कोणत्या रूपानें बुद्धि उत्पन्न झाल्याचें आढळून येतें, तेथें जडपदार्थ असलाच पाहिजे. या दोहींची संलग्नावस्थाच नेहमीं आढळून येईल. असें असतां पुरुष हा बुद्धिरूप होईल हें

मानणें अशास्त्र आहे. तर मग पुरुषाचें स्वरूप तरी काय? इच्छा अथवा बुद्धि हें पुरुषाचें रूप नव्हे; तरी या दोन्ही रूपांचें कारण पुरुषच आहे हें मात्र खरें. पुरुषाचें अस्तित्व आहे, म्हणूनच निष्पंदावस्थेंत स्पंदांची उत्पत्ति होते, आणि त्यामुळेंच मिश्रणेंही बनतात. रासायनिक क्रियेंत कित्येक वस्तु मोठ्या चमत्कारिक स्वरूपाच्या असतात. उदाहरणार्थ, पोट्याश सायनाईड हा पदार्थ घ्या. सोन्याच्या खाणींतील मातीला आंच देऊन यांतून रासायनिक क्रियेनें सोनें काढतात, त्या वेळीं भट्टींत पोट्याश सायूनाईड या पदार्थाचा उपयोग करावा लागतो. भट्टी निवून गेल्यावर शुद्ध सोनें बाहेर पडतें, आणि त्याबरोबरच पोट्याश सायूनाईड अगदीं जसेंच्यातसेंच बाहेर पडतें. भट्टींत असतां त्याजवर दुसऱ्या कोणत्याही पदार्थाची क्रिया घडल्याचें आढळून येत नाहीं, अथवा त्याचीही क्रिया दुसऱ्या पदार्थावर घडल्याचें उघडकीस येत नाहीं; पण असें असलें तरी त्याच्या साहाय्यावांचून भट्टीही नीट उतरत नाहीं असाही अनुभव येतो. भट्टी बरोबर उतरण्यास तें आवश्यकच आहे; पण अशा स्थितींत तें अक्रियही आहे. पुरुषाचें स्वरूप अशाच प्रकारचें आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. पुरुष प्रकृतीशीं एकरूप होत नाहीं. तसेंच तो महत् अथवा बुद्धि हीं रूपेंही धारण करीत नाहीं. तो पूर्ण आणि शुद्ध असा आहे. "**मयाध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम् । हेतुनानेव कौंतेय जगद्विपरिवर्तते ॥** ( गीता ९–१० ). पुरुष केवळ साक्षीरूप आहे. त्याच्या साक्षित्वानें प्रकृति सर्व कांहीं निर्माण करते. चर अथवा अचर पदार्थ हे सर्व प्रकृतीपासून पुरुषाच्या साक्षित्वामुळें निर्माण झाले आहेत."

प्रकृति स्वतः जर जड आहे, तर तिच्या ठिकाणीं चैतन्य कोठून येतें? चैतन्य हा पुरुषाचा भाग आहे. पुरुष केवळ चैतन्यरूप आहे. केवळ चैतन्यस्वरूप असणें हाच पुरुषाचा धर्म आहे. पुरुष हा वाचेच्या पलीकडचा आहे. तो अमुक, असें त्याजविषयीं सांगतां येत नाहीं. तसेंच तो जाणतांही येत नाहीं. तो स्वतः ज्ञानरूप आहे. ज्ञेय म्हटलें म्हणजे तें बुद्धीच्या आटोक्यांत येतें. पुरुष बुद्धीच्या पलीकडचा असल्यामुळें तो ज्ञेय होऊं शकत नाहीं. त्याचप्रमाणें पुरुष हा अहंकारस्वरूपही नाहीं. कारण, अहंकार हेंही मिश्ररूप आहे. अहंकारांतही जडवस्तु आणि चैतन्य यांचें मिश्रण असतें. त्यांत परावर्तित झालेलें जें चैतन्य, तो पुरुषाचा भाग आहे. पुरुष चैतन्यस्वरूप

आहे; पण तो बुद्धि नव्हे अथवा तो जाणतो असेंही म्हणतां येत नाहीं; कारण, जाणणें हासुद्धां विकारच आहे; यासाठीं तो जाणतचही नाहीं; तथापि ज्ञान होणें ही क्रिया घडावयास कारण तोच आहे. पुरुषांतील चित् आणि प्रकृति यांच्या मिश्रणानें बुद्धि आणि अहंकार हीं बनलीं आहेत: विश्वांतील आनंद आणि ज्ञान हीं पुरुषाचींच आहेत; तथापि आनंद आणि ज्ञान या भावनाही मिश्ररूप आहेत. प्रकृति आणि पुरुष यांच्या संयोगापसूनच त्यांची उत्पत्ति झाली आहे. “**परम आनन्द एतस्यैवानन्दस्यान्यानि भूतानि मात्रामुपजीवंति ।** ( बृहदारण्यकोपनिषत् ४. ३. ३२ ) तो परमानंदरूप आहे. विश्वांत जेथें जेथें आनंद–सुख–आढळून येतें, त्या त्या ठिकाणीं तो आनंदरूप पुरुषाचा स्फुलिंग आहे असें समजावें. या विश्वांतील सर्व वस्तूंचें लक्ष्य पुरुष हाच आहे. सर्व विश्व त्याकडेच धांव घेत आहे. विश्व त्याला स्पर्श करूं शकत नाहीं अथवा त्याजवर कांहीं परिणामही करूं शकत नाहीं; तथापि सर्व विश्वाचें साध्य–सर्व विश्वाच्या आवडीचा पदार्थ–तोच आहे. एखाद्या मनुष्याला सोन्याचें वेड असतें. वाटेल त्या रीतीनें सोनें मिळवावें, त्याचा संग्रह करावा, आणि त्याच्या दर्शनानें सुख पावावें, असें एखाद्याला वाटत असतें. याचें कारण इतकेंच कीं, त्या सोन्याच्या ठिकाणीं जें पुरुषाचें तेज वास करीत आहे, त्या तेजाचें वेड त्याला लागलेलें असतें; परंतु तें त्याचें त्यालाच कळत नसतें. कांहीं माणसें मुलांसाठीं वेडीं झालेलीं आढळतात. मूल नाहीं म्हणून सर्व जग त्यांना तुच्छ वाटत असतें. एखादी स्त्री प्रेमी मनुष्यासाठीं वेडी होते. अशा ठिकाणींसुद्धां तोच पुरुष या प्रेमाच्या पदार्थांच्या मागें असतो. जेथें पुरुषाची व्याप्ति नाहीं असें एकही ठिकाण या विश्वांत नाहीं. बाह्यतः अत्यंत जड म्हणून वाटणाऱ्या प्रत्येक पदार्थांतही त्याचा वास आहे. आपली दृष्टि सूक्ष्म नसल्यामुळें बाह्यजडांशांतच ती गुंतून राहते; आणि यामुळेंच पुरुषदर्शन आपणांस होत नाहीं. “**नित्योऽनित्यानां चेतनश्चेतनानाम् ।**” ( कठोपनिषत् ५. १३ ). असें त्याचें स्वरूप आहे. जडविश्वांतील चेतन तो आहे. सांख्यशास्त्रानें पुरुषाचें वर्णन या प्रकारें केलें आहे. या वर्णनाप्रमाणें पाहतां पुरुष सर्वव्यापी असला पाहिजे असें उघड अनुमान होतें. कारण, जें सर्वव्यापी नाहीं तें समर्याद असलेंच पाहिजे. प्रत्येक समर्याद पदार्थ कारणापासून उत्पन्न झालेला असतो. तो कार्यरूप असतो; आणि

जो पदार्थ कार्य असेल–कोणत्या कारणामुळें ज्याला अस्तित्व आलें असेल, अशा पदार्थाला आदि आणि अंत हीं अवश्यमेव असलींच पाहिजेत. ज्याला म्हणून जन्म आहे त्याला मृत्यु नेमलेलाच आहे; “**जातस्य हि ध्रुवो मृत्युः**” ( गी. २. १७ ) असा सिद्धांत आहे. जर पुरुष समर्याद असेल तर त्यालाही मृत्यु अवश्य गांठीलच. तो अंतिम हेतु होऊं शकणार नाहीं; तसेंच तो स्वतंत्रही असूं शकणार नाहीं. तो कारणाचें कार्य होईल. कारणामुळें त्याची उत्पत्ति झाली असें होईल. तो अमर्याद असेल तरच सर्वव्यापी होऊं शकेल; श्रीकपिलांच्या मतें असे पुरुष विश्वांत अनेक आहेत. पुरुष एक असून त्यांची संख्या अमर्याद आहे. प्रत्येक जीवांत व्यक्त होणारा पुरुष निर-निराळा आहे. तुमच्यापैकीं प्रत्येकांत आणि माझ्यांतही एक एक पुरुष आहे. याप्रमाणें अनंत चक्रें असून त्यांपैकीं प्रत्येक चक्र अनंत आहे असें सांख्यमत आहे. अशा अनंत चक्रांचेंच हें विश्व बनलें आहे. पुरुष जन्म घेत नाहीं अथवा त्याला मृत्युही नाहीं. तो मनःस्वरूप नाहीं अथवा जडरूपही नाहीं. त्याच्या प्रतिबिंबित स्वरूपाचें ज्ञान मात्र आपणांस होऊं शकतें. जर ती सर्व-व्यापी असेल तर तो जन्ममृत्यूंच्या पलीकडे असला पाहिजे हें म्हणणें योग्यच आहे. आपली छायाप्रकृति त्याजभोंवतीं पसरते; आणि जन्म व मृत्यु हीं त्या छायेचींच रूपें आहेत. पुरुष स्वतः अनंत आहे, येथपर्यंत श्रीकपिलांनीं सांगितलेली उपपत्ति अत्यंत आश्चर्यजनक आणि कौतुकास्पद आहे, यांत संशय नाहीं.

यापुढें याविरुद्ध जीं कांहीं मतें असतील त्यांचा विचार आपण करूं. येथ-पर्यंत श्रीकपिलांनीं केलेलें पृथक्करण सशास्त्र आणि पूर्ण आहे, आणि विश्वरच-नेची त्यांनीं सांगितलेली उपपत्ति अगदीं साधार असून तीविरुद्ध कांहीं प्रमाणें उभीं करतां येत नाहींत, असें आपल्या लक्ष्यांत येईल. प्रकृतीची उत्पत्ति कशी झाली असा आपला प्रश्न होता. त्याला श्रीकपिलांनीं उत्तर दिलें कीं प्रकृति निर्माण झालेली नाहीं. तिला आदि–आरंभ–असा केव्हांच नव्हता. त्याच-प्रमाणें पुरुषही अनादि असून सर्वव्यापी आहे आणि असे अनादि व सर्व-व्यापी पुरुष अनेक आहेत असेंही त्यांनीं सांगितलें. त्यांच्या या शेवटच्या सिद्धांताबद्दल मात्र आम्हांस आक्षेप घ्यावयाचा आहे. त्यांच्या या शेवटच्या उत्तराहून अधिक चांगलें–अधिक बुद्धिग्राह्य–उत्तर आपणांस शोधावयाचें आहे

तें उत्तर आपण शोधूं लागलों म्हणजे त्यांतच वेदान्ताचा पायाही आपणांस आढळून येईल. आम्हांला पहिली शंका अशी येते कीं, जगांत दोन अनंत पदार्थ एकत्र असूं शकतील काय? अझूनही आम्ही सर्वव्यापक सिद्धांता-पर्यंत पोहोंचलों नाहीं अशी शंका आम्हांला येते. यामुळेंच आमच्या सर्व शंकांचें पूर्ण निवारण झालें असें म्हणतां येत नाहीं. आमच्या या सर्व शंकांचें निवारण वेदान्ती कसें करतात, या भयंकर अडचणींतून ते सरळ मार्ग कसा काढतात व शेवटीं ते सर्वव्यापी सिद्धांताची स्थापना कशी करतात, याचा विचार आपण पुढें करूं. वेदान्ताचें साम्राज्य विश्वव्यापी असलें, तरी त्याचें सारें श्रेय श्रीकपिलांना देणेंच योग्य आहे. सर्व इमारत पुरी झाल्यानंतर वर रंग वगैरे देऊन ती पूर्ण करणें, याला कांहीं मोठ्या कुशलतेची आवश्यकता नाहीं.



## प्रकरण ३ रें

## सांख्य आणि अद्वैत

तुलनात्मक दृष्टीनें सांख्य व अद्वैत यांचा विचार सुरू करण्यापूर्वी सांख्य-मताचें थोडेंसें सिंहावलोकन करणें इष्ट आहे. असें करण्यानें सांख्यमतांत उणीव कोठें आहे, आणि वेदान्तानें ती कशी भरून काढिली आहे हें लक्ष्यांत येण्यास ठीक पडेल.

हें सर्व विश्व प्रकृतीमुळें व्यक्त झालेलें आहे असें सांख्यांचें मत असल्याचें तुमच्या लक्ष्यांत असेलच. केवळ स्थूल विश्वच प्रकृतीचें कार्य आहे असें नसून, विचार, इच्छा, बुद्धि, प्रेम, द्वेष, इत्यादि भावना आणि शब्दस्पर्शरसादि गुण हेही प्रकृतिनिर्मितच आहेत. या विश्वांत ज्याचा ज्याचा आपणांस कोणत्या तरी रूपानें प्रत्यय येतो, तें सारें प्रकृतीनें निर्माण केलेलें आहे. प्रकृति तीन मूलतत्त्वांची बनली आहे. त्यांना सत्त्व, रज आणि तम अशीं नांवें आहेत. हीं तीन मूलद्रव्यें असून यांतूनच सर्व विश्व व्यक्त होतें; आणि कल्पांत झाला म्हणजे हीं तीन मूलद्रव्यें साम्यावस्थेंत राहतात. विश्व पुन्हां प्रतीत होण्याची वेळ आली म्हणजे या साम्यावस्थेंत बिघाड होऊन, त्या तीन द्रव्यांत सर-मिसळ होऊं लागते; व या सरमिसळीमुळें विश्व दृश्यत्वाला येतें. प्रकृति व्यक्तदशेस येऊं लागली म्हणजे तिचें महत् हें रूप प्रथम प्रकट होतें. या महत्तत्त्वापासून अहंकार निर्माण होतो. अहंकाराच्या एका भागापासून मन निर्माण होतें. त्याचप्रमाणें अहंकाराच्या दुसऱ्या भागापासून इंद्रियें आणि तन्मात्रें निर्माण होतात, आणि या तन्मात्रांपासून स्थूलद्रव्यें निर्माण होतात. तन्मात्रांचें स्वरूप अत्यंत सूक्ष्म आहे; इतकें कीं, तीं पाहण्याचें अथवा त्यांचा आकार मापण्याचें साधन आपणांपाशीं नाहीं. या अत्यंत सूक्ष्म स्वरूपाच्या तन्मात्रांपासून स्थूल अणू निर्माण होतात. यांचें अस्तित्व आपणांस आपल्या इंद्रियांनीं जाणतां येतें. मन, बुद्धि आणि अहंकार, यांच्या समवायी रूपाला चित्त अशी संज्ञा आहे. या चित्तापासून प्राणशक्ति निर्माण होते. प्राण म्हणजे श्वासोच्छ्वास नव्हत हें अवश्य लक्ष्यांत ठेवलें पाहिजे. प्राण म्हणजे श्वासो-च्छ्वास असा दृढ समज पुष्कळांचा झालेला आहे. ही कल्पना तुम्ही आपल्या चित्तांतून प्रथम काढून टाका. प्राणशक्तीच्या आघाताच्या ज्या कांहीं क्रिया

विश्वांत चालू आहेत, त्यांपैकींच श्वासोच्छ्वास ही एक क्रिया आहे. त्याचप्रमाणें दुसऱ्याही कित्येक प्राणक्रिया आपल्या या देहांत प्रत्येक क्षणीं चालू आहेत. संदेश पोहोंचविण्याची व आपल्या सर्व शरिराची यथायोग्य हालचाल सुरू ठेवण्याची क्रिया ज्ञानतंतू करीत असतात. त्या ज्ञानतंतूंच्या अंगीं हें सामर्थ्य प्राणशक्तीमुळेंच आलेलें आहे. श्वासोच्छ्वास ही प्राणशक्तीच्या अनेक क्रियांपैकीं एक उघड दिसून येणारी क्रिया आहे. श्वासोच्छ्वास हे हवेमुळें होत नसून प्राणांमुळें होतात. ते हवेमुळें होत असते, तर मृत मनुष्यांतही श्वासोच्छ्वास चालू राहिला असता. प्राणाचा आघात हवेवर होऊन श्वासोच्छ्वास सुरू होतात. या क्रियेंत हवेचा आघात प्राणावर होत नसून प्राणाचा आघात हवेवर होतो असें समजावें. आपल्या शरिरांतील सर्व प्रकारचीं कार्यें करणारी मूलशक्ति प्राण हीच असून तिची क्रिया सर्व शरीरभर चालू आहे; व ह्या प्राणशक्तीचें नियमन मन आणि इंद्रियें हीं करीत असतात. येथवर ही सर्व उपपत्ति सुसंगत आहे. सांख्यशास्त्रानें सांगितलेली अंतःसृष्टीची रचना येथवर अगदीं स्पष्ट आणि सप्रमाण आहे. सांख्यशास्त्र हें प्राचीनतम शास्त्र आहे. अंतःसृष्टीची सप्रमाण चर्चा ज्यांत केली आहे असा हा पहिलाच ग्रंथ होय. ज्या वेळीं कोणत्याही प्रकारचीं सध्यासारखीं उपकरणें अस्तित्वांत नव्हतीं, त्या पुरातनकाळीं ही ग्रंथरचना झाली हें मनांत आलें म्हणजे अत्यंत आश्चर्य वाटतें ! जगांत जेथें जेथें कांहीं बुद्धिग्राह्य सिद्धांताची स्थापना करण्याचा यत्न आढळतो, तेथें तेथें श्रीकपिलांनीं थोडातरी हातभार लावल्याचें आढळून येईल. अंतःसृष्टीचा शोध लावणारा कोणीही पंडित असो, या शास्त्राचे आद्यप्रवर्तक जे कपिल महामुनि त्यांची थोडीफार मदत त्याला अवश्य लागतेच. अंतःसृष्टीचा प्रत्येक शोधक, श्रीकपिलांचा थोडाबहुत ऋणी आहेच.

येथवर सांगितलेले सांख्यसिद्धांत सुसंगत आणि आश्चर्यजनक आहेत हें कबूल करणें भागच आहे; तथापि सांख्यमत आम्हांस शेवटपर्यंत सारखेंच ग्राह्य मानतां येत नाहीं; व कांहीं बाबतींत त्याच्यापासून आमच्या विचारांची दिशा निराळी होते असें आपणांस पुढें आढळून येईल. श्रीकपिलांनीं सांगितलेल्या सिद्धांतांबद्दल आपण विचार करूं लागलों म्हणजे एक गोष्ट विशेषेंकरून आपल्या लक्ष्यांत येते ती ही कीं, श्रीकपिलांच्या एकंदर विचारसरणींत 'उत्क्रांति' हीच मूळ कल्पना आढळून येते. त्यांच्या साऱ्या इमारतीचा पाया

उत्क्रांति हाच होय. एकांतून दुसरें आणि दुसऱ्यांतून तिसरें, याप्रमाणें सर्व सृष्टींतील तत्त्वें उत्क्रांत झालीं आहेत, असें श्रीकपिलांचें म्हणणें आहे. "**कारणमस्त्यव्यक्तं प्रवर्तते त्रिगुणतः समुदायाच्च । परिणामतः सलिलवत् प्रतिपत्तिगुणाश्रयविशेषात् ॥**" कारणच कार्यरूपानें अवतरतें–व्यक्त होतें–असा श्रीकपिलांचा आदिसिद्धांत आहे. कारण प्रथम अव्यक्त असतें आणि तेंच गुणांच्या आश्रयानें कार्यरूप धारण करितें. कारण आणि कार्य यांत गुणधर्मांचा भेद नाहीं. त्यांतील भेद म्हटला म्हणजे एक अव्यक्त आणि दुसरें व्यक्त असतें इतकाच. विश्वाचें जें कांहीं स्वरूप आपण पाहतों, तें सारें अशाच रीतीनें पायरीपायरीनें प्रकट झालें आहे. हें सारें विश्व ज्यांतून उत्क्रांत झालें, तें मूळ कारण प्रकृति हेंच होय. आणि ज्या अर्थी कारण व कार्य यांचा गुणधर्मांत भेद नसतो असा सिद्धांत आहे, त्या अर्थी प्रकृति आणि विश्व यांच्या स्वरूपांतही वास्तविक भेद नसावा हें युक्तच आहे. प्रकृति आणि विश्व यांच्या स्वरूपांत जो कांहीं भेद असतो तो इतकाच कीं, प्रकृति अमर्याद असते आणि विश्व व्यक्त झालें म्हणजे नामरूपादि उपाधींनीं तें मर्यादित होतें. प्रकृति–कारणरूप–नामरूपादि उपाधींच्या पलीकडची–निराकार–आहे; तथापि अव्यक्त प्रकृतीपासून तों थेट शेवटच्या व्यक्त पदार्थापर्यंत कोणीही पुरुषस्वरूपी नाहीं, असें श्रीकपिलांचें म्हणणें आहे. पुरुष हा भोक्ता आणि प्रकाशक असून, प्रकृति ही भोग्य आणि प्रकाश्य आहे. पुरुष आणि प्रकृति यांत कोणतेंही साधर्म्य नाहीं. एखाद्या मातीच्या गोळ्याला जी किंमत आहे, तीच मनाला आणि बुद्धीला व सर्व विश्वालाही आहे. विश्वांतील कोणतीही वस्तु स्वयंप्रकाश नाहीं; पण ज्या अर्थी बुद्धि आणि इच्छा हीं सचेतन रूपें विश्वांत आपल्या अनुभवाला येत आहेत, त्या अर्थी या वस्तुतः अचेतन पदार्थांच्या मागें कोणी तरी प्रकाशक असला पाहिजे हें उघड आहे. ज्याला चिरंतन अस्तित्व आहे असा सत्रूप पदार्थ या जडपदार्थांच्या पाठीमागें असून, त्याचा अस्तित्वधर्म या जडपदार्थांच्या द्वारें व्यक्त होत आहे. तोच सत् पदार्थ महत्, अहंकार इत्यादि अनेक रूपांच्या द्वारें दिसत आहे. या सत् वस्तूला पुरुष आणि आत्मा अशीं नांवें श्रीकपिलांनीं दिलीं आहेत. श्रीकपिलांच्या मतें पुरुष हा मूलरूप–केवलरूप–आहे; तो मिश्रपदार्थ नाहीं; तों जड नाहीं. जड नाहीं असा, या विश्वांत तोच एक आहे. विश्वांतील बाकीच्या सर्व वस्तू जड आहेत. पुरुष हा

एकच ज्ञाता आहे. माझ्यासमोर असलेला एक फळा मीं पाहिला. त्याकडे पाहण्याबरोबर माझ्या नेत्रांनीं त्याचा आकार दृगिंद्रियाकडे पाठविला आणि दृगिंद्रियानें तो मनाकडे रवाना केला. इतकी क्रिया पूर्ण झाली म्हणजे, मन अहंकाराला जागें करतें, आणि त्याच वेळीं तो आकार बुद्धीकडे रवाना होतो; पण बुद्धी ही स्वतः जडच आहे. तेथें पुरुषाचें साहाय्य ती घेते. मन, बुद्धि आणि अहंकार, हे सारे पुरुषाचे सेवक आहेत. बाहेरून ज्या कांहीं चिजा गोळा होतील त्या पुरुषापर्यंत आणून पोहोंचवावयाच्या, हें या सेवकाचें काम आहे. त्यानंतर पुरुषाच्या हुकुमाप्रमाणें पुढील तजवीज ते करतात. पुरुषाचा हुकूम घेऊन बुद्धि परत फिरते व तो हुकूम अहंकाराला पोहोंचविते; आणि अहंकार मनोद्वारा बाहेर येऊन, 'मीं फळा पाहिला' असें म्हणतो. वस्तुतः हे सारे सेवकजन असून पुरुष हा भोक्ता आणि द्रष्टा आहे. पुरुष हा सिंहासनस्थ राजासारखा असून तो केवलरूप—सत्यरूप—आहे. तो ज्या अर्थी मूलरूप आहे, त्या अर्थी तो अमर्याद असला पाहिजे, हें अगदीं उघड आहे. तो स्वतःच मूलरूप असल्यामुळें त्याला मर्यादा कोणत्या पदार्थानें घालावी ? यामुळें तो मर्यादित होणें शक्यच नाहीं. पुरुष अनंत असून, त्यांपैकीं प्रत्येक अमर्याद आणि सर्वव्यापी आहे; सूक्ष्म आणि स्थूल स्वरूपाच्या पदार्थांच्या संयोगामुळें तो कार्यकारी झाला आहे; तो स्वतः कांहीं करीत नाहीं. जडपदार्थांचा अभाव झाला, तर त्याचें कोणतेंही कार्य दिसणार नाहीं. जडपदार्थांशीं संयोग झाला म्हणजे तो कर्ता आहे असें दिसतें. मन, अहंकार, इंद्रियें आणि प्राणशक्ति हीं सर्व मिळून सूक्ष्म शरीर बनतें. यालाच ख्रिस्ती तत्त्वज्ञांनीं Spiritual Body असें म्हटलें आहे. याच शरिराच्याद्वारें प्राणी सुखदुःखादि भोग भोगतो. त्याचप्रमाणें स्वर्गादि लोकांस जाणारें शरीरही हेंच आहे. हेंच शरीर पुनः पुन्हां जन्म घेतें; कारण पुरुषाला जन्म नाहीं आणि मृत्युही नाहीं, हें पूर्वी आपण सिद्ध केलेंच आहे. जाणें आणि येणें म्हणजे हालचाल करणें, अथवा एका स्थलाहून दुसऱ्या स्थलीं प्रवास करणें असें आहे. जो पदार्थ स्थलांतर करूं शकतो, तो सर्वव्यापी असूं शकणार नाहीं. पुरुष सर्वव्यापी आहे हें आपणांस ठाऊकच आहे; याकरितां स्थलांतर करणें पुरुषाला शक्य नाहीं; आणि तो स्थलांतर करीत नाहीं. त्याअर्थी, त्याला जन्म आणि मृत्यु असणें आणि तसेंच स्वर्गादि लोकगमन हींही शक्य नाहींत; म्हणून जन्म आणि मृत्यु हे केवळ लिंग-

शरीराचे–सूक्ष्मदेहाचे–धर्म आहेत. जाणें आणि येणें या क्रिया लिंगशरीरच करूं शकतें.

पुरुष हा अमर्याद आहे आणि प्रकृतींतून उत्क्रांत न झालेला असा तोच एक आहे, असें श्रीकपिलांच्या अंतःसृष्टिशास्त्रांतील सिद्धांतावरून आपणांस आढळून येतें. प्रकृतीच्या मर्यादेबाहेर असा फक्त पुरुषच असून, तो प्रकृतीनें बद्ध झाल्यासारखा दिसतो. पुरुषाच्या सर्व बाजूंनीं प्रकृतीचें रूप पसरलें असल्यामुळें तोही प्रकृतीसारखा दिसूं लागतो; इतकेंच नव्हे तर मी प्रकृतीच आहें असाही भ्रम त्याला होतो. मी लिंगशरीर आहें, मी जडदेह आहें, असा भ्रम त्याला होतो; आणि या भ्रमामध्यें असतां तो भोक्ता होऊन सुखदुःखादि भोग भोगतो; तथापि सुखादि भोग हे पुरुषाचे धर्म नव्हत. ते वस्तुतः लिंगदेहाचे व स्थूलदेहाचे धर्म आहेत. एखाद्या विशिष्ट ज्ञानतंतूवर आघात झाला असतां आपणांस दुःख होतें, आणि त्याची संवेदनाही त्या तंतूच्या द्वारा आपणांस समजते. आपल्या एखाद्या बोटांतील ज्ञानतंतू कांहीं कारणानें जर अक्रिय झाले, तर तें बोट कापलें असतांही आपणांस दुःख होणार नाहीं; कारण, तेथील ज्ञानतंतूंच्या क्रियेच्या अभावामुळें तेथें घडलेल्या क्रियेची संवेदना मेंदूकडे रवाना केली जात नाहीं. शरिरावर एखाद्या घट्टा पडलेल्या जागीं सुई टोंचली असतांही त्याची नोंद मनावर होत नाहीं. यावरून सुख अथवा दुःख हे इंद्रियांचे ( Nerve-centres ) धर्म आहेत हें प्रसिद्ध होतें. माझी दृष्टि नाहींशी झाली, तर बऱ्यावाईट देखाव्यापासून उत्पन्न होणारें सुखदुःख मला होणार नाहीं. यावरून सुख आणि दुःख हे आत्म्याचे धर्म नसून, ते मनाचे व देहाचे धर्म आहेत हें सिद्ध होतें.

पुरुषाला–आत्म्याला–सुख अथवा दुःख यांपैकीं कोणीच स्पर्श करूं शकत नाहींत. तो या सर्वांचा साक्षी मात्र आहे. त्याजभोंवतीं प्रकृतीच्या अनेक प्रकारच्या क्रिया सुरू असून, त्यांजपासून उद्भवणारीं फळें तो घेत नाहीं; पण या सर्व क्रिया, त्याच्या साक्षित्वामुळें घडत आहेत. “**सूर्यो यथा सर्वलोकस्य चक्षुर्न लिप्यते चाक्षुषैर्बाह्यदोषैः। एकस्तथा सर्वभूतांतरात्मा न लिप्यते लोकदुःखेन बाह्यः॥**” (कठोपनिषत् २. २. ११.) सूर्य हा सर्व लोकांच्या दृष्टीचें कारण असूनही त्यांच्या दृगिंद्रियांतील दोषांनीं तो जसा लिप्त होत नाहीं, त्याचप्रमाणें पुरुषही दुःखानें लिप्त होत नाहीं. ज्याप्रमाणें तांबड्या

फुलांच्या सांनिध्यामुळें शुभ्र स्फटिकही तांबडा दिसतो, त्याचप्रमाणें प्रकृतींत प्रतिबिंबित झालेला पुरुष सुखी अथवा दुःखी असल्यासारखा दिसला, तरी वस्तुतः तो केवलरूपच आहे. ध्यान हा पुरुषाच्या सन्निध जाण्याचा मार्ग आहे. ध्यानस्थ स्थितींतच त्याच्या खऱ्या स्वरूपाचा प्रत्यय अधिक स्पष्टपणें येतो. समाधि-स्थिति, ही अत्युच्च प्रकारची स्थिति आहे असें योगी कां म्हणतात हें आतां आपल्या लक्ष्यांत आलें असेल. मनुष्याच्या सामान्य स्थितींत चापल्य आणि जाड्य असे दोन प्रकार असतात; पण समाधीची स्थिति या दोहोंहून निराळी आहे. ती केवलस्थिति आहे. पुरुष आणि 'मी' वस्तुतः एकरूपच आहों, असा अनुभव समाधीच्या स्थितींतच प्राप्त होतो.

प्रकृति ही पुरुषाकरतां व्यक्त झाली आहे, असें सांख्यांचें म्हणणें आहे. "**इत्येष प्रकृतिकृतो महदादिविशेषभूतपर्यंतः । प्रतिपुरुषविमोक्षार्थं स्वार्थ इव परार्थ आरंभः ॥**" अनेक जडपदार्थांचीं मिश्रणें आणि प्रतिमिश्रणें, हीं पुरुषार्थासाठीं सुरू राहिलीं आहेत. मिश्रणें आणि प्रतिमिश्रणें बनण्यांत, त्या पदार्थांचा स्वतःचा असा कांहीं हेतु नाहीं. हीं सर्व प्रकारचीं मिश्रणें—हे सर्व प्रकारचे खेळ, पुरुषाच्या भोगाकरितां आणि मुक्तीकरितां सुरू आहेत. अत्यंत क्षुद्र पदार्थांपासून तों अत्युच्च पदार्थांपर्यंत सर्वांचा अनुभव पुरुषाला घडावा, आणि त्या अनुभवाच्या द्वारें पुरुष मुक्त व्हावा, हाच प्रकृतीचा हेतु आहे. हा अनुभव पूर्णपणें आल्यानंतर, आपण प्रकृतीच्या आधीन केव्हांच नसून स्वभावतःच आपण तीहून निराळे आहोंत, अशी त्याची खात्री होईल. त्याचप्रमाणें आपण अविनाशी असून गमनागमन करीत नाहीं, स्वर्गादि लोक भोगीत नाहीं, आणि जन्मही घेत नाहीं, असेंही त्यास आढळून येईल. गमनागमन आणि जन्म-मरण हे प्रकृतीचे धर्म असून ते आपले धर्म नाहींत, अशी त्याची खात्री होईल. अशी खात्री एकवार अनुभवानें पटली म्हणजे पुरुष मुक्त होतो. पुरुष मुक्त व्हावा, याच हेतूनें प्रकृति हे सर्व खेळ करीत आहे. आणि स्वतः मुक्त होण्याकरितां पुरुष हे सर्व अनुभव घेत आहे; मुक्ति हेंच पुरुषाचें अखेरचें साध्य आहे. सांख्यमताप्रमाणें या विश्वांत अनंतपुरुष आहेत. सांख्यांचें आणखीही एक मत असें आहे कीं, या विश्वाचा उत्पत्तिकर्ता असा कोणी नाहीं. परमेश्वराचें अस्तित्त्व सांख्यदर्शनाला मान्य नाहीं. विश्वरचनेचा समा-धानकारक उलगडा जर एकट्या प्रकृतीच्या साहाय्यानें करतां येतो, तर

आणखी एका निराळ्या परमेश्वराची कल्पना कां करावी, असा सांख्यांचा प्रश्न आहे.

सांख्यमताशीं आमचा जो मतभेद आहे, त्यांत तीन मुद्दे आहेत. सांख्यांचें मत असें आहे कीं, पुरुष हा अगदीं निर्गुण आहे, आणि बुद्ध्यादि रूपें केवळ प्रकृतीचीं कार्यें आहेत. सांख्यदर्शनाचें हें म्हणणें वेदान्ताला मान्य नाहीं. दुसरा मुद्दा असा आहे कीं, परमेश्वराचें अस्तित्व नाहीं असें जें सांख्यांचें म्हणणें, तेंही वेदान्ताला मान्य नाहीं. परमेश्वराचें अस्तित्व मान्य केल्यावांचून अनेक प्रश्नांचा समाधानकारक निकाल लागत नाहीं असें वेदान्ताचें मत आहे. तिसरा मुद्दा, अनेक पुरुषांच्या अस्तित्वाबद्दलचा आहे. सांख्य-मताप्रमाणें या विश्वांत अनेक पुरुष आहेत; वेदान्ताला हेंही मत मान्य नाहीं. सर्वव्यापी असा आत्मा एकच असून तो अनेकत्वानें भासतो, असें वेदान्त म्हणतो. आतां, या तिन्ही मुद्द्यांचा विचार आपण क्रमशः करूं.

इच्छा, विवेचकबुद्धि इत्यादि रूपें केवळ प्रकृत्यात्मक असून, पुरुषाशीं त्यांचा यत्किंचितही संबंध नाहीं असें जें सांख्यांचें म्हणणें आहे, त्याचा प्रथम विचार करूं. पुरुषाचें–आत्म्याचें–स्वरूप, सच्चिदानंद हें आहे असें वेदान्ताचें म्हणणें आहे; तथापि बुद्धि ही मिश्रणरूप आहे हें सांख्यमत, वेदान्ताला अमान्य नाहीं. विश्वांतील अनेक वस्तूंचें ज्ञान करून घेण्याच्या आपल्या मार्गाचें शास्त्रीय स्वरूप कसें आहे, याचें विवेचन पूर्वी अनेकवार केलेलेंच आहे. बाहेरून येणाऱ्या संवेदनांची नोंद प्रथम चित्तावर होते; आणि नंतर चित्त जी प्रतिक्रिया करतें त्याला आपण ज्ञान असें म्हणतों. या सिद्धांताच्या स्पष्टीकरणासाठीं पूर्वीचेंच एक उदाहरण पुन्हा घेऊं. माझ्यासमोर मांडलेला हा फळा मला दिसत आहे. या ठिकाणीं वास्तविक कोणती वस्तु आहे याचें ज्ञान मला नाहीं; किंबहुना त्याचें ज्ञान होण्याची शक्यताच नाहीं; ती अमुकच वस्तु आहे असें जें मी म्हणतों तें माझें इंद्रियजन्य ज्ञान होय. तें ज्ञान वस्तुगत नसून चित्तगत आहे. बाह्य-जग हें 'केवलवस्तु' आहे असें जर्मन पंडित म्हणतात त्याचें कारण हेंच होय. ज्या वस्तूचें स्वरूप अनिश्चित आहे, तिला 'क्ष' असें नांव बीजगणि-तांत देत असतात. आध्यात्मिकदृष्ट्या जगाचें स्वरूपही 'क्ष' हेंच आहे. खुद्द जगाचेंच असें निश्चित स्वरूप त्याला नाहीं. प्रथम हें 'क्ष' रूप माझ्या चित्ताकडे धांव घेतें, आणि नंतर–चित्ताची प्रतिक्रिया घडली म्हणजे–तें

'अमुक,' तो 'फळा' असें मी म्हणतों. एखाद्या शांत तळयांत आपण धोंडा फेंकला व तो खालीं जाऊं लागला, म्हणजे पाण्याचे बुडबुडे खालून वर येऊं लागतात; ही तळयांतील पाण्याची प्रतिक्रिया होय. दगडानें जी 'क्रिया' पाण्यावर केली, तिला पाण्यानें प्रतिक्रियेच्या रूपानें जणुंकाय 'उत्तर' दिलें! आपलें चित्त हें या तळयासारखें आहे. तळयांतील पाण्यानें केलेली प्रतिक्रिया ज्याप्रमाणें बुडबुड्यांच्या रूपानें दिसते, त्याचप्रमाणें बाह्यसंवेदनेला चित्तानें केलेली प्रतिक्रिया ज्ञानाच्या रूपानें प्रत्ययाला येते. दगड आणि बुडबुडा यांच्या स्वरूपांत कांहींच साम्य नसतें. दगड तो दगड आणि बुडबुडा तो बुडबुडा. हा बाहेरील फळा त्या दगडासारखा आहे. त्याचा आघात चित्तावर झाला म्हणजे तेथून बुडबुडे बाहेर पडूं लागतात, व ते बुडबुडेच आपणांस दिसतात; आणि त्यांचें जें कांहीं स्वरूप आपणांस दिसतें त्याचा आरोप बाह्य-वस्तूवर करून 'हा फळा' असें आपण म्हणतों. मी सध्या तुमच्याकडे पाहात आहें, तुमचें स्वतःचें वास्तविक स्वरूप काय आहे हें मला माहीत नाहीं, आणि तें माहीत करून घेण्याचें कांहीं साधनही मजपाशीं नाहीं. तुमचें खरें स्वरूप म्हटलें म्हणजे बीजगणितांतील 'क्ष' हेंच. तुम्ही माझ्या चित्तावर आघात केला म्हणजे तेथून बुडबुडे बाहेर पडूं लागतात, व जेथून या क्रियेचा मूळ उद्भव झाला त्या दिशेकडे धांव घेऊं लागतात. ते अशी धांव घेऊं लागले म्हणजे मीही त्यांच्या मागो मागजातों, आणि हे अमुक 'राजश्री' अथवा या अमुक 'बाई' असें म्हणतों.

अशा प्रकारें प्राप्त होणाऱ्या ज्ञानांत दोन तत्त्वें असतात. दोन तत्त्वें मिळून हें ज्ञान निर्माण झालेलें असतें. यांतील एक तत्त्व अंतर्गत व दुसरें बाह्य असतें. अशा रीतीनें हीं दोन तत्त्वें व आपलें चित्त यांच्या संयोगानें बाह्य-विश्वातील अनेक वस्तू आपण निर्माण केल्या आहेत. सर्व वस्तूंचें ज्ञान हें आपल्या चित्ताच्या प्रतिक्रियेपासूनच निर्माण झालें आहे. देवमाशाच्या शेपटी-वर तडाका दिला तर त्याला त्याचें ज्ञान होऊन तज्जन्य दुःखाची उत्पत्ति होण्यास मध्यंतरीं किती काळ जातो याचें निरीक्षण कित्येकांनीं केलें आहे. शेपटीवर तडाका दिल्याबरोबर तेथें वस्तुतः दुःखाची उत्पत्ति व्हावी, पण तसें होत नाहीं; कारण, बाह्यसंवेदना चित्तापर्यंत जाऊन, तेथून दुःखरूपानें त्याची प्रतिक्रिया परत येईपर्यंत मध्यंतरीं काहीं काळ निघून जातो. हा काळ किती असतो याचा निर्णय निरीक्षणानें करण्यांत आला आहे. मोत्यांची

उत्पत्ति कशी होते हें आपणांस माहीत असेलच. समुद्रांतील एखादा कठीण पदार्थ शिंपलींत गेला, म्हणजे आंतील किडा एक प्रकारचा चिकट रस बाहेर टाकतो. मोतीं बनण्यास दोन प्रकारच्या क्रियांची अपेक्षा असते. एक बाह्यपदार्थ शिंपलींत शिरणें; आणि दुसरी किड्यानें रस बाहेर टाकणें. या दोन क्रियांच्या एकत्र परिणामापासून मोतीं बनतें. त्याचप्रमाणें आपलें बाह्य पदार्थांचें ज्ञानही दोन प्रकारच्या क्रियांवर अवलंबून आहे. बाह्यवस्तूनें चित्तांत प्रवेश करणें; आणि अंतर्गत चित्तानें प्रतिक्रिया करणें; या दोन संवेदनांच्या मिलाफापासून बाह्यवस्तूच्या ज्ञानाची उत्पत्ति होते. आतां येथें आणखीही एक गोष्ट विशेषेंकरून लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे. बाह्यवस्तु काय आहे हें समजण्याची खटपट चित्त करूं लागलें, म्हणजे आपल्या स्वतांतील कांहीं अंश तें पदार्थांकडे पाठवितें. बाह्यपदार्थाची संवेदना चित्ताकडे गेल्याबरोबर त्याचा प्रवाह त्या पदार्थाकडे वाहूं लागतो. अशा रीतीनें बाह्यपदार्थाची संवेदना, व त्यांत मिळालेला चित्ताचा अंश, यांचें मिश्रण झाल्याबरोबर तो पदार्थ अमुक, असें ज्ञान तेथें निर्माण होतें; यावरून ज्ञान हें मिश्ररूप आहे असें सिद्ध होतें. हीच गोष्ट अंतर्गत वस्तूंच्या ज्ञानालाही लागू आहे. 'मी' म्हणजे कोण, याचें ज्ञान आपणांस करून घ्यावयाचें आहे अशी आपण कल्पना करूं 'मी' असें म्हणणारा या देहांत कोण आहे हें आपणांस माहीत नाहीं; आणि तें माहीत करून घेण्याचें कांहीं साधनही आपणांस उपलब्ध नाहीं. या अंतर्गत 'मी' ला आपण 'ब' असें म्हणूं. मी अमुक 'राजश्री' असें मला स्वतः-बद्दल म्हणावयाचें असलें, तर त्या वेळीं आंतील 'ब,' आणि चित्तानें केलेल्या प्रतिक्रियेच्याद्वारा आलेला चित्ताचा अंश, यांचा संयोग झाला पाहिजे. मी कोण असा प्रश्न उपस्थित झाल्याबरोबर 'ब' चा आघात प्रथम चित्तावर जाऊन आदळतो; त्या क्रियेला चित्तांतून प्रतिक्रिया सुरू होते आणि हीं दोन्ही मिळून 'मी अमुक गोमाजी' असें आपण म्हणतों. यावरून बाह्यविश्वाचें ज्ञान म्हणजे, 'क्ष' + 'चित्ताचा अंश'; आणि अंतर्गत सृष्टीचें ज्ञान म्हणजे 'ब' + 'चित्ताचा अंश'; हेंच आहे असें सिद्ध झालें. अद्वैतमत गणितानेंही कसें सिद्ध होतें याचा विचार आपण पुढें करूं.

'क्ष' आणि 'ब' या अक्षरांची योजना आपण उदाहरणार्थ केली. या दोन बीजगणितांतील अज्ञात वस्तू आहेत. या 'अमुक' असें आगाऊ ज्ञान

आपणांस मुळींच नाहीं. यांचें उदाहरण घेऊन आपण असें सिद्ध केलें कीं, ज्ञान ही मिश्रवस्तु आहे. ती निर्माण केलेली चीज आहे. ज्याप्रमाणें बाह्य-विश्वाचें ज्ञान निर्मित आहे, त्याजप्रमाणें बुद्ध्यादि अंतःसृष्टीचें ज्ञान हीसुद्धां निर्मित वस्तूच आहे. अंतर्गत सृष्टीचें ज्ञान हें 'ब' + 'चित्ताचा अंश,' आणि बाह्यविश्वाचें ज्ञान हें 'क्ष' + 'चित्ताचा अंश,' असें आपण ठर-विलें. आतां आपण प्रथम अंतःसृष्टीबद्दल विचार करूं. बुद्धि हें नांव ज्या विशिष्ट वस्तूला आपण दिलें आहे, ती केवळ जडप्रकृतीपासूनच निर्माण झाली असें म्हणतां येत नाहीं; कारण, बुद्धि ही मिश्रवस्तूच आहे. तींत 'ब' + 'चित्ताचा अंश' असे दोन पदार्थ आहेत. यांपैकीं 'ब' हें स्वरूप पुरुषाचें अंशभूत आहे. बुद्धि ही प्रकाशक वस्तु आहे. तींत जो प्रकाशाचा अंश आहे तो पुरुषाचा अंश असून तिच्यांतील जडत्व हा प्रकृतीचा अंश आहे. त्याचप्रमाणें विश्वाचें 'अस्तित्व' ही संज्ञा ज्या ज्ञानाला आपण लावतों, तें ज्ञानही 'क्ष' + 'चित्ताचा अंश' या मिश्रणांतूनच निर्माण झालें असलें पाहिजे. आपल्या एकंदर आयुष्यक्रमाचें परीक्षण केलें, तर त्यांत तीन मुख्य स्थिति आढळून येतात. ज्या स्थितींचा आपणांस कधींही विसर पडत नाहीं अशा स्थिति तीन आहेत. त्यांपैकीं मी 'आहें' ही एक स्थिति आहे. माझ्या अस्तित्वाबद्दल माझी पूर्ण खात्री सदोदित असते. दुसरी स्थिति, मला 'सम-जतें' ही आहे. मला ज्ञान आहे ही भावनाही माझ्यांत सदोदित जागृत असते. तिसरी स्थिति, मी 'सुखरूप आहें' ही होय. मला कशाचीही गरज नाहीं अशी भावना क्षणोक्षणीं आपल्या चित्तांत उद्भूत होत असते. या तीन भावनांच्या मूळपायावर आपल्या साऱ्या आयुष्याची इमारत आपण बांधीत असतों. 'मी अमुक करीन' 'तमुक भोगीन', असें आपण म्हणतों; त्या वेळीं तसें करण्यास मी 'स्वतंत्र' आहें अशी भावना या विचारांच्या पोटीं सदो-दित अंतर्भूत झालेली असते. आपल्या आयुष्यक्रमाचा पाया 'सत्-चित्-आनंद' हाच आहे; असें आहे तर आपल्या आयुष्यक्रमांत आपणांस दुःख होतें तें कां ? याचें कारण असें आहे कीं, ज्या प्रमाणानें आपण आपलें हें मूल-रूप सृष्टपदार्थांशीं–प्रकृतीशीं–मिश्र करतों, त्या प्रमाणानें त्याचा अनुभव कमी होतो, आणि त्या मिश्रस्थितीला आपण दुःख असें म्हणतों. मी 'सत्-चित्-आनंद' ही मूळ भावना सोडून आपण सृष्टपदार्थांशीं–जडप्रकृतीशीं–जसजसे

अधिक मिश्र होतों, तसतसा मूळ भावनेचा लोपही अधिक प्रमाणावर होऊं लागतो. 'आनंद' या भावनेचा जसजसा लोप होत जातो, तसतसें 'दुःख' तेथें प्रवेश करूं लागतें. जडपदार्थांचें मिश्रण कमी होऊं लागलें, म्हणजे मूळ पदार्थाचा प्रत्यय अधिक स्पष्ट होऊं लागतो व त्या स्थितीला आपण 'सुख' असें म्हणतों.

'सत्-चित्-आनंद' हा जसा आपल्या अस्तित्वाचा पाया आहे, त्याचप्रमाणें एकंदर अस्तित्वाचाही तोच पाया आहे. प्रत्येक मनुष्य 'असतो,' 'जाणतो' आणि 'आनंदरूप' असतो. तसें नसणें ही गोष्ट मूलतःच अशक्य आहे. हा मूळ पाया नसेल तर मनुष्याचें अतिस्त्वच शक्य नाहीं. हीच गोष्ट सर्व सृष्टीलाही लागू आहे. झाडेंझुडपें आणि पशुपक्षी यांच्या अस्तित्वाचा मूळ पायाही 'सत्-चित्-आनंद' हाच आहे. त्या सर्वांत या त्रयीचा वास असलाच पाहिजे. त्यांतील चिदानंदाचा प्रत्यय तुम्हाआम्हांला आला नाहीं, तरी त्या सर्वांत अस्तित्व, चैतन्य आणि आनंद हीं आहेतच. याकरितां जें जें कांहीं अस्तित्वांत आहे त्याचें शास्त्रीय स्वरूप 'क्ष' + 'चित्ताचा अंश' हें असून, त्याचें जें कांहीं ज्ञान आपणांस होतें त्याचें स्वरूप 'ब' + 'चित्ताचा अंश' असें आहे. त्याचप्रमाणें सुख अथवा आनंद या भावनाही 'ब' आणि 'चित्ताचा अंश' मिळून झाल्या आहेत. 'सत्-चित्-आनंद' ही त्रयी अंतर्गत असून, ती बाह्यवर्ती होऊन बाह्यवस्तूशीं मिळून बाह्यजग निर्माण करते. या त्रयीलाच 'सच्चिदानंद' असें नांव वेदान्ती देतात.

जेव्हां हें अस्तित्व केवळ 'सत्-रूप' असतें—जेव्हां त्याचा दुसऱ्या कोणत्याही बाह्यवस्तूशीं मिलाप झालेला नसतो—तेव्हां त्याचें स्वरूप 'केवळ-रूप' हेंच असतें. त्या स्वरूपाला दुसऱ्या कोणत्याही पदार्थाच्या संगतीनें मर्यादा पडलेली नसते; तें अमर्याद स्वरूप असतें. मुक्त पुरुषाचें—आत्म्याचें—हेंच रूप होय. या स्वरूपाशीं प्रकृतीच्या तत्त्वांचा संकर झाला, म्हणजे मनुष्य-प्राणी निर्माण होतो. प्रकृतीच्या पदार्थांच्या संयोगामुळें अमर्यादाला मर्यादा उत्पन्न होते. मूळचें अमर्याद केवलरूप मर्यादित होतें. अशाच रीतीनें प्रकृतीच्या अनेक प्रकारच्या मर्यादा निर्माण होऊन, त्यांतून झाडेंझुडपें, पशुपक्षी आणि मनुष्यप्राणी निर्माण झाले आहेत. ज्याप्रमाणें एखाद्या अफाट मैदानावर चार भिंती उभ्या केल्या, म्हणजे तेवढ्या जाग्याला मर्यादित खोलीचें

स्वरूप प्राप्त होतें तसेंच हें आहे. ‘चित्त’ हें ज्ञानाचें मूलरूप आहे. आपण ज्याला सामान्य भाषेंत ज्ञान या नांवानें ओळखतों तेंच चित्त असें मात्र समजूं नये. कारण, आपलें ‘ज्ञान’ हें मूलरूप नसून मिश्ररूप आहे. त्याचप्रमाणें इच्छा, विवेचकबुद्धि अथवा उपजतबुद्धि म्हणजेही चित् नव्हें. चित् हें मिश्ररूप झालें, म्हणजे तें विवेचकबुद्धि अथवा उपजतबुद्धि इत्यादि रूपानें प्रत्यक्ष प्रत्ययाला येतें. चित्त मर्यादित झालें म्हणजे त्याला अंतर्ज्ञान अथवा अंतःस्फुर्ति असें नांव आपण देतों. ही मर्यादा अधिक वाढली म्हणजे त्या अधिक मर्यादित स्वरूपाला आपण विवेचकबुद्धि असें म्हणतों; हीच मर्यादा त्याहून अधिक वाढून चित्चें स्वरूप अधिक आकुंचित झालें, म्हणजे त्या स्वरूपाला आपण उपजतबुद्धि या नांवानें ओळखतों. या चित्ला विज्ञान असें नांव वेदान्तानें दिलें आहे. विज्ञान हें केवलरूप आहे. त्यांत कशाचेंही मिश्रण नाहीं. विज्ञानरूप हें पुरुषाचें स्वभावरूप आहे. त्यांत पुरुष केवलरूप आहे आणि विज्ञानही केवलरूप आहे. यामुळें तीं दोघेंही एकमेकांची स्वभावरूपें आहेत. त्याचप्रमाणें आनंदरूप मर्यादित झालें म्हणजे त्याला आपण प्रेम या नांवानें ओळखितों. यांत सुंदर स्थूलदेहावरील प्रेमाचा अथवा सूक्ष्म देहावरील प्रेमाचा अंतर्भाव होतो. स्थूलदेहाचें सौंदर्य पाहून त्यावर कोणाचें प्रेम जडेल अथवा दुसऱ्या एखाद्याचें प्रेम एखाद्या सुंदर विचाराशीं संलग्न होऊन राहील. हें आनन्दरूपाचें वस्तूनें मर्यादित झालेलें रूप होय. प्रेम हें आनंदरूपाचें विकृत झालेलें रूप आहे. पुरुषाचें हेंही स्वभावरूपच आहे. आनंद हा पुरुषाचा गुण नसून त्याचा तो स्वभावच आहे. पुरुष आणि आनंद हीं पूर्णपणें अविभाज्य आहेत. त्यांची जोडी कधींही फुटावयाची नाहीं. सत्, चित् आणि आनंद हे पुरुषाचे गूण नसून ते त्याचे स्वभावरूप आहेत. त्यांत आणि पुरुषांत—आत्म्यांत—कसल्याही प्रकारचा निराळेपणा नाहीं. हीं सर्व एकरूप आहेत. मूळ एकच वस्तु असून ती तीन निरनिराळ्या स्वरूपांनीं आपल्या प्रत्ययाला येते. आपण ज्याला ज्ञान असें म्हणतों त्याच्या पलीकडचें हें स्वरूप आहे. तें आपल्या ज्ञानानें जाणतां येणार नाहीं. त्या स्वरूपाचें प्रतिबिंब प्रकृतींत पडलें म्हणजे बुद्धि इत्यादिद्वारा प्रकृति ज्ञानरूप दिसूं लागते.

मनुष्याच्या मनाच्या द्वारानें जें चिद्रूप प्रकट होतें, त्याला आपण बुद्धि या नांवानें ओळखतों. या ठिकाणीं आत्म्याचा प्रकाश, मध्यस्थाच्याद्वारें व्यक्त

होत असतो. यामुळें मध्यस्थाचें जें कांहीं रूप असेल, त्याप्रमाणेंच त्या प्रकाशाचेंहि रूप दिसेल हें उघड आहे. माझ्यांतील पुरुषरूपांत आणि एखाद्या पशूंतील पुरुषरूपांत मुळचा असा कांहींच भेद नाहीं. आम्हा दोघांतील पुरुष एकाच स्वरूपाचे आहेत. असें असतांहि त्याच्या आणि माझ्या बुद्धींत जो भेद दिसतो, त्याचें कारण त्याचा मेंदु कमी प्रतीचा मध्यस्थ आहे हेंच होय. यामुळें पशूच्या बुद्धीला उपजतबुद्धीचें म्हणजे कमी प्रतीच्या जडबुद्धीचें स्वरूप प्राप्त होतें. दोघांतील मूळ ज्ञानरूप एकच असतां, एकाचा मेंदु अधिक जड आणि दुसऱ्याचा अधिक तरल असल्यामुळें दोघांच्या बुद्धींत मात्र भेद दिसतो. मनुष्याचा मेंदू अधिक शुद्ध पदार्थाचा बनलेला आहे; यामुळें तद्वारा प्रतीतीस येणारें ज्ञान अधिक शुद्ध स्वरूपाचें असतें. मेंदूचें स्वरूप जसजसें अधिक शुद्ध होत जातें, तसतसें तद्वारा प्रतीतीस येणारें ज्ञानरूपहि अधिक शुद्ध दिसूं लागतें. अत्यंत शुद्ध मनुष्याचा मेंदु स्वच्छ आरशासारखा असल्यामुळें, त्यांत पडणारें ज्ञानरूपहि विशुद्ध असतें. याचप्रमाणें आपल्या अस्तित्वाचीहि गोष्ट आहे. आपलें सध्याचें—कांहीं काळ राहणारें—अस्तित्व हें मूळ अनंत अस्तित्वाचें केवळ प्रतिबिंब आहे. अनंत—केवलरूप—अस्तित्व हा पुरुषाचा-आत्म्याचा—स्वभाव आहे. याचप्रमाणें आनंदाविषयींहि समजावें. आपण ज्याला प्रेम—प्रीति—असें म्हणतों, तें आत्म्याच्या अनंत आनंदरूपाचें प्रतिबिंब आहे. परोक्षवस्तु ज्या मध्यस्थाच्याद्वारें प्रत्यक्ष होऊं लागते त्या मध्यस्थाचें रूप ती धारण करते असें भासतें; परंतु त्यामुळें मूळ परोक्षवस्तूचें स्वरूप लवमात्रही बदलत नाहीं. परोक्ष आत्मा प्रत्यक्ष स्वरूपाला येऊं लागला, म्हणजे मध्यस्थाचें मर्यादित रूप त्यालाहि लागू होतें; पण त्यामुळें आत्म्याच्या मूल अनंत—केवल—स्वरूपांत कांहीं फरक पडतो असें मात्र नाहीं. आत्म्याच्या अनंत अमर्याद—रूपाला मर्यादा घालण्याला कोणींही समर्थ नाहीं; पण मनुष्यांत व्यक्त झालेलें त्याचें रूप मर्यादित असतें. एखाद्यावर प्रेम करावें असें मला आज वाटत असतें आणि उद्यां त्याचाच मी द्वेष करितों. माझ्या प्रेमाला मर्यादा नाहीं असें मला आज वाटत असतें आणि उद्यांच तें प्रेम कमी होतें. माझ्यांत व्यक्त झालेल्या प्रेमाच्या स्वरूपाला अनेक प्रकारच्या मर्यादा उपस्थित झाल्यामुळें, त्याचें स्वरूप आज एक आणि उद्यां भलतेंच दिसावें यांत आश्चर्य तें काय ?

आतांपर्यंत केलेल्या विवेचनावरून, श्रीकपिलांच्या मतांत आणि वेदान्त मतांत फरक कोठें आहे, हें आपल्या लक्ष्यांत थोडेंबहुत आलें असेल. पुरुष अत्यंत निर्गुण, वर्णरहित आणि अक्रिय असा आहे असें श्रीकपिलांचें मत आहे. श्रीकपिलांचें हें मत वेदान्ताला मान्य नाहीं. आत्मा–पुरुष–सच्चिदानंद-रूप आहे असें वेदान्ताचें म्हणणें आहे. मानवी मनानें जितकें कांहीं जाणतां येण्याची शक्यता आहे, त्याहून आत्मा अनंतपटीनें ज्ञानवान् आहे. मानवी प्रेमाची जी कांहीं कल्पना आपणांस करतां येईल, त्याहून अनंतपटीनें आनंद, आत्म्याच्या ठिकाणीं आहे. आत्मा अमर आहे. जन्म व मृत्यु यांचा नुसता विचारही आत्म्याच्या ठिकाणीं संभव नाहीं; कारण, तो नव्हता असा काळच केव्हां नाहीं. तो सर्वकाळ होता आणि पुढेंही सर्वकाळ राहील.

श्रीकपिलांचें दुसरेंहि एक मत वेदान्ताला मान्य नाहीं. तें मत म्हणजे श्रीकपिलांचें ईश्वराबद्दलचें मत होय. ज्याप्रमाणें पिंडांत व्यक्त झालेल्या प्रकृति रूपांना प्रकाशित करण्यास पिंडस्थ आत्म्याची आवश्यकता आहे, त्याचप्रमाणें ब्रह्मांडांत व्यक्त झालेल्या प्रकृतीचा प्रकाशक असाही आत्मा असला पाहिजे. पिंडांतील बुद्धयादि वस्तू ज्याप्रमाणें आत्म्याच्या प्रकाशानुरोधानें वर्तत असतात, त्याचप्रमाणें ब्रह्मांडांतील महदादि तत्त्वें ज्याच्या प्रकाशानें चालतात असा कोणी तरी असला पाहिजे. ज्याप्रमाणें पिंडांतील वस्तुपरंपरेच्या शेवटीं आत्मा हा असलाच पाहिजे, त्याचप्रमाणें ब्रह्मांडांतील वस्तुपरंपरेचा शेवट आत्म्यांतच झाला पाहिजे. तसें न होईल तर ही परंपरा अपूर्णावस्थेंत राहिली असें होईल. परमेश्वराला अस्तित्व नाहीं असें मानावयाचें म्हटलें, तर मनुष्यांतही आत्मा नाहीं असें म्हणणें भाग पडेल! पिंड आणि ब्रह्मांड यांची रचना तत्त्वदृष्ट्या एकसारखीच आहे, हें आपण नुक्तेंच पाहिलें आहे. एका शितावरून खंडीभर भाताची परीक्षा करतां येते. एका पिंडाचें पृथक्करण करून त्याचें ज्ञान आपण संपादन केलें, तर सर्व ब्रह्मांडाचें ज्ञान आपणांस प्राप्त झाल्यासारखेंच आहे. कारण, पिंड आणि ब्रह्मांड यांच्या रचनेंत तत्त्व-दृष्ट्या कांहींसुद्धां भेद नाहीं. या दोन्ही इमारती एकाच नमुन्यावर बांधल्या गेल्या आहेत. याकरितां, प्रकृतीच्या पलीकडच्या अशा आत्म्याचें अस्तित्व पिंडांत आहे असें मानावयाचें असेल तर ब्रह्मांडांत व्यक्त झालेल्या प्रकृती-पलीकडेहि आत्म्याचें अस्तित्व आहे हें म्हणणें तर्कशास्त्राला अनुसरून

ओघालाच येतें. प्रकृतीच्या महदादि रूपांपलीकडे असलेल्या या ब्रह्मांड-पुरुषाला ईश्वर असें नांव वेदान्तानें दिलें आहे. ज्याप्रमाणें पिंडपुरुष —आत्मा—हा पिंडाचा शास्ता आणि प्रकाशक आहे, त्याचप्रमाणें ईश्वर हा ब्रह्मांडाचा शास्ता आणि प्रकाशक आहे.

आतां तिसऱ्या मतभेदाचा विचार करूं. हा मतभेद फार तीव्र आणि नाजूक आहे. आत्मे अनेक–अनंत–आहेत असें श्रीकपिलांचें मत आहे. आत्मा एकच असणें शक्य आहे असें वेदान्ताचें म्हणणें आहे. सांख्यांचीं बाकीचीं मतें मान्य करून व त्यांच्याच विचारसरणीनें चालून सांख्यांचें हें मत आम्हांला जमीनदोस्त कसें करतां येतें हें आतां दाखवितों. सांख्यांच्या मताप्रमाणें प्रत्येक पुरुष–आत्मा सर्वव्यापी असला पाहिजे असें सिद्ध होतें. कारण, पुरुष हा केवलरूप आहे; मिश्रणरूप नाहीं. तो अमुक एका वस्तूचा बनला आहे असें नाहीं. तो ज्या अर्थी मिश्रणरूप नाहीं, त्या अर्थी तो सर्वव्यापी असला पाहिजे. वस्तु मर्यादित असली म्हणजे तिला मर्यादा घालणारी दुसरीही एक वस्तु असली पाहिजे हें उघडच आहे. येथें हें टेबल आहे आणि तें मर्यादित आहे. भोंवतालच्या परिस्थितीनें तें मर्यादित झालें आहे. अमुक वस्तु मर्यादित आहे असें म्हटलें कीं त्याबरोबरच तिला मर्यादा घालणारा वस्तुसंघ असला पाहिजे, ही कल्पनाही आपोआपच उत्पन्न होते. या दोन कल्पना अविभाज्य आहेत. जेथें एक आली तेथें दुसरीही आपोआपच येते. एखाद्या लहानशा–मर्यादित–स्थलाचा विचार आपल्या मनांत आला कीं, त्याबरोबरच त्या बाहेरील अमर्याद स्थलाची कल्पनाही आपल्या मनांत आपो-आप येते. अमर्याद स्थलांतच कांहीं वस्तुसंघ निर्माण होऊन त्यांतून मर्यादित स्थलाची उत्पत्ति होत असल्यामुळें, या दोन्ही कल्पना एकसमयावच्छेदें-करून आपल्या मनांत उभ्या राहतात. मर्यादित वस्तु ही अमर्याद वस्तूचा भाग असल्यामुळें, त्यांची संलग्नावस्थाच आपल्या चित्तांत उत्पन्न होते. या-करितां मर्यादित वस्तूचा विचार करावयाचा म्हटलें, कीं त्याबरोबर अमर्याद वस्तूचीही कल्पना चित्तांत असली पाहिजे. एखाद्या विशिष्ट कालाचा–काल-भागाचा–विचार आपल्या मनांत आल्याबरोबर अनंतकालापैकीं हा 'अमुक भाग' असें आपल्या मनांत येतें. हा कालभाग म्हणजे मर्यादित काल असून अनंत–अमर्याद–काल त्यापलीकडे आहे. अशाच रीतीनें कोणत्याही अमर्यादित

वस्तूचा विचार करावयाचा म्हटलें, कीं अमर्यादाचा विचारही आपोआप उत्पन्न होतो. या दोन विचारांची जोडी फोडणें आपणांस शक्य नाहीं. याच विचार-सरणीनें आपण पुढें चाललों, तर पुरुष–आत्मा–हा अमर्याद–सर्वव्यापी–असला पाहिजे असें आपणांस आढळून येईल. आतां येथें एक असा प्रश्न उद्भवतो कीं अमर्याद–सर्वव्यापी–अशा स्वरूपाच्या दोन वस्तू एकाच वेळीं असूं शकतील काय ? अशा प्रकारच्या दोन वस्तू असूं शकतील असेंही घटकाभर गृहीत धरून चालूं. या दोन वस्तूंना आपण ‘ अ ’ आणि ‘ ब ’ अशीं नांवें देऊं. या दोन वस्तू एकत्र आल्याबरोबर प्रथम एकमेकांनाच मर्यादा घालतील. कारण, ‘ अ ’ वस्तू ती ‘ ब ’ नव्हे आणि ‘ ब ’ वस्तू ती ‘ अ ’ नव्हे, हें उघड आहे. या दोहोंचीं स्वरूपें कसल्या तरी बाबतींत भिन्न असलीं पाहिजेत; म्हणजे त्या वस्तू स्वरूपाच्या बाबतींत आपोआपच मर्यादित झाल्या. यावरून दोन अमर्याद वस्तू एकत्र असणें शक्य नाहीं. याकरितां अमर्याद–सर्वव्यापी–वस्तु एकच असूं शकेल. तसेंच सर्वव्यापो वस्तूचे भाग करतां येणेंही शक्य नाहीं. सर्व-व्यापी वस्तूचे भाग केले, तरीही ती वस्तू सर्वव्यापीच राहील; कारण, तिचे भाग पाडले तरी ते ऐकमेकांपासून भिन्न करतां येणें शक्यच नाहीं. पाण्याचा एक अमर्याद समुद्र आहे अशी आपण कल्पना करूं. त्यांतून एखादाही थेंब निराळा करतां येणें आपणांस शक्य नाहीं. कारण, तो निराळा केला अशी कल्पना केली, तर त्या समुद्राच्या मूलरूपांत तेवढ्या थेंबानें उणेपणा आला असें होईल. ज्यांत उणेपणा येतो ती वस्तु अमर्याद होऊं शकणार नाहीं. या-करितां एक अमर्याद वस्तु आणि तिचे भाग या दोन कल्पना एकत्र राहूंच शकत नाहींत. अमर्याद वस्तु म्हटलीं कीं ती एकच असली पाहिजे आणि तीही अविभाज्यच असली पाहिजे हें सिद्ध झालें. अमर्याद वस्तु दोन असल्या, तर त्या एकमेकींसच मर्यादित करतील. तसेंच अमर्याद वस्तूचे भाग पाडले, तर त्या भागामुळेंच तिला मर्यादा पडेल. अस्तु.

आतां हीं प्रमाणेंही बाजूला ठेविलीं तरी याहूनही बलवत्तर प्रमाणें आम-च्याशीं आहेत. पुरुष एकच आहे. इतकेंच नव्हे तर सर्व विश्वही एकरूप आहे असें आमचें म्हणणें आहे. आपण आपलीं पूर्वीचीं बीजगणितांतील चिन्हें पुन्हां एकवार घेऊं. ‘क्ष’ + ‘चित्ताचा अंश’ यांच्या संयोगानें बाह्य जग निर्माण होतें आणि ‘ब’ + ‘चित्ताचा अंश’ यांच्या संयोगानें

अंतःसृष्टि निर्माण होते, हें आपण पूर्वी सिद्ध केलेंच आहे. 'क्ष' आणि 'ब' या दोन अज्ञात आणि अज्ञेय वस्तू आहेत, हेंही आतां आपणांस माहीत आहेच. मन या शब्दाचा अर्थ तरी काय? मन ही संज्ञा आपण ज्या वस्तूला लावतों तिची शास्त्रीय व्याख्या काय? मन म्हणजे काल-देश-निमित्त. मन ही वस्तु तयार होण्याला या तीन मूलवस्तू लागतात. कोणत्याही गोष्टीबद्दल तुम्ही विचार करूं लागलां, कीं त्याबरोबर कालकल्पना तुमच्या ठिकाणीं अवश्यमेव उद्भवते. कालाच्या साहाय्यावांचून त्या वस्तूचा विचार सुरू होणेंच शक्य नाहीं. त्याचप्रमाणें त्या वस्तूचें स्थल आणि निमित्त हीं प्रथम मनांत आल्यावांचून, त्या वस्तूबद्दल कोणत्याही प्रकारची विचारपरंपरा सुरू होणें शक्य नाहीं. 'अमुक वस्तु' इतका विचार चित्तांत आल्याबरोबर 'ती अमुक कालीं आणि स्थलीं असलेली व अमुक निमित्तामुळें उत्पन्न झालेली' इतकी विचारपरंपरा चित्तांत प्रथमच तयार होते. या विचारपरंपरेचा अभाव झाला तर त्या वस्तूबद्दलच्या कल्पनेचाही अभाव होईल. वस्तु 'क्ष' स्वरूपाची असो अगर 'ब' स्वरूपाची असो. तिजबद्दल विचारपरंपरा सुरू होण्यास, ती या देश-काल-निमित्ताच्या उपाधींत प्रथम बांधली गेली पाहिजे. या मर्यादात्रयीनें ती निगडित झाल्यानंतरच पुढील विचारपरंपरेला सुरवात होणें शक्य आहे. या तिहींचा अभाव झाला तर त्या अभावाबरोबर मनाचाही अभाव होईल. कोणत्याही उपाधीनें युक्त नाहीं अशा वस्तूबद्दल मन कधींही चिंतन करूं शकणार नाहीं. अशा एखाद्या वस्तूबद्दल विचार करून पहा, म्हणजे या उपाधित्रयीच्या साहाय्यावांचून चिंतनक्रिया सुरूच होत नाहीं असें तुम्हांस आढळून येईल. आतां खुद्द या उपाधित्रयीबद्दल विचार केला, तर तिलाही स्वतंत्र अस्तित्व नाहीं–तिचें अस्तित्व वस्तूवर अवलंबून आहे –असें आढळून येईल. जर विश्व अदृश्य झालें, तर देश-काल-निमित्त ही उपाधित्रयी तरी कोठें राहील? अशा रीतीनें वस्तुकल्पना आणि उपाधिकल्पना या संयुक्त कल्पना आहेत. त्या परस्परावलंबी कल्पना आहेत. त्यांपैकीं एक नष्ट झाली तर दुसरीही आपोआप तिच्यामागें जाईल. या दोन्ही कल्पना नष्ट झाल्यावर मनही आपोआपच निष्क्रिय होणार. तें पूर्ण निष्क्रिय झालें–त्याचें मनपण नष्ट झालें–म्हणजे शेवटीं काय उरेल? जें कांहीं उरेल तें एकरूपच उरेल. त्या [illegible]णीं [illegible] आणि [illegible] भेदही

प्रतीत होणार नाहींत. कारण, हे भेदही मनाचेंच कार्य आहे. हीं दोन निराळीं आहेत हा भेद मनानेंच निर्माण केला आहे, हें अगदीं उघड आहे. एकंदर वस्तुजातांत असा भेद निर्माण करून एकाला बाह्यविश्व आणि दुसऱ्याला अंतःसृष्टि अशीं नांवेंही माननेंच दिलीं आहेत. ‘क्ष’ आणि ‘ब’ हीं दोन्ही स्वरूपें वस्तुतः अज्ञात व अज्ञेय आहेत. तीं अमुक एका स्वरूपाचीं आहेत असें स्वतंत्रपणें—आपल्या मनाच्या साहाय्यावांचून—सांगतां येणें शक्यच नाहीं. याकरितां तीं एकरूपच आहेत. ज्या वस्तुजातावर कोणत्याही गुणाचा अथवा उपाधीचा आरोप स्वतंत्रपणें करतां येत नाहीं, तें सर्व वस्तुजात एकरूपच असलें पाहिजे. केवलस्वरूपाची वस्तु एकच असूं शकेल, त्या दोन असणें शक्यच नाहीं, हें आपण सिद्ध केलेंच आहे. याकरितां गुणोपाधिकल्पना शिल्लक आहे तोंपर्यंतच भेद दिसेल आणि ती कल्पना नष्ट होण्याबरोबर जें कांहीं उरेल तें केवलरूप—एकरूप—मात्र उरेल. ‘क्ष’ आणि ‘ब’ हीं दोन्ही रूपें वस्तुतः निर्गुण आहेत. त्यांच्या ठिकाणीं गुणांचा आरोप मनामुळें केला जातो. याकरितां या दोन्ही निर्गुण वस्तू खरोखर एकरूपच असल्या पाहिजेत.

सर्व विश्व वस्तुतः एकरूपच आहे. विश्वांत पुरुष एकच आहे, आणि अस्तित्व—सत्—एकच आहे. ज्या वेळीं हें सत् देश-काल-निमित्त या उपाधीनें बद्ध झाल्यासारखें दिसूं लागतें, त्या वेळीं त्याला महत्, अहंकार, तन्मात्रें, महाभूतें इत्यादि नांवें प्राप्त होतात. या विश्वांत प्रतीत होणारीं सर्व जडरूपें आणि विचार, मन, इत्यादि रूपें हीं सर्व त्या एकरूपाचींच आहेत. तें एकच अनेक रूपांनीं प्रतीत होत आहे; तें एक देश-काल-निमित्त या उपाधीच्या जाळ्यांत सांपडलें कीं त्याला आकार उत्पन्न होऊं लागतात, या जाळ्याचा उच्छेद झाला तर तें पूर्वी जसें एकरूप होतें, तसेंच तें पुन्हां होईल; जें एक या विश्वरूपानें प्रतीत होत आहे, त्याला अद्वैतमतानें ब्रह्म असें नांव दिलें आहे. ब्रह्मांडाच्या पाठीमागें जें प्रकाशक ब्रह्म असतें त्याला ईश्वर आणि पिंडाच्या मागें जें प्रकाशक ब्रह्म त्याला आत्मा असें नांव आहे. येथपर्यंत केलेल्या विवेचनावरून आत्मा आणि ईश्वर यांचें स्वरूप एकच कसें आहे, हें आपल्या लक्ष्यांत आलें असेल. ईश्वर आणि मनुष्य यांच्या स्वरूपांचें पृथक्करण केलें, तर ते दोघेही एकरूपच आहेत असें सिद्ध होतें. याकरितां

तुम्ही स्वतःच वास्तविक विश्वरूप आहां असें म्हणायला काय हरकत आहे ? हें सर्व विश्व तुम्हींच व्यापिलें आहे. तुम्हीं नाहीं असें ठिकाण साऱ्या विश्वांत एकही नाहीं. "**सर्वतः पाणिपादं तत्सर्वतोऽक्षिशिरोमुखम् । सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ॥**" ( गीता १३. १३. ) सर्व हस्तांनीं तुम्हीच काम करीत आहां, सर्व मुखांनीं तुम्हीच भक्षण करीत आहां; आणि सर्व मनांतून विचारही तुम्हीच करीत आहां. तुम्हीच सर्व विश्व आहां. हें दृश्य विश्व तुमचेंच शरीर आहे. अव्यक्त अथवा व्यक्त विश्व हीं दोन्ही तुमचींच रूपें आहेत. ज्याप्रमाणें विश्वाचा आत्मा म्हणजे तुम्हीच आहां, त्याचप्रमाणें शरीरही तुम्हीच आहां. तुम्हीच परमेश्वर, तुम्हीच देवदूत, तुम्हीच मनुष्य, तुम्हीच पशुपक्षी, तुम्हीच झाडेंझुडपें आणि खनिज पदार्थही तुम्हीच आहां. जें जें कांहीं दिसतें तें तें सर्व तुम्हीच. ज्याला अस्तित्व म्हणून आहे तें सर्व तुम्हीच. आतां येथें एक गोष्ट मात्र विशेषेंकरून लक्ष्यांत बाळगली पाहिजे, ती ही कीं 'तुम्ही' या शब्दाचा अर्थ या लहानशा देहांत स्वतःस कोंडून बसलेला अहंकारी 'मी' असा नाहीं; तर तुमचें जें मूलरूप—शुद्धरूप—तें, असें समजावें.

आतां येथें एक प्रश्न असा उद्भवतो कीं, सर्वव्यापी स्वरूपाचे असे जे तुम्ही ते अनेक रूपांनीं कसे दिसूं लागलां ? तुमचे इतके अगणित तुकडे कसे झाले ? मनुष्यें, पशुपक्षी, झाडेंझुडपें इत्यादि अनेक रूपें तुम्हीं कशीं घेतलीं ? या प्रश्नाला अद्वैतमताचें उत्तर असें आहे कीं, हे सर्व भाग केवळ दृश्यमात्र आहेत. वस्तुतः तुमचे भाग झालेले नसून अनेक भाग झाल्याचा भास मात्र होतो. अमर्यादाचे भाग करतां येणें शक्य नाहीं हें आपण प्रथम सिद्ध केलेंच आहे; याकरितां, आपण केवळ अंश आहों ही कल्पनाच संभवत नाहीं. ही कल्पना निर्भेळ खोटी आहे. मी म्हणजे 'अमुक राजश्री' ह्या कल्पनेला कोणत्याच काळीं सत्यत्व नव्हतें आणि पुढेंही कधीं येणार नाहीं. ही कल्पना निवळ स्वप्नरूप आहे. "**एतद्बुद्ध्वा बुद्धिमान् स्यात् कृतकृत्यश्च भारत ।** ( गीता १५. २० ). ही खूण पटवून घ्या आणि मुक्त व्हा. अद्वैतमताचा हाच सिद्धांत आहे. "**मनोबुद्ध्यहंकारचित्तानि नाहम् । न च श्रोत्रजिव्हे न च घ्राणनेत्रे ॥ न च व्योमभूमिर्न तेजो न वायुः । चिदानंदरूपः शिवोऽहं शिवोऽहम् ॥**" ( निर्वाणषट्कम् १. ) हेंच ज्ञान. याखेरीज बाकी जें कांहीं

उरलें तें सारें अज्ञान. तें सर्व अज्ञानाचा परिणाम आहे. याकरितां 'मला ज्ञान मिळविलें पाहिजे' ही भाषाच चुकीची आहे! कारण मी स्वतःच ज्ञानरूप आहें! मी स्वतःच चिद्रूप आहें! जीवित हें माझ्या चिद्रूपाचें एक व्यक्तरूप आहे इतकेंच; माझ्यावांचून या जगत्रयांत कशालाही अस्तित्व नाहीं. हें सारें अस्तित्व मीच आहें. मीच भूतांचीं रूपें धारण करतों; तथापि वस्तुतः मी मुक्त आणि एकरूपच आहें! मुक्तीची इच्छा तरी मला कशाला हवी? मुक्तीची इच्छा मी मुळींच करीत नाहीं. कारण मी बद्ध असा कधींच नव्हतों. तुम्ही स्वतः 'बद्ध' असें म्हटलें, कीं मग तुम्हांला सोडविणारा कोणीही नाहीं. मग तुम्हांला बद्धच राहिलें पाहिजे. आपल्या पायांत अडकविण्या-करितां तुम्हीच 'बद्ध' ही श्रृंखला घडवितां. "**असोनियां मुक्त बळें झाला बद्ध। घेउनियां छंद माझें माझें॥**" अशी वस्तुस्थिति आहे. तुम्ही मुक्त आहां ही खूण तुम्हांला एकवार पटली, कीं त्याक्षणींच तुम्ही मुक्त आहां— हेंच ज्ञान. सर्व प्रकृतीचा शेवट होण्याचें ठिकाण हेंच.



## प्रकरण ४ थें

## मुक्त आत्मा

पूर्वी केलेल्या सांख्यमताच्या विवरणावरून, प्रकृति आणि पुरुष–आत्मा–अशीं दोन अनंत तत्त्वें आहेत असें श्रीकपिलांचें मत आहे, हें आपल्या लक्ष्यांत आलेंच असेल. हें मत द्वैतवादी आहे. आत्मे अनेक असून ते मिश्ररूप नसल्यामुळें त्यांना अंत नाहीं; आणि तसेंच प्रकृति ही वारंवार परिणाम पावत असून तद्वारा हीं अनेक रूपें ती धारण करीत असली, तरी ती जड-स्वभाव आहे असें सांख्यांचें म्हणणें आहे. त्यांच्या मताप्रमाणें प्रकृतीचें समवायीरूप अमिश्र आहे, आणि ती अनेक मिश्ररूपें धारण करते, त्याचा हेतु आत्म्याची मुक्ति हाच होय, "**पुरुषमोक्षनिमित्तं प्रवृत्तिः प्रधानस्य।**" ( सांख्यकारिका ५७ ). आपण स्वतः प्रकृतिरूप नसून केवलरूप–अमिश्ररूप–आहों अशी खूण पुरुषाला पटणें हीच त्याची मुक्ति. पुरुषानें या अनेक रूपांचा अभ्यास करून, आपण त्या रूपांहून निराळे आहों अशी खूण पटवून घ्यावी, याचसाठीं प्रकृतीनें हा सारा खटाटोप केला आहे. प्रत्येक पुरुष सर्वव्यापी आहे, असेंही सांख्यांस कबूल करावें लागतें, हेंही आपण पाहिलेंच आहे. पुरुष हा कोणत्याही पदार्थांच्या मिश्रणाचें कार्य नसून, तो केवलरूप असल्यामुळें त्याला मर्यादा घालणारा कोणीही नाहीं. कारण कोणत्याही पदार्थाला मर्यादा पडते ती देश-काल-निमित्त या उपाधीमुळें पडत असते. पुरुष या साऱ्या उपाधींच्या पलीकडचा आहे. याकरितां त्याला मर्यादा उत्पन्न होणें केवळ अशक्यच आहे. उपाधि उत्पन्न होण्याकरितां स्थलमर्यादा अवश्य असली पाहिजे. स्थलमर्यादा म्हणजे विशिष्ट आकार अथवा देह. देह अथवा आकार हें प्रकृतीचें कार्य आहे. जर पुरुषला आकार असेल तर तोही प्रकृतीचेंच कार्य होईल. याकरितां पुरुषाला आकार असणें शक्य नाहीं. निराकार वस्तु अमुक एका स्थळीं आहे असा तिजबद्दल निर्देश करतां येणें शक्य नाहीं. ती सर्वत्र–सर्वव्यापी–असली पाहिजे. सांख्यमताचा एकंदर मथितार्थ इतकाच आहे. यापलीकडे सांख्यशास्त्र जाऊं शकत नाहीं.

सांख्यशास्त्राविरुद्ध अद्वैतवाद्यांचा जो पहिला मोठा आक्षेप आहे तो हा कीं, सांख्यशास्त्र अपुरें आहे. प्रकृति केवलरूप आहे आणि पुरुषहि केवलरूप

आहे असें म्हटलें, तर दोन केवलरूप पदार्थांचें अस्तित्व सिद्ध होईल. आत्मा सर्वव्यापी आहे हें सिद्ध करण्याकरितां आपण जीं प्रमाणें उभीं केलीं तीं सर्व या स्थलींहि लागू पडतील. या प्रमाणांवरून प्रकृति ही देश–काल–निमित्ताच्या पलीकडे आहे असें सिद्ध होईल. प्रकृतिलाही उपाधि लागूं शकत नाहीं असें सिद्ध झालें, तर उपाधीच्या अभावीं तिच्यांतही बदलाबदल होणें शक्य नाहीं; आणि बदलाबदलीच्या अभावीं अनेक आकार दिसणेंही शक्य नाहीं असेंच म्हणावें लागेल. प्रकृति स्वयमेव–केवलरूप–आहे असें मानण्यांत आणखीही एक अडचणीची जागा आहे. ती ही कीं दोन स्वयमेव–केवलरूप–सर्वव्यापी पदार्थांचें अस्तित्व कबूल करावें लागेल, आणि हें म्हणणें तर उघड उघड अशक्य आहे.

अशा प्रकारच्या अडचणींतून वेदान्तानें आपला मार्ग कसा काढला आहे हें पाहूं. प्रकृति जडस्वभाव असल्यामुळें तिच्यामागें चैतन्याचें अधिष्ठान असल्यावांचून मनाला विचारशक्ति प्राप्त होणें शक्य नाहीं, अथवा प्रकृतीलाहि महदादि रूपें धारण करतां येणें शक्य नाहीं. स्थूलपदार्थापासून तों थेट महत्तत्त्वापर्यंत प्रकृतीला अनेक रूपें धारण करतां येत असलीं, तरी ती जडस्वभाव आहे. ज्या चैतन्याच्या अधिष्ठानामुळें प्रकृति हीं अनेक रूपें धारण करते, त्या चैतन्याला ईश्वर असें नांव वेदान्त्यांनीं दिलें आहे. ज्या अर्थीं हें विश्व त्या चैतन्याच्या अधिष्ठानामुळेंच प्रतीत होतें, त्या अर्थीं तें त्याहून निराळें आहे असें म्हणतां येत नाहीं. ईश्वरच या अनेक रूपांच्या द्वारें प्रतीत झाला आहे. या विश्वाचें तो केवळ निमित्तकारण आहे असें नाहीं, तर तो त्याचें उपादानकारणहि आहे. कुंभार मातीचीं मडकीं घडतो, त्या वेळीं तो स्वतः मडक्याचें निमित्तकारण असून, माती ही उपादानकारण असते. कारण आणि कार्य हीं एकस्वभाव असतात असें आपण पूर्वी अनेकवार सिद्ध केलेंच आहे. कार्य हें कारणाचेंच रूपांतर असतें. कारण आणि कार्य यांच्या स्वभावांत भिन्नता नसून ती फक्त रूपांत असते, हा आपला नेहमींचा अनुभव आहे; याकरितां अस्तित्व हेंच प्रकृतीचें कारण आहे. 'असणें' पणाचा धर्म हा प्रकृतीचा स्वभाव आहे. द्वैती, विशिष्टाद्वैती अथवा अद्वैती, यांपैकीं कोणत्याही वेदान्त्याच्या मतांचा निष्कर्ष आपण काढला, तर आपणांस असें आढळून येईल कीं, ईश्वर हा जगाचें केवळ निमित्तकारण आहे असें नसून, तो त्याचें

उपादानकारणही आहे; याबद्दल त्या सर्वांची एकवाक्यता आहे. या विश्वांत जें जें कांहीं प्रतीतीला येतें तें सर्व तोच आहे. त्याचप्रमाणें प्रत्येक जीवात्मा हा ईश्वराचाच अंशभूत आहे असें वेदान्तमत आहे. जीवात्मा हा त्या अनंत अग्नीचा एक स्फुलिंग आहे. "**तदेतत्सत्यं यथा सुदीप्तात्पावकाद्विस्फुलिंगाः सहस्रशः प्रभवंते सरूपाः ॥ तथाक्षराद्विविधाः सोम्यभावाः प्रजायंते तत्र तत्र चैवापियंति ॥**" (मुंडकोपनिषत् २. १). ज्याप्रमाणें मोठ्या पेटलेल्या अग्नींतून लक्षावधि ठिणग्या उडतात, त्याचप्रमाणें या प्राचीन एकरूपांतून हे आत्मे जन्म पावले आहेत; हें सर्व वेदान्त्यांचें मत आहे. या मताबद्दल निरनिराळ्या आचार्यांत एकवाक्यता आहे आणि येथपर्यंत केलेलें विवेचन आपणा सर्वांस पटण्याजोगेंही आहे; तथापि एवढ्यानें पूर्ण समाधान होतें असें मात्र नाहीं. 'अनंतरूपाचा अंशभूत' या शब्दांचा अर्थ काय ? जें अनंत आहे तें अविभाज्य असतें असा सिद्धांत आहे. अनंताचे–केवलरूपाचे–भाग पाडतां येणें जर शक्य नाहीं, तर जीवात्मे त्याचेच अंशभूत आहेत असें कसें म्हणतां येईल ? या शंकेचें समाधान अद्वैतमतानें केलें आहे. जीवात्मे हे ईश्वराचे अंशभूत आहेत हें खरें, पण त्याचा अर्थ ईश्वराचे इतके भाग पडले असा नाहीं. प्रत्येक जीवात्मा हा ईश्वराचा लहानसा भाग आहे असें नसून तो पूर्ण ईश्वरच आहे. तो पूर्णब्रह्मरूप आहे. आतां यावर अशी एक शंका उद्भवते कीं, जितके जीवात्मे तितके ईश्वर–ब्रह्में–आहेत कीं काय ? जीवात्मे अनंत आहेत; आणि प्रत्येक जीवात्मा पूर्ण ईश्वर आहे असें म्हटलें, तर ईश्वरही अनंत आहेत असेंच झालें. या शंकेचें समाधान असें आहे कीं, सूर्य उगवला म्हणजे पाण्याच्या लक्षावधि बिंदूंत लक्षावधि सूर्यप्रतिबिंबें दिसतात. प्रत्येक बिंदूंत सूर्याची एक लहानशी पण हुबेहूब प्रतिमा असते. त्याचप्रमाणें प्रत्येक जीवात्मा ईश्वराचें प्रतिबिंब आहे. जीवात्मा हा खरा ईश्वर नसून ईश्वराचें प्रतिबिंब मात्र आहे. या विश्वाचा प्रकाशक जो ईश्वर, त्याचीं हीं सारीं प्रतिबिंबें आहेत. त्याचीं अनंत प्रतिबिंबें पडून मनुष्यें आणि पशुपक्ष्यादि सृष्टि निर्माण झाली आहे. सर्व दृश्य विश्व हें प्रतिबिंबरूप आहे. प्रकृतीवर ईश्वराचें प्रतिबिंब पडलें, म्हणजे तिचीं अनेक रूपें चैतन्ययुक्त दिसूं लागतात. हीं अनेक रूपें प्रकृतीचीं आहेत. याकरितां त्यांचें अस्तित्व खरें नसून तें मृगजलासारखें आहे. हीं सर्व रूपें भ्रामक आहेत. या विश्वांत जें कांहीं आहे तें अनंत–एकरूपच–आहे.

आणि तेंच 'मी,' 'तूं,' 'तो' इत्यादि अनेक रूपांनीं दिसत आहे. याकरितां 'मी,' 'तूं,' 'तो' इत्यादि प्रकारांनीं दिसणारा भेद खरा—चिररूप—नसून, केवळ भ्रमामुळें तो भासत आहे. ईश्वराच्या ठिकाणीं खरा भेद उत्पन्न झाला नसून, तो उत्पन्न झाल्यासारखा भास मात्र होतो. आतां हा भास तरी कसा उत्पन्न झाला, याचा विचार करणें अवश्य आहे. हा भास, देश-काल-निमित्त या उपाधीमुळें उत्पन्न झाला आहे. या उपाधीच्याद्वारा आपण ईश्वराकडे अवलोकन करीत असल्यामुळें, तो अनेकशः भिन्न झाल्यासारखा दिसतो. देश-काल-निमित्त ही उपाधि जडरूप असल्यामुळें, तद्द्वारा अवलोकिलेलें परमात्मरूपही जडविश्वाच्या रूपानें प्रतीत होतें. या उपाधीचा, केवळ जड असलेला अंश टाकून, त्याहून उच्च अंशांतून त्याच परमात्मरूपाकडे आपण पाहिलें, तर तेंही पशू, पक्षी इत्यादि चैतन्ययुक्त रूपांनीं गोचर होतें. त्याहूनही अधिक उच्चतर अंशांतून तेंच रूप, मनुष्य या रूपानें दिसतें. हीच उपाधि त्याहूनहि अधिक शुद्ध स्वरूपाची केली, तर तेंच रूप देव या रूपानें दिसेल. याप्रमाणें उपाधिभेदामुळें अनेक रूपें प्रतीत होत असलीं, तरी वस्तुतः सर्वत्र एकच रूप भरलें आहे. एकच परमात्मा—ब्रह्म—सर्वत्र आहे; आणि तेंच ब्रह्म आपण आहों. मीही वस्तुतः ब्रह्म आहें आणि आपण सर्वही ब्रह्मच आहों. आपण त्याचे भाग नसून संपूर्ण ब्रह्मच आहों. या विश्वरूप देखाव्याच्या मागें तोच अनंत आणि सर्वज्ञ आहे. तोच हें विश्व नटला आहे. तोच 'मी' आणि तोच 'तूं' आहे. हा सर्वज्ञ स्वतःला कसा जाणतो? जाणणारा स्वतःला जाणूं शकत नाहीं. आपण सर्व वस्तू पाहूं शकतों, पण स्वतःला मात्र पाहूं शकत नाहीं. त्याचप्रमाणें परमात्मा, सर्वज्ञ, सर्वांचा अधिष्ठाता, सत्यरूप आणि या विश्वांतील देखाव्याचें मूळकारण असूनही स्वतःला जाणूं शकत नाहीं. त्याला स्वतःला जाणावयाचें असेल तर तें प्रतिबिंबरूपानें मात्र जाणतां येईल. आपणांस आपलें तोंड पहावयाला इच्छा झाली तर आपण आरसा मध्यस्थ घेतों. त्यांत प्रतिबिंबित झालेलें आपलें तोंड आपण पाहूं शकतों, त्याचप्रमाणें सर्वज्ञालाही स्वतःचें रूप पाहावयाचें असलें, तर एखाद्या मध्यस्थाची मदत घ्यावी लागते. त्या मध्यस्थांत प्रतिबिंबित झालेलें स्वतःचें रूप सर्वज्ञ पाहूं शकेल. मध्यस्थाच्या मदतीशिवाय आत्मरूपाचें ज्ञान त्याला होणार नाहीं. हें सर्व विश्व त्या अनंत सर्वज्ञाच्या आरशासारखें आहे. स्वतःचें रूप पाहण्याची इच्छा

त्याला झाली, म्हणजे प्रथम एखाद्या सूक्ष्म बीजकोशांत तो तें पाहूं लागतो. या बीजकोशापासून त्याची दृष्टि अधिक अधिक विस्तृत होऊं लागली, म्हणजे अधिक विस्तृत आकाराचे आरसे—झाडेंझुडपें, पशुपक्षी इत्यादि—तयार होऊं लागतात. हे आरसे क्रमानें अधिकाधिक श्रेष्ठ होत जातात; व सर्वांत श्रेष्ठ आरसा म्हणजे पूर्णत्व पावलेला मनुष्य. एखाद्या मनुष्याला स्वतःचें तोंड पाहावेंसें वाटलें, आणि त्यानें एखाद्या गढूळ डबक्यांत पाहिलें, तर त्याच्या चेहऱ्याची सामान्य रूपरेषा मात्र त्याला दिसेल; पण त्याहून अधिक स्वच्छ पाण्यांत पाहिल्यास, स्वतःचें तेंच रूप त्याला अधिक स्पष्ट दिसेल; त्यानंतर एखाद्या धातूच्या चकचकीत पत्र्याकडे त्यानें पाहिलें, तर तेंच स्वच्छ पाण्यांतील रूपाहूनही अधिक स्पष्ट होईल; आणि त्यानें स्वच्छ बिलोरी आरशांत पाहिलें, तर स्वतःचें अत्यंत स्पष्टरूप—जसें आहे तसें—त्याला दिसेल. पूर्णत्व पावलेला मनुष्य हा या आरशासारखा आहे. त्यांत त्या अनंत सर्वज्ञाचें यथास्थित प्रतिबिंब उतरलेलें असतें. मनुष्यप्राणी सृष्टपदार्थांची पूजा स्वभावतःच कां करतो, आणि त्याला त्यांची स्वभावतःच आवड कां आहे, हें तुम्हांस आतां कळलें असेल. पूर्णत्व पावलेल्या मनुष्याचे पदरज, लक्षावधि लोक डोक्यावर घेतात याचें रहस्यही हेंच आहे. त्यांचा अधिक्षेप कोणी कितीही केला, तरी जनतेच्या दृष्टीनें ते पूज्यच ठरणार ! भगवान् बुद्ध आणि भगवान् ख्रिस्त यांचीं नांवें, याच कारणानें पूज्य गणिलीं जातात. अनंत सर्वज्ञाच्या त्या शुद्ध प्रतिमा होत. ईश्वर कसा असेल याबद्दल कितीही उच्च कल्पना आपण केल्या, तरी त्या यांच्या प्रत्यक्ष उच्चत्वाच्या पासंगालाही लागणार नाहींत. ईश्वराबद्दल केवढीही विशाल कल्पना आपल्या डोक्यांत उद्भवली, तरी ती या प्रत्यक्षापुढें केवळ बिंदुवत् होईल. त्यांच्या ठिकाणीं ध्याता, ध्येय आणि ध्यान, ही त्रिपुटी एकरूप झालेली असते. त्यांचा भ्रमनिरास पूर्ण झालेला असतो. आपण सर्वकाळ एकरूपच आहों ही खूण त्यांना पूर्णत्वानें पटलेली असते. जर आम्ही सर्व परमात्मरूप आहों—स्वतंत्र आहों—असें म्हणतां, तर सृष्टीच्या कायद्याच्या खोड्यांत आमचे पाय अडकले हें कसें ? या बंधनाची उत्पत्ति कोठून झाली ? पूर्णत्व हाच ज्याचा स्वभाव, तो प्राणी अवनत होऊन अपूर्णत्वाला कसा गेला ? या प्रश्नांना अद्वैतानें असें उत्तर दिलें आहे कीं, तुम्ही परतंत्र कधींच नव्हतां, सध्या नाहीं आणि पुढेंही कधीं होणार नाहीं. तुम्ही सदैव स्वतंत्रच आहां. आकाशांत

नाना रंगांचे अनेक ढग येऊन थोडा वेळ राहतात आणि जातात, पण त्यांचा कांहीं परिणाम आकाशावर होतो काय? आकाशाला त्यांचा लेप कधीं लागतो काय? अनेक रंगांचे ढग आले आणि गेले, तरी त्यामुळें आकाशाच्या नील-प्रभेंत कांहीं फरक पडत नाहीं; तें सदैव एकरंगीच असतें. ढगाच्या रंगांत वारंवार बदल झाला, तरी आकाशाचा रंग पालटत नाहीं. त्याचप्रमाणें तुम्ही सर्वकाळ पूर्णच आहां; तो तुमचा हक्कच आहे; तो तुमच्याकडून काढून घेण्याला कोणी समर्थ नाहीं. 'मी अपूर्ण आहें, मी पुरुष आहें, मी स्त्री आहें, मी पापी आहें, मी मनःस्वरूप आहें, मी विचार करतों' इत्यादि भावना शुद्ध मृगजलासारख्या आहेत. तुम्हांला शरीर नाहीं, मन नाहीं आणि तुम्ही केव्हां विचारही करीत नाहींत. अपूर्ण अशा अवस्थेंत तुम्ही केव्हांच नव्हतां. या सर्व विश्वाचे चालक तुम्हीच. तुम्ही सदैव कल्याणरूप आहां. जें कांहीं आज जन्माला आलें आहे, आणि जें पुढें जन्माला येणार असेल, त्या सर्वांचे शास्ते तुम्हीच आहां. विश्वांत दिसणारे सूर्य, चंद्र, तारे, ग्रह, आणि उपग्रह, तसेंच अनेक लोक व त्यांतील झाडेंझुडपें इत्यादिकांवर तुमचीच सत्ता आहे. तुम्ही आहां म्हणून सूर्याला त्याचा प्रकाश प्राप्त झाला आहे; तुमच्या तेजाच्या अंशानें तारे चमकत आहेत. तुमच्यापासूनच पृथ्वीला तिचें सौंदर्य प्राप्त झालें आहे. तुमच्या प्रेमसागरांतील तुषार या विश्वांतील वस्तूंना प्राप्त होतात; आणि त्यामुळेंच तीं प्रेमानें एकमेकांना कवटाळू पाहतात. गुरुत्वाकर्षणाच्या कायद्याचा हाच अर्थ आहे. सर्वत्र तुमचेंच अधिष्ठान आहे—किंबहुना सर्व तुम्हीच आहां. अशा स्थितींत प्रिय कोण आणि द्वेष्य तरी कोण? घ्यावें कोणाला आणि टाकावें तरी कोणाला? आपण स्वतःच सर्व कांहीं आहों, या ज्ञानाचा प्रत्यय आला म्हणजे सध्याच्या स्वप्नांतून तुम्ही जागे व्हाल.

हिंदुस्थानांतील एका निर्जन अरण्यांत मी एके वेळीं प्रवास करीत होतों. त्या अरण्यांत सुमारें एक महिनाभर मी प्रवास केला. तेथें कित्येक वेळां अत्यंत सुंदर देखावे मला दिसत असत. एखाद्या तळ्यांत नवपल्लवांनीं सुशोभित झालेली वृक्षराजी मला दिसे. स्फटिकासारख्या पाण्यांत नवीन पालवलेल्या वृक्षलतांचें प्रतिबिंब पडलें, म्हणजे, त्या संयोगाचा देखावा खरोखर मनोहर असतो. एके दिवशीं भर दोनप्रहरीं बराच वेळ चालल्यामुळें मला फार तहान लागली होती. थोड्याशा अंतरावर अशाच प्रकारचें एक तळें

मला दिसत होतें. त्या धोरणानें मी तेथें गेलों; आणि पाहतों तों तेथें पाणी मुळींच नव्हतें! मृगजलाच्या देखाव्याबद्दल ग्रंथांतरीं अनेक गोष्टी मीं वाचल्या होत्या, पण त्याबद्दल मला यथार्थ कल्पना मात्र नव्हती. त्या साऱ्या गोष्टी मला त्या वेळीं एका झपाट्यासरशा आठवल्या, आणि मला जें हसूं कोसळलें तें सांगतां येत नाहीं. मृगजलाबद्दल आगाऊ ज्ञान मला होतें; पण तें पुस्तकी ज्ञान! सबंध एक महिना मी अशीं तळीं रोज पाहत असतांही, तें मृगजल असेल अशी कल्पनाही कधीं माझ्या चित्ताला शिवली नाहीं! ही गोष्ट घडल्यानंतरही कित्येक दिवस त्या अरण्यांत मी फिरत होतों, आणि पुन्हां पुन्हां तोच देखावा मला कित्येक वेळां दिसला; पण मला अनुभवानें शहाणपण प्राप्त झालें होतें, यामुळें तो देखावा दिसल्याबरोबर 'मृगजल' एवढाच शब्द माझ्या मनांत उभा राही. त्याचा खोटेपणा मला अनुभवानें पटल्याबरोबर, त्याच्यांतील फसविण्याचें सामर्थ्य नष्ट झालें! त्याचप्रमाणें हें विश्वरूपी मृगजलही एखादे दिवशीं आपलें खरें स्वरूप दाखवील. त्या दिवशीं या विश्वरूपी मृगजलाची वाफ होऊन ती हवेंत मिसळून जाईल. विश्व मुळांतच नव्हतें असें तुम्ही म्हणूं लागाल! यालाच ब्रह्मानुभव म्हणतात. तत्त्वज्ञान हें केवळ बोलण्याकरितां नाहीं, अथवा तो चेष्टेचाही विषय नाहीं. त्यांतील प्रत्येक अक्षराचा अनुभव निःसंशय येईल. त्या वेळीं हें शरीर वितळून जाईल; ही पृथ्वी आणि इतर साऱ्या वस्तूही नाहींशा होतील. मी शरीरधारी आहें, आणि मला मन आहे, या कल्पनाही कांहीं काळ नष्ट होतील; अथवा तुमचें कर्म संपुष्टांत आलें असलें, तर या कल्पना सर्वथा नष्ट होतील; आणि त्या पुन्हां केव्हांही परत येणार नाहींत. कर्मभोग अंशतः तरी शिल्लक असेल, तर हें शरीर कर्मक्षयापर्यंत चालू राहील. मडकें तयार करावयाचें असलें, म्हणजे मातीचा गोळा एका चक्रावर ठेवून, कुंभार तें चक्र गरगर फिरवितो. मडकें तयार झाल्यावरही पूर्वी दिलेला वेग शिल्लक असेपर्यंत चक्र फिरतच असतें. त्याचप्रमाणें विश्वाचें अस्तित्व केवळ आभासरूप आहे; आणि देहही या आभासांपैकींच आहे, असा अनुभव आला तरी ज्या पूर्वकर्मांमुळें हा देह उत्पन्न झाला आहे, त्यांचा क्षय होईपर्यंत तो राहीलच. असा अनुभवाच्या स्थितींतून परत आला, म्हणजे त्याला जग पुन्हां स्त्रीपुरुष, जनावरें, झाडेंझुडपें इत्यादिकांनीं गजबजलें आहे असें दिसूं लागेल.

पण असें झालें तरी त्याबरोबर पूर्वानुभवाचें ज्ञान मात्र नष्ट होणार नाहीं. यामुळें सध्या आपणाला जग जसें शृंखलेसारखें होऊन बसलें आहे, तसें तें त्याला होणार नाहीं. त्याला पुन्हां कसलेंही दुःख प्राप्त होणार नाहीं, अथवा अमुक गोष्ट अनिष्ट आहे असेंही वाटणार नाहीं. सामान्य जनतेच्या दृष्टीनें दुःखकारक अशी कांहीं गोष्ट घडली, तर तें मृगजल आहे—स्वप्नवत्—आहे असा त्याच्या बुद्धीचा निश्चय होईल. स्वप्नांतील गोष्टीचें सुखदुःख तें काय असणार ? अशा स्थितीला पोहोंचलेल्या मनुष्याला जीवन्मुक्त असें म्हणतात. जीवन्मुक्त म्हणजे देहधारी असतांही मुक्तावस्थेंत असलेला मनुष्य. चालू आयुष्यांत ज्ञानयोगाचें साध्य म्हटलें म्हणजे ही जीवन्मुक्तस्थिति प्राप्त करून घेणें हेंच आहे. जीवन्मुक्त पुरुष या जगांत राहिला तरी, त्यांतील वस्तूंशीं तो आसक्त असत नाहीं. कमळाचें पान पाण्यांत राहूनही जसें ओलें होत नाहीं, त्याचप्रमाणें जीवन्मुक्त पुरुष जगांत राहूनही, जगांतील वस्तूं-पासून अलिप्त राहतो. सर्व मानवी प्राण्यांत—किंबहुना सर्व प्रकारच्या प्राण्यांत—असा पुरुष श्रेष्ठ असतो. आपण स्वतः केवलरूप आहों—परमेश्वरस्वरूप आहों, असा अनुभव त्याला झालेला असतो. जोंपर्यंत परमेश्वरस्वरूपांत आणि आपणांत थोडेंतरी अंतर आहे असें आपणांस वाटत असेल, तोंपर्यंत आपण निर्भय झालों असें म्हणतां येणार नाहीं; तोंपर्यंत आमच्या अंतःकरणांत भीति केव्हां प्रवेश करील याचा नेम नाहीं; पण परमात्मा आणि आपण एकरूपच आहों, आपणांत आणि त्याच्यांत कसलाही भेद नाहीं, किंबहुना आपणच तो आहों असा अनुभव आला, म्हणजे भीतीचें ठाणें काय-मचेंच उठेल. अशा स्थितींत द्रष्टा कोण आणि दृश्य कोण ? पूजक कोण आणि पूज्य कोण ? वक्ता कोण आणि श्रोता कोण ? जोंपर्यंत द्वैत शिल्लक आहे तोंपर्यंतच हे भेद. "**यत्र हि द्वैतमिव भवति तदितर इतरं पश्यति तदितर इतरं जिघ्रति तदितर इतरं रसयते तदितर इतरमभिवदति तदितर इतरं शृणोति यत्र त्वस्य सर्वमात्मैवाभूत्तत्केन कं पश्येत्तत्केन कं जिघ्रेत्केन कं रसयेत्केन कमभिवदेत्केन कं श्रुणुयात्**" ( बृहदारण्यकोपनिषत् ५. १५ ). जेथें द्रष्टा आणि दृश्य हा भेद नाहीं, आणि जेथें श्रोता आणि वक्ता हा भेद नाहीं, तेंच ब्रह्म. एक वेळ तुम्ही ब्रह्मरूप झालां म्हणजे सदोदित तुम्ही ब्रह्मरूप राहतां. "अशा स्थितींत जगाची वाट काय होईल ? आपणाकडून

उपयुक्त असें कांहीं कार्य होईल काय ?" असेही प्रश्न कोणीकोणी विचारतात; पण अशा स्थितींत हे प्रश्न संभवतच नाहींत. एखादा लहान मुलगा उद्यां असेंही म्हणेल कीं, "मी मोठा झाल्यावर माझ्या खाऊचें काय होईल ? माझ्या खेळावयाच्या गोट्यांचें काय होईल ? मी मोठी झालें तर माझ्या बाहुल्यांचें कसें होईल ? याकरितां मी मोठी होणारच नाहीं." जगाबद्दल नुकतेच सांगितलेले प्रश्न याच मासल्याचे आहेत. जगाला वस्तुतः पूर्वी अस्तित्व नव्हतें, सध्यां नाहीं, आणि पुढेंही कधीं असणार नाहीं. आत्म्याचें वास्तविक स्वरूप कसें आहे हें आपण जाणलें, तर सर्वत्र केवळ आत्मरूपच आहे असें आपल्या प्रत्ययाला येईल. जगांत दिसणारे अनेक आकार हे स्वप्नांतील वस्तूंसारखे असून, त्यांस वास्तविक अस्तित्व नाहीं असा प्रत्यय आल्यानंतर, जगांतील दुःखें, आपत्ती, दुष्टपणा अथवा चांगुलपणा, यांचा कोणताच परिणाम आपणावर होणार नाहीं; जर या अनंत वस्तूंना अस्तित्वच नाहीं असें दिसून आलें तर त्यांत बरें आणि वाईट ही निवड तरी कोणीं आणि कशी करावी ? ज्ञानयोग्यांनीं जें कांहीं आपणांस शिकविलें आहे तें हेंच. यासाठीं निधड्या छातीनें पुढें सरा आणि मुक्त व्हा. आपली बुद्धि खंबीर करून, तिनें दाखविलेल्या मार्गानें पुढें पाऊल टाका. ज्ञानमार्ग सोपा नाहीं. त्यावर आरूड होणाऱ्याला 'लोखंडाचे चणे' खावे लागतात. नामरूपाचा भंग करून जो पुढें सरेल, त्यालाच ज्ञानप्राप्ति होईल. केवळ शूरालाच ज्ञानमार्गावर आरूढ होणें शक्य आहे. इंद्रियांच्या आणि बुद्धिच्याही ताब्यांत राहून ज्ञान मिळविणें शक्य नाहीं. या दोहोंच्याही बाहेर गेल्यानंतर ती तुम्हांस सांपडेल.

हें स्थूल शरीर म्हणजे 'मी' नव्हें. याकरितां या शरिराबद्दलचे सर्व विचार सोडून दिले पाहिजेत. अशा प्रकारच्या तत्त्वज्ञानाच्या गोष्टी ऐकून अनेक लोक भांबावून जातात आणि विलक्षण प्रश्न विचारूं लागतात. एक म्हणतो, 'हें सारें ज्ञान मला तंतोतंत पटलें; 'मी' म्हणजे शरीर नव्हे हेंही मला समजलें, पण माझें डोकें अजून तसेंच दुखतें, तें अद्यापि थांबलें नाहीं.' जर आपल्या सगळ्या शरिरालाच अस्तित्व नाहीं, तर डोकेंतरी कोठून आलें ? त्याला तरी अस्तित्व कसें असेल ? हजारों देह आणि डोकीं जातात व येतात. त्यांचें आम्हांस काय ?

**मनोबुद्ध्यहंकारचित्तानि नाहं न च श्रोत्रजिह्वे न च घ्राणनेत्रे ।**
**न च व्योम भूमिर्न तेजो न वायुश्चिदानंदरूपः शिवोहं शिवोहम् ॥ १ ॥**

"जर माझे हजार देह दुःखांत आणि रोगांत खितपत पडले असतील, तर दुसरे हजार आरोग्यसुख भोगीत असतील. जर हजार देह भुकेनें व्याकूळ झाले असतील, तर दुसरे हजार पंचपक्वान्नें खात बसले असतील. जर हजार देहांत मी दुःख भोगीत असेन, तर दुसऱ्या हजारांत मी आनंदाच्या उच्च पर्वतावर बसलों असेन. आतां मीं निंदा कोणाची करावी अथवा स्तुति तरी कोणाची करावी ? मी कोणाच्या पाठीमागें लागावें अथवा कोणाला चुकविण्याचा यत्न करावा ? मी माझीच स्तुति करतों आणि मी माझीच निंदाही करतों; कारण, हें सारें विश्व मीच आहें. मीं माझ्या इच्छेप्रमाणें दुःख अथवा सुख भोगतों; कारण, मी स्वतंत्र असल्यामुळें माझ्या इच्छेप्रमाणें वागण्याला मी मोकळा आहें." हें ज्ञानमार्गाचें अंतिम पर्यवसान आहे. खरा ज्ञानी म्हटला, म्हणजे सदोदित शूर आणि निधड्या छातीचा असतो. जगांतील कोणत्याही परिस्थितीनें त्याचें चित्त कंप पावत नाहीं. "**आतां वसुधातळही बुडो। वरी हें गगनमंडळही पडो ॥**" ज्ञान्याच्या मुखावरील मधुर हास्याचा भंग होत नाहीं. जगाला मुळांतच अस्तित्व नव्हतें, आणि आपण पाहतों तें सारें स्वप्न आहे, ही त्याची जाणीव कधींही नष्ट होत नाहीं. सर्व विश्व वितळत जाऊन अखेर गुप्त होतें हें तो—ज्ञानी—पाहत असतो. मग विश्व पूर्वी असून नाहींसें झालें कीं तें मुळांतच नव्हतें, इतकाच प्रश्न तो स्वतःला विचारीत असतो.

या ज्ञानमार्गाच्या व्यवहार्य रूपासंबंधीं विचार करण्यापूर्वी आणखी एका बौद्धिक प्रश्नाचा विचार करूं. आरंभापासून आतांपर्यंत केलेलें विवेचन आपल्या तारतम्यबुद्धीला किती धरून आहे, हें आपल्या लक्ष्यांत आलेंच असेल. आतांपर्यंत गुंफलेली विचारमालिका तर्कशास्त्राशीं इतकी पक्की जखडली गेली आहे, कीं, तींत कोठेंही बोट शिरकावयास जागा नाहीं. आपल्या विवेचकबुद्धीला धरूनच या प्रश्नांचा विचार करावयाचा असा ज्याचा खरोखर निर्धार असेल, त्याला अद्वैतसिद्धांतापर्यंत मजल मारल्यावांचून गत्यंतरच नाहीं. एकात्मता हें सत्य आणि अनेकात्मता हें स्वप्न हाच शेवटचा सिद्धांत आहे असें त्याला कबूल करावें लागेल. बुद्धिगम्य मार्गानें जाणाऱ्या मनुष्याला हा सिद्धांत कबूल करणें भागच आहे. आतां येथें एक असा प्रश्न उद्भवतो कीं, जें अनंत, स्वयंपूर्ण

आणि आनंदमय असें सच्चिदानंदरूप, त्याच्या ठिकाणीं या विश्वभ्रमाची उत्पत्ति झाली कशी? जगाच्या आरंभापासून अनेक वेळीं आणि अनेक ठिकाणीं या प्रश्नाची चर्चा झाली आहे. शास्त्रीय भाषा सोडून देऊन ग्राम्य भाषेनें हाच प्रश्न विचारावयाचा झाला, तर "जगांत पापाची उत्पत्ति कशी झाली?" असा हा प्रश्न होईल. "ब्रह्माच्या ठिकाणीं जगद्भ्रम निर्माण झाला कसा?" ही शास्त्रीय भाषा झाली; आणि जगांत पाप उत्पन्न झालें कसें, ही ग्राम्य भाषा झाली. यांत फरक फक्त भाषेचाच आहे; जगाच्या आरंभापासून अस्तित्वांत असलेले तत्त्वग्रंथ चाळून पाहिले, तर हा प्रश्न अगदीं आरंभापासून उद्भवला असल्याचें आपणांस आढळून येईल. या दोन्ही प्रश्नांचें उत्तर एकच आहे. प्रश्न वेगळ्या भाषेंत असले, तरी त्यांचें तात्पर्य एकच असल्यामुळें त्यांचें उत्तरही एकच असणार हें उघड आहे. जगांत पाप कसें उद्भवलें, या प्रश्नाला ख्रिस्ती शास्त्रानें जें उत्तर दिलें आहे, त्यानें विवेचकबुद्धीचें समाधान मुळींच होणार नाहीं. मनुष्यजातीचा आद्यजनक आडाम आणि त्याची बायको ईव्ह, हीं परमेश्वराजवळ नंदनवनांत राहत होतीं. तेथें एक ज्ञानवृक्ष होता. त्याचीं फळें खाऊं नको असें परमेश्वरानें आडामला सांगितलें होतें; पण एका सर्पानें ईव्हच्या द्वारें त्याचा बुद्धिभेद करून त्याजकडून तें फळ खावविलें. हा परमेश्वराचा हुकूम आद्यपित्यानें तोडल्यामुळें जगांत पापाची उत्पत्ति झाली. 'जगांत पापाची उत्पत्ति कशी झाली' हा प्रश्न जसा अत्यंत पोरकट आहे, त्याचप्रमाणें त्याला साजेसें हें उत्तरही पोरकटच आहे. जसा प्रश्न तसें उत्तर. पण सृष्टिरचनेचा विचार आपण शास्त्रीयरीत्या सुरू केला म्हणजे या प्रश्नालाही शास्त्रीयस्वरूप प्राप्त होऊन, 'पूर्णाच्या ठिकाणीं जगद्भ्रम कसा झाला?' असें त्याचें पारिभाषिक भाषेंत भाषांतर होतें हा प्रश्न फारच नाजूक आहे आणि याचें उत्तरही त्याला साजेशा नाजुक भाषेंतच दिलें पाहिजे. याचें उत्तर थोडक्यांत असें आहे कीं, तुमचा प्रश्नच अशक्य कोटींतला असल्यामुळें त्याला उत्तर संभवतच नाहीं. हा प्रश्न विचारण्याचा तुम्हांला अधिकारच नाहीं. कां? पूर्णव म्हणजे काय याचा विचार आपण पूर्वीं केलाच आहे. देश-काल-निमित्त या उपाधीच्या पलीकडे जें कांहीं आहे, तें पूर्णरूप, अशी आपण त्याची व्याख्या सिद्ध केली, हें आपणांस आठवत असेलच. आतां तुमचा प्रश्न असा आहे कीं, पूर्णत्वास अपूर्णत्व कां प्राप्त झालें? शुद्ध तर्कशास्त्राच्या परिभाषेंत

हा प्रश्न विचारावयाचा झाला, तर 'जें निमित्ताच्या पलीकडचें आहे, त्याला निमित्त कसें लागलें?' असा विचारतां येईल. या वाक्यांत पृच्छक स्वतःलाच कसा खोडून काढीत आहे, तें पहा. निमित्ताच्या पलीकडे पूर्णत्व आहे, हें वाक्याच्या आरंभींच पृच्छक कबूल करीत आहे; आणि नंतर, तें निमित्ताच्या उपाधींत कसें आलें, असा वाक्याचा उत्तरार्ध आहे. देश-काल-निमित्त ह्या उपाधीच्या हद्दींतच प्रश्न आणि उत्तरें संभवतात. या हद्दीच्या आंत आल्यावांचून प्रश्न करतांच येत नाहीं; पण ही हद्द ओलांडली गेली म्हणजे प्रश्नच असंभाव्य होतो. कारण, तसें करणें तर्कशास्त्राला सोडून होईल. यामुळें प्रश्नच जर संभवत नाहीं तर त्याला उत्तर तरी कोठून येईल. देश-काल-निमित्त या उपाधीच्या हद्दींतच प्रश्न संभवतात आणि त्यांचीं उत्तरेंही मिळतात. यापलीकडे जें कांहीं उत्तर असेल त्याचा प्रत्यक्ष अनुभव, ही हद्द ओलांडल्यानंतर प्राप्त होईल. याकरितां या प्रश्नावर डोकेफोड करणें म्हणजे असंभाव्य गोष्टींच्या मागें लागण्यासारखें आहे हें लक्ष्यांत ठेवून, हा असंभाव्य प्रश्न बाजूला ठेवणें यांतच शहाणपण आहे. एखाद्या मनुष्याला कांहीं रोग झाला तर प्रथम औषध घेऊन बरें होणें हें चांगलें, कीं हा रोग उद्भवला कसा याची शुष्क काथ्याकूट करीत बसणें चांगलें, हें आपणच ठरवा.

हाच प्रश्न केवळ शास्त्रीय परिभाषेंतून थोडा अलीकडे आणला, तर तो अधिक व्यवहार्य आणि स्पष्टीकरणात्मक होतो. व्यवहार्य भाषेंत हा प्रश्न विचारावयाचा म्हटला तर हा भ्रम कोण उत्पन्न करतें, या शब्दांनीं विचारतां येईल. हा भ्रम सत्यानेंच उत्पन्न केला असेल काय? नाहीं, खचित नाहीं. भ्रमापासूनच भ्रम उत्पन्न होतो. रोगापासूनच रोग उद्भवतो. आरोग्य हें रोगाचें कारण कधीं स्वप्नांत तरी होऊं शकेल काय? पाण्यापासून लाट उद्भवते, तथापि पाणी आणि लाट यांत वास्तविक कसलाच फरक असत नाहीं. कारण आणि कार्य हीं सदैव एकरूप असतात, असें आपण पूर्वीं अनेकवार सिद्ध केलेंच आहे. कार्याचें जें कांहीं स्वरूप असेल तेंच कारणाचेंही स्वरूप असलें पाहिजे. आपण सध्या ज्याचा विचार करीत आहों, तें कार्य भ्रम हें आहे. याकरितां याचें कारणही भ्रम हेंच असलें पाहिजे. हा भ्रम कोणीं उत्पन्न केला, या प्रश्नाला उत्तर 'दुसऱ्या भ्रमानें' हेंच. हा दुसरा भ्रम कोणीं निर्माण केला असाही प्रश्न उपस्थित झाला, तर त्याला उत्तर 'तिसऱ्या

भ्रमानें ' हेंच. अशा रीतीनें आपण चाललों, तर भ्रमाला प्रथम कोणीं उत्पन्न केलें हें सांगतां येणें शक्य नाहीं. भ्रम हासुद्धां अनादिच म्हटला पाहिजे. आतां यापुढें फक्त एकच प्रश्न विचारण्याचा अधिकार तुम्हांस उरतो. "भ्रम" अनादि आहे असें तुम्ही म्हणतां, आणि आत्मा अनादि आहे हें तुम्हीं अगोदरच सिद्ध केलें आहे; अर्थात् दोन अनादि वस्तूंचें अस्तित्व तुम्हीं कबूल केल्यासारखें झालें. मग "**एकमेवाद्वितीयम्**" या तुमच्या अद्वैतमताची वाट काय? यावर आमचें उत्तर असें आहे कीं, भ्रम हा अस्तित्वरूप आहे असें म्हणतां येत नाहीं. आपल्या आयुष्यक्रमांत हजारों स्वप्नें आपणांस पडतात; पण त्यामुळें तुमच्या जीवनक्रमाचा ओघ यत्किंचित् तरी बदलतो काय? स्वप्नें येतात आणि जातात; त्यांना वास्तविक रीतीनें अस्तित्व आहे असें म्हणतां येत नाहीं. भ्रमाला खरोखर अस्तित्व आहे असें म्हणणें म्हणजे नुसता शब्दच्छल अथवा वक्रवाद करणें होईल. याकरितां सच्चिदानंद हेंच एक अस्तित्व विश्वांत आहे असें म्हटलें पाहिजे. हेंच तुमचें खरें स्वरूप आहे. अद्वैतमताचा शेवटचा सिद्धांत हाच आहे.

आतां केवळ व्यावहारिक दृष्ट्या येथें एक प्रश्न संभवतो. जर सर्वच एक आहे असें म्हटलें, तर नाना धर्म, नाना पंथ, नाना मतें, नाना प्रकारचे पूजाविधी आणि उपासनापद्धती जगांत चालू आहेत त्यांची वाट काय? शास्त्रीय दृष्ट्या अद्वैत मत बरोबर असलें, तरी तें सर्वांना एकदम पटेल असें नाहीं. याकरितां नाना पंथ आणि पूजाविधी यांचें अस्तित्व जगांत राहणारच. हे नाना पंथ आणि नाना विधी परमेश्वराच्या भेटीकरितां अंधारांत चांचपडत आहेत. कोठूनतरी उजेड येऊन आपला रस्ता आपणांस दिसूं लागेल असें त्यांस वाटत आहे. आत्मा स्वतःला पाहूं शकत नाहीं हें आपण अगोदर सिद्ध केलेंच आहे. आपलें सर्व ज्ञान एकत्र केलें तरी तें मायेच्या (भ्रमाच्या) विस्ताराबाहेर जाऊं शकत नाहीं. आणि स्वातंत्र्य–मुक्ति–ही मायेच्या पलीकडची स्थिति आहे. मायेच्या हद्दींत आपण आहों तोंवर तिच्या कायद्यांची अंमलबजावणीं ती आपल्यावर करणारच. तोंवर आपण तिचे बंदेगुलाम आहोंच. तिच्या राज्याची हद्द ओलांडून आपण पलीकडे गेलों म्हणजे तिचे कायदे पाळण्याची गरज आपणांस नाहीं. सच्चिदानंदरूप विश्वरूपानें दिसत आहे, तोंपर्यंत मायेच्या कायद्याची सत्ता त्याजवर आहेच; पण त्यापलीकडे

तिची सत्ता संपुष्टांत येईल. जोंपर्यंत देश-काल-निमित्त या उपाधीची हद्द आपण ओलांडली नाहीं, तोंपर्यंत आपल्या स्वातंत्र्याच्या सर्व वल्गना व्यर्थ आहेत. मायेच्या कायद्याचें जाळें असें पक्कें विणलेलें आहे कीं, त्यांतून सुटका होण्याला तिच्या हद्दीच्या बाहेरच गेलें पाहिजे. तिच्या राज्यांत राहून तिच्या कायद्यांतून आपण पळवाटा शोधून काढूं, ही तुमची घमेंड फुकट आहे. तुमच्या मनांत उद्भवणारा प्रत्येक विचार हा कारणाचें कार्य आहे. प्रत्येक विकारसुद्धां कार्यरूप आहे. याकरितां आमची इच्छा स्वतंत्र आहे असें म्हणणें शुद्ध वेडेपणाचें आहे. सच्चिदानंदाचा अंश मायेच्या राज्यांत येऊन कायद्याच्या जाळ्यांत अडकल्यानंतर इच्छा आणि बुद्धि यांचा जन्म होतो. बुद्धि हा मायेच्या जाळ्यांत सांपडलेला सच्चिदानंदाचा अंश आहे. मग ती स्वतंत्र असणें शक्य आहे काय ? मायेचें आवरण आहे तोंपर्यंत स्वातंत्र्य हा शब्दही संभवत नाहीं.

ज्याप्रमाणें एखादा दगड अथवा हें टेबल केवळ परतंत्र आहे, त्याचप्रमाणें तुमचा प्रत्येक विचार, तुमचा प्रत्येक शब्द, तुमची प्रत्येक कृति आणि तुमचें मनही परतंत्र आहे. मी या क्षणीं आपणांशीं भाषण करीत आहें आणि आपण ऐकत आहां; हीं दोन्हीं कर्में देश-काल-निमित्त यांच्या मर्यादेंतील आहेत. मायेच्या पलीकडे गेल्यावांचून खऱ्या स्वातंत्र्याची प्राप्ति होऊं शकतच नाहीं. आत्म्याच्या खऱ्या स्वतंत्र्याचें ठिकाण तेंच आहे. मायेच्या राज्यांत आपण इतके पक्के जखडले गेलों आहों, हें तत्त्व तीक्ष्णबुद्धीच्या माणसाला अगदीं सुलभ-पणें लक्ष्यांत येण्याजोगें आहे. कारण हें तत्त्व तर्कशास्त्राच्या जंत्रींत इतकें पक्कें बांधलेलें आहे कीं, बुद्धिगम्य मार्गानें जाणाराला तें कबूल केल्यावांचून गत्यंतरच नाहीं; पण स्वतःच्या पारतंत्र्याची कबुली बुद्धि देत असतांही त्याच वेळीं आपण स्वतंत्र आहों ही भावनाही आपणांस पक्की चिकटून बसली आहे. 'मी स्वतंत्र आहें' ही भावना आपणांस कोणत्याही क्षणीं सोडून जात नाहीं. ही भावना नष्ट झाली तर आपल्या हातून कोणतेंही कर्म घडणें शक्य नाहीं. कोणतीही गोष्ट करण्याचा विचार आपल्या चित्तांत येवो, त्या वेळीं तसें करण्याला आपण मुखत्यार आहों—स्वतंत्र आहों—ही भावना जागृत नसेल तर आपल्या हातून त्या कर्माचा आरंभही होणार नाहीं. यावरून कोणतेंही कर्म सुरू होण्यापूर्वी आपल्या चित्तांत स्वातंत्र्यकल्पनेचें अस्तित्व असतें असें सिद्ध होतें. पारतंत्र्याच्या पाशांत जखडून बांधलेल्या आम्हां मनुष्याच्या

ठिकाणीं 'मी स्वतंत्र आहें' ही जाणीव कोठून उद्भवते ? आकाश वस्तुतः नीलवर्णाचें असून ढगांनीं व्यापलें गेलें म्हणजे तें त्या ढगांच्या रंगाचें दिसूं लागतें; आणि त्याचा निळा रंग मधूनमधून फाटलेल्या ढगांच्या फटींतून मात्र दिसत असतो. त्याचप्रमाणें आमच्या स्वतंत्र—सदैव मुक्त—आत्म्यावर मायेचें आवरण पूर्ण असतांही, त्याच्या स्वातंत्र्याची प्रभा मधूनमधून अंशतः मात्र दिसत असते. आपलें खरें स्वातंत्र्य या आवरणाच्या मागें आहे. आपल्या स्वातंत्र्याच्या साऱ्या बढाया हें मधूनमधून दिसणारें अंशस्वरूप आहे. या मायेच्या राज्यांत, या भ्रमांत, अनेकतेनें भासणाऱ्या या विश्वाच्या कल्पनेंत आणि इंद्रियें, देह व मन यांनीं निर्माण केलेल्या हद्दींत, स्वातंत्र्याचा पूर्ण प्रत्यय येणें शक्यच नाहीं. आमच्या डोक्यांत भरून राहिलेल्या या विश्वकल्पनेचें शास्त्रीय दृष्ट्या पृथक्करण केलें तर काय दिसून येतें ? तर स्वप्न; त्याला आदि नाहीं आणि अंतही नाहीं. लगाम नसलेल्या घोड्याप्रमाणें उधळलेल्या आणि अनावर अशा आपल्या मनाच्या या साऱ्या उड्या; ज्याला कांहीं धरबंध उरलेला नाहीं, आणि ज्यांत कोठेंहि एकतानता नाहीं, अशी ही आपली विश्वकल्पना आहे. वीस हातांचा एक राक्षस आपणांस धरण्यास येत आहे आणि आपण पळत सुटलों आहों असें स्वप्न आपणांस पडलें, तरी त्याक्षणीं 'तें खोटें आहे,' असें आपल्या मनांत येत नाहीं. यांत कांहीं गैरशिस्त झालें असें आपणांस वाटत नाहीं. मायेच्या राज्यांतील कायद्यांचा कडकपणा अशाच प्रकारचा आहे. स्वप्न शिल्लक आहे तोंपर्यंत त्यांत घडणाऱ्या साऱ्या गोष्टी बरोबर आहेत, असेंच वाटत असतें. विश्वांत सर्व गोष्टी नियमबद्ध आहेत असें आपण म्हणतों. त्यांना विश्वव्यापी कायदे असें आपण गंभीर नांव देतों; पण त्यांचा कायदेपणा हें स्वप्न सुरू असेपर्यंतच आहे. त्या कायद्यांना आणि नियमांना वास्तविक अस्तित्व नाहीं. विश्वकल्पना हाच भ्रम; मग त्यांतील कायद्यांना तरी सत्यत्व कोठून येणार ? अनेकतेनें भासमान होणाऱ्या विश्वांत ज्या अनेक घटना घडत आहेत, ती केवळ यदृच्छा आहे. कावळा बसावयाला आणि खांदी मोडायला गांठ पडली, म्हणून 'कावळा बसला म्हणजे खांदी मोडते' असा नियम नव्हे; त्याचप्रमाणें विश्वांतील अनेक घटना याच प्रकारच्या काकतालीय न्यायानें घडतात. जगद्भ्रम शिल्लक आहे तोंपर्यंत तो कायदाच असें आपणांस वाटत असतें. देश-काल-निमित्त या मायेच्या हद्दींत आपण आहों, तोंवर या

कायद्यांना अस्तित्व असल्यामुळें त्या हद्दींत स्वातंत्र्य मिळणें शक्य नाहीं. याकरितां आपलीं सारीं कर्मे, आपलें परमेशपूजन आणि आपली उपासना, हींसुद्धां मायेच्या राज्यांतीलच आहेत. परमेश्वराच्या अस्तित्वाबद्दलची आणि मनुष्य व पशु यांच्या अस्तित्वाबद्दलची आपली कल्पना, यासुद्धां मायेंतीलच आहेत; आणि ज्या अर्थी या कल्पना मायिक आहेत, त्या अर्थी त्याही भ्रमरूपच आहेत. ही सारीं स्वप्नें आहेत. आतां येथें एक गोष्ट मात्र अवश्य लक्ष्यांत ठेवली पाहिजे. सध्याच्या काळीं निरीश्वरवाद्यांचा ऐक नवाच पंथ निघाला आहे. ईश्वराचें अस्तित्व स्वप्नवत् आहे–तोही एक भ्रम आहे–असें ते म्हणतात. पण असें म्हणत असतांही जगाचें अस्तित्व खरें आहे असें त्यांस वाटत असतें. ज्या तर्कशास्त्रपद्धतीनें ईश्वराचें अस्तित्व ते नाकारतात, त्याच पद्धतीनें जगही भ्रमरूप आहे असें सिद्ध होतें. या दोन्ही कल्पना एकमेकींशीं इतक्या संलग्न आहेत कीं, त्यांपैकीं एकीचें अस्तित्व मानावयाचें असेल, तर दुसरींचेंही अस्तित्व मानल्यावांचून गत्यंतर नाहीं. एक टाकावयाची असेल तर दुसरीही टाकली पाहिजे. ज्याला जगाचेंही अस्तित्व मान्य नसेल तोच अस्सल—सशास्त्ररीतीचा—नास्तिक म्हणतां येईल. कारण, दोहींकडेही एकाच पद्धतीची विचारसरणी लागू पडते. जर ईश्वराचें अस्तित्व हा भ्रम आहे असें म्हटलें, तर तीच विचारमालिका आणखी लांब करून, तृणापर्यंतच्या सर्व पदार्थांचें अस्तित्वही भ्रमरूपच आहे असें म्हटलें पाहिजे. परमेश्वराच्या कल्पनेंतील भ्रमाचा अंश पाहण्याइतकी ज्याची बुद्धि सूक्ष्म झाली असेल, त्याला स्वतःच्या शरिराचें आणि मनाचेंही असत्यत्व पटलें पाहिजे. परमेश्वर नष्ट झाला कीं, त्याबरोबरच देह आणि मन हींसुद्धां नष्ट झालीं पाहिजेत; आणि हीं नष्ट झालीं म्हणजे जें कांहीं उरेल, तें '**केवलरूप**' मात्र उरेल. तेंच अनाद्यनंतरूप आहे. "**नैव वाचा न मनसा प्राप्तुं शक्यो न चक्षुषा**" ( कठोपनिषत् २. ३. १२ ). शब्द, विचार, मन आणि बुद्धि यांचा आत्यंतिक विस्तार झाला, तरी तीं जेथवर पोहोंचूं शकतात, ती मायेचीच हद्द आहे, हें आपण नुकतेंच सिद्ध केलें आहे; आणि मायेच्या हद्दींत जें कांहीं असेल तें सर्व भ्रमरूप आहे, हें उघड आहे. सत्य म्हणून जें कांहीं आहे, तें त्यापलीकडे आहे. त्या ठिकाणीं विचार, मन अथवा वाणीं हीं पोहोंचूं शकत नाहींत. "**यतो वाचो निवर्तंते अप्राप्य मनसासह ।**"

येथवरची विचारमालिका अगदीं सुसंगत आहे यांत शंका नाहीं; पण आतां यापुढें असा एक प्रश्न उद्भवतो कीं, या साऱ्याचा अनुभव आपणांस कसा येईल? त्यासाठीं कांहीं अभ्यास केला पाहिजे काय? आपल्या दृष्टीनें खरा महत्त्वाचा मुद्दा हाच आहे. या एकत्वाचा अनुभव आपणांस हवा असेल तर त्याकरितां अभ्यास केला पाहिजे, हें निराळें सांगावयालाच नको. तुमचें रूपांतर होऊन त्यांतून ब्रह्म नवीन निर्माण होतें असें नाहीं. तुम्ही वस्तुतः ब्रह्मरूपच आहां; तुम्ही परमेश्वररूप–ब्रह्मरूप–होणार असें नाहीं; तुम्ही स्वयमेव पूर्णरूपच आहां. आपण तसे नाहीं असें वाटणें हाच भ्रम. 'मी अमुक व्यक्तिविशेष' असें जें आपणांस सदोदित वाटत असतें तें भ्रमामुळेंच होय. या भ्रमाचा निरास, दुसऱ्या एका प्रकारच्या भ्रमानें करावयाचा असतो. अभ्यासभ्रमानें या पूर्वभ्रमाचा निरास होतो. आगीनें आग मारण्याचा हा प्रकार आहे. जुना भ्रम नाहींसा करण्यासाठीं तेथें नवा भ्रम आपणांस उत्पन्न करावा लागतो. हा नवा भ्रम उत्पन्न झाला, म्हणजे तो जुन्या भ्रमाचें उच्चाटन करतो आणि नंतर स्वतःही नाहींसा होतो. आतां अभ्यासक्रमाचें मूलतत्त्व काय आहे याचा विचार करूं. एक गोष्ट आपण नित्य लक्ष्यांत बाळगली पाहिजे; ती ही कीं, मुक्ति ही कांहीं कोठून बाहेरून आणण्याची जिन्नस नाहीं. आपण वस्तुतः सदैव मुक्तच आहों. या वस्तुस्थितीविरुद्ध येणारी जी जी कल्पना ती भ्रमाचें कार्य आहे. 'मीं दुःखी आहें, अथवा मी सुखी आहें,' असें वाटणें हासुद्धां भ्रमच. या ठिकाणीं दुसऱ्या एका प्रकारचा भ्रम निर्माण केला पाहिजे. 'मला मुक्ति मिळवावयाची आहे, आणि त्याकरितां मला अभ्यास केला पाहिजे. त्याकरितां मला ईश्वरोपासना केली पाहिजे.' हा दुसरा भ्रम पक्का उत्पन्न झाला, म्हणजे तो पहिल्या भ्रमाला आपल्या चित्तांतून हांकून लावील आणि शेवटीं स्वतःही नाहींसा होईल.

मुसलमान लोक कोल्ह्याला अपवित्र प्राणी समजतात. तसेंच हिंदु लोक कुत्र्याला अपवित्र समजतात. खाण्याच्या एखाद्या पदार्थाला कोल्हें शिवलें, तर तो पदार्थ मुसलमान लोक फेंकून देतात. तो ते तोंडांत घालणार नाहींत. एकदां एका गरीब मुसलमानाच्या घरांत एक कोल्हें शिरलें. त्या वेळीं जेवणाची अगदीं तयारी झाली असल्यामुळें सर्व पदार्थ वाढून ठेवले होते. ते त्यांपैकीं एक खाण्याचा जिन्नस त्या कोल्ह्यानें पळविला. त्यामुळें तें सर्व अन्न

अपवित्र झालें. त्या दिवशीं त्यानें मेजवानीचा बेत केला होता, त्यामुळें त्या बिचाऱ्या मुसलमानाला फार खेद झाला. तो एका मुल्लाकडे जाऊन म्हणाला, "कोल्ह्यानें माझें अन्न अपवित्र करून टाकलें आहे. आतां कसें करावें ? मंडळी तर भुकेनें आतुर आहेत आणि आतां घरांत दुसरें अन्न नाहीं. जें कांहीं आहे तें त्या रांडलेकानें विटाळून टाकलें आहे. मुल्लानें एक क्षणभर विचार करून म्हटलें, 'एखादा कुत्रा घेऊन ये आणि त्याजकडून त्या अन्नांतला थोडासा भाग खावव. कोल्हा आणि कुत्रा यांचें जन्मजात हाडवैर असतें. याकरितां कोल्ह्याच्या स्पर्शाच्या अन्नाबरोबरच कुत्र्याच्या स्पर्शाचें अन्न तुझ्या पोटांत गेलें, म्हणजे दोन्ही एकमेकांची पापें भस्म करून टाकतील.' आपली स्थिति बऱ्याच अंशीं अशा प्रकारची झाली आहे. आपणही त्या मुसलमानासारखेच पेंचांत सांपडलों आहों. 'मी अपूर्ण आहें' या भ्रमानें आपणांस पछाडलें आहे. हा भ्रम नाहींसा करण्याकरितां 'अभ्यासानें मुक्ति मिळवावयाची आहे' हा भ्रम तेथें उत्पन्न केला पाहिजे. कांट्यानें कांटा काढण्याचा हा प्रकार आहे. 'तूं मुक्तच आहेस' एवढे नुसते शब्दही कोणास पुरे होतात. ते ऐकल्या-बरोबर कांहीं धीर पुरुष जगद्भ्रम एकदम फेंकून देऊन मोकळे होतात; पण तुमच्या आमच्यासारख्यांना ही कल्पना मगरमिठी मारून बसली आहे. तिचा दाब ढिला पाडण्याकरितां आपणांस प्रचंड खटाटोप केला पाहिजे.

ज्ञानयोगी होण्याला योग्य कोण, याचाही विचार येथें करणें अवश्य आहे. ज्ञानयोगी होण्याला कांहीं साधनांची आगाऊ तरतूद केली असली पाहिजे. कर्मफलत्याग हें पहिलें साधन आहे. आपण कोणतेंही कर्म केलें तर त्याचें ऐहिक अथवा पारलौकिक फळ मिळावें, अशी नुसती कल्पनासुद्धां चित्ताला शिवतां उपयोगी नाहीं. ही कल्पना शिरली कीं चित्त विटाळलें. आपण असा विचार करावा कीं, जर आपण या साऱ्या विश्वाचे निर्माणकर्ते आहों, तर आम्हांला जें कांहीं हवें असें वाटेल तें आपणांस खास मिळेल. कारण तें उत्पन्न करण्याचें सामर्थ्य आपल्या ठिकाणीं आहे. कोणाच्या इच्छा आजच तृप्त होतात, आणि दुसऱ्या कोणाच्या कांहीं काळानें तृप्त होतील. कारण कित्येकांचे कांहीं विशिष्ट संस्कार उदय पावले असले, तर ते इच्छातृप्तीच्या आड येत असल्यामुळें ती तृप्ति प्राप्त होण्याला अधिक वेळ लागेल इतकेंच. याकरितां, इच्छेची तृप्ति करण्यांत आयुष्याचा व्यय करणें उचित नाहीं. ती

केव्हां ना केव्हां तृप्त होणारच. मग त्याकरितां एवढा अट्टहास कां करावा? आपल्या आयुष्यांत जितक्या कांहीं खटपटी आपण करतों, त्यांत आपला एकच हेतु असतो. तो हेतु म्हणजे चैन करणें हाच. कित्येक लोकांना ऐहिक उपभोग अपुरे वाटतात आणि ते स्वर्गसुखाकरितां खटपट करीत असतात. आपल्या मनुष्यपणाला हें खरोखर उचित नाहीं. " **आशा ममता देहीं बेडी। सुसरी करिताती ताडातोडी। वोढून दुःखाचे सांकडी। माजी घालिती॥** " हें साधुवचन आपण नित्य लक्षांत बाळगण्याचा अभ्यास केला पाहिजे. जीवित हें मृगजलासारखें आहे. वस्तुतः मृत्यूलाच जीवित हें एक दुसरें नांव आहे. 'मी जीवंत आहें, मी संसार करतों' या भावनांचा त्याग करण्यास आपण शिकलें पाहिजे. या जीविताची काळजी कोणीं वहावी? आमच्याठायीं जें अनेक भ्रम आहेत त्यांतलाच हाही एक भ्रम आहे. मग या भ्रमाची पर्वा आपण कशाला करावी? एका प्रकारच्या भ्रमाला आपण सुख समजतां आणि त्याच्याच दुसऱ्या भावंडाला दुःख म्हणतों. आपल्या साऱ्या आयुष्यांतील नानाविध स्थितींचें वास्तविक स्वरूप या प्रकारचें आहे. जीवित आणि मृत्यु या दोन्ही स्थितींचा विचारच आपणांस नको. ही सारी आपल्याच मनाची प्रजा आहे. आपल्या मनानेंच हीं निर्माण केलीं आहेत. जन्ममृत्यूंचा विचार सर्वथा टाकून देणें यालाच त्याग असें म्हणतात. त्यागी मनुष्य ऐहिक अथवा पारलौकिक सुखाचा विचार कधींही करीत नाहीं—या गोष्टी त्याच्या मनांत येतच नाहींत.

ही स्थिति आपणांस प्राप्त झाल्यानंतर मनावर ताबा चालविण्याचा अभ्यास करावा. त्याजवर कसल्याही प्रकारची लाट उठूं नये इतकी शांति त्याला प्राप्त झाली पाहिजे. त्याजवर लाटा उठत आहेत, तोंपर्यंत अनेक प्रकारच्या इंद्रियसुखांचें चिंतन केल्यावांचून तें राहणार नाहीं. याकरितां मन अत्यंत स्थिर करण्यास शिकलें पाहिजे. आपल्या इच्छाशक्तीनें मनाची शांतता अशी पक्की करावी कीं, आंतल्या अथवा बाहेरच्या कारणांनीं त्यानें स्वस्थिति सोडूं नये. राजयोगांतील अथवा हठयोगांतील विशेष प्रकारच्या मानसिक अगर शारीरिक शिक्षणाची मदत ज्ञानयोगी घेत नाहीं. त्याचा मुख्य मार्ग म्हटला म्हणजे चिंतन हाच होय. आध्यात्मिक विद्येंतील प्रमेयांचें सदैव चिंतन करून ज्ञानावरील पडदा दूर करणें, स्वतःची इच्छाशक्ति दिवसेंदिवस अधिक प्रखर करीत जाणें हा त्याचा

मार्ग आहे. मुक्तिमार्गातील अडचणी दूर करण्याचीं हींच त्याचीं शस्त्रें! यानंतर तितिक्षेचा अभ्यास करणें प्रशस्त आहे. तितिक्षा म्हणजे सहन करण्याची शक्ति. केवढेंही संकट कोसळलें अथवा कसलेंही मोठें दुःख प्राप्त झालें, तरी त्याची यत्किंचितही दिक्कत न बाळगतां तें मुकाट्यानें सहन करणें याला तितिक्षा म्हणतात. कांहीं शारीरिक दुःख झालें तरी त्याकडे लक्ष्यच द्यावयाचें नाहीं. जंगलांत कोठें तुम्ही भटकत असलां आणि एखाद्या ठिकाणीं वाघ भेटला तर खुशाल उभे रहा. आपण काय म्हणून पळावें? या गोष्टींचें आपणांस आश्चर्य वाटूं देऊं नका. अशा प्रकारचा अभ्यास करून त्यांत पूर्ण यश मिळविणारीं माणसें आजही आहेत. हिंदुस्थानांत उन्हाळ्याच्या दिवसांत भर दोनप्रहरीं गंगानदीच्या तटाकीं खुशाल वर डोळे करून पडणारीं आणि भर थंडीच्या दिवसांत दिवसभर पाण्यांत डुंबणारीं माणसें आजही आहेत. या तुच्छ देहाची आणि जिवाची पर्वाच त्या माणसांना नसते. हिमालयाच्या एखाद्या हिममय शिखरावर अवधूत स्थितींत राहणारीं माणसें सध्याही आढळतात. थंडी म्हणजे काय, आणि उष्णता म्हणजे काय, या दोन्ही स्थिति त्यांच्या गांवींही नसतात. 'यदृच्छेनें घडणार असेल तें सुखेनैव घडो. मी देह नव्हे; मग त्याची स्थिति कशीही असली तरी त्याची काळजी मीं कां करावी?' हाच त्यांचा अभ्यास. तुमच्या या पाश्चात्य देशांतल्या लोकांना या गोष्टी खऱ्यासुद्धां वाटणार नाहींत. त्या खऱ्या वाटोत अगर खोट्या वाटोत, पण त्या घडतात एवढें लक्ष्यांत ठेवण्यास कांहीं हरकत नाहीं. पाश्चात्य देशांतील लोक तोफेच्या तोंडावर धांवून जातील अथवा भर लढाईच्या गर्दीत बिनदिक्कत शिरतील असा त्यांचा लौकिक आहे. त्याचप्रमाणें आध्यात्मिक विद्येच्या अनुभवाकरितां काय वाटेल तें करण्याची आम्हां पौर्वात्यांची तयारी आहे. 'देह जावो अथवा राहो' त्याची पर्वा आम्हांला नाहीं. "**चिदानंदरूपः शिवोऽहं शिवोऽहम् ।**" हेंच आमचें नित्य चिंतन. प्रत्येक प्रकारच्या व्यवहारांत चैनीचा समावेश कसा करतां येईल, याचा निदिध्यास जसा तुम्हां पाश्चात्यांस लागतो, त्याचप्रमाणें देहभावना जाऊन ब्रह्मभावना कशी उत्पन्न होईल, हा विचार रात्रंदिवस आमच्या डोळ्यांपुढें उभा असतो. धर्म म्हणजे वेड्याची बडबड नसून, त्यांतील प्रत्येक अक्षराचा आणि अक्षराच्या फांट्याचा अनुभव या एकाच आयुष्यक्रमांत कसा घेतां येईल, हें दाखविण्याची आमची

इच्छा असते. कसल्याही प्रकारच्या स्थितीबद्दल कुरकुर न करतां स्वस्थ असावयाचें, याचें नांव तितिक्षा. 'मला सुख नको, दुःख नको, सद्गुण नकोत, दुर्गुण नकोत, थंड नको, उष्ण नको, या द्वंद्वांतील कांहींच मला नको; मी केवलरूप आहें; विश्वाशीं मला काय कर्तव्य आहे?' असें म्हणणारीं माणसें मीं पाहिलीं आहेत. शरीरसुखाकरितां कसलाच उद्योग न करणें, याचें नांव तितिक्षा. सध्याचा धार्मिक मनुष्य काय करीत असतो? तो प्रार्थना करतो आणि म्हणतो, "परमेश्वरा, मला अमुक दे आणि तमुक दे." हा काय धर्म झाला? मौर्ख्यस्खलितमिदम्! असल्या भिकार प्रार्थनांना आणि उपासनांना जे धर्म समजतात, त्यांना ईश्वर आणि आत्मा यांबद्दल कांहीं कल्पनाच नाहीं, असें आपण समजा. माझ्या सद्गुरूंनीं एके वेळीं म्हटलें, "घार आकाशांत इतकी उंच जाते कीं, ती एका लहानशा ठिपक्याएवढी दिसते; पण तेथून तिचे डोळे, सडकें ढोर कोठें पडलें आहे याकडे लागलेले असतात." तुमच्या सगळ्या धर्मकल्पना एकत्र शिजवून त्यांचा अर्क काढला, तर काय निष्पन्न होतें? रस्ते साफ ठेवणें, खूप खाणें आणि चांगले कपडे घालणें; झालें, यांत सर्व धर्म आला. हा धर्म नव्हे. अन्नाची आणि कपड्याची पर्वा कोण करतो? सवा लक्षाची घडामोड रोज सुरू आहे; त्यांत हातभर अलीकडे काय आणि वीतभर पलीकडे काय? या बिंदुवत् जगांत कोंडून घेऊन, त्यांतील क्षुद्र सुखाच्या इच्छेनें लाळ कोणीं घोटावी? त्याच्या क्षणोक्षणीं पालटणाऱ्या रंगांबरोबर खेळत कोणीं बसावें? छाती असेल, तर या कोंडवाड्याच्या भिंती फोडून बाहेर पडा. चला; ह्या विश्वाच्या बाहेर, ह्या मायेच्या बाहेर, आणि ह्या कायद्यांच्या बाहेर चला. म्हणा '**चिदानंदरूपः शिवोऽहं शिवोऽहम्!!**'



## प्रकरण ५ वें

## एक तेंच अनंत

योगांचे प्रकार अनेक असले, तरी त्यांपैकीं प्रत्येकांत वैराग्याची आवश्यकता किती आहे, याचा विचार आपण केलाच आहे. ब्रह्मानुभवाच्या मार्गांतील पहिला महत्त्वाचा मुक्काम, वैराग्य हाच आहे. संसारी आणि कर्मसंगी मनुष्यानें कर्मफलत्याग करणें अवश्य आहे. वैराग्य अंगीं बाणण्याकरितां कर्मफलत्याग करण्याचा अभ्यास करावा. जो भक्त असेल, त्यानें अव्यभिचारी भक्ति करणें हेंच त्याचें वैराग्य. सर्वव्यापी आणि सर्वशक्तिमान् अशा प्रेममयाचें सदैव चिंतन करणें, हेंच त्याला योग्य आहे. त्याचें चित्त इतर कसल्याही वस्तूबद्दल चिंतन करूं लागलें, तर भक्तींत व्यभिचार होतो हें लक्ष्यांत ठेवून त्यानें क्षुद्र प्रकारच्या सर्व ममतांचा त्याग करावा. हें भक्ताचें वैराग्य. राजयोगाचा मार्ग ज्याला पसंत असेल, त्यानें विश्वशक्तींच्या अनुभवांचा त्याग करावा. त्यानें अभ्यासाला सुरवात केली म्हणजे विश्वशक्तींचे नानाप्रकारचे अनुभव त्याला प्राप्त होऊं लागतात. या एकेका अनुभवाचा त्याग करून त्यानें पुढें जावें. हें सर्व विश्व जरी पुरुषाच्या अनुभवाकरितांच निर्माण झालें आहे, तरी पुरुष विश्वांतर्गत नसून तो विश्वशक्तींच्या बाहेरचा—पलीकडचा—आहे, हा शेवटचा अनुभव मिळविण्याकरितां राजयोग्याची सारी खटपट असते. हा अनुभव प्राप्त होईपर्यंत, मध्यंतरीं कोठेंही मुक्काम न करण्याचा निश्चय त्यानें केला पाहिजे. याकरितां सर्व प्रकारच्या क्षुद्र अनुभवांचा त्याग त्यानें करावा. ज्ञानयोग्यानें तर आरंभींच सर्व वस्तूंचा त्याग केला पाहिजे. कारण, या विश्वाला वस्तुतः अस्तित्वच नाहीं, हा त्याचा शेवटचा सिद्धांत आहे. विश्वाला पूर्वी कधीं अस्तित्व नव्हतें, सध्या नाहीं आणि पुढें कधीं असणारही नाहीं. हा सिद्धांत चित्तांत बाणण्याकरितां, सर्व भ्रमांचा—वस्तूंचा—त्याग त्याला अवश्य आहे.

धर्ममार्गाचा उपयोग व्यवहारांत कितपत होईल असा प्रश्न विचारणें मूर्खपणाचें आहे, याचें विवेचनही आपण पूर्वी केलेंच आहे. उच्च आणि शुद्ध वातावरणांत भराऱ्या मारण्याची इच्छा करणारांनीं, अशुद्ध आणि जड वातावरणाचा विचारही मनांत आणणें अयोग्य आहे. धर्माचा उपयोग व्यवहारांत

किती आहे, हा प्रश्नच विचारार्ह नाहीं हें खरें; तथापि आतांपर्यंत केलेल्या विवेचनाचा संगतवार विचार केला, तर आपणांस काय आढळून येतें? कोणत्याही वस्तूची उपयुक्तता ठरविण्याचा आपला कस काय आहे? त्या वस्तूपासून होणारी सुखप्राप्ति हाच आपला कस आहे. ज्या वस्तूपासून आपणांस सुखाची प्राप्ति होते, ती वस्तु उपयोगी आहे असें आपण म्हणतों. व्यवहारांतील सर्व वस्तूंची उपयुक्तता ठरविण्याचें माप सुखप्राप्ति हेंच होय. या दृष्टीनें विचार केला म्हणजे, ज्यापासून आपणांस अत्यंत सुखाची प्राप्ति होईल, ती वस्तु अत्यंत उपयुक्त आहे, हा आपला शेवटचा सिद्धांत होईल. ज्या वस्तू आपल्या सुखांत भर टाकीत नाहींत, त्यांचा उपयोग आपणांस कांहींच नाहीं, हें उघड आहे. सर्व भौतिकशास्त्रांचा विकास याच तत्त्वाला अनुसरून झालेला आहे. ज्या शास्त्राच्या वाढीमुळें मनुष्याच्या सुखसाधनांत भर पडते, त्या शास्त्राकडे त्याचा ओढा आपोआपच अधिक असतो; आणि ज्या शास्त्राचा असा उपयोग त्याला होत नाहीं, त्याचा तो त्याग करतो. सुखांत तीन प्रकार अथवा तीन पायऱ्या आहेत. देहगत सुख, बुद्धिगत सुख आणि आत्मगत सुख. पशू आणि त्यांच्याच योग्यतेचीं मनुष्यें यांचें सर्व सुख देहांत सांठविलेलें असतें. स्वतःचा देह सुखांत राहिला म्हणजे झालें; याहून अधिक कशाचीही पर्वा पशू करीत नाहींत. त्यांच्या साऱ्या हालचाली आणि खटपटी, या एकाच उद्देशाला धरून चालतात. एखादा भुकेलेला कुत्रा अथवा लांडगा आपलें भक्ष्य खात असतां तुह्मी त्याकडे पहा; म्हणजे त्या वेळीं त्याच्या हृदयांत आनंदाच्या केवढ्या मोठ्या लहरी उसळत असतात तें तुम्हांला दिसेल. खऱ्या मनुष्यावस्थेला पोहोंचलेला प्राणी, अशा रीतीनें आनंदाचें प्रदर्शन कधींही करणार नाहीं; कारण, त्याला केवळ देहाच्या सुखानें सुख होत नाहीं. मनुष्यांना खरा आनंद केव्हां प्राप्त होतो याचें सूक्ष्म निरीक्षण केलें तर त्याचा आनंद बुद्धिगत असतो असें आपल्या लक्ष्यांत येईल. सुंदर विचारांनीं मनुष्याला जो आनंद प्राप्त होतो, त्याची बरोबरी जड आनंदाशीं तो कधींही करणार नाहीं. ज्ञान्याचा आनंद या दोहोंहूनही निराळ्या प्रकारचा असतो. त्याचा आनंद आत्मगत असतो. स्वतःच्या केवलरूपांत सदैव राहणें हाच त्याचा आनंद. स्वतःच्या आनंदाकरितां बाहेरील वस्तूंवर अवलंबून राहण्याचें त्याला मरणप्राय दुःख होतें. आपल्या चालू विषयाचा विचार केवळ याच दृष्टीनें केला,

तरी हा विषय अत्यंत उपयुक्त आहे हेंच सिद्ध होतें. शक्य तितक्या उच्च प्रतीचें सुख मिळविणें असेल, तर धर्ममार्गाशिवाय तें मिळणें शक्य नाहीं. इंद्रियजन्य सुख मिळवून देणारीं कितीही साधनें एखाद्यानें जमा केलीं, तरी तीं साधनें अत्यंत उपयुक्त आहेत असें म्हणतां येणार नाहीं; कारण, ज्ञानावांचून इतर सर्व सुखें तुच्छ आहेत. स्वतःच ज्ञानमय होणें, हें आपलें अखेरचें साध्य आहे. अत्यंत सुखी होण्याला, त्यावांचून अन्य साधनच नाहीं. गाढ अज्ञानांत राहून जीं मनुष्यें कर्में करीत असतात, तीं खरोखर केवळ बुद्धिबळांसारखीं असतात, असें म्हणावयास हरकत नाहीं; केवळ हातापायांनीं काम करणें इतकेंच मनुष्यत्वाचें लक्षण नाहीं. यंत्रें सदोदित कार्यरत असतात, हें आपण नित्य पाहतोंच; पण त्यांनीं केलेल्या कामाचा उपयोग जसा भलत्यालाच होतो, त्याचप्रमाणें अज्ञानी मनुष्यांच्या जिवावर तिसरेच सुख भोगतात. मानवी आयुष्यक्रमांत मिळणारा सुखाचा वांटा, अज्ञानी मनुष्याच्या पदरीं कधींही पडत नाहीं. त्या सुखाचा खरा भोक्ता म्हटला म्हणजे ज्ञानी हाच होय. एखाद्या कुबेरानें एक लाख रुपये खर्चून एखादें सुंदर चित्र खरेदी केलें, तरी त्या चित्रांतील मर्म जाणण्याचें ज्ञान ज्याला असेल त्यालाच त्याच्या दर्शनापासून वास्तविक आनंद होईल. त्या कुबेराला चित्रकलेचें मर्म जाणण्याची पात्रता नसली, तर त्या चित्राचा तो भोक्ता आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं. त्यानें द्रव्य खर्च केलें, त्या अर्थी तो त्या चित्राचा मालक झाला हें खरें; तथापि त्याचा भोक्ता भलताच कोणी होईल. आपण साऱ्या जगभर हिंडून पहा, आपणांस सर्वत्र एकच नियम आढळून येईल; तो हा कीं, लौकिक सुखाचाही खरा भोक्ता शहाणा पुरुषच असतो. अज्ञानी मनुष्यांनीं बैलासारखें काम मात्र करावें; सुख त्यांच्या नशिबीं लिहिलेलेंच नसतें. त्यांनीं केलेल्या कामाचा उपयोग ज्ञान्यालाच होतो. पुष्कळ वेळां ही गोष्ट अज्ञानी मनुष्यांच्या लक्ष्यांत येत नाहीं; पण हा नियम सर्वत्र एकसारखा लागू पडतो हें मात्र खरें. असो.

एकच पुरुष—आत्मा—सर्वत्र भरून राहिला आहे आणि एकाहून अधिक आत्म्यांना अस्तित्व असणें शक्य नाहीं; या अद्वैतमताचा विचार येथवर केला. अस्तित्व म्हणून जें कांहीं आहे, तें एकच आहे व इंद्रियद्वारा आपण त्याजकडे पाहिलें म्हणजे तेंच अस्तित्व विश्वरूप दिसतें हेंही आपण पाहिलेंच आहे. जड इंद्रियांच्या द्वारा त्याचा अनुभव घेतला, तर तें जड आहेसें भासतें;

मनाच्या द्वारें त्याजकडे अवलोकन केलें, म्हणजे तें विकारमय आणि कल्पनामय आहे, असा त्याजबद्दल अनुभव येतो. या दोन्ही प्रकारच्या इंद्रियांचा त्याग केला म्हणजे तें जसें वस्तुतः आहे, तसाच त्याचा अनुभवही येईल. हा अनुभव म्हणजे सर्वत्र तें एकरूपच भरलें आहे, हा होय. आपण एक तत्त्व नित्य लक्ष्यांत बाळगलें पाहिजे, तें हें कीं, 'प्रत्येक मनुष्याचा जीवात्मा स्वतंत्र आहे असें नाहीं.' चालू विषयाच्या समजुतीकरितां कित्येक ठिकाणीं त्याचा तसा उल्लेख केला झाहे हें खरें; तथापि वास्तविक अस्तित्व एकच असून, एकच पुरुष–एकच आत्मा–इंद्रियद्वारा देहमय भासतो; तोच विकारद्वारा मनःस्वरूप भासतो; आणि उपाधिरहित पाहिला असतां, तोच आत्मा केवलरूप आहे असा अनुभव येतो. आपल्या या एकाच पिंडापुरता विचार केला, तरी त्यांत देह, मन आणि आत्मा असे तीन प्रकार वास्तविकपणें नाहींत. विषयाच्या समजुतीकरितां तसे भाग कल्पिणें इष्ट आहे, इतकेंच. जें एकच रूप सर्वत्र भरलें आहे, त्यालाच परिस्थित्यनुरूप देह, मन आणि आत्मा अशा संज्ञा प्राप्त होतात. सर्वत्र एकच अस्तित्व असतां, केवळ अज्ञानी लोक त्याला जग या नांवानें ओळखतात; याहून उच्च प्रतीचीं माणसें असतात त्यांना जग विचारमय दिसतें; आणि ज्यांना पूर्ण ज्ञान प्राप्त झालें आहे व त्यामुळें ज्यांचा भ्रमनिरास झाला आहे, त्यांना सर्वत्र अखंड असें एकरूपच दिसतें. "**अहं ब्रह्मास्मि**" हा शेवटचा सिद्धांत आहे. जगांत तीन रूपें नाहींत आणि दोनही नाहींत; जें कांहीं आहे तें एकच आहे. अर्धवट उजेडांत दोरी पडली असतां ती ज्याप्रमाणें सर्पासारखी दिसते, त्याचप्रमाणें मायेच्या आवरणामुळें, एकच अनेकतेनें भासत आहे. दोरीच्या तुकड्यावरच सर्पाचा भास होतो, त्या वेळीं दोरी निराळी आणि सर्प निराळा असा कांहीं भाग नसतो. एकच तुकडा दृष्टिभ्रमामुळें दोरी आणि सर्प अशा दुहेरी स्वरूपाचा दिसतो. द्वैत आणि अद्वैत हे दोन शब्द, केवळ बुद्धीच्या पकडी दाखविण्याच्या उपयोगीं आहेत; पण आपणापाशीं अशी द्विधादृष्टीच नाहीं. आपण सारे जन्मतःच अद्वैती आहों; कारण, कोणत्याही गोष्टीचें एका वेळीं एकच स्वरूप आपल्या दृष्टीस दिसतें. एखाद्या गोष्टीचें खरें आणि खोटें अशीं दोन्ही स्वरूपें एकाच वेळीं आपणांस कधींही दिसत नाहींत. आपण निसर्गतःच अद्वैती आहों. याला कांहीं उपाय नाहीं. ज्या वेळीं आपण सर्प पाहतों, त्या वेळीं दोरी आपणास दिसत नाहीं.

आणि दोरी दिसली, म्हणजे सर्प दिसेनासा होतो. यांपैकीं कोणतें तरी एकच एका वेळीं पाहणें आपणांस शक्य आहे. ज्या वेळीं सर्प दिसत होता, त्या वेळीं तिचें दोरी हें स्वरूप आपणांस दिसत नव्हतें; आणि त्याच वस्तूचें दोरी हें स्वरूप दिसूं लागतांक्षणींच, सर्प कोठें नाहींसा झाला. भ्रमकालीं दिसत असलेलें रूप सत्यदर्शनाच्या काळीं दिसत नाहीं. आपण असें समजूं कीं, संध्याकाळच्या वेळीं थोडथोडा अंधार आणि धुकें पडत असतां आपण आपला एखादा स्नेही दुरून येतांना पाहिला. तो गृहस्थ आपला स्नेही असल्यामुळें आपल्या चांगल्या ओळखीचा आहे; परंतु अस्पष्टपणामुळें तो दुसराच कोणी असावा असें वाटलें. ज्या वेळीं तो दुसराच कोणी असावा असें वाटतें, त्या वेळीं आपला स्नेही आपण पाहत नसतों. आपल्या स्नेह्याचें नांव ‘ अ ’ आहे असें समजूं. ज्या वेळीं ‘ अ ’ ला न ओळखल्यामुळें आपण त्याला ‘ ब ’ समजतों, त्या वेळीं ‘ अ ’ ला जणुंकाय अस्तित्वच नसतें. याचप्रमाणें प्रत्येक वेळीं प्रत्येक वस्तूचें एकच स्वरूप आपणांस दिसत असतें. देहबुद्धि पक्की आहे तोंपर्यंत आत्म्याचें स्वरूप देहमय आहे, इतकाच प्रत्यय असतो. एकंदर मनुष्यजातीपैकीं बहुतेकांना, देह हाच आत्मा वाटत असतो. मन, बुद्धि, आत्मा इत्यादिकांबद्दल वेळीं अवेळीं कितीही गप्पा त्यांनीं सांगितल्या, तरी त्यांचा अनुभव शब्द, स्पर्श, रूप इत्यादि जड गुणापलीकडे गेलेला नसतो. आपलें खरें स्वरूप केवळ विचारमय–मनोमय–आहे, असा अनुभव कांहीं थोड्यांना क्वचित् प्रसंगीं होत असतो. सर हंफ्रे डेव्ही याची एक गोष्ट आपण बहुधा ऐकिली असेलच. एके वेळीं आपल्या विद्यार्थ्यांसमोर तो हास्यवायूसंबंधीं कांहीं प्रयोग करीत असतां ती वायु भरलेली नळी फुटली आणि तो वायु त्याच्या नाकांत शिरला. त्यामुळें त्याला गुंगी आली आणि तो थोडा वेळ अगदीं निश्चेष्ट स्थितींत राहिला. तो शुद्धीवर आल्यानंतर आपल्या विद्यार्थ्यांना म्हणाला, ‘ सारें जग म्हणजे निवळ कल्पनांचें जाळें आहे; याहून अधिक त्यांत कांहीं नाहीं. ’ त्या वायूच्या गुणाचा जोर शिल्लक होता, तोंपर्यंत त्याची देहबुद्धि नष्ट झाली होती. यामुळें जगाचें जें स्वरूप याला तोंपर्यंत जड असें वाटत होतें, तेंच स्वरूप कल्पनामय–मनोमय–आहे असें त्याला वाटलें. हीच जाणीव याहून अधिक मोठी भरारी मारून पुढें गेली, तर जड आणि मनोमय अशी दोन्ही रूपें मागें पडून खरें रूप–केवलरूप–दिसूं लागेल. सर्व विश्व म्हणजे ‘ सच्चिदानंद ’ हेंच, याहून अन्य कांहीं नाहीं; असा अनुभव येईल.

**किमपि सततबोधं केवलानंदरूपम्**
**निरुपममतिवेलं नित्यमुक्तं निरीहम् ।**
**निरवधी गगनाभं निष्कलं निर्विकल्पम्**
**हृदि कलयति विद्वान् ब्रह्म पूर्णं समाधौ ॥**

( विवेकचूडामणि ४१० )

कोणी कोणी असा प्रश्न करतात कीं, "कायहो, स्वर्गलोक, नरकलोक आणि इतर पुष्कळ प्रकारचे लोक यांचीं वर्णनें सर्व धर्मांत केलीं आहेत. त्यांजबद्दल तुमचें काय म्हणणें आहे? कांहीं ठिकाणीं असें सांगितलें आहे कीं, मनुष्य मेला म्हणजे तो स्वर्गांत अगर नरकांत जातो; त्याला तेथें दुसरा देह प्राप्त होतो; आणि तेथें तो आपल्या बऱ्यावाईट कर्मांचीं फळें भोगतो." यावर आम्ही अद्वैतवादी अगदीं सरळ भाषेनें असें सांगतों कीं, हे सारे भ्रम आहेत. वस्तुतः कोणी जन्मासही येत नाहीं आणि मरतही नाहीं. स्वर्गलोक आणि नरकलोक यांना भ्रमिष्ट डोक्यावांचून दुसऱ्या कोठें अस्तित्व नाहीं; आणि या जगालाही वस्तुतः अस्तित्व नाहीं. या तिहींपैकीं एकालाही खरोखर अस्तित्व नाहीं. एखाद्या मुलाला भुतांच्या खूपशा गोष्टी तिखटमिठ लावून सांगितल्या आणि रात्रीं त्याला रस्त्यावर एकटें धाडलें, तर एखाद्या मोडलेल्या झाडाचें बुंधकें पाहिल्याबरोबर 'अरे, भूत!' म्हणून तो ओरडेल. त्या भुताला हातपाय असून तें आपल्याला धरण्यास येत आहे असेंही तो म्हणेल. एखादा मनुष्य रात्रीच्या वेळीं आपल्या प्रियपात्राला भेटावयाला जात असला, तर तेंच बुंधकें त्याला स्त्रीसारखें दिसेल. एखाद्या पोलीस शिपायाला तेंच बुंधकें चोर आहेसें वाटेल; उलटपक्षीं एखाद्या चोराला तें पोलीस शिपायासारखें दिसेल. झाडाचें बुंधकें एकच असतां निरनिराळ्या मनोवृत्तींना तें निरमीराळें भासतें. या नानाप्रकारच्या आभासांत सत्यरूप बुंधकें एकस्वरूपच होतें. त्याच्या स्वरूपांत कोणत्याही प्रकारचा बदल नव्हता. निरनिराळ्या मनांनीं त्यावर निरनिराळ्या रूपांचा आरोप केल्यामुळें, त्या एकरूपाचीं इतकीं अनेक रूपें झालीं. त्याचप्रमाणें एकच स्वरूपाचें ब्रह्म सर्वत्र व्यापून राहिलें आहे. तें कोठें जात नाहीं अथवा कोठून येतही नाहीं. एखाद्या मनुष्यानें स्वर्गसुखाचीं वर्णनें ऐकलीं म्हणजे त्यालाही स्वर्गसुखाची इच्छा उत्पन्न होते. सर्व वेळ तो याच गोष्टीचें चिंतन करतो. कांहीं काळानें त्याच्या चालू ऐहिक स्वप्नाची समाप्ति होते व दुसऱ्या

स्वप्नाला आरंभ होतो. त्यांत तो आपण स्वर्गात आहों व आपल्याभोंवतीं देवांची आणि देवांगनांची गर्दी झाली आहे, असा भास त्याला होतो. एखाद्या मनुष्याला आपल्या पितरांना भेटण्याची इच्छा झाली, तर थेट अर्यम्यापासून स्वतःच्या वडिलांपर्यंत त्याला सर्वांचें दर्शन होतें; कारण, त्या सर्वांचा निर्माणकर्ता तो स्वतःच आहे. एखादा मनुष्य याहूनही अधिक गाढ अशा अज्ञानांत असला आणि त्याच्या डोक्यांत नानाविध नरकांच्या गोष्टी कोणीं भरून दिल्या असल्या, तर मृत्यूनंतर हेंच जग त्याला नरकासारखें दिसेल; आणि त्यांतील अनेकविध शिक्षांचे प्रकारही त्याच्या नजरेस पडतील. जन्म आणि मृत्यू यांचा वास्तविक अर्थ म्हटला म्हणजे आपल्या दृष्टीची दिशा बदलणें; याहून त्यांत कांहीं अधिक अर्थ नाहीं. आपण कोठें जात नाहीं अथवा येतही नाहीं. तसेंच आपण ज्याकडे पाहत असतों, तेंही कोठें जात येत नाहीं. आपण स्वतः एकरूप आहों. मग आपण जाणार कोठें आणि येणार कोठून ? जाणें आणि येणें या दोन्ही क्रिया आपल्या ठिकाणीं अशक्यच आहेत. आपण सर्वव्यापी आहों; मग आपण जाणार कोठें ? हे शब्दही आपल्या ठिकाणीं संभवत नाहींत. आकाश सदोदित स्थिरच असतें. त्यावर आलेले ढग इतस्ततः फिरत असतात आणि त्यामुळें आकाश हालतें, असा भ्रम ते उत्पन्न करतात. आगगाडी झपाट्यानें जात असतां बाहेर नजर फेंकली, म्हणजे झाडेंझुडपें झपाट्यानें पळत आहेत, असें वाटतें. वस्तुतः आगगाडी पळत असतां दृष्टीच्या भ्रमामुळें स्थिर झाडेंझुडपें पळत आहेतसें दिसतें. तुम्ही स्वतः एकरूप आहां आणि स्वप्नांत अनेक प्रकारचे ढग पळतांना तुम्ही पाहात आहां. एक स्वप्न संपलें कीं दुसऱ्या स्वप्नाला सुरवात होते. या दोन स्वप्नांत कांहीं परस्परसंबंध नसतो. त्याचप्रमाणें या विश्वांत अमुक एक कायदा आहे—नियम आहे—असें नाहीं. लहान मुलांसाठीं लिहिलेलें Alice in Wonderland हें पुस्तक तुम्हांपैकीं पुष्कळांनीं वाचलें असेल. चालू शतकांत मुलांसाठीं जीं पुस्तकें लिहिलीं आहेत, त्या सर्वांत हें पुस्तक मला फारच आवडलें. तें मी वाचलें तेव्हां मला खरोखर फारच मौज वाटली. लहान मुलांसाठीं असलें एखादें पुस्तक लिहावें असेंही मला वाटलें. ज्यांची परस्परसंगति लावतां येणार नाहीं अशाच गोष्टींचा त्यांत भरणा आहे, आणि त्या पुस्तकांतली ही विशेष खुबी मला फार आवडली. एक कल्पना लिहून पुरी झाली नाहीं, तों

दुसऱ्या कल्पनेस सुरवात होते आणि त्या दोहोंचा अर्थाअर्थी संबंध नसतो. या सर्व गोष्टी विसंगत आहेत, असें लहानपणीं आपणांस वाटत नाहीं. त्या वेळीं त्या संगतवारच वाटत असतात. या पुस्तकाच्या लेखकानें आपल्या लहानपणींच्या मनोवृत्तींची पुरती आठवण करूनच मुलांसाठीं हें पुस्तक तयार केल्याचें दिसून येतें. लहान मुलांच्या दृष्टीनें ज्या गोष्टी सुसंगतशा दिसतात, त्याच गोष्टी मोठेपणीं विसंगत दिसूं लागतात. आपणही वाढलेलीं मुलेंच आहों. आपली योग्यता मुलांहून कांहीं अधिक आहे, असें नाहीं. आतां सांगितलेल्या पुस्तकासारखीच जगाची हुबेहुब स्थिति आहे. त्यांत सर्वत्र विसंगतता भरली आहे. एकच गोष्ट एकाच प्रकारें अनेक वेळां घडून आल्याचें दिसलें, म्हणजे त्यावरून आपण आपले कायदे बनवितों. एखाद्या गोष्टीची परंपरा एकसारखी अनेक वेळां दिसली, म्हणजे आपले कारणकार्यभाव आपण तयार करतों. त्या परंपरेपैकीं एका गोष्टीला आपण कारण म्हणतों आणि दुसरीला कार्य असें नांव देतों. आपणच निर्माण केलेल्या या कार्यकारणभावांस आणि कायद्यांस अनुसरून विश्व वर्तत आहे, असें आपणांस वाटतें. चालू स्वप्नाचा अंत झाला म्हणजे दुसऱ्या स्वप्नाला प्रारंभ होतो आणि त्या वेळींही जें कांहीं घडतें तें सुसंगत आहे अशी कल्पना कायम असतेच. स्वप्नांत अनेक वस्तूंचें दर्शन आपणांस होतें आणि त्या वेळीं त्या वस्तु सुसंगत आहेत असें आपणांस वाटत असतें. स्वप्न चालू असतां अनेक प्रकारच्या क्रिया घडलेल्या आपणांस दिसतात आणि त्या वेळीं तरी त्यांत विसंगतपणा आहे, असें आपणांस वाटत नाहीं. आपण जागे झालों म्हणजे स्वप्नांतील अनेक क्रियांचा विसंगतपणा आपणांस दिसूं लागतो. त्याचप्रमाणें या विश्वरूप महास्वप्नांतून आपण जागे झालों व सत्यस्वरूपाशीं त्याची आपण तुलना केली, म्हणजे हजारों विसंगत गोष्टी त्यांत आपणांस दिसूं लागतील. गारुड्याच्या पोतडींत जशा अस्ताव्यस्त वस्तू भरलेल्या असतात, तसेंच हें जग म्हणजे अस्ताव्यस्त वस्तूंचें प्रचंड पोतडें आहे, असें आपणांस दिसून येईल. अनेक प्रकारच्या विसंगत चित्रांचें एक लांबलचक भेंडोळें आपल्या समोर उलगडत आहे असें आपणांस दिसून येईल. त्यांत आरंभ कशाचा आणि शेवट तरी कशाचा ? पण या स्वप्नालाही शेवट येईल अशी आपली खात्री असूं द्या. माया म्हणतात ती हीच. ढग इतस्ततः फिरूं लागले, म्हणजे सूर्य चालू

लागल्याचा भ्रम दृष्टीला होतो. वस्तुतः सूर्य एकाच जागीं असतो. त्याचप्रमाणें ही माया ढगासारखी असून तुम्ही स्वतः सूर्यासारखे स्थिर आहां. मायेच्या चंचलतेचा आरोप स्वतःवर केल्यामुळें आपण जातों आणि येतों असें आपणांस वाटतें. वास्तविक आपण जात नाहीं अथवा येतही नाहीं. त्या स्थिररूपाकडे बाह्यविश्वांतून अवलोकन केलें म्हणजे त्याला आपण परमेश्वर म्हणतों; आणि हीच दृष्टी स्वतःकडे वळविली म्हणजे तेंच स्थिररूप 'मी' या रूपानें दिसतें. दोन्ही रूपें एकच. एकाच रूपाचे हे दोन प्रकार आहेत. तुमच्याहून अगदीं भिन्न असा परमेश्वर म्हणून कोणी प्राणी नाहीं. तसेंच तुमचें जें वास्तविक निश्चलरूप आहे, त्याहून उच्च प्रतीच्या स्वरूपाचा असाही कोणी नाहीं. सर्व प्रकारचे देव म्हणजे तुम्हींच उत्पन्न केलेले लहान लहान प्राणी आहेत. 'आकाशस्थ पिता' आणि इतर कल्पनात्मक देव, हीं तुम्हींच स्वतः-च्या कल्पनेनें काढलेलीं चित्रें आहेत. परमेश्वर म्हणजे तुमचीच प्रतिमा. "परमेश्वरानें स्वतःच्या मूर्तीबरहुकूम मनुष्य घडविला," ही ख्रिस्ती शास्त्रांतील उपपत्ती सर्वथा चुकीची आहे. त्या ठिकाणीं "मनुष्यानें स्वतःच्या मूर्तीबरहुकूम परमेश्वर बनविला" असें पाहिजे. हीच शास्त्रीय उपपत्ती आहे. आपणच या साऱ्या विश्वभर अनेक देव निर्माण करीत असतों. परमेश्वराला निर्माण करून आपण त्याच्या पायां पडतों आणि त्याची पूजा करितों. हें परमेश्वराचें स्वप्न आपण निर्माण करतों आणि त्यावरच आपलें प्रेम जडतें.

इतका वेळ ज्या अनेक गोष्टींचें विवेचन आपण केलें, त्यांत ध्यानांत ठेवण्याचा मुख्य मुद्दा हाच कीं, अस्तित्व म्हणून जें कांहीं आहे तें एकच आहे; त्या एकाच अस्तित्वाकडे निरनिराळ्या भिंगांतून आपण पाहतों आणि त्याला पृथ्वी, स्वर्ग, नरक, परमेश्वर, पिशाच, मनुष्य, राक्षस व दुसरींही कित्येक नांवें आपण देतों. ही सारी आपण निर्माण केलेली सृष्टि आहे. तथापि "**नित्योऽनित्यानां चेतनश्चेतनानाम्। एको बहूनां यो विदधाति कामान्। तमात्मस्थं येऽनुपश्यंति धीरास्तेषां शांतिः शाश्वती नेतरेषाम्॥**" (कठोपनिषत् ५. १३.) अनित्य अशा सगळ्या वस्तुजातांतील नित्यतत्त्व जो पाहतो, मृत्युवश अशा या विश्वांतील एकरूप चैतन्याचा अनुभव जो घेतो, या अनेकांना तृप्ति देणाऱ्या एकाला जो स्वतःच्या अंतर्यामीं जाणतो, त्यालाच शांति माळ घालते; इतर कोणालाही नाहीं. जें

कांहीं जाणावयाचें आहे, तें हेंच. ज्याचा अनुभव घ्यावयाचा, तें सदैव एकरूप असणारें अस्तित्वच होय. आतां हा अनुभव कसा घेतां येईल, इतकाच काय तो प्रश्न उरला. या स्वप्नांतून आपण जागे कसे होऊं याचा विचार केला पाहिजे. आज या क्षुद्र देहांत कोंडून घेऊन 'मी' म्हणजे 'देह' हा जप आपण भ्रमामुळें करीत आहों. हा महाभ्रम कसा जाईल? या विश्वाचें अधिष्ठान आपणच आहों. जडरूप होऊन या क्षुद्र मनुष्यदेहांत स्वतःस आपण कोंडून घेतलें आहे. स्वतःची सदैव सुखरूपता विसरल्यामुळें एखाद्याच्या तोंडून दोन शब्दांची अपेक्षा आपण करीत आहों! एखादा रागाचा शब्द ऐकल्याबरोबर आपला आनंद पार मावळून जातो! हर! हर! कोण भयंकर दशा ही! गुलामगिरीचें याहून खडतर असें स्वरूप तें कोणतें असणार! जो मी या सुखदुःखादि सर्व प्रकारच्या द्वंद्वांपलीकडे असणारा, हें सारें विश्व ज्या माझें केवळ प्रतिबिंब, ज्या माझ्या अनंत तेजोनिधींतून चंद्रसूर्यादि गोल, तुषारांसारखे उडाले आहेत, तोच मी अशा गुलामगिरींत खितपत पडलों आहें. अं! माझ्या शरिराला कोणी चिमटा घेतला तर ताबडतोब दुःखानें मी ओरडतों! एखादा गोड शब्द कोणीं उच्चारला म्हणजे जणूं काय मी आनंदाच्या शिखरावर बसतों! काय ही माझी स्थिति! मी या भिकार देहाचा गुलाम, मी या तुच्छ मनाचा गुलाम, मी या जगाचा गुलाम, एखाद्या बऱ्यावाईट शब्दाचा गुलाम, अनंत वासनांचा मी गुलाम, सुखाचा गुलाम, जीविताचा गुलाम आणि मृत्यूचाही गुलाम! या सर्व वस्तूंचा मी दासानुदास बनून गेलों आहें! आतां या गुलामगिरींतून माझी सुटका कशी होईल? या अनंत शृंखलांचीं जाळीं कशीं तुटतील? याला कांहीं उपाय आहे काय? आहे. उपाय हाच. सर्वव्यापी आत्म्याबद्दल ऐकणें, त्याचें ज्ञान करून घेणें आणि त्याचेंच सदैव चिंतन–ध्यान–करणें हाच उपाय योग्य आहे. अद्वैतवादी ज्ञानी पुरुषांनीं हाच उपाय सांगितला आहे. सत्यवस्तूबद्दल प्रथम ऐकून घ्या; जें कांहीं तुम्हीं ऐकलें असेल, त्यावर नंतर विचार करा; आणि त्यानंतर त्या एकाचेंच सदैव चिंतन करा. सदोदित एकच विचार चित्तांत असूं द्या. '**अहं ब्रह्मास्मि**' यावांचून दुसरें कांहींच चित्तांत असूं नये. यावांचून अन्य कोणताही विचार आपलें बंधन अधिक दृढ मात्र करील, हें जाणून त्याचा त्याग करावा. 'मी अमुक' अशा प्रकारची आकुंचित भावना चित्तांत उठूं देऊं नये. हें शरीर, मन, पर-

मेश्वर, भुतेंखेतें या सर्वांना एकदम रजा द्या. '**अहं ब्रह्मास्मि**' यावांचून बाकीच्या साऱ्या अनंत वस्तूंना रजा द्या. "**यत्र नान्यत्पश्यति नान्यच्छृणोति नान्यद्विजानाति स भूमाऽथ यत्रान्यत्पश्यत्यन्यच्छृणोत्यन्यद्विजानाति तदल्पं यो वै भूमा तदमृतमथ यदल्पं तन्मर्त्यं स भगवः कस्मिन्प्रतिष्ठित इति स्वे महिम्नि यदि वा न महिम्नीति**" ( छांदोग्योपनिषत् ७. २४. ). जेथें एक दुसऱ्याला पाहतो, जेथें एक दुसऱ्याला ऐकतो, तें अल्प. ज्या ठिकाणीं एक दुसऱ्याला ऐकत नाहीं आणि एक दुसऱ्याला पाहात नाहीं, तें अनंत. सर्वांत अत्युच्च ठिकाण तें हेंच. ज्या ठिकाणीं प्रमाता आणि प्रमेय एकरूप होतात, ज्या ठिकाणीं मी वक्ता आणि मीच श्रोता, ज्या ठिकाणीं मी गुरु आणि मीच शिष्य आणि ज्या ठिकाणीं मी जनक आणि मीच प्रजा, तेंच एक ठिकाण मात्र निर्भय आहे. आपणाला भीति दाखविणारें दुसरें असें तेथें कोणीच नाहीं. ज्या ठिकाणीं मीच सर्वत्र असणार तेथें मला भीति दाखवायला तरी कोण असणार ? रोज हेंच ऐकणें, याचाच विचार करणें आणि याचाच निदिध्यास ठेवणें हाच मार्ग आहे. बाकीच्या सर्व विचारांस हांकून लावा. फक्त इतकेच शब्द ऐकण्याचा छंद तुमच्या कानांना लागूं द्या. फक्त इतकेच शब्द अंतःकरणापर्यंत पोहोंचूं द्या. '**सोऽहम्**' एवढ्या एकाच शब्दाचा जप आपण नित्य करावयास पाहिजे. हाच जप तुमच्या रोमरोमांत खेळत राहिला पाहिजे. तुमच्या प्रत्येक ज्ञानतंतूंच्या स्पंदांबरोबर तेथें हाच स्पंद उमटत राहिला पाहिजे. तुमच्या देहांतील रक्ताच्या प्रत्येक थेंबाबरोबर याच विचाराचें अभिसरण देहांत झालें पाहिजे. प्रत्यक्ष मृत्यूच्या मुखासंनिध असतांही त्या वेळीं '**सोऽहम्**' एवढेंच म्हणावयाचें. हिंदुस्थानांत एक संन्यासी होता, तो फक्त '**शिवोऽहम्**' एवढा शब्द म्हणत असे. एके वेळीं तो एका अरण्यांतून जात असतां एका वाघानें त्याजवर उडी मारली. '**शिवोऽहम्**' हा त्याचा जप चालूच होता. वाघानें त्याला धरून फाडलें आणि ठार मारलें; त्या वेळीं जीव जाईपर्यंत तो '**शिवोऽहम्**' एवढाच शब्द म्हणत होता. एखादें महाभय प्राप्त झालें असतां, प्रत्यक्ष मृत्यूच्या मुखीं जात असतां, लढाईच्या भर गर्दीत असतां, समुद्राच्या तळापर्यंत बुडत असतां, अत्युच्च पर्वताच्या शिखरावर असतां अथवा एखाद्या निबिड अरण्यांत असतांही आपल्या मनाला '**सोऽहम्**' एवढाच शब्द शिकवीत जा. रात्री आणि दिवसा एकच

जप. '**सोऽहम्**' हा मंत्र महाबलदायी आहे. हाच धर्म. "**नायमात्मा बल-हीनेन लभ्यः**" (मुण्डकोपनिषत् ३. २. ४.). हें श्रुतिवचन नित्य लक्ष्यांत बाळगणें अवश्य आहे. आत्मलाभ फक्त शूरालाच शक्य आहे. "अरे परमेश्वरा, मी पापी आहें, मी दुःखकर्दमांत लोळणारा आहें." असले शब्द तोंडावाटे कधींही काढूं नका. असल्या शब्दांनीं आपलें तोंड कां विटाळावें? तुम्हांला मदत करावयाला या विश्वांत कोण समर्थ आहे? सारें विश्व तुमच्या मदतीनें चालत आहे; मग या विश्वांत असा कोणता पदार्थ आहे, कीं जो तुम्हांला मदत करील. या मानवसृष्टींत, देवसृष्टींत अथवा दानवसृष्टींत असा एकही प्राणी जन्मास आला नाहीं कीं जो तुम्हांस मदत करील. या विश्वाचे परमेश्वर तुम्हीच. मग तुम्ही मदत कोणाजवळ मागावी आणि ती तुम्हांला कोणीं द्यावी? या विश्वांत मदत देणारे तुमचे तुम्हीच. एखादे वेळीं आपण प्रार्थना करतों आणि ती सफळ झाली म्हणजे ती विश्वबाह्य अशा शक्तीनें ऐकली, असें आपणांस वाटतें; पण तो निवळ भ्रम आहे. आपण वस्तुतः आपलीच प्रार्थना करतों आणि ती ऐकणारेही आपणच. आपल्याला बाहेरून मदत मिळाली असें वाटतें; पण विश्वनिर्माणकर्ते आम्हीच असल्यावर आम्हांस मदत करण्याची पात्रता कोणत्या वस्तूच्या अंगीं असणार? रेशमाचा किडा आपल्या पोटांतून तंतू काढतो आणि त्यांत स्वतःस गुंडाळून घेतो. त्याचे हातपाय पक्के बांधले गेले म्हणजे 'आतां यांतून मला कोण सोडवील?' असा विचार तो करूं लागतो. पण अशा स्थितींत त्याला मदत कोण करणार? त्यानें निर्माण केलेलें जाळें त्याचें त्यालाच तोडलें पाहिजे. तें जाळें त्यानें स्वतः तोडलें म्हणजे त्यांतून सुंदर फुलपांखरूं बाहेर पडतें आणि इच्छेस येईल तिकडे गमन करतें. हें देहरूपी जाळें तुम्हींच निर्माण केलें आहे. यांतून तुम्ही बाहेर पडलां म्हणजे सत्याची व तुमची भेट होईल. सदोदित आपल्या चित्ताला एकच जप शिकवीत जा. '**सोऽहम्**' हा एकच जप तुमच्या चित्तांतील अनंतवासना दग्ध करील. जी शक्ति तुमच्यांत सध्यां गुप्तरूपानें वास करीत आहे ती बाहेर पडेल. सध्या निद्रावस्थेंत असलेली ती स्थिति खडबडून जागी होईल. आपल्या अंतःकरणावर सत्यवस्तूचा एकसारखा आघात करून तिला जागृति आणावयाची आहे. त्यावांचून दुसरा कांहीं उपाय नाहीं. जेथें गेलें असतां दुर्बळपणाचा एखादाही विचार उद्भवत असेल

अशा ठिकाणीं कधीं पाऊलही घालूं नये. तुम्हांस ज्ञानयोगी होणें असेल, तर दुर्बलता प्रथम टाकली पाहिजे. त्यावांचून ज्ञानमार्गाला लागण्याची योग्यता तुमच्या अंगीं कधींही येणार नाहीं.

अभ्यासाला आरंभ करण्यापूर्वी आपल्या चित्तावरील संशयरूपी मळ प्रथम काढून टाकला पाहिजे. प्रथम या साऱ्या उपपत्ती ऐकून घ्या. त्याबद्दल वाटेल तितक्या निकराचा वाद करा. तुमची विवेचकबुद्धि होईल तितकी प्रखर करा. तिच्या भट्टींत सर्व हिणकस जळून जाऊं द्या, आणि सत्य मार्ग असला तर हाच अशी खात्री तुमच्या चित्ताला पक्की पटली, म्हणजे सर्व वादविवाद बंद करून टाका. मग आपल्या तोंडाला कायमचेंच कुलूप घालणें चांगलें. अशा वेळीं स्वतः वादविवाद तर करूं नयेच, पण दुसऱ्याचें भाषणही ऐकून घेऊं नये. तुमच्या स्वतःच्या चित्ताची खात्री झाल्यावर वादविवाद करून फायदा काय? वादविवादाचें काम पूर्वींच होऊन गेल्यावर शिल्लक काय उरतें? सत्याचा अनुभव प्रत्यक्ष येणें हेंच. मग फुकटच्या वादविवादांत आपलें मोलाचें आयुष्य व्यर्थ कां घालवावें? सत्याचाच जप सदोदित करावयाचा, आपल्या चित्ताला दृढता आणणारा प्रत्येक विचार सांठवावयाचा आणि दुर्बलता आणणाऱ्या प्रत्येक विचाराचा त्याग करावयाचा, इतकीच कामगिरी आपल्याकरितां शिल्लक उरते. जो शुद्ध भक्तिमार्गी असतो तो मूर्तींचें आणि दुसऱ्या अशाच प्रकारच्या वस्तूंचें चिंतन करतो. खरें म्हटलें म्हणजे हाच स्वाभाविक व सोपा रस्ता आहे; तथापि तो फार लांब पल्ल्याचा मार्ग आहे हेंही खोटें नाहीं. राजयोगी, शरिरांतील ज्ञानकमलांचें ध्यान करून तद्द्वारा मनःशक्तीस चेतना आणण्याचा अभ्यास करीत असतात. ज्ञानयोग्यांचा मार्ग या दोहोंहून भिन्न आहे. शरीर अथवा मन यांना अस्तित्वच नाहीं असें चिंतन करणें, हा ज्ञानयोग्याचा मार्ग. शरीर आणि मन यांच्या अस्तित्वकल्पनेचा साफ लोप झाला पाहिजे. या कल्पनांना अट्टहासानें हद्दपार करावयाचें आहे. याकरितां त्यांबद्दल अधिक विचार करून फायदा होणार नाहीं. इतर कल्पना नष्ट व्हाव्या म्हणून मन आणि शरीर यांवर लक्ष्य लावणें म्हणजे आगींतून निघून फुपाट्यांत जाण्यासारखेंच झालें. एक रोग बरा व्हावा म्हणून दुसऱ्या रोगाला बोलावणें पाठवून काय फायदा? याकरितां ज्ञानमार्ग हा अत्यंत बिकट मार्ग आहे. त्याचा मार्ग एकाच शब्दांत सांगावयाचा तर तो '**नेति**' या शब्दानें सांगतां येईल. प्रत्येक

वस्तूला तो 'नेति' म्हणतो. प्रत्येक वस्तूचा अशा रीतीनें पूर्ण ग्रास झाल्यावर शेवटीं जें काय उरतें, तें तो स्वतःच उरतो. प्रत्येक वस्तूचें पृथक्करण करून त्यांतील 'आत्मा' शोधण्याची ही क्रिया आहे. प्रत्येक वस्तूचा उच्छेद करावयाचा आणि अशा रीतीनें सर्व विश्वाचें पृथक्करण करून त्याला स्वतःपासून दूर करावयाचें हाच ज्ञान्याचा मार्ग. 'मी ज्ञानी आहें' ही भाषा बोलण्याला फार सोपी आहे, पण ज्ञानी होणें मात्र कठीण आहे. "**फुकाचें मुखीं बोलतां काय वेंचे?**" "**क्षुरस्य धारा निशिता दुरत्यया। दुर्गं पथस्तत्कवयो वदंति॥**" (कठोपनिषत् १. ३. १४). तीव्र धार दिलेल्या वस्तऱ्यावरून चालणें आणि ज्ञानी होऊं पाहणें, हीं कर्मे सारखींच सोपीं आहेत; तथापि भिऊं नका; धीर सोडूं नका. "**उत्तिष्ठत जाग्रत प्राप्यवरान्निबोधत।**" असा उपदेश उच्च घोषानें श्रुति करीत आहे.

मन आणि देह क्षुद्र कल्पनांचा सर्वस्वी त्याग ज्ञान्याला कर्तव्य आहे. मग त्यानें कशाचें चिंतन करावें? 'मी स्वामी' इतकी कल्पना माझ्या चित्तांत आल्याबरोबर 'मी देह' असें वाटूं लागतें. त्याच वेळीं मनाला जबर टोला दिला पाहिजे आणि त्याला बजावलें पाहिजे कीं 'तूं देह नाहींस; तूं आत्मरूप आहेस.' शरिराला शेंकडों रोगांनीं घेरलें, तरी त्याची काळजी कोण करतो? अत्यंत अक्राळविक्राळ रूप घेऊन मृत्यु पुढें येऊन उभा राहिला, तरी त्याकडे आम्ही ढुंकूनही बघणार नाहीं. मी देह नव्हें. मग या देहाला नटवावयाचें आणि सजवावयाचें कशाला? त्या जुन्या स्वप्नाचें सुख पुन्हां भोगण्याची इच्छा आहे काय? त्या गुलामगिरीच्या चिखलांत पुन्हां लोळण्याकरितां? नको, नको. त्याचें आतां नांव काढूं नका. मी देह नव्हें. ज्ञान्याचा मार्ग हाच.

भक्त म्हणतो, 'हें शरीर मला ईश्वरानें दिलें. याच्या साहाय्यानें संसार-समुद्रांतून मीं तरून जावें हाच त्याचा उद्देश आहे. याकरितां हा समुद्र पार होईपर्यंत मला त्याचें संरक्षण केलें पाहिजे.'

योगी म्हणतो, 'याच देहांत अनंतशक्ति वास करीत आहे. ती पूर्ण जागृत होईपर्यंत मला त्याला जपलें पाहिजे.'

पण ज्ञान्याला इतका वेळ थांबण्याला फुरसुदच नाहीं. याच क्षणीं त्याला मुक्ति पाहिजे. त्याचें चिंतन एकच. 'मी सदैव मुक्त आहें. मी बद्ध केव्हांच नव्हतों. मी सदैव या सृष्टीचा परमात्मा आहें. मग मला पूर्णत्व देणारा दुसरा कोण असणार? मी आतांच पूर्ण आहें.'

मनुष्य स्वतः पूर्णत्व पावला म्हणजे इतरांतील पूर्णत्व त्याला दिसूं लागतें. त्याला सर्व ठिकाणीं अपूर्णत्व दिसतें याचें कारण, तो स्वतःच्या अपूर्ण मनाचें प्रतिबिंब सर्वत्र पाहत असतो हेंच. तो स्वतः अपूर्ण असल्यावांचून सर्वत्र अपूर्णता त्याला कशी दिसेल? याकरितां पूर्णत्व आणि अपूर्णत्व या दोन्ही कल्पनांचा त्याग ज्ञानी करीत असतो. त्याच्या दृष्टीनें दुसऱ्या कशाला अस्तित्वच नसतें. मुक्त स्थितींत त्याला बरें आणि वाईट या दोहोंपैकीं कोणाचाच प्रत्यय येत नाहीं. हें बरें आणि तें वाईट असें कोण म्हणतो? ज्याच्या ठिकाणीं या द्वंद्वांचे अंश शिल्लक असतील तोच. शरीर कोणाला दिसतें? जो स्वतः शरीरमय होऊन बसला असेल त्यालाच. ‘मी देह नव्हें’ हा अनुभव येतांक्षणींच जगाचा लोप संपूर्णत्वानें होतो. तें कायमचेंच हरवतें. आपल्या बुद्धीला खंबीर करून जडवस्तूंत गुरफटून बसलेल्या आत्म्याला मोकळें करावयाचें हा ज्ञान्याचा मार्ग. ‘नेति नेति’ हाच त्याचा मार्ग.



## प्रकरण ६ वें

## आत्मैक्य

गेल्या प्रसंगीं ज्या विषयाची आपण चर्चा करीत होतों व त्याचा जो शेवटला निष्कर्ष आपण काढला, त्यासंबंधीं हिंदुस्थानांत अत्यंत प्राचीन काळींही अशा प्रकारचे वादविवाद होत असत हें दाखविण्याकरितां, एका उपनिषदांतील कांहीं भाग मी आज आपणांस वाचून दाखविणार आहें.

### बृहदारण्यकोपनिषत्—अध्याय २. ब्राह्मण ४.

याज्ञवल्क्य या नांवाचे एक महर्षि पूर्वकाळीं होऊन गेले. वृद्धपणीं गृहत्याग करावा अशी चाल पूर्वी हिंदुस्थानांत होती, हें आपणांस मीं पूर्वी सांगितलेंच आहे. एके दिवशीं याज्ञवल्क्य आपल्या पत्नीला म्हणाले, 'हें सर्व वित्त आणि इतर जी कांहीं चीजवस्त माझ्याजवळ आहे ती सर्व आतां तुझ्या स्वाधीन करून अरण्यवास पत्करण्याचा माझा विचार झाला आहे." ती म्हणाली, 'महाराज, संपत्तीनें विपुल अशी ही पृथ्वी मला कोणीं दिली, तरी तीमुळें मला अमरत्व प्राप्त होईल का?' याज्ञवल्क्य म्हणाले, 'नाहीं; तसें होणें शक्य नाहीं. फार तर तुझा संसार श्रीमंतीचा होईल, इतकेंच. संपत्तीच्या हातीं अमरत्व देण्याचें सामर्थ्य नाहीं.' पत्नी म्हणाली, 'ज्यायोगें मला अमरत्व प्राप्त होईल असा कांहीं उपाय आपणांस ठाऊक असल्यास मला सांगा.' याज्ञवल्क्य म्हणाले, 'आजपर्यंत माझी आवडती होतीसच; पण या प्रश्नामुळें तूं आतां मला अधिक आवडूं लागलीस. ये, इकडे येऊन बैस. आतां जें कांहीं मी तुला सांगेन, तें प्रथम लक्ष्यपूर्वक ऐकून घे आणि नंतर त्याचें सदैव चिंतन कर.' महर्षि पुढें बोलूं लागले: 'स्त्री पुरुषावर प्रेम करते तें वास्तविक पुरुषाकरितां नसून तें प्रेम आत्म्यावरील आहे. ( **पतिनिमित्त पती तुजला प्रिये। प्रिय असें सहसा म्हणतां नये। परम आवडि आपुली आपणा। वळख तूं तुज टाकुनि मीपणा॥**—वामनपंडित. ) तिचें खरें प्रेम आत्म्यावर असतें आणि त्यासाठीं ती पतीवर प्रेम करते. पुरुष स्त्रीवर प्रेम करतो, पण तें स्त्रीसाठीं नसून आत्म्यासाठीं असतें. आईबाप आपत्यावर प्रेम करतात पण तें प्रेम अपत्यासाठीं नसून तें आत्मप्रेमच असतें. संपत्तीची आवड वस्तुतः संपत्तीकरितां नसून, तें प्रेमही आत्मप्रेमच होय.

ब्राह्मणाबद्दल जें पूज्यत्व असतें, तें ब्राह्मणाकरितां नसून आत्म्याकरितांच असतें. तसेंच क्षत्रियाबद्दल जो पूज्यभाव असतो, तो क्षत्रियासाठीं नसून आत्म्यासाठींच असतो. त्याचप्रमाणें जगावर जें प्रेम असतें, तेंही जगाकरितां नसून आत्म्याकरितांच असतें; आणि तसेंच देवांवर जें प्रेम असतें, तें देवांकरितां नसून आत्म्याकरितांच असतें. कोणी कशावरही प्रेम करो, तें प्रेम त्या वस्तूकरितां नसून आत्म्याकरितांच असतें. याकरितां आत्मा म्हणजे काय, याजबद्दल प्रथम ऐकून घ्यावें; नंतर जें कांहीं ऐकलें असेल त्याचा सांगोपांग विचार करावा, आणि मग त्याचेंच सदैव चिंतन करावें. माझ्या प्रिय मैत्रयी आत्मज्ञान झालें म्हणजे सर्व कांहीं ज्ञात होतें. सर्व वस्तुजातांत अज्ञात असें कांहीं उरतच नाहीं. '

या संभाषणाचा अर्थ काय? आपणाला चमत्कारिक भासण्यासारखें तत्त्वज्ञान यांत गोंविलें आहे. ज्याला आपण जग या संज्ञेनें ओळखतों, त्यांतील अनेक वस्तूंच्या द्वारें आत्माच प्रतीत होत असतो, असें यांत सांगितलें आहे. प्रेम, प्रेम म्हणून जी कांहीं चीज आहे, तिचें वास्तविक स्वरूप म्हणजे अगदीं हलक्या दर्जाचा आपलपोटेपणा हेंच. याहून त्या प्रेमाला खऱ्या दृष्टीनें अधिक किंमत नाहीं, आणि माझें स्वतःवरच प्रेम असल्यामुळें मी इतरांवर प्रेम करतों, असें या संभाषणांत दर्शविलें आहे, हें खरें असेल काय? अर्वाचीन काळच्याही कांहीं तत्त्ववेत्त्यांनीं हेंच प्रतिपादन केलें आहे. त्यांचेंही म्हणणें हेंच आहे कीं, मनुष्याला कार्याकडे प्रवृत्त करणारी एकच शक्ति या जगांत आहे. ती शक्ति म्हणजे स्वार्थ. हें म्हणणें खरें आहे आणि खोटेंही आहे. या लहानशा देहांत प्रत्ययाला येणारा 'मी' हा त्या विश्वव्यापी आत्म्याची छाया—प्रतिबिंब—मात्र आहे; आणि या छायारूप 'मी' बद्दल प्रेम वाटणें हें पापमूलक आहे असें वाटतें, याचें कारण हेंच कीं, हें प्रेम समर्याद होतें. प्रेमाचें हें आकुंचित स्वरूप आहे. आपलें प्रेम वस्तुतः छायेबद्दल नसून तें विश्वव्यापी आत्म्याकरितांच असतें; तथापि तें बाह्यतः मर्यादित झालें—आकुंचन पावलें—म्हणजे त्याला आपलपोटेपणाचें हिडिस स्वरूप प्राप्त होतें. एखादी स्त्री आपल्या नवऱ्यावर प्रेम करते तेंसुद्धां वस्तुतः विश्वव्यापक आत्म्यावरीलच प्रेम होय. आतां ही गोष्ट तिला कदाचित् समजत असेल अथवा नसेल इतकेंच. त्या प्रेमाचें रूप व्यक्त होऊन जगाच्या बंधनांत सांपडूं लागलें, कीं तें हलक्या

दर्जाचें होतें आणि त्याला आपलपोटेपणा हें पापदर्शक नांव प्राप्त होतें; तथापि तें प्रेमही विश्वव्यापी प्रेमाचाच अंश असतें. विश्वव्यापी आत्मा हा प्रेमनिधान असल्यामुळें आपल्या मनांत कसल्याही प्रकारचें प्रेम अंशतः जरी उद्भवलें, तरी तें त्या निधींतूनच आलें पाहिजे.

या आत्म्याची आपणांस ओळख करून घ्यावयाची आहे. ज्यांना अशा प्रकारची ओळख पटलेली नसते, ते अत्यंत मर्यादित स्थितींत राहिले असल्या-मुळें त्यांचें प्रेमही अत्यंत मर्यादित होतें; आणि त्याला आपलपोटेपणा हें नांव प्राप्त होतें. ज्यांना आत्मप्रतीति झालेली असते, त्यांच्या प्रेमालाही मर्यादा नसते. त्यांचें प्रेम विश्वव्यापी असतें. त्यांचा आपलपोटेपणा आपली लहानशी मर्यादा टाकून विश्वव्यापी होतो. "**कीं विश्वचि माझें घर। ऐशी मति जयाची स्थिर। किंबहुना चराचर। आपण झाला॥**" अशी त्याची स्थिति होते आणि त्यांना आपण सत्पुरुष म्हणतों. कोणाचें ब्राह्मणावर प्रेम असतें तें तो ब्राम्हण म्हणून नव्हे, तर त्याच्या द्वारा जें आत्मबिंबाचें दर्शन होतें त्या-वरील तें प्रेम असतें. 'ब्राह्मण आणि विश्वात्मा, हें जो वेगळेपणें पाहतो त्याचा ब्राह्मण त्याग करतो. क्षत्रिय आणि विश्वात्मा हे भिन्न आहेत असें जो पाहतो त्याचा क्षत्रिय त्याग करतो. जग आणि विश्वव्यापी आत्मा हे भिन्न आहेत असें जो पाहतो त्याचा जग त्याग करतें. देव आणि विश्वव्यापी आत्मा यांत भिन्नता आहे असें जो पाहतो त्याचा देव त्याग करतात. सर्व वस्तू निराळ्या आणि विश्वव्यापी आत्मा निराळा असें जो पाहतो त्याचा त्याग सर्व वस्तू करतात. ब्राह्मण, क्षत्रिय, देव, जग आणि इतर सर्व वस्तू, या वस्तुतः आत्मरूपच आहेत.' प्रेमाचें स्वरूप महर्षि याज्ञवल्क्यांनीं याप्रमाणें सांगितलें आहे. प्रेम याप्रमाणें विश्वव्यापी असतां त्यांत आपलपोटेपणाचा भाग कसा निर्माण होतो? माझें प्रेम एखाद्या विशिष्ट स्त्रीच्या ठायीं जडलें आहे अशी कल्पना करूं. ज्या क्षणीं मी माझें प्रेम त्या एकाच विशिष्ट व्यक्तीशीं जोडलें, त्याच क्षणीं माझ्यांतील प्रेमाला मर्यादा उत्पन्न झाली. जो पदार्थ समर्याद आहे तो अनंत असूं शकणार नाहीं हा तर सिद्धांतच आहे. माझें प्रेम समर्याद झाल्याबरोबर तें अंतवंत झालें, आणि त्याबरोबरच त्याला स्वार्थाचें–आपलपोटे-पणाचें–क्षुद्ररूपही प्राप्त झालें. त्याला स्वार्थाचें रूप प्राप्त होण्याबरोबर, त्याचें दुःखांत पर्यवसान होण्याचीं भीतिही उत्पन्न झाली; पण ती स्त्री आत्मरूपच

आहे असा प्रत्यय माझ्या अंतरंगांत बाणला, तर त्याच माझ्या प्रेमाला पूर्णत्व प्राप्त होतें; आणि मग त्या ठिकाणीं दुःखाचें वारेंही संभवत नाहीं. अशाच रीतीनें विश्वांतून एखादी वस्तु निराळी करून—तिचें आत्मरूप संकुचित करून—तिजवर तुम्ही प्रेम करतां त्यावेळीं त्या तुमच्या क्रियेला पुढें होणाऱ्या प्रतिक्रियेची तयारीच तुम्हीं करीत असतां. ज्या ज्या पदार्थांचें आत्मरूप आपण संकुचित करूं पाहतों, तो तो प्रत्येक पदार्थ आपल्या या क्रियेला प्रतिक्रिया करतो आणि यामुळें त्या पदार्थांतून आपणांस दुःखाची आणि संकटाची प्राप्ति होते. जर सर्व पदार्थ आत्मरूप आहेत असें जाणून आत्मरूपानें त्यांजवर आपण प्रेम केलें; तर त्यांतून प्रतिक्रियेची—दुःखाची—उत्पत्ति होणें शक्यच नाहीं. पूर्णानंद—पूर्ण सुखरूपता—ती हीच.

या कल्पनातीत स्थितीला पोहोंचणें शक्य आहे काय ? या स्थितीला पोहोंचावयास कांहीं मार्ग आहे काय? होय. श्रीयाज्ञवल्क्यांनीं हा मार्गही सुप्रकाशित करून ठेविला आहे. विश्व अनंत आहे. त्याच्यांतील प्रत्येक वस्तूंत आत्मरूप पाहावयाचें ही गोष्ट खरी; पण प्रथम आत्मरूपाचीच ओळख नसेल, तर तें इतर वस्तूंत तरी कोठून दिसेल ? ‘लांब अंतरावर एखादा ढोल वाजत असला आणि त्याचा नाद बंद करण्याची इच्छा आपणास झाली, तर हवेवरून वाहत येणारे नादतरंग बंद करून त्याचा नाद बंद करणें आपणांस शक्य नाहीं; परंतु आपण त्या ढोलाजवळ गेलों व त्यावर हात ठेविला, तर त्याचा नाद ताबडतोब बंद पडेल. एखादा शंख वाजत असला, तर शंखाजवळ जाऊन त्याच्या मुखाला हात लावल्याशिवाय त्याचें वाजणें बंद करतां येत नाहीं. एखादा वीणा वाजत असला, तर त्याच्याजवळ जाऊन त्याच्या तारांवर हात ठेवला पाहिजे. ओलसर सर्पण जळत असलें म्हणजे त्यांतून धूर आणि नानाप्रकारचे स्फुलिंग बाहेर पडत असतात. त्याचप्रमाणें त्या मोठ्या एकांतून इतिहास आणि अनेक प्रकारच्या विद्या बाहेर पडल्या आहेत. सर्व पाण्याचा शेवटचा मुक्काम समुद्र हाच; स्पर्शज्ञानाचें अधिष्ठान हात हेंच; गंधज्ञानाचें अधिष्ठान नाक; रसज्ञानाचें अधिष्ठान जीभ; रूपज्ञानाचें अधिष्ठान डोळे; शब्दज्ञानाचें अधिष्ठान कान; संकल्पविकल्पांचें अधिष्ठान मन; सर्व विद्यांचें अधिष्ठान हृदय; क्रियेचें अधिष्ठान हात; भाषेचें अधिष्ठान जीभ; समुद्राच्या पाण्यांत मीठ ओतप्रोत भरलें असतांही तें दिसत नाहीं; त्याच-

प्रमाणें आत्मा अनेक अधिष्ठानांत आणि सर्वत्र ओतप्रोत भरलेला असतांही त्याचें दर्शन होत नाहीं; तथापि आत्मा विश्वांत सर्वत्र आहे. सर्वच आत्मरूप आहे. सर्व ज्ञान जेथें एकत्र सांठविलें गेलें आहे असें ठिकाण आत्मा हेंच. हें सर्व विश्व त्यांतूनच निर्माण झालें असून, त्याचा लयही त्यांतच होणार आहे. आत्मप्रतीति झाली तर आपण ज्ञानातीत होऊं.' आपण सर्व त्या आत्मरूपाचे स्फुलिंग आहों ही कल्पना येथें ग्रथित केली आहे. तसेंच आपण त्याला जाणलें असतां, आपण त्याच मूळ अधिष्ठानाला परत जाऊन त्याशीं पुन्हां एकरूप होतों, असेंही येथें सांगितलें आहे.

हें भाषण ऐकून मैत्रेयी घाबरली. हा प्रकार आपणांस सर्वत्र आढळून येतो. अपूर्व असें भाषण ऐकल्यावर पुष्कळांचें चित्त कंपित व्हावयाचेंच. मैत्रेयी म्हणाली, 'महाराज, आपण मला गोंधळांत पाडीत आहां. आपण म्हणतां सर्व देव आणि व्यक्ति नष्ट होणार! हें ऐकून माझें चित्त ठाव सोडूं पाहत आहे! व्यक्तित्व नष्ट झालें, तर अशा स्थितींत मला आत्मप्रतीति कशी होईल! व्यक्तित्व नष्ट झालें, म्हणजे बेशुद्धि येईल, कीं तशा स्थितींतही आत्मप्रतीतीची जाणीव माझ्या ठिकाणीं राहील? अशा स्थितींत जाणण्याजोगें कोणी असणार नाहीं काय? अशा स्थितींत संज्ञा कशाची असेल? अशा स्थितींत प्रेम कोणावर करावें? आणि अशा स्थितींत द्वेष्य कोण असेल? अशा स्थितींत माझें काय होईल?' याज्ञवल्क्य म्हणाले, 'मैत्रेयी, मी बेशुद्धीबद्दल–मोहावस्थेबद्दल–बोललों नाहीं. भिऊं नको. आत्मा अविनाशी आहे. तो मूलतः अनाद्यनंत आहे. या एकरूपांत दोहोंचा भास होणें हें वैगुण्य आहे. ज्या ठिकाणीं द्वैताची प्रतीति आहे, त्या ठिकाणीं एक दुसऱ्याचा वास घेतो, एक दुसऱ्याला पाहतो, एक दुसऱ्याला ऐकतो, एक दुसऱ्याबद्दल विचार करतो आणि एक दुसऱ्याला जाणतो. पण सर्वच एकात्मरूप झाल्यावर कोण कशाचा वास घेणार, कोण कोणाला ऐकणार, कोण कोणाचें स्वागत करणार आणि कोण कोणाला जाणणार? ज्यामुळें सर्व जाणलें जातें त्या मूलरूपाला जाणण्याचें सामर्थ्य कोणाला असणार आहे? या आत्म्याबद्दल भाषेनें सांगावयाचेंच म्हटलें, तर 'नेति नेति' इतकेंच म्हणतां येईल. तो जाणतां येण्यासारखा नसल्यामुळें बुद्धि त्याला जाणूं शकत नाहीं. त्याच्यांत कसलाच बदल होत नसल्यामुळें तो कधींही निस्तेज होत नाहीं. तो अलिप्त असल्यामुळें

प्रकृतीशीं तादात्म्य पावत नाहीं. स्वयंपूर्ण असल्यामुळें तो सुखदुःखातीत आहे. जाणत्याला कोणीं जाणावें ? कोणत्या साधनांनीं त्याचें ज्ञान करून घ्यावें ? त्याला जाणण्याला साधनेंच नाहींत. सर्व ऋषींनीं सांगितलेला हाच अंतिम सिद्धांत आहे. ज्ञानातीत होणें हाच आत्मानुभवाचा आणि अनंतत्वाचा मार्ग.

अस्तित्व म्हणून जें कांहीं आहे, तें एक एकरूप आहे असें येथें सांगितलें आहे. ज्या ठिकाणीं लहानमोठे भाग नाहींत, जें अच्छेद्य आहे, ज्या ठिकाणीं लहान आणि मोठें या क्षुद्र आणि मृगजलवत् कल्पना संभवतच नाहींत, असे तें विशिष्ट अस्तित्व आहे. त्या अस्तित्वाचें स्वरूप असें आहे तरी पिंडापिंडांतून तेंच रूप प्रतीत होत आहे. व्यक्तिमात्राच्या ठिकाणीं त्याच अस्तिवाचे प्रकाशकिरण व्यक्त होत आहेत. प्रत्येक वस्तु त्याच आत्मरूपाचें व्यक्तस्वरूप आहे. या मूळरूपापर्यंत कसें पोहोंचावयाचें ? महर्षि याज्ञवल्क्यांनीं आपणांस आरंभींच असें सांगितलें आहे कीं, प्रथम याबद्दल ऐकून घ्या, मग त्यावर विचार करा आणि नंतर त्याचेंच सदैव चिंतन करा. या विश्वांत जें जें कांहीं आपण पाहतों, अथवा जाणतों, त्या सर्वांत मूलतत्त्व आत्मा हेंच आहे, असें येथवर सांगितलें आहे. नंतर आत्मरूपाचें अनंतत्व आणि मानवी मनाचें समर्यादत्व यांचा विचार करून समर्यादानें अमर्यादाला—अनंताला—जाणणें सर्वथा अशक्य आहे, असा सिद्धांत श्रीयाज्ञवल्क्यांनीं सांगितला आहे. आतां, अनंताला जाणणें आम्हांस जर सर्वथा अशक्य आहे तर पुढें आम्हीं काय करावें ? याज्ञवल्क्य म्हणतात कीं, जरी त्याला जाणतां आलें नाहीं, तरी त्याचा अनुभव होईल; आणि हें सांगत असतां त्यांनीं चिंतनविचारही सांगितला आहे. हें सारें विश्व व्यक्तीला मदत करीत आहे आणि व्यक्ति ही विश्वाला मदत करीत आहे, कारण, त्यांचा अन्योन्यसंबंधच तसा आहे. यांतील एकाची उत्क्रांति दुसऱ्याच्या उत्क्रांतीला मदत करते; पण आत्मा स्वयमेव प्रकाशक असल्यामुळें त्याला प्रकाश देणारा दुसरा कोणीही असणें शक्य नाहीं हें उघडच आहे. जो स्वयंपूर्ण आहे, त्याला आणखी निराळें पूर्णत्व तें कोण आणि कसें देणार ? आत्मा स्वयमेव आनंदरूप आहे; आणि या सुखरूपतेचें कितीही ग्राम्यरूप आढळलें, तरी तेंही त्या आनंदरूपाचेंच प्रतिबिंब आहे. जें कांहीं 'चांगलें' म्हणून आपणांस वाटतें तें त्याचेंच प्रतिबिंब आणि तेंच प्रतिबिंब अधिक संकुचित झालें म्हणजे त्याला आपण

'वाईट' असें नांव देतों. जेव्हां आत्मरूपावरील आवरण अधिक दाट असतें, तेव्हां आपण त्याला अंधार—वाईट—असें म्हणतों आणि ज्या वेळीं हें आवरण विरल असतें, तेव्हां त्याला आपण प्रकाश—चांगलें—असें म्हणतों. चांगलें आणि वाईट हीं वस्तुतः भिन्न रूपें नाहींत. त्यांत फरक आहे तो फक्त परिमाणाचा आहे. एकांत आत्मरूप अधिक व्यक्त झालें असून दुसऱ्यांत तें कमी व्यक्त झालें आहे. आपण आपलाच अनुभव चाळून पाहिला तरी हेंच आढळून येतें. आपल्या लहानपणीं कित्येक गोष्टी आपणांस चांगल्या वाटत असतात. पण त्याच वाईट असतात असा अनुभव नंतर आलेला असतो. त्याचप्रमाणें आरंभीं वाईट म्हणून वाटत असलेल्या गोष्टी, नंतर चांगल्या वाटूं लागतात. आपल्या आयुष्यांतील बऱ्यावाईट कल्पनांत बदल किती वेळां होत असतो याचा विचार करा. आपल्या कल्पनांची वाढ कशी होत असते, हें पहा. एके वेळीं बरी म्हणून वाटत असलेली स्थिति थोड्या वेळानंतर शिळी आणि बेचव होते! यावरून बरें आणि वाईट हीं स्वरूपें वस्तुतः आपल्या स्वतःच्या मनःस्थितीवर अवलंबून आहेत, असें दिसून येईल. बरें आणि वाईट या कल्पना वस्तुगत नसून आत्मगत आहेत हें यावरून सिद्ध होतें; आणि त्याचप्रमाणें बरें आणि वाईट या स्वरूपांत फरक म्हणून जो दिसतो तो त्या पदार्थांच्या वास्तविक गुणधर्मांमुळें उत्पन्न झालेला नसून तो फक्त व्यक्ततेच्या कमी अधिक परिमाणामुळें उत्पन्न झालेला असतो हेंही कळतें. तो फरक गुणधर्ममूलक नसून परिमाणमूलक मात्र असतो. जें जें कांहीं व्यक्तदशेला आलें आहे, तें वस्तुतः आत्म्याचेंच व्यक्तरूप आहे. ज्या वेळीं आत्म्याच्या व्यक्ततेचें परिमाण फार कमी असतें, त्या वेळीं त्या स्थितीला आपण वाईट, पाप इत्यादि नांवें देतों; आणि ज्या वेळीं हें व्यक्तत्व अधिक स्पष्ट असेल त्या वेळीं त्या स्थितीला आपण चांगलें, पुण्य अशीं नांवें देतों. आत्मा हा या दोन्ही स्थितींच्या पलीकडचा आहे. त्याच्या ठिकाणीं कांहीं चांगलें नाहीं, आणि कांहीं वाईटही नाहीं. याकरितां विश्वांत जें जें कांहीं आहे, तें सर्व चांगलेंच आहे, अशा भावनेचें चिंतन करावें. कारण, कोणतेंही रूप झालें तरी तें त्या पूर्णाचेंच प्रतिबिंब आहे. तो पूर्ण आहे याकरितां तो बरा नाहीं आणि वाईटही नाहीं. तो पूर्ण आहे आणि पूर्ण वस्तु एकच असूं शकेल. चांगले अनेक असूं शकेल आणि वाईटही अनेक असूं

शकेल. त्याच्यांत अनंत प्रकारच्या कमीअधिकपणाचें परिमाण असूं शकेल. पण पूर्ण असें एकच आहे. तें पूर्ण एखाद्या विशेष प्रकारच्या भिंगांतून पाहिलें म्हणजे त्या प्रकारच्या रंगाचें दिसतें; आणि आपण त्याला 'बरें' म्हणतों. तेंच दुसऱ्या भिंगांतून पाहिलें म्हणजे त्या दुसऱ्या रंगाचें दिसतें; आणि आपण त्याला 'वाईट' असें नांव देतों. कांहीं कांहीं गोष्टींवर आपण बरें आणि वाईट असे कायमचे ठसे मारले आहेत, हा आपला भोळे-पणा–वेडेपणा–नव्हे काय? वास्तविक पाहतां एखादी वस्तु कमी चांगली अगर अधिक चांगली इतकेंच फारतर म्हणतां येईल. या आपल्या चांगल्या वाईटाच्या कल्पनेमुळें दुसरीं हजारों प्रकारचीं द्वैतें–द्वंद्वें–मात्र उपस्थित झालीं आहेत, आणि तीं आतां मानवी हृदयांत खोल बुड्या मारून बसलीं आहेत. आज युगानुयुगें या कल्पना स्त्रीपुरुषांस भेडसावीत आहेत. जगांत जितका मत्सर आज दिसतो, तितक्या साऱ्याचें खापर याच कल्पनांच्या माथीं फोडलें पाहिजे. आमच्या बाल्यावस्थेपासून हीं द्वंद्वें आमच्या चित्तांत सुरुंग तयार करीत असतात. आणि यथाकाळीं त्यांचा भडका उडतो. एकंदर मनुष्यजातीबद्दल आम्ही आपलें म्हणून बनविलेलें मत सर्वथैव चुकीचें असतें. अहाहा! ही पृथ्वी किती सुंदर! पण आम्हीं दिवट्यांनीं, तिला नरकाचें स्वरूप दिलें आहे. मित्रहो, बरें आणि वाईट या द्वंद्वाचा त्याग आपण ज्या क्षणीं करूं त्या क्षणीं तिला स्वर्गाचें रूप प्राप्त होईल.

'ही पृथ्वी आनंदमयी आहे. सर्व प्राण्यांना ती आनंद देते. तसेंच सर्व प्राणी पृथ्वीला आनंद देतात. ते सर्व एकमेकांचे हात धरून चालले आहेत. हा सर्व आनंद त्या आत्म्यापासून उद्भवला आहे. तोच प्रकाशक आणि अनंत आहे.' तो एकच आनंद अनंतप्रकारें व्यक्त होत आहे. मनुष्याच्या हृद-यांत प्रेमाचा जो ओलावा आहे, तो सर्व त्याचाच आहे. मग तो ओलावा साधूच्या हृदयांत असो, वा पाप्याच्या हृदयांत असो; तो एखाद्या देवाच्या हृदयांत असो, वा एखाद्या खुनी मनुष्याच्या हृदयांत असो; तो देहांत असो, मनांत असो अगर इंद्रियांत असो, तो त्याचेंच रूप. त्यावांचून अन्य काय असूं शकणार आहे? केवळ शारीरिक सुखासारख्या अत्यंत जडरूपानेंही जें सुख प्रत्ययास येतें, तें तोच आणि केवळ उच्च आत्मभावामुळें जें सुख अनु-भवास येतें तेंही तोच. श्रीयाज्ञवल्क्यांचा हा उपदेश आहे. ज्या वेळीं सर्वत्र

एकच आनंद पाहण्याजोगी स्थिति तुम्हांस प्राप्त होईल, ज्या वेळीं दारूबाजाच्या आनंदांत आणि शुद्ध सात्विक साधूच्या समाधिसुखांत एकाच आनंदाची व्याप्ति तुम्हांस दिसूं लागेल, त्याच वेळीं सत्याशीं तुमची प्रत्यक्ष भेट होईल; आणि त्याच वेळीं सुख म्हणजे काय हें तुम्हांस बरोबर कळूं लागेल; त्याच वेळीं शांति म्हणजे काय व प्रेम म्हणजे काय हेंही तुम्हांस कळेल, जोंपर्यंत तुमच्या हृदयांत हे खोटे भेद जिवंत आहेत, या पोरकट आणि खुळसट कल्पना वास्तव्य करून आहेत, तोंपर्यंत सर्व प्रकारचीं दुःखें आणि आपत्ती बोलावण्यावांचून येतील. तोच अनंत प्रकाश सर्व विश्वाचें अधिष्ठान आहे. हा सर्व आनंद त्याचाच आहे. ही देहरचना म्हणजे विश्वरचनेचा एक लहानसा नमुनाच आहे. या देहांत प्रत्ययास येणाऱ्या सर्व प्रकारच्या शक्तींतून आणि मनाला प्राप्त होणाऱ्या आनंदांतून तोच प्रकाश प्रकाशत आहे. देहांत प्रकाशणारा तो प्रकाश म्हणजे आत्मा. 'हें जग सर्वांना प्रिय आहे आणि जगाला सर्व प्रिय आहेत–;' कारण, तोच अनंत या विश्वांतील आनंद आहे. तोच ब्रह्म. 'हें वातावरण सर्व प्राण्यांना प्रिय आणि वातावरणाला सर्व प्राणी प्रिय–;' कारण, तोच स्वयंप्रकाश अनंत वातावरण आहे. तोच या देहांतही आहे. सर्व प्राण्यांत तोच चैतन्यरूपानें व्यक्त होतो. 'सूर्य सर्व प्राण्यांना प्रिय आहे आणि सूर्याला सर्व प्रिय आहेत–;' कारण, तोच स्वयंप्रकाश सूर्य आहे आणि आपण सर्व त्याच्याच लहान लहान ज्योती आहोंत. 'हा चंद्र सर्वांना प्रिय आहे आणि चंद्राला सर्व प्रिय आहेत–;' कारण, तोच स्वयंप्रकाश अनंत चंद्राचा आत्मा आहे. तोच मनोरूपानें आमच्यांत प्रकाशत आहे. 'ही विद्युत् सर्वांना प्रिय आहे आणि विद्युत्ला सर्व प्रिय आहेत–;' कारण, तोच स्वयंप्रकाश अनंत या विजेचा आत्मा आहे; आणि तोच आपणांतही आहे. कारण, "**सर्वं खल्विदं ब्रह्म.**" हें ब्रह्म–आत्मा–हाच सर्वांचा अधिपति आहे. या सर्व कल्पना आपल्या मानवजातीला अत्यंत हितकर आहेत. या सर्व कल्पना ध्यानार्ह आहेत. पृथ्वीचें ध्यान करावें, आणि त्याच वेळीं अशीही विचारजागृति ठेवावी कीं या पृथ्वींत जें कांहीं आहे तें माझ्यांतही आहे आणि पृथ्वी व मी एकरूपच आहों. हा देह म्हणजेच पृथ्वी. अशा एकरूपानें या कल्पनेचा विचार करावा आणि या पृथ्वीचा व आपला प्रकाशक एकच आहे अशी पक्की भावना करावी. या हवेचा चालक आणि आपला चालक एकच आहे अशी भावना करावी.

अनंतरूपांनीं तोच एक प्रकाशत आहे. हें आत्मैक्य सर्वत्र अनुभवणें हेंच ध्यानाचें साध्य आहे. श्रीयाज्ञवल्क्यांच्या मनांत मैत्रयीला जें कांहीं सांगावयाचें होतें तें हेंच.



## प्रकरण ७ वें

# ज्ञानयोगाचा अत्युच्च आदर्श

चालू व्याख्यानमालेंतील हें शेवटचें व्याख्यान असल्यामुळें, मीं आजपर्यंत आपणांस जें कांहीं सांगितलें, त्याचें आज सिंहावलोकन करावें असा माझा विचार आहे. वेद आणि उपनिषदें यांत हिंदूंच्या धर्मसंबंधीं अत्यंत प्राचीन कल्पना आढळून येतात. श्रीकपिल महामुनि हे प्राचीन खरे, पण वेद त्यांहूनही फार प्राचीन आहेत. सांख्यशास्त्र हें त्यांनीं अगदींच नवें शास्त्र प्रकाशांत आणलें असें नाहीं. त्या वेळीं ज्या हजारों धर्मकल्पना इतस्ततः वावरत होत्या त्या सर्वांना एका सुतांत ओंवून त्यांचा एक सर बनविण्याचें कार्य मात्र त्यांनीं केलें. सर्व धर्मकल्पना मुळांत होत्याच; पण त्या विस्कळित होत्या. त्यांना एकतानता आणि विशेष प्रकारचें शास्त्रीयरूप हीं नव्हतीं. श्रीकपिलांनीं आपल्या विशाल बुद्धीच्या प्रभावानें या विस्कळित कल्पनांतून शास्त्र निर्माण केलें. बाह्यतः एकमेकांशीं विरोधी दिसणारीं अशीं अनेक मतें हिंदुस्थानांत आज प्रचलित आहेत. या सर्व मतांनीं श्रीकपिलांच्या सूक्ष्मेंद्रियशास्त्राचा आधार घेतला आहे. श्रीकपिलांनीं जें शास्त्र निर्माण केलें, तें आजतागाईत सर्व प्रकारच्या पंडितांस मान्य झालें आहे. श्रीकपिलांनंतरही अनेक दर्शनकार होऊन गेले; तथापि मानवी मनाचें त्यांनीं केलेलें पृथक्करण आणि त्यांचें सर्वव्यापी दर्शन यांजवर कडी करणारा तत्त्वदर्शी आजतागाईत कोणीही झाला नाहीं. त्यांच्या सांख्यदर्शनानंतर अद्वैतमताचा उद्भव झाला हें खरें; तथापि त्या मताचा पाया श्रीकपिलांनींच घातला असें म्हणण्यास यत्किंचितूही प्रत्यवाय नाहीं. श्रीकपिलांनीं इमारतीचा जेवढा भाग रचिला होता तोच हातीं घेऊन इमारत पुरी करण्याचें काम मात्र अद्वैतमतानें केलें. सांख्यमताचें पर्यवसान द्वैतमतांत होतें; त्याचीच सर्व पूर्वपीठिका अद्वैतमतानें घेतली आणि त्याच विचारसरणीनें आणखी एक पाऊल पुढें टाकून अद्वैतमतानें शेवटीं सर्व '**एकच**' आहे असें स्थापित केलें.

श्रीकपिलांच्या काळापूर्वीं जितक्या कांहीं धर्मकल्पना अस्तित्वांत होत्या, त्यांपैकीं अत्यंत प्राचीन कल्पनासमूहांतही अंतर्ज्ञानकल्पनेचा समावेश झाला असल्याचें आढळून येतें. अमुक पुस्तक अथवा तत्त्वज्ञान हें परमेश्वराकडून

मिळालें, अमक्याच्या मनांत ईश्वरी प्रेरणा झाली, अशा प्रकारच्या कल्पना अत्यंत प्राचीनकाळींही प्रचलित होत्या. अगदीं आरंभींची विश्वोत्पत्तीबद्दलची कल्पना म्हटली म्हणजे, 'हें सारें विश्व परमेश्वराच्या इच्छेनें शून्यांतून उद्भ-वलें' हीच होय. आरंभीं विश्वाचा कांहीं मागमूसही नव्हता आणि नास्ति-त्वांतूनच तें उत्पन्न झालें. यानंतरचा कल्पनासमूह पाहिला, तर त्यांत या मताबद्दल संशय प्रदर्शित केला असल्याचें आढळून येतें. वेदान्तमताच्या अगदीं प्रारंभकाळीं अशी शंका प्रदर्शित करण्यांत आली आहे, कीं 'नास्ति-त्वांतून अस्तित्व कसें उद्भवूं शकेल?' ज्या अर्थी या विश्वाच्या अस्तित्वाचा अनुभव येतो, त्या अर्थी कसल्या प्रकारच्या तरी पूर्व अस्तित्वांतूनच हें निर्माण झालें असलें पाहिजे. नास्तित्वांतून कधींच कांहीं निर्माण होऊं शकत नाहीं, हा सामान्य अनुभव त्या पूर्वकालीनांसही होताच. आपणास कोणताही पदार्थ निर्माण करावयाचा असला, तरी त्याचा मालमसाला आणि त्याचा कर्ता या दोहोंसही त्या पदार्थापूर्वी अस्तित्व अवश्य असतें, ही गोष्ट त्यांच्या रोजच्या अनुभवाची होती. यामुळें 'शून्यांतून विश्व निर्माण झालें' या पूर्वकल्पनेचा त्याग प्राचीन हिंदूंनीं–आर्यांनीं–केला, हें रीतसरच झालें असें म्हटलें पाहिजे. यानंतर ज्यांतून हें सारें विश्व निर्माण झालें, तो पदार्थ कोणता असावा, याच्या शोधाकडे यांच्या विचाराचा ओघ स्वाभाविकपणेंच वळला. धर्मशास्त्राच्या इतिहासाचें समग्र आलोडन केलें, तर एकच गोष्ट मुख्यत्वेंकरून आढळून येते, ती ही कीं, या पदार्थांच्याच शोधांत वस्तुतः सारा धर्म गुंतला आहे. 'हें सारें विश्व कशांतून निर्माण झालें?' याच प्रश्नाच्या उत्तराकरितां हा सारा खटा-टोप उभा राहिला आहे. ईश्वर हा विश्वाचें निमित्तकारण आहे कीं नाहीं हा प्रश्न बाजूला ठेवला, तरी ईश्वरानें हें विश्व कशांतून निर्माण केलें, हा अत्यंत मोठा प्रश्न शेवटीं शिल्लक उरतोच. जगांतलें सारें तत्त्वज्ञान जणुंकाय या एकाच प्रश्नाभोंवतीं पिंगा घालीत आहे!

या प्रश्नाला असें एक उत्तर देण्यांत आलें आहे, कीं, परमात्मा, जीवात्मा आणि जडवस्तू हीं तिन्ही अनंत अस्तित्वें आहेत. या तीन समांतर रेषा एका शेजारीं एक अशा रीतीनें अनंतकालापासून चालू आहेत. यांपैकीं जीवात्मा आणि जडवस्तु–निसर्ग–हीं दोन्ही अस्तित्वें परतंत्र असून ईश्वर मात्र स्वतंत्र आहे. ज्याप्रमाणें जडवस्तूंच्या प्रत्येक अणूचें अस्तित्व ईश्वराच्या इच्छेवर

अवलंबून आहे, त्याचप्रमाणें प्रत्येक जीवात्म्याचें अस्तित्वही ईश्वराच्या इच्छेवर अवलंबून आहे. श्रीकपिलांचें सांख्यदर्शन अस्तित्वांत आलें त्याच्या अगोदरच्या काळापासून या आणि अशाच प्रकारच्या दुसऱ्या कल्पना अस्तित्वांत असल्याचें आपणांस आढळून येतें. बाह्यवस्तूंचें ज्ञान आपणांस होतें तें एका विशिष्ट पद्धतीला अनुसरून होतें, असें श्रीकपिलांनीं प्रथम सांगितलें. एखाद्या बाह्यवस्तूच्या दर्शनाबरोबर पहिला आघात बाह्यकरणावर–जडडोळ्यांवर–होतो. त्या करणाच्या द्वारें तो इंद्रियाकडे–गोलकाकडे–पोंहोंचविला जातो. तेथून तो आघात मनाकडे रवाना होतो. मनाकडून तो बुद्धीकडे जातो आणि शेवटीं बुद्धीच्या द्वारें त्याची रवानगी आत्म्याकडे होते. निरनिराळ्या बाह्यसंज्ञांची नोंद मेंदूतील निरनिराळ्या गोलकांवर होते, असा शोध अर्वाचीन इंद्रियविज्ञानशास्त्रानेंही लावला आहे. या गोलाकांतही उच्च आणि नीच असे भेद त्या शास्त्रानें सांगितले आहेत. या दोन प्रकारच्या गोलाकांचीं कांहीं कार्यें आहेत असें जें इंद्रियविज्ञानशास्त्राचें प्रतिपादन आहे, त्या कार्यावरून पाहतां त्यांचें साम्य मन आणि बुद्धि या दोन स्वरूपांशीं आहे असें आपल्या लक्ष्यांत येईल; तथापि या सर्व गोलकांच्या कार्याची वासलात जेथून लागते असा एखादा मध्यवर्ती गोलक, इंद्रियविज्ञानशास्त्रास अद्यापि सांपडलेला नाहीं; यामुळें या निरनिराळ्या गोलाकांच्या क्रिया एकत्र कोठें होतात, हा प्रश्न शिल्लकच राहतो. या गोलकांच्या वास्तव्याच्या जागा मेंदूंत निरनिराळ्या ठिकाणीं असून, त्या सर्वांचें नियमन करणारा असा मध्यवर्तीगोलक सांपडला नाहीं. यावरून सांख्यदर्शनाचा शोध निदान या बाबीपुरता तरी इंद्रियविज्ञानशास्त्राच्या सीमेपलीकडे गेला आहे असें निर्विवाद कबूल करणें भाग आहे. हे सर्व गोलक जेथें एकत्र होतात असें मध्यवर्ती ठिकाण असलेंच पाहिजे. ज्या ठिकाणीं या निरनिराळ्या गोलकांच्या द्वारें आलेल्या संज्ञा एकत्र परावर्तित होतात, असा कांहीं पदार्थ असला पाहिजे. तो नसेल, तर एकतानतेचा भंग अवश्य होईल. जर असा मध्यवर्ती पदार्थ नाहीं अशी कल्पना केली, तर मला तुमच्याबद्दलची अथवा त्या चित्राबद्दलची अथवा दुसऱ्या कोणत्याही पदार्थाबद्दलची समग्र कल्पना एकाच वेळीं होणें अशक्य होईल. असें मध्यवर्ती ठिकाण नाहीं असें म्हटलें, तर पाहण्याची क्रिया एका वेळीं होईल. नंतर कांहीं वेळानें ऐकण्याची आणि नंतर कांहीं वेळानें स्पर्श जाणण्याची, याप्रमाणें सर्व क्रिया विस्कळित-

पणें होऊं लागतील. तसेंच एखाद्या मनुष्याचें भाषण आपण ऐकत असलों, तर त्या वेळीं पाहण्याची क्रिया बंद पडेल. सर्व गोलक निरनिराळे असून त्यांचा मध्यवर्ती नियंता कोणी नाहीं असें झालें, तर केवढा घोंटाळा उपस्थित होईल तो पहा.

हें आपलें स्थूलशरीर ज्या वस्तूंचें बनलें आहे, त्या वस्तू जड आहेत. त्यांच्यांत कोणत्याही प्रकारचें चैतन्य नाहीं. त्याचप्रमाणें आपला सूक्ष्म देहही जडवस्तूंचा बनला आहे. सांख्यमताप्रमाणें सूक्ष्मशरीर आकारानेंही अत्यंत सूक्ष्म आहे; तें ज्या वस्तूंचें बनलें आहे त्या वस्तू जड खऱ्या, पण त्या इतक्या सूक्ष्म--विरलस्वभाव--आहेत कीं, अति उच्चप्रतीच्या सूक्ष्मदर्शक कांचें-तूनही त्या दिसणार नाहींत. या सूक्ष्मदेहाचें कार्य काय आहे ? ज्याला आपण मन या संज्ञेनें ओळखतों, त्याचा वास त्या शरिरांत असतो. ज्याप्रमाणें जडदेह हा जडशक्तीचें निवासस्थान आहे, त्याचप्रमाणें सूक्ष्मदेह हा सूक्ष्म-शक्तीचें निवासस्थान आहे. ही सूक्ष्मशक्ति विचारादि क्रियांच्या द्वारें आपल्या प्रत्ययास येते. अगदीं बाह्यवरण म्हणजे स्थूल--जड--देह. त्या जडदेहा-बरोबर शक्तीचें जडरूप राहतें. पदार्थांच्या आश्रयावांचून शक्ति राहूं शकत नाहीं. पदार्थांच्या द्वारेंच शक्ति प्रगट होणें शक्य आहे. पदार्थांच्या आश्रयावांचून एकट्या शक्तीला स्वतंत्र रीतीनें प्रकट होणें शक्यच नाहीं. यामुळें स्थूलशक्ति स्थूलदेहाच्या द्वारें प्रकट होते, आणि नंतर आपल्या सूक्ष्मरूपांत परत जाऊन राहते. सूक्ष्मशक्ति सूक्ष्मदेहाच्या द्वारें प्रकट होते आणि त्यावेळीं तिला विचारादि संज्ञा प्राप्त होते. विचारादि सूक्ष्मशक्ति व क्रियेच्याद्वारें अनुभवाला येणारी स्थूलक्रियाशक्ति यांच्या रूपांत वस्तुतः भेद नाहीं; जो भेद आहेसा वाटतो तो गुणमूलक नसून रूपमूलक आहे. शक्ति बाह्यवर्ती झाली म्हणजे तिला आपण क्रिया म्हणतों आणि तीच शक्ति अंत-र्वर्ती झाली म्हणजे तिला विचार हें नांव आपण देतों. मूलशक्तींत भेद नसून नामरूपामुळें भेद झाल्यासारखा दिसतो. ज्याप्रमाणें निरनिराळ्या रूपांनीं प्रकट होणारी शक्ति मूलतः एकरूपच आहे, त्याचप्रमाणें स्थूलशरीर आणि सूक्ष्मशरीर यांतील द्रव्येंही मूलतः एकरूपच आहेत. ज्या पदार्थांचें सूक्ष्म-शरीर बनलें आहे ते पदार्थही जडच आहेत--मात्र त्यांचें स्वरूप सूक्ष्म आहे.

शक्तीचे हे नानाविध प्रकार कोठून उद्भवले ? वेदान्तमताप्रमाणें प्रकृति दोन पदार्थांची बनली आहे. यांपैकीं एकाला आकाश असें नांव त्यांनीं दिलें आहे.

आकाश हें जडवस्तूंचें मूलरूप आहे. दुसऱ्या पदार्थाला त्यांनीं प्राण असें नांव दिलें आहे. जें कांहीं आपण पाहूं शकतों अथवा ऐकूं शकतों अथवा ज्याचा आपणांस कोणत्या तरी द्वारानें अनुभव घडतो, तें सर्व जडरूप आहे. आणि प्रत्येक वस्तूला तिचें जडरूप आकाशापासून प्राप्त झालें आहे; अथवा आकाशच निरनिराळीं रूपें धारण करतें, असें म्हणणें अधिक सशास्त्र होईल. आकाश सूक्ष्मरूपानें अथवा स्थूलरूपानें अवतरतें. आकाशाचें हें स्थूल अथवा सूक्ष्म-रूपांतर प्राणशक्तीमुळें घडून येतें. आकाश जसें सर्वगामी आहे, त्याचप्रमाणें प्राणही सर्वगामी आहे. प्रत्येक वस्तूंत प्राण आणि आकाश यांचा वास असा-वयाचाच. आकाश हें पाण्यासारखें आहे अशी कल्पना केली, तर जगांतील स्थूलवस्तू या बर्फासारख्या आहेत असें म्हणतां येईल. बर्फ हें ज्याप्रमाणें पाण्याचेंच बनलेलें असतें आणि तें जसें अंतर्बाह्य पाणीच असतें, त्याचप्रमाणें सर्व वस्तू आकाशाच्याच बनल्या असून त्यांच्या आंतबाहेर आकाशच असतें. आकाशाला जे निरनिराळे आकार प्राप्त होतात, ते प्राणशक्तीच्या आघातामुळें झालेले असतात. शक्तीच्या स्थूलरूपाचा प्रत्यय येण्याकरितां स्थूलदेह बनला आहे. चालणें, बसणें, बोलणें इत्यादि क्रिया आणि स्नायूंच्या इतर क्रिया हीं सारीं शक्तीचीं स्थूलरूपें होत. ज्याप्रमाणें स्थूलदेह आकाशांतून बनला आहे, त्याचप्रमाणें सूक्ष्मदेहही आकाशांतूनच बनला आहे. त्या सूक्ष्म-देहाच्याद्वारें प्राणाचें सूक्ष्मरूप—विचार इत्यादि—प्रत्ययास येतें. स्थूलदेह हें अगदीं बाह्यावरण असून त्याच्या आंत सूक्ष्मदेह आहे आणि त्याच्या आंत जीव आहे. जीव म्हणजे खरा मानवी प्राणी. आपण आपलीं नखें शेंकडों वेळ कापून टाकलीं, तरी तीं आपल्या देहाचाच एक भाग म्हणवितात. तीं बाहेरून आणून आपल्या देहाला चिकटविलेलीं नसतात. त्याचप्रमाणें आपल्याला सूक्ष्म आणि स्थूल असे अगदीं निरनिराळे देह असतात असें नाहीं. ज्याप्रमाणें वर्षांतून शेंकडों वेळां आपण आपलीं नखें काढून टाकतों त्याचप्रमाणें आपला हा स्थूलदेह शेंकडों वेळ आपण टाकीत असतों; आणि सूक्ष्मदेह अशा रीतीनें टाकतां येत नाहीं. नखें गेलीं तरी स्थूलदेह राहतो; त्याचप्रमाणें स्थूलदेह गेला तरी सूक्ष्म-देह राहतो. जीवात्म्याचें स्वरूप अत्यंत सूक्ष्म आहे असें द्वैतवाद्यांचें म्हणणें आहे.

येथवर केलेल्या विवेचनावरून, मनुष्याचें अत्यंत बाह्य आवरण स्थूलदेह हें असून तें लवकर नष्ट होतें आणि त्याच्या आंतील आवरण म्हणजे सूक्ष्म

देह याचा निःपात तितक्या लवकर होत नाहीं, हें आपल्या लक्ष्यांत आलें असेल. सूक्ष्मदेहाच्या आंत जीवाचा वास असतो. वेदान्तमताप्रमाणें जीव हा परमात्म्याप्रमाणेंच अनाद्यनंत आहे. तसेंच प्रकृतिही अनाद्यनंत आहे, तथापि ती रूपांतरक्षम आहे. ती वारंवार बदलते. आकाश आणि प्राण हीं तत्त्वें अनाद्यनंत आहेत, पण त्यांच्या रूपांत क्षणोक्षणीं बदल होत असतो. त्याचप्रमाणें जडवस्तू आणि जडशक्ति हींसुद्धां अनाद्यनंत आहेत; पण त्यांच्या रूपांतही प्रत्येक क्षणीं बदल आहे. जीव हा कोणत्याही प्रकारच्या वस्तुसंघातामुळें बनलेला नाहीं; त्यांत प्राण अथवा आकाश यांपैकीं कोणाचाही भाग नाहीं. तो मिश्रणरूप नसल्यामुळें त्याच्यांत बदल होत नाहीं आणि तो अनाद्यनंतही आहे. जें जें कांहीं प्राण आणि आकाश यांच्या संयोगानें उत्पन्न झालें असेल, तें रूपांतरक्षम असलेंच पाहिजे; आणि जें मिश्रणरूप नसेल त्यांत रूपांतर होणें शक्यच नाहीं. त्याचप्रमाणें त्याचा नाश होणेंही शक्य नाहीं. कारण नाश या शब्दाची शास्त्रीय व्याख्या म्हटली म्हणचे कार्यरूपांतून कारणरूपांत रूपांतर होणें, इतकीच आहे. जें मिश्ररूप नाहीं तें अविनाशी असलेंच पाहिजे. स्थूल देह हा आकाश आणि प्राण यांच्या मिश्रणानें आणि प्रतिमिश्रणानें बनला असल्यामुळें त्यांत विघटना व्हावी हें नैसर्गिकच आहे. त्याचप्रमाणें सूक्ष्मदेहही कालांतरानें नाश पावेल. परंतु जीव कार्यरूप नसल्यामुळें तो सर्वथैव अविनाशी आहे. ह्याचसाठीं जीव अमुक वेळीं जन्माला आला असें म्हणणें अशास्त्र–चुकीचें–आहे. जें मूलरूप आहे तें नवीन जन्मास येणें शक्य नाहीं. जें मिश्ररूप असेल–दोन पदार्थांच्या संयोगानें झालें असेल—तेंच जन्मास येऊं शकेल. लक्षावधि आकारांनीं भरलेली ही सारी प्रकृति परमेश्वराच्या इच्छेवर अवलंबून आहे. परमेश्वर सर्वव्यापी, सर्वांतरात्मा आणि निराकार असा असून तो सर्वत्र आहे आणि सर्व कालीं प्रकृतीच्या घडामोडीचें अधिष्ठान आहे. ही सर्व प्रकृति त्याच्या नियामकत्वाखालीं आपले खेळ करीत आहे. या प्रकृतीच्या राज्यांतील एकाही प्राण्याला स्वातंत्र्य नाहीं, असें असणें शक्यच नाहीं. तोच सर्वांचा अधिपति आहे. हें द्वैतमताचें सामान्य निरीक्षण झालें.

आतां यावर प्रश्न उद्भवतो कीं जर परमेश्वरानें या सृष्टीला निर्माण केलें तर ती इतकी दुष्ट कशी झाली? आम्ही सर्व ज्या हजारों प्रकारच्या

यातना भोगितों त्या कां? यावर ते असें उत्तर देतात कीं, हा परमेश्वराचा दोष नव्हे. आपल्याच अपराधाचा हा दंड आहे. आपल्याच अपराधामुळें हें दुःख आपल्या वांट्याला येतें. जसें पेरावें तसें उगवतें यांत नवल काय? आपणांस शिक्षा व्हावी अशी परमेश्वराची इच्छाही नाहीं. एखादा मनुष्य जन्मतःच दरिद्री, अंध, अथवा लंगडा असला तर तें त्याच्या पूर्वजन्मींच्या कर्मांचें फळ आहे. जीव नव्हता असा कोणताच काळ नाहीं. तो सर्व काळीं होताच. त्याला कोणीं नवीनच जन्मास घातलें असें नाहीं. तो अनंत काल अनंत प्रकारच्या क्रिया करीत आहे. तो ज्याप्रमाणें क्रिया करतो त्याप्रमाणें त्यांचीं सुखदुःखादि फळें भोगतो. चांगली क्रिया केली तर सुख प्राप्त होतें आणि वाईट कर्मांचें फळ कडू आणि दुःखदायक असतें. जीव हा स्वभावतः शुद्ध आहे—पवित्र आहे. पण अज्ञानाचें पांघरूण त्यावर पडतें आणि त्यामुळें तो भलत्या प्रकारें वागतो असें द्वैतवादी सांगतात. अज्ञान जसें वाईट कृत्यांमुळें उद्भवलें आहे, त्याचप्रमाणें शुभकृत्यांनीं तें निघून जाईल आणि जीवला स्वतःचें पूर्वींचें शुद्ध रूप प्राप्त होईल. तो स्वभावतः अनंत आणि शुद्ध आहे. शुभकर्मांनीं त्याचीं पापें नाश पावलीं म्हणजे तो पुन्हां शुद्ध होतो. मृत्यु पावल्यानंतर तो देवयानानें स्वर्गलोकीं जातो. स्वर्गलोकीं सर्व देवांची वस्ती आहे. जर तो केवळ सामान्यतः चांगला माणूस असेल तर त्याला पितृलोकाची प्राप्ती होते. पितृलोकांत सर्व पितरांची वस्ती असते.

जडशरिराचा पात झाला म्हणजे वाचा मनांत प्रवेश करते. शब्दाच्या साहाय्यावांचून विचार करणें आपणांस शक्य नाहीं, हा आपला अनुभव लक्ष्यांत आणा. ज्या ठिकाणीं शब्द त्याच ठिकाणीं विचारांची उत्पत्ति होते. मन प्राणांत प्रवेश करतें, आणि प्राण जिवांत प्रवेश करतो. इतकी तयारी झाली म्हणजे जीव देह सोडतो आणि आपल्या कर्मांचीं बरीं अथवा वाईट फळें भोगण्याकरितां योग्य ठिकाणीं जातो. देवलोक ही देव राहण्याची जागा आहे. देव म्हणजे तेजस्वी प्राणी. ख्रिस्ती आणि महंमदी धर्मग्रंथांत ज्यांना देवदूत म्हटलें आहे तशाच प्रकारची आमची देवांबद्दलची कल्पना आहे. डान्टे यानें-ही अनेक प्रकारचे लोक वर्णिले आहेत; त्याच लोककल्पना आमच्या द्वैत-मतांतही आहेत. एकाचें नांव पितृलोक, दुसऱ्याचें देवलोक, तिसऱ्याचें ब्रह्मलोक इत्यादि. खालच्या दर्जाच्या लोकास गेलेला जीव पुन्हां मृत्युलोकांत

जन्म घेतो. पण ज्याला ब्रह्मलोकाची प्राप्ति झाली असेल, असा जीव मात्र त्या लोकाचा अनंतकालचा रहिवासी होतो. हीं अत्युच्च प्रतीचीं माणसें होत. स्वार्थ पूर्णपणें विसरलेलीं, अत्यंत पवित्र, आणि ज्यांच्या सर्व प्रकारच्या इच्छा नाहींशा झाल्या आहेत, अशीं असून परमेश्वराचें पूजन व भक्ति करावयाची इतकेंच त्यांस कर्तव्य उरतें. यांच्या खालच्या पायरीचे लोक म्हणजे शुभकर्में करणारे, परंतु फलाशा असलेले असे होत. त्यांना स्वर्गभोगांची इच्छा असते. ते मृत झाले म्हणजे चंद्रलोकास जातात. त्या ठिकाणीं त्यांस देवांचा देह मिळतो. देवयोनी म्हणजे अमरांची योनी नव्हे. त्यांनाही मरण आहेच. स्वर्गातल्या रहिवाशांनाही मृत्यूनें सोडलेलें नाहीं. ब्रह्मलोकांतील रहिवाशांस मात्र मृत्यु स्पर्श करूं शकत नाहीं. त्या ठिकाणीं मात्र जन्ममृत्यूचें वारेंही नाहीं. देव आणि दानव यांचीं वारंवार युद्धें होत असत असें वर्णन आमच्या पुराणांत केलेलें आढळतें. अशा प्रकारचीं वर्णनें जगांतील सर्व प्रकारच्या दंतकथांतून आढळतात. त्याच प्रमाणें मानवी स्त्रियांस देव भुलल्याचीं वर्णनेंही आढळतात. देवयोनींत नवें कर्म जीवाच्या हातून घडत नाहीं. तेथें फक्त पूर्वकर्मांचें शुभ फळ भोगावयाचें असतें. कर्म म्हणजे ज्यापासून सुखदुःखादिकांची उत्पत्ति होते तें. एखादा मनुष्य मरून देवलोकीं गेला म्हणजे तेथें असेपर्यंत तो स्वर्गसुख भोगतो. पण शुभकर्में भोगून झाल्यावर बाकीचीं कर्में उदय पावूं लागतात. वेदग्रंथांत नरकाचें वर्णन आढळत नाहीं. पण पुराणग्रंथांनीं अनेक प्रकारचे नरक निर्माण करून ठेवले आहेत. त्या स्थितींत वाईट कर्में फलद्रूप होत असतात. त्यानंतर तो जीव मृत्युलोकांत पुन्हां जन्म घेतो आणि कर्में करण्याची संधी त्यास पुन्हां प्राप्त होते. मानव देह हा मोठ्या योग्यतेचा आहे. मानवयोनी ही कर्मयोनी आहे. आपण जणुंकाय चक्राकार परिभ्रमण करीत असतां ही मध्यंतरींची विश्रांतीची जागा आहे! तसेंच येथें तुम्हांस आपल्या पुढील स्थितीची तयारी करावयाची संधी मिळते. यामुळें मानवयोनी ही देवयोनीपेक्षां मोठी मानली आहे. याप्रमाणें द्वैतमतानें सांगितलें आहे.

यानंतर वेदान्ताची पुढील पायरी लागते. द्वैतकल्पना असंशोधित आहेत, ही कल्पना प्रथम येथें उद्भवल्याचें आढळून येतें. जर परमात्मा अनंत, जीवात्मा अनंत आणि प्रकृतिही अनंत असें म्हटलें, तर दुसरेही अनेक पदार्थ अनंत होऊं शकतील. हें म्हणणें तर्कशास्त्राला प्रतिकूल आहे. परमेश्वर हा

या विश्वाचें उपादानकारण आहे आणि निमित्तकारणही तोच आहे, असें म्हटलें तर येथें दुसरीच एक शंका उद्भवते. या सर्व विश्वांतील वस्तू परमेश्वर असें म्हटलें तर यांतील दुष्ट वस्तूही परमेश्वरच काय ? हे जड पदार्थ अथवा पशुपक्षादि प्राणी अथवा एखादा आसुरी वृत्तीचा मनुष्य हींसुद्धां त्याचींच रूपें काय ? परमेश्वर पवित्र आहे तो हीं रूपें कशीं घेईल ? यावर उत्तर असें कीं, परमेश्वराचीं हीं रूपांतरें नसून तीं प्रकृतीचीं रूपांतरें आहेत. एका व्यक्तींत आत्मा आणि देह हीं आहेत. देह व्यक्तीपासून निराळा आहे असें नाहीं; तथापि देह म्हणजे मात्र खरी व्यक्ति नव्हे. एकाच देहाला कौमार, यौवन आणि जरा इतकीं रूपें प्राप्त होतात. तथापि त्यामुळें आत्म्यांत कांहीं बदल होत नाहीं. आत्मा सर्व काल एकरूपच असतो. त्याचप्रमाणें सर्व विश्व म्हणजे प्रकृति हें परमात्मशरीर आहे. त्यांतील रोमरोमांत परमेश्वर भरून राहिला आहे. प्रकृतींत वारंवार बदल होतो; पण परमेश्वराचें मात्र रूपांतर होत नाहीं. प्रकृतींत बदल होतो त्याबरोबर जीवात्म्यांतही बदल होतो. प्रकृतींत बदल होतो म्हणजे तिच्या आकारांत मात्र बदल होतो. जीवात्म्यांत बदल होतो, तो लहान मोठेपणाच्या स्वरूपाचा असतो. ज्ञानानें जीवात्मा विस्तृत होतो अगर अज्ञानानें संकुचित होतो. ज्यामुळें जीवात्मा संकुचित आणि मलिन होतो, त्या कृत्यांस वाईट असें म्हणतां येतें. आणि ज्या कृत्यांमुळें त्याचें तेज फांकूं शकतें तीं कृत्यें शुभ कृत्यें होत. जीवात्मा आरंभीं शुद्धच असतो, पण स्वतःच्या कर्मांनीं तो अशुद्ध होतो. तथापि शुभकृत्यांनीं आणि परमेश्वराच्या कृपेनें तो पुन्हां विस्तार पावून शुद्ध होऊं शकतो. वेदान्तांतील ही दुसरी पायरी आहे. या मताप्रमाणें जीवात्मे आणि इतर प्रकृति मिळून परमात्म्याचें--ईश्वराचें--शरीर बनतें. या मताला विशिष्टाद्वैत असें नांव आहे.

यानंतर अद्वैतमत; हें सर्वांत अत्युच्च मत आहे. परमेश्वर हा या विश्वाचें उपादान आणि निमित्तकारण आहे, हें प्रतिपादन अद्वैतमतास मान्य आहे. हें सर्व विश्व परमात्मरूपच आहे. परमेश्वर हा आत्मा आणि विश्व हें शरीर असून शरिरांत बदल होतो हें विशिष्टाद्वैतमताचें प्रतिपादन अद्वैतमताला मान्य नाहीं. हें मान्य केलें तर परमेश्वर विश्वाचें उपादानकारण आहे असें म्हणण्यांत काय अर्थ आहे ? उपादानकारण आणि कार्य हीं सदैव एकरूप असतात. कार्य म्हणजे कारणाचेंच निराळें रूप. कार्य हें कारणाचेंच स्थूल रूपां-

तर असतें. परमात्मा हें-उपादानकारण आहे असें म्हटलें तर विश्व हें त्याचेंच रूप आहे असें म्हटलें पाहिजे. यावर एक प्रश्न असा उद्भवतो कीं जर परमेश्वर विश्वरूप झाला असेल, तर यांतील प्रत्येक वस्तु परमेश्वरच म्हटली पाहिजे. होय, प्रत्येक वस्तु परमेश्वरच आहे. माझें शरीर परमेश्वर, मन परमेश्वर आणि माझा आत्माही परमेश्वरच आहे. मग इतके जीव कोठून उत्पन्न झाले? परमेश्वराचे लक्षावधि भाग झाले काय? अनंताचे भाग पाडणें शक्य नाहीं. परमात्मा विश्वरूप आहे असें म्हटलें तर तो रूपांतरक्षम आहे हेंही कबूल करावें लागेल. जें कांहीं रूपांतरक्षम आहे तें प्रकृतीच्या आधीन असावयाचेंच असा सिद्धांत आहे. आणि जें कांहीं प्रकृतीच्या आधीन असेल त्याला जन्ममृत्यु असावयाचे. परमात्मा रूपांतरक्षम असेल, तर त्यालाही एखादे दिवशीं मरण येणारच. दुसरें असें कीं, परमात्म्याचा किती भाग विश्वरूप झाला आहे असें म्हणावें? बीजगणिताच्या पद्धतीनें 'क्ष' हा भाग विश्वरूप झाला आहे असें मानिलें तर विश्व निर्माण झाल्यानंतर परमेश्वराचें रूप म्हणजे परमात्मरूप "–क्ष" असें झालें. यामुळें विश्व निर्माण होण्याच्या अगोदर जें काहीं परमात्म्याचें रूप होतें तें हें नव्हे असें आपोआपच सिद्ध झालें. या सर्व शंकांवर अद्वैती असें उत्तर देतो कीं, विश्वाला वास्तविक अस्तित्व नाहीं. त्याचें अस्तित्व हा एक देखावा आहे—स्वप्न आहे. देव, दानव आणि मनुष्यें व इतर पदार्थ येतात आणि जातात व जन्म घेतात आणि मृत्यु पावतात, हें सारें स्वप्न आहे. जें कांहीं आहे तें एकरूपच आहे. पाण्याच्या हजारो बिंदूंवर एकच सूर्य प्रकाशला, म्हणजे त्या बिंदूंत प्रत्येकीं एक निराळा सूर्य दिसूं लागतो; तथापि सूर्य एकच असतो. त्याचप्रमाणें अनंत जीव हीं एकाच अनंताचीं अनंत प्रतिबिंबें आहेत. स्वप्न हेंसुद्धां सत्यवस्तूंचेंच असतें. त्याचप्रमाणें परमात्मा ही एक सत्यवस्तु असून त्याचींच हजारों प्रतिबिंबें आपण स्वप्नांत पाहत आहों. आपणाला शरीर आहे, मन आहे आणि आत्मा आहे, असें वाटणें हें स्वप्न आहे. वस्तुतः तुम्ही सच्चिदानंदरूप आहां. हें जन्म आणि पुनर्जन्म, हें जाणें आणि येणें, हीं सारीं मायिक–काल्पनिक–आहेत. तुम्ही स्वतः अनंत आहां मग तुम्ही येणार कोठून आणि जाणार कोठें? हे चंद्रसूर्यादि गोल तुमच्या अनंत रूपांतून उडालेले तुषार आहेत. आत्म्याला जन्म नाहीं आणि मृत्युही नाहीं. त्याला कोणी आई नाहीं, कोणी बाप नाहीं, आणि मित्र नाहीं आणि कोणी शत्रुही नाहीं. तो केवळ सच्चिदानंदरूप आहे.

हें ज्ञान प्राप्त करून घेऊन विश्वाशीं एकरूप होऊन जाणें हें अद्वैतमताचें साध्य आहे. जो विश्वाशीं एकरूप होतो त्याच्या दृष्टीनें सर्व प्रकारचे स्वर्गादि लोक आणि ब्रह्मलोकही नष्ट होतात. हे लोकही स्वप्नांतलेच आहेत. स्वप्न संपलें म्हणजे त्यांतील वस्तूंना अस्तित्व कोठून राहील? ज्यांचें स्वप्न संपलें ते परमात्मरूपच होतात. या क्षुद्र देहांतून ते बाहेर पडतात आणि आपल्या खऱ्या रूपाला ते परत जातात. आज या क्षुद्र देहाचें आपण अतिशय कौतुक करतों; पण हें स्वप्न संपलें म्हणजे आपलें खरें महत्त्व आपणांस प्राप्त होईल. 'पण अनंतत्वांत आमचें व्यक्तित्व हरवणार नाहीं ना?' स्वप्नांतला '**मी**' जागा झाला म्हणजे तो हरवला असें म्हणतां काय? त्याचप्रमाणें जगद्भ्रमाचा निरास झाला म्हणजे तुमचें अनंतत्व--खरें रूप--तुम्हांस प्राप्त होईल. असें झालें म्हणजे क्षुद्र वस्तूंबद्दल आज वाटणारें प्रेमही नष्ट होईल, यांत नवल नाहीं. आपल्याला या एकाच लहानशा देहांत केवढा आनंद अनुभवास येतो! मग आपला देह विश्वरूप झाला--अत्यंत विस्तार पावला--तर त्यांत केवढ्या आनंदाचा प्रत्यय येईल, याची कल्पना होत असेल तर करा. ज्या मनुष्याला हा अनुभव येतो, तो मुक्त होतो. तो स्वप्नांतून जागा होऊन आपल्या मूलरूपास जातो. अद्वैतमताचें हें निरूपण आहे.

वेदान्तमताच्या तीन पायऱ्या आहेत. अद्वैतमत ही अखेरची पायरी आहे. तो शेवटचा मुक्काम आहे. त्यापलीकडे जाणें शक्यच नाहीं. कारण मूलरूपापलीकडे जाणें शक्य नाहीं. कोणतेंही शास्त्र मूलरूपापर्यंत पोहोंचलें म्हणजे तें पूर्णावस्थेस गेलें असेंच म्हटलें पाहिजे. त्यापलीकडे तें कोठें जाणार? केवलरूपापलीकडे जाणें तुम्हांस शक्यच नाहीं. ज्या एकरूपांत हें सारें विश्व उत्क्रांत झालें आहे, तें केवलरूप आहे. हा अद्वैतसिद्धांत सर्वांनाच मानवतो असें नाहीं. हा नुसता समजणेंही फार कठीण आहे. त्याचें ग्रहण बुद्धीनेंही करणें अवघड आहे. अत्यंत कुशाग्रबुद्धि आणि निधडी छाती यांनाच तो समजला तर समजेल. बहुजनसमाजाला या सिद्धांताचा फारसा उपयोग होत नाहीं.

पहिल्या पायरीपासून आरंभ करून क्रमाक्रमानें पुढील मार्गाला लागावें हें उचित आहे. त्या पायरीवर पाऊल पक्कें ठरलें, म्हणजे दुसऱ्या पायरीवर पाय ठेवण्यास अवसान सांपडतें आणि त्यामुळें दुसरी पायरी चढण्यास सोपें जातें. एखाद्या मानवकुलाचा अभ्युदय आणि एखाद्या व्यक्तीचा अभ्युदय यांचे मार्ग

एकसारखेच आहेत. धर्मगिरीच्या अत्युच्च शिखरावर आरोहण करण्यास मानवकुलाला जितका मार्ग आक्रमण करावा लागला, तितकाच मार्ग आक्रमण करणें प्रत्येक व्यक्तीलाही अवश्य आहे. आतां यांत सवड एवढीच आहे कीं, मानवकुलाला एका पायरीवरून दुसरीवर आणि दुसरीवरून तिसरीवर जाण्यास लक्षावधि वर्षांचा काळ लागला; पण एका व्यक्तीला तोच मार्ग थोड्याशा वर्षांत आक्रमण करतां येईल. फार काय सांगावें, पण वेगवान् मनुष्य हा लक्षावधि वर्षांचा मार्ग सहा महिन्यांत चालून जाईल. सर्व रस्ता संपविल्यावांचून मात्र सुटका नाहीं. आज एखादा पूर्ण अद्वैती बनला असेल; पण त्यानें आयुष्यांतील पूर्वक्रमाची झडती घेतली तर आपण पक्के द्वैती होतों असें त्यास आढळून येईल. जोंपर्यंत देहभाव गेला नाहीं, आणि आत्मभाव आला नाहीं, तोंपर्यंत तें द्वैतच. जोंपर्यंत 'देह मी', 'मन मी' असें वाटत आहे तोंपर्यंत या साऱ्या विश्वाचें अस्तित्व कबूल करणें आपणांस भागच आहे. एखादा भाग आहे असें म्हटलें म्हणजे सर्व वस्तु आहे असें म्हणण्यास नड कशाची? कित्येक लोक असे असतात कीं त्यांना जगाचें अस्तित्व मान्य असतें, कारण तें प्रत्यक्ष दिसतें. पण त्यांना ईश्वराचें अस्तित्व मात्र मान्य नसतें; पण या मूर्खशिरोमणींना असें कळत नाहीं कीं जग हें कार्य जर 'आहे' म्हणतां तर त्याचें कारण नको काय? या कारणरूपालाच परमेश्वर असें नांव आहे. कारणावांचून कार्य घडूं शकतच नाहीं. कार्य आहे असें कबूल केलें कीं: कारण कबूल केलेंच पाहिजे; अथवा दोहोंचाही त्याग करण्यास तुम्हांला पूर्ण मोकळीक आहे. विश्व नष्ट होईल तेव्हांच परमेश्वर नष्ट होईल. तुम्ही स्वतःच परमात्मरूप होऊन बसलां, तरच जगाचें अस्तित्व तुमच्या दृष्टीनें नाहींसें होईल; पण जोंपर्यंत स्वप्नांश शिल्लक आहे, तोंपर्यंत आम्हांस जन्म आहे, मरण आहे, आणि ईश्वराचें अस्तित्वही आहेच आहे; पण 'मी' म्हणजे देह, हा भ्रम नाहींसा झाला—या स्वप्नाचा अंत झाला—कीं जन्म नाहीं, मृत्यु नाहीं आणि स्वप्नांतील इतर विश्वादि वस्तू याही नाहींत. आज आपणांस विश्व या रूपानें दिसत आहे, तेंच अशा स्थितींत परमात्मरूपानें दिसूं लागेल. जो ईश्वर आजपर्यंतच विश्वाच्या बाहेर कोठें तरी असल्यासारखा वाटत होता, तो आपल्या हृदयांतच आहे किंबहुना तोच आपण आहों असा अनुभव येईल, हेंच अद्वैतमताचें अंतिम साध्य. '**तत्त्वमसि!**'

**ॐ शांतिः शांतिः शांतिः।**

# कर्मरहस्य



कर्म कसें करावें यासंबधीं जे कांहीं मोठे धडे मी आपल्या आयुष्यांत शिकलों, त्यांतला एक विशेष महत्त्वाचा आहे. तो असा कीं, कर्माच्या अंतिम पर्यवसानाकडे जितकें लक्ष्य आपण लावतों, तितकेंच साधनांच्या बाबतींतही लक्ष्य देणें अवश्य आहे. ज्यांच्यापासून हा धडा मला मिळाला ते फारच थोर पुरुष होते. त्यांचा सारा जीवनक्रम या तत्त्वाला धरून चालत असे. या तत्त्वाचें प्रत्यक्ष व्यावहारिक स्वरूप कसें असतें असा प्रश्न कोणीं विचारला तर नमुन्यादाखल त्या थोर गृहस्थांच्या वर्तनक्रमाकडे खुशाल बोट दाखवावें! या एकाच तत्त्वांतून दुसऱ्याही अनेक महत्त्वाच्या बाबी निर्माण होतात असें माझ्या अनुभवाला आलें आहे. कोणत्याही कार्यांतील यशापयश या तत्त्वावर मुख्यत्वेंकरून अवलंबून असतें असा माझा समज आहे. कर्माचें साध्य आणि त्याकरितां हातीं घेतलेलीं साधनें या दोन्ही बाबींकडे सारखें लक्ष्य पुरवलें तरच साध्य सिद्ध होईल.

आपल्या एकंदर जीवनक्रमाचें सूक्ष्मदृष्ट्या निरीक्षण केलें तर असें आढळून येतें कीं, आपलें लक्ष्य साध्याकडे—कर्माच्या पर्यवसानाकडे—जितकें वेधलेलें असतें, तितकें तें साधनांकडे असत नाहीं. एखादें कार्य करावें असा विचार आपल्या मनांत आला म्हणजे त्या कार्यरूप इमारतीचा साद्यंत नकाशा आपल्या मनश्चक्षूंपुढें दिसूं लागतो; आणि आपलें लक्ष्य कळसाकडे अगोदर वेधलें जातें. आपण अमुक कार्य केलें तर त्याचें अमुक रीतीनें पर्यवसान होईल आसा विचार मनांत आला, म्हणजे तें पर्यवसान जणुं काय झालेंच आहे अशा रीतीनें आपल्यापुढें उभें रहातें. त्याच्या मनोहर रूपाकडे आपलें सारें चित्त लागतें. आपल्या चित्ताला त्यामुळें मोह उत्पन्न होतो. आपल्या मनोभूमिकेवर त्याचेंच चित्र विशेष स्पष्ट रंगांत खुलतें आणि त्यामुळें त्या साध्याच्या साधनांकडे साहजिकच आपलें दुर्लक्ष्य होतें.

आपण आपल्या आयुष्यांत अनेक प्रकारचीं कार्यें हातीं घेत असतों आणि अनेक कार्यांत आपणांस अपयश आलेलें असतें. अशाचपैकीं एखाद्या कार्याचा आपण मनःपूर्वक अभ्यास केला आणि त्याचें तपशीलवार पृथक्करण केलें तर

आपणांस शेंकडा नव्याण्णव प्रसंगीं असें आढळून येईल कीं, साधनांकडे आपलें दुर्लक्ष्य झाल्यामुळें कार्य फसलें. प्रत्येक साधन नीट तपासणें, त्याची दुरुस्ती करणें आणि तें कार्यक्षम करणें या बाबी अत्यंत महत्त्वाच्या आहेत. साधनें जय्यत असलीं तर यश ठेवलेलेंच. कारणापासून कार्य निर्माण होतें–कारणाचें कार्य होतें–हा सिद्धांत शेंकडों वेळां आपल्या कानांवरून गेलेला असेल; पण प्रत्यक्ष कार्याच्या वेळीं आपणांस त्याचा जणुं काय विसर पडतो. कार्य कांहीं आपण होऊन बनत नाहीं; साधनांनीं तें बनवावयाचें असतें. याकरितां कारण-रूप पदार्थ योग्य असतील, आणि कार्यक्षम स्थितींत असतील; तरच कार्याचा परिपाक बरोबर उतरेल. उलटपक्षीं कार्याचें मातेरें होईल हें उघड आहे. आपलें साध्य काय आहे, हें एकवार ठरविलें आणि योग्य साधनांची तरतूद लावली कीं साध्य विसरावयाससुद्धां हरकत नाहीं. मग साधनांकडे लक्ष्य ठेवून त्यांना पूर्णता कशी येईल इतकेंच पाहिलें तरी साध्य हटकून सिद्ध होई-लच. कारणरूप पदार्थांची योग्य संघटना झाली कीं कार्य हें होणारच. त्याला निराळें बोलावणें पाठविण्याचें कारण नाहीं. साधनांची योग्य काळजी घेणें हें आपलें पहिलें महत्त्वाचें कर्तव्य आहे. तें नीट बजावलें गेलें कीं, सिद्धीकडे ढुंकून पाहण्याचीसुद्धां गरज नाहीं. ती आपण होऊन चालत येईल. आपलें साध्य हें कार्यरूप असून साधनें हीं कारणरूप आहेत. याकरितां कारणरूपा-कडे प्रथम लक्ष्य देणें आणि त्याविषयींच शक्य तितका बारीक विचार करणें हें आपल्या जीवनक्रमांतील एक महत्त्वाचें रहस्य आहे. कर्माविषयीं भगव-द्गीतेंत केलेलें विवेचन पुष्कळांनीं वाचलें असेल. आपणांस सतत कार्यरत राहणें अवश्य आहे, असें गीतेचें सांगणें आहे. कर्म केल्यावांचून आपल्या आयुष्यांतील एक क्षणही जात नाहीं. हें खरें असेल–आहेच–तर आपलें सारें लक्ष्य हातीं घेतलेल्या कार्याकडे लावा. आपलें कार्य मोठें असो अथवा क्षुल्लक असो. आपलें मन फक्त त्या एकाच कार्यांत गुंतून राहिलें पाहिजे. दुसऱ्या कसल्याही बाबी उपस्थित झाल्या तरी त्यांनीं आपलें लक्ष्य त्या कार्या-तून खेंचून घेऊं नये; इतकें आपलें लक्ष्य त्या ऐकाच कार्यांत गुंतलेलें असावें; तथापि असें असलें तरी त्याचा त्याग कोणत्याही क्षणीं करण्याची चित्ताची तयारी असली पाहिजे. कोणतेंही कार्य मनःपूर्वक करावयाचें पण त्याच्या फळाबद्दल अनासक्त असावयाचें असें गीतेचें सांगणें आहे. "तस्मादसक्तः

**सततं काय कर्म समाचर । असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पूरुषः ॥"** (गीता ३. १९).

आपण आपल्या आयुष्यांतील अनुभव तपासून पाहिले तर आपल्या दुःखाचें एक मोठें कारण विशेषेंकरून आढळून येतें, तें हें कीं, आपण एखादें कार्य हातीं घेतों त्या वेळीं मोठ्या उत्साहानें आपली सर्व कर्तबगारी त्या ठिकाणीं खर्ची घालतों; आणि इतकें करूनही कित्येक वेळां आपला डाव फसतो. पण आपली आसक्ति त्या कर्माच्या ठिकाणीं इतकी पक्की जडलेली असते कीं, तें कार्य सोडून देणें आपल्या जिवावर येतें. 'धरलें तर डसतें आणि सोडलें तर पळतें,' अशी आपली स्थिति झालेली असते. त्या कार्याला चिकटून राहण्यांत आपण आपल्या पायांवर धोंडा पाडून घेत आहोंत हें आपणांस कळतें; त्या कार्याच्या मागें लागण्यांत आपणांस दुःखावांचून दुसरें कांहीं पदरीं पडावयाचें नाहीं, अशी आपली खात्री असते; तथापि त्याचा मोह इतका अनिवार असतो कीं, तें आपल्या हातून सोडवत नाहीं. मधमाशी मध खाण्याकरितां एका मधाच्या भांड्यावर येऊन बसली; पण तिचे पाय भांड्याला चिकटून बसले आणि तिला पुढेंही जातां येईना अथवा मागेंही येतां येईना; तशीच आपली गत होते. हा अनुभव वारंवार आपल्या आयुष्यांत आपणांस येतो. आपल्या साऱ्या जीवनक्रमाचा आढावा काढला, तर तो बहुधा असल्या प्रसंगांनीं भरला असल्याचें आढळून येईल. आपण या जगांत जन्म कां घेतला ? येथें येण्यांत आपला उद्देश मध खाण्याचा होता; पण आमचे हातपाय भांड्याला चिकटून मात्र बसले. आपण येथें चैन करण्याकरितां आलों; पण आपल्या जीवावर दुसरेच चैन करूं लागले. राज्यासनावर बसून प्रभुत्व गाजवावें या उद्देशानें आपण येथें आलों; आणि पहावें तों सृष्टीचे बंदे गुलाम होऊन बसलों. कांहीं स्वतंत्र कर्तबगारी करावी हा आपला उद्देश; पण आतां सृष्टीच्या हाताखालीं पाळ्या उचलण्यापलीकडे आपण कांहींच करीत नाहीं. सतत हें असेंच चालू आहे. आपल्या आयुष्यक्रमांतील बारीकसारीक गोष्टींतसुद्धां हीच तऱ्हा. आमच्यावर हजारों मनांचा ताबा; आणि आपण हजारों मनांवर ताबा मिळविण्याकरितां धडपडत असतों! या सुखकर वस्तूंचा आस्वाद घेण्याची आपली इच्छा आहे; पण पहावें तों हीं सुखें आमचीं जिव्हारें खात आहेत. या सृष्टीपासून सर्व कांहीं वैभव बुचाडून घेण्याची खटपट आम्ही

करतों; पण शेवटीं पहावें तों सृष्टीनेंच आमचें सर्वस्व घेऊन आम्हांस नागवें उघडें करून कोठें तरी ढकलून दिलेलें असतें !

अशा गोष्टी घडत नसत्या तर केवढी मौज झाली असती ! सारा जन्म आम्हीं दिवाळी केली असती ! पण—असो. धीर सोडून फायदा नाहीं. आपल्या आयुष्यांत आपणांस कितीही ठोकरा लागल्या असल्या अथवा लहानसहान जय मिळाले असले, त्यांत कितीही सुखदुःखाचे प्रसंग आले असले, तरी अजूनही आपल्यास एकसारखी दिवाळी करतां येईल. पण हें होण्याला सृष्टीच्या जाळ्यांत न सांपडण्याची खबरदारी मात्र घेतली पाहिजे.

आपल्या दुःखाचें पहिलें मोठें कारण आसक्ति हेंच आहे. आसक्ति उद्भवली, कीं सृष्टीच्या जाळ्यांत पाय गुंतलेच. याकरितां गीतेची अनुज्ञा अशी आहे कीं, सदोदित काम करा; पण तें अनासक्त चित्तानें करा. त्या कामांत गुंतून पडूं नका. आपणांस वाटेल तेव्हां आपलें अंग त्यांतून काढून घेतां येईल, इतकी चित्ताची तयारी असूंद्या. एखाद्या वस्तूकडे तुमचा जीव कितीही ओढ घेत असला, अथवा एखादी वस्तु तुम्हांला आवडत असली, अथवा एखाद्या वस्तूचा त्याग तुमच्या केवढ्याही मोठ्या दुःखास कारण होणार असला, तरी अशा स्थितींतही वाटेल त्या वेळीं त्या वस्तूचा त्याग करण्याची तयारी तुम्हीं ठेवली पाहिजे. दुर्बळ मनुष्याला कोणत्याही कार्यांत यश येणें शक्य नाहीं. या लोकांत काय अथवा दुसऱ्या एखाद्या लोकांत काय, दुबळ्याला कवडीचीही खरी किंमत नाहीं. मनाचा दुबळेपणा हा साऱ्या गुलामगिरीचा मूळ पाया आहे. शारीरिक आणि मानसिक दुःखें उत्पन्न होण्याचें कारणही हा दुबळेपणाच. दुबळेपणा म्हणजे खरोखर साक्षात् मृत्युच. आपल्या भोंवतालच्या वातावरणांत लक्षावधि रोगजंतू असतात; पण आपण दुर्बळ झाल्याशिवाय ते आपणावर हल्ला करूं शकत नाहींत. आपल्या दुर्बळपणामुळें आपलें शरीर या जंतूंना राहावयास योग्य होतें; आणि मग तें स्वतःचें घर आहे असें समजून रोगबीजें तेथें प्रवेश करतात. आपल्या भोंवतीं दुःखकारक अशा लक्षावधि गोष्टींचा आणि लक्षावधि रोगबीजांचा गराडा पडला असला तरी काय होणार ? आपल्याजवळ येण्याची त्यांची छाती नाहीं, आपल्यावर ताबा चालविण्याचें सामर्थ्य त्यांना नाहीं. मन जर अशक्त झालें तर मात्र गोष्ट निराळी. आपला एकंदर आयुष्यक्रम मुख्यतः ज्यावर अवलंबून आहे, असा हा

पहिला मोठा नियम नीट ध्यानांत ठेवला पाहिजे. सुदृढता हेंच जीवित, आणि दौर्बल्य हाच मृत्यु. मनोबल हेंच सुखसर्वस्व, हेंच चिरंतन जीवित, हेंच अमरत्व. दुबळेपणा हाच रोग, दुःख आणि मृत्यु.

आसक्ति हेंच सध्या आपल्या सुखाचें साधन होऊन बसलें आहे. आपली आपल्या मित्रांबद्दल आसक्ति, आपल्या इष्टमित्रांबद्दल आसक्ति, आपल्या बुद्धीबद्दल आणि धर्मकर्माबद्दल आसक्ति, प्रत्येक बाह्यविषयाबद्दल आसक्ति, आणि हें सारें लटांबर गळ्यांत कशाकरितां बाळगावयाचें, तर सुख व्हावें म्हणून! पण याचा परिणाम काय होतो म्हणाल, तर दुःख मात्र हटकून मिठी मारतें. खऱ्या आनंदाची प्राप्ति करून घेणें असेल, तर अनासक्त होण्यावांचून दुसरा उपाय नाहीं. आपल्याला इच्छा होण्याबरोबर या सर्वांना एकदम तोडून टाकण्याचें सामर्थ्य आमच्यांत असेल तर आम्हांस दुःखें शिवणारही नाहींत. अत्यंत असक्त मनुष्य ज्या उत्साहानें एखाद्या कार्याच्या मागें लागतो, तितक्याच उत्साहानें एखादें कार्य करीत असतांही, वाटेल त्या क्षणीं त्यांतून मोकळें होण्याचें सामर्थ्य ज्याला असेल, तोच मनुष्य शक्य तितकें सुख प्रकृतीपासून—निसर्गापासून—मिळवूं शकतो. अत्यंत महत्त्वाची पण अत्यंत कठीण अशी गोष्ट हीच आहे, कीं कार्य करण्यास लागणारें आसक्तीचें बळ आणि त्यांतून बाहेर पडण्यास लागणारें अनासक्तीचें बळ हीं समसमान असावीं. कांहीं माणसें अशीं असतात, कीं तीं बाह्यतः अनासक्तशीं दिसतात. त्यांची कोणत्याही वस्तूबद्दल आसक्ति असत नाहीं. त्यांचें कोणावरच प्रेम नसतें. त्यांचें हृदय जणुंकाय दगडाचें बनलें आहे. जगापासून तीं सदोदित पराङ्मुख. अशीं मनुष्यें कधीं दुःखांत चूर झालेलीं आढळावयाचीं नाहींत; पण या सृष्टींत यांची खरी किंमत काय असते? या भिंतीला साऱ्या जन्मांत कधींतरी दुःख झालें होतें काय? तिचें कधीं कोणावर प्रेम जडलें नव्हतें. ती अगदीं अनासक्त; पण शेवटीं भिंत ती भिंतच. नुसता चिखलाचा गोळा. असली भिंत होऊन बसण्यापेक्षां, आसक्त होऊन दुःखें भोगणेंही शतपट बरें. अशा रीतीनें भिंत होऊन जगांतील दुःखें टाळतां येतील हें खरें; पण जगांतील आनंदही त्यामुळें टळतात आणि त्यामुळें चित्ताला दौर्बल्यही येतेंच. याकरितां दगड होऊन बसणें हें युक्त नाहीं; हें आपलें साध्य नाहीं. एक प्रकारचें दौर्बल्य गेलें आणि दुसऱ्या प्रकारचें आलें; हाही एक प्रकारचा मृत्युच नव्हे तर काय? दगडाचें जीवित हेंच आपलें इष्ट आहे काय?

एखाद्या वस्तूच्या ठिकाणीं अत्यंत प्रेम जडणें हेंसुद्धां एक प्रकारचें सामर्थ्य आहे. ही एक प्रकारची शक्तिच आहे. केवळ एखाद्याच विषयाकडे आपलें सारें लक्ष्य गुंतून राहतें; इतकें कीं आपल्याला त्यावांचून अन्य कशाचेंही भान राहत नाहीं; आपला समूळ नाश होण्याची वेळ आली तरी त्या विषयाचा त्याग करावा असें आपल्या मनांत येत नाहीं; या गोष्टी सामर्थ्यावांचून शक्य होतील काय ? यालाही सामर्थ्य लागतें. स्वतःला विसरून दुसऱ्याच्या संतोषासाठीं वाटेल ते हाल सोसावयाचे हा दैवी गुण आहे. यासाठीं अत्यंत आसक्तींत दिसून येणारें मनाचें सामर्थ्य तर आम्हांला हवेंच; पण आम्हांला नुसता दैवी गुण पैदा करून स्वस्थ बसावयाचें नाहीं; म्हणून त्या सामर्थ्याशिवाय आणखी अनासक्तीचें सामर्थ्यही आम्हांस पाहिजे. आसक्तींत दिसून येणारें आणि अनासक्ति मिळविण्यास लागणारें अशीं दोन्हीं सामर्थ्यें आम्हांस पाहिजेत. मनुष्याचें पूर्णत्व यांतच आहे. एकाच प्रेमाच्या विषयावर आपल्या आत्मिक शक्तीचें सर्व भांडार रिकामें करीत असतांही, पूर्णत्व पावलेला मनुष्य त्या विषयाबद्दल अत्यंत उदासीन असतो. आतां हें दुहेरी कार्य कसें साधतें हें पाहिलें पाहिजे. याचें रहस्य जाणलें पाहिजे.

भिकारी मनुष्य कधींही सुखी असत नाहीं. त्याच्या जीवधारणापुरतें साधन त्याला इकडूनतिकडून मिळतें; पण प्रत्येक वेळीं त्याचा जिकडेतिकडे तिरस्कारही होतो. त्याला कितीही मोठी प्राप्ति झाली, तरी तिच्या पाठीमागें तुच्छतादर्शक दया आणि तिरस्कार हीं असावयाचींच. भिकारी म्हणजे कवडीच्या किंमतीचा सुद्धां नाहीं; असें दात्याला वाटल्यावांचून राहत नाहीं. यामुळें त्याला मिळालेल्या साधनांपासून सुखप्राप्ती होत नाहीं.

आपणही बहुतांशीं असल्या प्रकारच्या भिकाऱ्यांसारखेच आहों. आपण जें जें कांहीं करतों त्याचें प्रतिफल मिळावें अशी आपली अपेक्षा असते. आपण शुद्ध वैश्यवृत्तीचे लोक आहों. आपला तराजू सदोदित समतोल राखण्याची आपण फार काळजी बाळगीत असतों. सारा जन्मभर तराजू समतोल कसा राहील याची आपणांस फार काळजी ! हें आपलें वाणिज्य कांहीं विशिष्ट गोष्टींसंबंधींच असतें असेंही नाहीं. आयुष्यांतील सर्व प्रकारच्या खटपटींत तीच वृत्ति. मीं अमुक केलें त्याबद्दल मला अमुक पाहिजे हेंच सदोदित चिंतन. मोठा दानधर्म केला तर त्या पुण्यकृत्याबद्दल नांवाची टिमकी वाजली

पाहिजे ही अपेक्षा आहे. धर्माच्या बाबतींतही हेंच. अमुक मनुष्य धार्मिक असें आपणांस कोणीं म्हटलें नाहीं, तर आपला धर्म फुकट गेला असें आपणांस वाटतें. तीच गोष्ट प्रेमालाही तंतोतंत लागू आहे. निर्व्याज प्रेमाचें नुसतें वारेंही आपल्या अंगावरून कधीं गेलें नाहीं. प्रेमांतही आम्हांला अदलाबदलीची–व्यापाराची–आवश्यकता वाटावी हें अत्यंत शोचनीय आहे !

जर तुम्हांला नुसता व्यापार करावयाचा असेल, जर केवळ देवाण, घेवाण करण्याचीच तुमची इच्छा असेल, जर विकणें आणि विकत घेणें हेंच तुमचें कर्तव्य आहे असें तुम्हांस वाटत असेल, तर व्यापाराचे सर्व नियमही तंतोतंत पाळावयाला नकोत काय ? 'व्यापार करतां सोळा बारा' अशी एक म्हण आहे. व्यापारांत कधीं तेजीचे दिवस असतात, तर कधीं मंदीचे असतात; कधीं खप कमी आणि माल पुष्कळ असें झालें तर दुसऱ्या वेळीं माल थोडा आणि खप पुष्कळ असेंही होतें. प्रत्येक व्यापाऱ्यानें हें तत्त्व ओळखून तदनुरूप आपल्या चित्ताची तयारी ठेवली पाहिजे. एखाद्या आरशाकडे आपण पाहिलें तर त्यांत आपलें तोंड आपणांस दिसतें. आपण तोंड वांकडें केलें कीं आरशांतलें तोंडही वांकडें होतें, आपण हंसलों तर आरशांतलें तोंडही हंसतें. ह्याच क्रयविक्रयाचा प्रकार आहे. हेंच देवाण–घेवाण.

अशा रीतीनें व्यापार करीत असतां आपले पाय त्यांत सांपडतात, हें कसें होतें ? आपण जें कांहीं देतों त्यामुळें आपण गुंततों असें नाहीं; तर त्याचा मोबदला आपणांस मिळावा असें जें आपणांस वाटत असतें, त्यामुळें आपण त्यांत गुंतून पडतों. पुष्कळ वेळां आपल्या प्रेमाच्या मोबदल्यांत आपणांस दुःखाची प्राप्ति होते. असें कां ? आपण प्रेम दिलें यामुळें हें दुःख प्राप्त झालें असें नाहीं; तर उलट प्रेमाची जी अपेक्षा आपल्या हृदयांत होती, ती आपल्या दुःखाला कारण झाली, असें आपणांस आढळून येईल. ज्या ठिकाणीं कशाची तरी अपेक्षा–गरज–उत्पन्न होते तेथें दुःख येतेंच. गरज–आशा–हीच आपल्या अनेक दुःखांचें कारण आहे. आशापूर्ति यशापयशावर अवलंबून असल्यामुळें तिजपासून दुःखाची प्राप्ति केव्हांना केव्हां होणारच.

याकरितां आपल्या जीवनक्रमांत खरी यशःप्राप्ति हवी असें वाटत असेल आणि खरें सुख मिळविण्याची इच्छा असेल, तर हें तत्त्व लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. ज्याला प्रतिफलाची अपेक्षा नसते त्यालाच खऱ्या यशाची प्राप्ति होते. या

तत्त्वांत आणि प्रत्यक्ष व्यवहारांत पुष्कळ वेळां विरोध दिसतो; पण तो विरोध नसून विरोधाभास असतो. ज्याला कसल्याच प्रकारच्या प्रतिफलाची अपेक्षा नाहीं असा मनुष्य नेहमीं फसला जातो आणि अनेक जण त्याला अनेक प्रकारें त्रास देतात असें आपण पाहतों. मग त्याला यशस्वी कसें म्हणतां येईल ? केवळ स्थूलदृष्टीनें पाहिलें तर हें यशाचें लक्षण नव्हे असें वाटतें. येशु ख्रिस्तानें साऱ्या जन्मभर परोपकारावांचून कांहीं केलें नसतांही त्याला शेवटीं सुळाची प्राप्ति झाली. होय, या गोष्टी खऱ्या आहेत; पण त्याच्या अलिप्तवृत्तीनें केवढ्या मोठ्या विजयाचा पाया घातला याचा विचार करा. लक्षावधि-कोट्यवधि-जीवांना त्यानें मुक्तीचा मार्ग दाखविला हें यश लहान म्हणतां येईल काय ?

कोणत्याही कर्माबद्दल उलट कांहींतरी मिळावें अशी आशा बाळगूं नका. तुम्हांला कांहीं द्यावयाचें असेल तें देऊन मोकळे व्हा. तें तुमचें तुम्हांस अवश्य परत मिळेल; पण त्याबद्दल आज कांहीं विचार करूं नका. तुमचें दान परत येईल तेव्हां तें एकटेंच न येतां आणखी बहुतांना आपल्याबरोबर घेऊन येईल; पण त्यावर आज लक्ष्य ठेवून बसूं नका. जें कांहीं करणें असेल तें आज करून मोकळें व्हावयाचें इतकाच विचार त्या वेळीं जागृत असावा. एक गोष्ट आपण पक्की लक्ष्यांत बाळगली पाहिजे; ती ही कीं, आपला जन्म, घेण्याकरितां नसून देण्याकरितां आहे. प्रकृतीचा कायदा असा कडक आहे कीं, ती आपणांस द्यावयास भाग पाडील. मग खुषीनें देण्यांतच शहाणपण नाहीं काय ? एक वेळ आपलें सर्व आपणांस सोडून द्यावें लागेल. साऱ्या आयुष्यभर आपण मुठी मिटीत असतों. मूठ पक्की कशी मिटतां येईल हाच विचार सदैव आपल्या चित्तांत घोळत असतो; पण एखादी वेळ अशी येते कीं, आपल्या नरड्यावर पाय देऊन प्रकृति आपल्या मुठी ढिल्या पाडते. त्या वेळीं तुमची खुषी असो अगर नसो, तुम्हांस मूठ ढिली करावीच लागते. तुम्ही 'नाहीं' म्हटलें, तर एखादी थप्पड अधिक मिळावयाची; यापलीकडे दुसरा कांहींच फायदा होत नाहीं. तुम्ही आपलें सर्वस्व उराशीं कितीही घट्ट धरून बसलां, तरी तें टाकून देण्याची वेळ अवश्य येईल. ज्यावर अशी वेळ येत नाहीं असा एकही प्राणी जन्माला आलेला नाहीं. या कायद्याच्या विरुद्ध तुमची गडबड जितकी अधिक, तितके प्रकृतीचेही तडाके अधिक भयंकर आणि म्हणून तुमचे कष्टही अधिक भयंकर ! आपली देण्याची तयारीच कधीं नसते. आपले हात सदोदित

घेण्याकरितां तयार असतात; देण्याचें धैर्यच आपणांस नसतें. प्रकृतीच्या या मागणीला पुरें पडण्याची आपली तयारी नसते, म्हणून आपणांस अनेक प्रकारचीं दुःखें भोगावीं लागतात. सूर्य सदोदित समुद्राचें पाणी शोषीत असतो, तें पावसाच्या रूपानें परत देण्याकरितांच शोषीत असतो. सर्व जगभर हाच व्यवहार चालू आहे. आपण मनुष्यें म्हणजे प्रकृतीचीं दे, घे, करण्याचीं यंत्रें आहों. एकाकडून घ्यावयाचें आणि दुसऱ्यास द्यावयाचें हा प्रकृतीचा व्यवहार आपल्यामुळें चालतो. याकरितां आपणापाशीं जें कांहीं येतें तें देण्याकरितां येतें असें समजावें. याकरितां दानाबद्दल उलट अपेक्षा करणें हें प्रकृतीच्या कायद्याविरुद्ध आहे. अधिक अधिक देत गेलां, तर अधिकाधिकाची प्राप्ति तुम्हांस आपोआपच होईल.

या खोलींतली हवा तुम्ही जितक्या जलदीनें बाहेर काढून टाकाल, तितक्याच लवकर बाहेरची हवा आंत भरेल; पण हीं सर्व दारें आणि खिडक्या तुम्हीं बंद केल्या, तर आंतली हवा आंतच राहील; पण बाहेरची हवा मात्र आंत येणार नाहीं. असें झालें म्हणजे आंतील हवा कोंडून राहील आणि खराब होऊन शेवटीं पूर्ण विषारी बनेल. नद्या एका बाजूनें आपलें सर्व पाणी समुद्राला अर्पण करीत असतात; आणि दुसऱ्या बाजूनें एकसारख्या भरत असतात. या विश्वव्यापी समुद्रांत प्रवेश करण्याचीं आपलीं द्वारें बंद करूं नका. हीं द्वारें बंद करून बसलां, कीं मृत्यूनें तुम्हांस घेरलेंच.

याकरितां भिक्षावृत्तीचा अवलंब करूं नका; आणि सदोदित अनासक्त रहा. अशा रीतीनें राहणें अत्यंत कठीण आहे. या मार्गातील भयंकर अडचणींची आणि दुष्ट श्वापदादिकांची नुसती कल्पनाही आपणांस करवत नाहीं. या मार्गांतल्या अडचणी यथाकथंचित् अत्यंत तीव्रबुद्धीमुळें जाणतां आल्या तरी त्यांचा प्रत्यक्ष गराडा पडेपर्यंत त्यांच्या भयंकरपणाची खरी कल्पना आपणांस झालेली नसते. एखाद्या रमणीय उद्यानाचा देखावा लांबून पाहून त्याची कल्पना अंशतः मात्र आपणांस होते; तथापि आपली नजर रूपरेषेच्या आंत मात्र गेलेली नसते. त्याची यथार्थकल्पना होण्याला त्या उद्यानांतच प्रवेश केला पाहिजे. एखाद्या कार्यांत आपणांस भयंकर अपयश आलेलें असतें. आपल्या अंगांतील सर्व जीवन सुकून गेलेलें असतें आणि शत्रूंनीं आपली लांडगेतोड चालविलेली असते. अशाही वेळीं हृदयास बांध घालावा लागतो.

अशा वेळींही आपलें ईश्वरत्व विसरलें जाणार नाहीं–गाडलें जाणार नाहीं–अशी खबरदारी घ्यावी लागते. आपला सारा दुष्ट स्वभाव या वेळीं खवळून उठतो. तो आंतून एकसारखें प्रोत्साहन देत असतो कीं, 'ऊठ, पाहतोस काय, चापटीला चापटी आणि लाठीला लाठी असा वाग; खोट्याला खोटें आणि नायट्याला बिब्बा असा वाग; आतां मागे होशील तर नेभळा ठरशील.' "**साध्वी शांति नागविली । मग माया मांगी श्रृंगारिली । तियेकरवीं विटाळविलीं । साधुवृंदें ॥**" अशी ज्यांची करामत ते आपले कामक्रोध संपूर्ण जागे झालेले असतात. अशा वेळीं पूर्ण शांति बाळगण्यास, टोल्याला टोला परत न करण्यास आणि अलिप्त राहण्यास, प्रत्यक्ष ईश्वराच्या बळाहूनही अधिक बळ पाहिजे.

अलिप्त रहावें असा बेत आपण रोज करीत असतों. आपण आपल्या पूर्व आयुष्यक्रमाचें कित्येक वेळां सिंहावलोकन करतों. त्या वेळीं ज्यांबद्दल आपणांस आसक्ति वाटत होती असे सर्व विषय आणि मनुष्यें आपल्या मनश्चक्षूंपुढें उभीं राहतात. त्यांपैकीं प्रत्येकानें आपणांस गुलाम करून कसें सोडलें होतें आणि शेंवटीं आपणांस दुःख कसें दिलें, याचें आपणांस स्मरण होतें. आपण आपलें ईश्वरत्व पार विसरून जाऊन गुलामगिरीच्या जाळ्यांत कसे सांपडलों होतों हें आपणांस दिसूं लागतें. 'प्रेम' या भपकेबाज नांवाखालीं मोडणाऱ्या गुलामगिरीला आपण त्या वेळीं मिठ्या मारीत होतों, असें आपणांस समजून येतें. दुसरे आपणास त्या वेळीं बाहुल्यासारखे नाचवीत होते आणि प्रत्येक दिवशीं आपल्या ईश्वरत्वावर एकएक नवें पांघरूण घालीत होते याचें आपणांस स्मरण होतें. त्या वेळीं आपण पुन्हां एकवार निश्चय करतों कीं 'आतां यापुढें कसल्याच गोष्टीची आसक्ति बाळगावयाची नाहीं. पण उपयोग काय ? "**जंव न देखिलें पंचानना तंव जंबुक करी गर्जना ।**" अशी आपली स्थिति होते. पुन्हां मोह आपणांस वश करतो. पुन्हां आपला जीव या जाळ्यांत गुंततो, पक्षी जाळ्यांत सांपडला म्हणजे धडपड आणि फडफड करतो, पण त्या जाळ्यांतून त्याची सुटका होत नाहीं. हाच आपलाही जीवनक्रम आहे.

अनासक्तीच्या मार्गांत मोठ्या भयंकर अडचणी आहेत ही गोष्ट कबूल केलीच पाहिजे. यांपैकीं एखादी अडचणही आपल्या हृदयाचें पाणी करून

टाकण्यास समर्थ असते. एखादे वेळीं कांहीं गोष्टींचा परिणाम असा होतो कीं सुतकीपणा आपल्या वृत्तींत शिरून बसतो. जगांत खरें प्रेम, खरा निःस्वार्थीपणा इत्यादि सद्गुणांचा वास कोठेंही नाहीं असें वाटूं लागून आपली वृत्ति अत्यंत निरुत्साही बनून जाते. पूर्ववयांत उदार, क्षमावान्, सदय आणि सरळ मनाचीं असलेलीं पुष्कळ माणसें वृद्धपणीं आपली माणुसकीसुद्धां विसरलीं असल्याचें आढळून येतें. यांत कित्येक ढोंगी असतात हें कांहीं खोटें नाहीं; पण पुष्कळांची मनुष्यत्वाची जाणीवच नष्ट झालेली असते. एखाद्या वाईट कृत्यांचा रागही त्यांस येत नाहीं, अथवा कशाबद्दल प्रेमही त्यांच्या चित्तांत असत नाहीं. त्यांचें मनुष्यत्व त्यांच्या बाह्य आकारांत मात्र राहिलेलें असतें. ते कोणावर कधीं रागावत नाहींत याचें कारण, त्यांस खरी शांति प्राप्त झाली असते हें नव्हे, तर त्यांचें रागावण्याचें सामर्थ्यच नष्ट झालेलें असतें. यामुळें एखाद्या वाईट कृत्याबद्दल कोणाला ते वांकडा शब्दही बोलावयाचे नाहींत. यापेक्षां राग येणें शतपट अधिक चांगलें. त्यामुळें खरें मनुष्यत्वतरी जागें होईल; पण त्यांच्या ठिकाणचें मनुष्यपण निद्रावस्थेंत नसतें; तें मेलेलें असतें. त्यांच्या नजरेसमोर कांहीं दुष्कृत्यें घडलीं, तरी त्यांबद्दल त्यांस क्षिति वाटत नाहीं. एखाद्याला शिव्याशाप देण्याइतकें मनुष्यपणही तेथें जिवंत नसतें. अशीं मनुष्यें म्हणजे निवळ चालतेबोलते दगडी पुतळे !

हा प्रकारही अत्यंत त्याज्य आहे, हें उघड आहे. यावरून आपणांस किती प्रकारच्या अडचणींतून मार्ग काढावयाचा आहे याचा अजमास होण्याजोगा आहे. याचकरितां आपणांस ईश्वराच्या बळाहूनही अधिक बळाची अपेक्षा आहे असें मीं नुकतेंच म्हटलें होतें. सामान्य मनुष्याच्या बळानें आपला मार्ग आपणांस आक्रमण करतां येणार नाहींच; पण त्याहून अधिक बळानेंसुद्धां तें काम होणार नाहीं. ईश्वरी बळाहून अधिक बळच हें कर्म करूं जाणेल. या चक्रव्यूहांतून बाहेर पडण्यास ईश्वरी बळाहूनही अधिक बळ अंगीं पाहिजे. आपल्या जीवनारण्यांत अनेक जाळीं, अनेक गुंतागुंती आहेत, त्यांतील अनेक विषारी सर्पांच्या आणि क्रूर श्वापदांच्या गर्दीतून आपणांस सुरक्षितपणें बाहेर पडावयाचें आहे. यांत आपल्या शरिराला इजा झाली, हातपाय मोडले आणि आपण रक्तबंबाळ झालों, तरी आपलें हृदय दिवसेंदिवस अधिक दृढ होत गेलें पाहिजे. कितीही आघात झाले, तरी मनाच्या शक्ती क्षीण न होतां वाढत गेल्या पाहिजेत.

हें अत्यंत दुष्कर कर्म आहे ही गोष्ट खरी; पण सतत अभ्यासाला अशक्य असें कांहींच नाहीं. एक सिद्धांत आपण पक्का लक्ष्यांत बाळगावा, तो हा कीं आपल्या स्वतःच्या तयारीवांचून कोणतेंही दुःख आपणावर हल्ला करूं शकणार नाहीं. एखादें दुःख यावें अशी तजवीज आपणच आगाऊ करीत असतों. दुःखाला राहण्यासाठीं आपणच घर बांधीत असतों. मग तें त्यांत येऊन राहतें हा त्याचा अपराध काय? मेलेलें जनावर जेथें पडलें असेल तेथें गिधाडें आणि डोमकावळे येणारच. आपलें शरीर एखाद्या रोगाचें वसतिस्थान होण्यास प्रथम योग्य होतें आणि नंतर रोग तेथें येऊन राहतो, हें मीं अगोदर सांगितलेंच आहे. रोगबीजें हें रोगांचें एकटेंच कारण नसतें. शरिराची पूर्वतयारी असल्याशिवाय रोगबीजें तेथें प्रवेशच करावयाचीं नाहींत; आणि यथाकथंचित् त्यांनीं प्रवेश केला तरी तीं जगावयाचीं नाहींत. जगांतील प्रत्येक स्थिति आपणांस आपल्या योग्यतेनुरूपच प्राप्त होते. आपला मूर्खपणाचा अभिमान बाजूला ठेवून आधीं आपण हें शिकूं या, कीं जें जें दुःख आपल्या गळीं पडतें, त्याला आपण पात्रच असतों. दुःखानें आपणांस मिठी मारावी अशी पात्रता आपण आपल्या अंगीं आगाऊच आणून ठेवलेली असते. दुःखाचा मार्ग आंखून आणि त्यांतले कांटेकुटे काढून, त्यांतील खांचखळगे आपणच बुजवून ठेवतों, आणि दुःख त्या सरळ रस्त्यानें आपल्याकडे येतें. दुःखाचे मार्गदर्शक दिवटे आपणच, हें अगोदर नीट समजून घ्या. ज्या ज्या वेळीं आपणांस धक्केचपेटे खावे लागले, त्या त्या वेळचा अनुभव नीट ध्यानांत आणा, म्हणजे तुम्हांला असें निःसंशय आढळून येईल कीं, त्या प्रत्येक वेळीं आपण आगाऊ तयारी करून ठेविली होती. अर्धी तयारी आपण करतों आणि बाकीची अर्धी बाह्यजगाकडून होते. अशा रीतीनें पूर्ण तयारी झाल्यानंतर दुःखाचा प्रवेश होतो. याच ठिकाणीं आशेचाही एक जंतु दिसत असतो. 'मला बाह्यजगावर ताबा चालवितां येत नाहीं; पण माझ्या अंतर्गत जगावर माझा ताबा चालूं शकेल. दुःखाला मार्ग मिळण्यास अंतर्बाह्य अशा दोन्ही गोष्टींची अपेक्षा असते. याकरितां माझ्या बाजूनें तरी मीं सुरक्षित राहण्याचा यत्न केला, तर दुःखाचा मार्ग आपोआपच बंद होईल. जर मी माझ्या अंतःसृष्टीवर—माझ्या मनावर–ताबा चालवूं शकलों, तर दुःखाचा प्रवेश माझ्या ठिकाणीं कधींही होणार नाहीं.' हाच आपला आशातंतु. यालाच अधिक बळकटी आणण्याचा यत्न आपण करावा.

एखादें दुःख प्राप्त झालें कीं आपला पहिला यत्न बाह्यकारण शोधून काढण्याचा असतो. ही संवय आपणांस लहानपणापासून जडली आहे. आपल्या अपयशाचें खापर कोणाच्या बोडक्यावर फोडतां येईल, हेंच आपण प्रथम शोधूं लागतों. मग आपली खटपट लोकांची सुधारणा करण्याकरितां सुरू होते. आपली स्वःतची कांहीं चूक असेल असें आपल्या स्वप्नींही येत नाहीं. जो काय अपराध असेल तो सारा दुसऱ्यांचा. त्यांना अगोदर सुधारलें पाहिंजे. आपण खरोखरच शुद्ध घमंडानंदन असतों. आपणांस कांहीं दुःख प्राप्त झालें म्हणजे प्रथम बोलावयाचें तें हेंच, 'काय हो, जग कितीतरी दुष्ट आहे!' मग लोकांना शिव्याशाप देऊन म्हणावयाचें, 'यांच्यासारखे गाढव मीं कोठेंही पाहिलें नाहींत.' पण शहाण्याच्या कांद्यानों, जर तुम्ही खरोखर शहाणे आहां, तर असल्या दुष्ट जगांत राहतां कशाला? जर या जगांत सर्वत्र राक्षसांची आणि दैत्यांची वस्ति असेल, तर आपण स्वतःही त्यांपैकींच एक दैत्य नव्हे काय? 'जगांतले सारे लोक शुद्ध आपलपोटे.' खरें आहे. अगदीं निर्भेळ सत्य आहे; पण आपण त्यांहून अधिक चांगले असतों तर येथें येतों कशाला, याचा कांहीं विचार करा.

जें जें कांहीं आपणांस प्राप्त होतें, त्याला आपण सर्वथैव पात्रच असतों. आम्ही चांगले आणि जग वाईट असें जेव्हां आपण म्हणतों, त्या वेळीं आपण शुद्ध खोटें बोलत असतों. जगाला उगीच थाप मारण्याचा हा आपला यत्न असतो; पण यामुळें आपण असल्या थापा मारून स्वतःलाच फसवीत असतों, हें आपल्या लक्ष्यांत येत नाहीं; इतकेतर आपण शहाणे आहों! मग जग वेडें कीं आम्ही वेडे?

अत्यंत महत्त्वाचा असा हा पहिला धडा आहे. ज्या वेळीं आपणांस दुःखाची प्राप्ति होते, त्या वेळीं दुसऱ्या कोणावर बोटें मोडण्याचें कारण नाहीं. खऱ्या शूराला अशी वागणूक सर्वथैव अनुचित आहे. शूर व्हा आणि दुःखाला तोंड द्या. आपल्या स्वतःचा दोष शोधून काढा. खरा मार्ग हाच आहे. आपल्या दुःखाबद्दल इतरांना दोष देण्यापेक्षां तो तुम्ही स्वतःलाच दिला, तर सत्य-मार्गानें गेल्याचें श्रेयतरी तुम्हांला मिळेल. स्वतःवर ताबा चालविण्यास तुम्ही शिकलां तर त्यांतच तुमचा फायदा आहे.

स्वतःच्या पौरुषाबद्दल कित्येक वेळां आपण बढाया मारीत असतों. त्या वेळीं आपण म्हणजे प्रतिपरमेश्वर असें आपण भासवीत असतों. 'मला सर्व कांहीं समजतें; मी वाटेल तें करूं शकेन, मी शुद्ध–निर्दोष–आहें; मी निष्कलंक आहें; या जगांत स्वार्थत्यागी कोणी असेल तर तो मी.' असल्या प्रकारची अघळपघळ भाषा आपण नित्य वापरीत असतों; पण त्याच क्षणीं एखादा लहानसा खडा कोणीं फेकला, तर तो तोफेच्या गोळ्याहूनही आपणांस अधिक इजा करतो. एखाद्या पोराचें लहानसें बोट लागलें, तर आपणास जखम झाल्यासारखें वाटतें. जगांतील वाटेल त्या मूर्खानें यावें आणि आमच्या शांतीचा भंग करावा, इतकी तर आपल्या 'ईश्वरत्वाची' किंमत आपण बाळगतों. आमचीं मनें इतकीं भोळीं असल्यावर यत्किंचित् आघातानें तेथें दुःखाची उत्पत्ति व्हावी यांत नवल काय? अशा स्थितींत जगाला नांवें ठेवण्यांत काय बरें फायदा आहे? आपल्या खोड्यांनीं परमेश्वराच्या शांतीचा भंग आपणांस कधींतरी करतां येईल काय? जर तुम्ही खरोखर परमेश्वरस्वरूप असाल, तर तुमच्या शांतीचा भंग कशानेंही होतां उपयोगी नाहीं. जगाच्या हातून तुमचें कांहींच वांकडें होणार नाहीं. तुम्ही एखाद्या नरकाच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत गेलां, तरी तुम्हांला यत्किंचित्‌ही दुखापत होणार नाहीं; पण खरी गोष्ट वेगळीच आहे. तुम्हीं कितीही बढाया मारिल्या, तरी जोंपर्यंत जगापासून तुम्हांस दुःख होतें असें वाटत आहे, तोंपर्यंत परमेश्वरत्वाची तुमची सारी बडबड म्हणजे निवळ धुराचे ढग! बाह्यजग आपणांस इजा करतें या भावनेनें तुम्ही मात्र स्वतःस अनेक दुःखांस पात्र करून घेतां. एका दुःखांतून तुम्ही सुटतां न सुटतां, तोंच दुसऱ्याच्या जाळ्यांत सांपडतां 'अरेरे! काय हें जग दुष्ट! हा मनुष्य मला दुःख देतो; तो मनुष्य माझे कान उपटतो; आणि तिसरा कांहीं तिसरीच खोडी करतो.' अशा तक्रारी करणें स्वतःच्या मूर्खपणाला असत्याची जोड देणें आहे. यामुळें दुःख द्विगुणित मात्र होईल.

या जगांत ज्याची त्यानेंच काळजी घेतली पाहिजे. आपल्या हातीं इतकेंच आहे. दुसरा कोणी तुम्हांस सुख अथवा दुःख देतच नाहीं. "**सुखस्य दुःखस्य न कोऽपि दाता। परो ददातीति कुबुद्धिरेषा॥ अहं करोमीति वृथाभिमानः। स्वकर्मसूत्रग्रथितो हि लोकः॥**" याकरितां परक्याबद्दलचा कांहींच विचार

करूं नका. स्वतःचीं साधनें जय्यत करण्याची खटपट मात्र अवश्य करावी; म्हणजे साध्य असेल तें आपोआप सिद्ध होईल. आपण आपलें वर्तन पवित्र केलें आणि आपलें चारित्र्य सुधारलें, तर जग आपोआपच सुधारेल. जग सुधारण्याचीं साधनें, आपण मनुष्येंच आहोंत. याकरितां स्वतःच पवित्र होण्याच्या मार्गाला लागा. तुम्ही स्वतः पूर्णत्व पावलां म्हणजे जग पूर्ण होईल.



# मानवी मनाचें सामर्थ्य



आपण साऱ्या जगाचा इतिहास अवलोकन केला, तर अलौकिक गोष्टी घडतात अशी पुष्कळांची श्रद्धा असते असें आपणांस आढळून येईल. ही गोष्ट कोणत्याही एका विशिष्ट काळालाच लागू होती असें नाहीं. प्राचीनकाळापासून तों आजतागाईत अशा प्रकारचा विश्वास बाळगणारे लोक सर्वत्र होते व आहेत. विचित्र गोष्टी घडल्याचें ज्याच्या कानावरूनही गेलें नाहीं असा मनुष्य बहुधा सांपडावयाचा नाहीं; आणि आपणांपैकीं पुष्कळांना अशा चमत्कारांचा प्रत्यक्ष अनुभवही आला असेल; पण इतर लोकांच्या अनुभवाविषयीं सांगत बसण्यापेक्षां मला स्वतःलाच जे कांहीं अनुभव आले, आणि ज्या कांहीं गोष्टी मीं स्वतः आपल्या डोळ्यांनीं पाहिल्या, त्याच आरंभीं तुम्हांस सांगाव्या हें बरें, म्हणजे आपल्या आजच्या विषयाला ही प्रस्तावनाही खाशी होईल.

एके वेळीं एका मनुष्याबद्दल माझ्या कानांवर असें आलें कीं, कोणी त्याकडे मनांत कांहीं प्रश्न धरून गेला, तर तो त्यांचीं उत्तरें ताबडतोब देतो. तसेंच पुढें होणाऱ्या कांहीं गोष्टीही तो सांगतो. हें वर्तमान ऐकून त्या मनुष्याला पाहण्याची इच्छा मला झाली. कांहीं मित्रांबरोबर मी त्याजकडे गेलों. आमच्यापैकीं प्रत्येक जणाच्या मनांत कांहीं ना कांहीं विचारावयाचें होतें. आम्हांस जे प्रश्न त्याला विचारावयाचे होते, ते कागदांवर लिहून ते कागद आम्ही पाकिटांत घातले होते. आमच्यापैकीं एकाकडे पाहिल्याबरोबर तो आमचे प्रश्न आणि त्यांचीं उत्तरें सांगूं लागला. मग त्यानें एका कागदावर कांहीं मजकूर लिहून तो कागद एका पाकिटांत घालून तें बंद केलें; आणि तें पाकिट माझ्यापुढें करून म्हणाला, ‘यांत तुमचे प्रश्न आणि त्यांचीं उत्तरें आहेत. हे आपल्या खिशांत घाला.’ अशा रीतीनें त्यानें प्रत्येकाला त्याचे प्रश्न आणि त्यांचीं उत्तरें दिलीं. नंतर त्यानें आम्हांला कांहीं पुढें घडून येणाऱ्या गोष्टीही सांगितल्या. थोड्या वेळानंतर तो म्हणाला, “कोणत्याही भाषेंतला एखादा शब्द अथवा एखादें वाक्य आपल्या मनांत धरा.” त्याला संस्कृत भाषेचें ज्ञान मुळींच नव्हतें हें मला ठाऊक होतें; म्हणून एका संस्कृत ग्रंथांतील एक लांबलचक वाक्य मीं मनांत म्हटलें. नंतर तो मला म्हणाला, “आतां आपल्या

खिशांतला कागद काढा." मीं कागद काढून पाहिला तों तें वाक्य त्या कागदावर लिहिलेलें मला आढळलें! तो कागद त्यानें सुमारें एक तासापूर्वी लिहिला होता; आणि त्यांत त्यानें एक वाक्य असेंही लिहिलें होतें कीं 'हे गृहस्थ पुढील वाक्य मनांत धरतील.' नंतर माझ्या एका स्नेह्याकडे वळून तो म्हणाला, 'तुम्हीही एखादें वाक्य मनांत धरा.' माझ्या स्नेह्याला आरबी भाषेचें चांगलें ज्ञान होतें. त्यानें कुराणांतील एक वाक्य मनांत धरलें. त्या मनुष्याला आरबी भाषेचा गंधही असण्याचा संभव नव्हता. माझ्या स्नेह्यानें आपल्या खिशांतील पाकीट उघडून पाहातां, त्यालाही तेंच वाक्य बरोबर लिहिलें असल्याचें आढळून आलें. आमच्यापैकीं तिसरे एक गृहस्थ डॉक्टर होते. त्यांनीं एका जर्मन वैद्यकीय ग्रंथांतलें एक वाक्य मनांत धरलें; आणि तेंही अशाच रीतीनें कागदावर आगाऊ लिहिलेलें आढळलें.

या सर्व गोष्टींचा मला मोठा चमत्कार वाटला; आणि त्या गृहस्थानें कांहीं विलक्षण रीतीनें आम्हांस चकविलें तर नसेलना! अशी शंका माझ्या मनांत येऊं लागली. थोड्या दिवसांनीं आणखी कांहीं स्नेही बरोबर घेऊन मी त्याजकडे पुन्हां गेलों आणि या वेळींही सारे प्रकार पूर्ववत् अगदीं बरोबर घडून आले.

दुसऱ्या एका प्रसंगीं कांहीं कामानिमित्त मी हैद्राबादेस गेलों होतों. तेथें माझ्या ऐकण्यांत आलें कीं, एक गृहस्थ हजारों प्रकारचे जिन्नस बसल्या जागीं काढून दाखवितो. हा गृहस्थ हैद्राबाद येथें कांहीं व्यापारधंदा करून राहत असे. आम्ही त्या गृहस्थाकडे गेलों आणि कांहीं जिन्नस काढून दाखविण्याविषयीं त्यास विनंति केली. त्या दिवशीं तो गृहस्थ तापानें आजारी होता. एखाद्या सत्पुरुषानें स्पर्श केला असतां रोगग्रस्त मनुष्यांचा रोग जातो असा आम्हां हिंदूंचा विश्वास आहे. त्याला अनुसरून सदर्हू गृहस्थ मला म्हणाला, 'महाराज, माझ्या मस्तकावर जरा आपला हात ठेवा बरें?' मी त्याला म्हटलें, 'पण तुम्हीं मला आपली करामत दाखविली पाहिजे.' ही गोष्ट त्यानें कबूल केल्यावर त्याच्या इच्छेप्रमाणें मीं आपला हात त्याच्या मस्तकावर ठेवला. पुढें कबूल केल्याप्रमाणें थोड्या दिवसांनीं तो मजकडे आला. त्या वेळीं तो फक्त एक धोतर नेसला होता, व अंगावर थोडे कपडे होते. आम्हीं त्याच्या आंगावरील सर्व कपडे काढून बाजूला ठेवले. त्याचें नेसतें धोतर मात्र त्याच्या

अंगावर राहूं दिलें. त्या दिवशीं थंडी फार होती म्हणून पांघरावयास एक ब्लांकेट त्यानें मजपासून मागून घेतलें; आणि तें पांघरून तो खोलीच्या एका कोपऱ्यांत जाऊन बसला. त्या खोलींत त्या वेळीं सुमारें पंचवीस माणसें होतीं. तो गृहस्थ म्हणाला, 'बोला, तुम्हांला काय पाहिजे तें.' आम्ही सर्वांनीं कांहीं फळांचीं नांवें लिहिलीं. त्यांत कित्येक फळें जवळपासच्या प्रदेशांत न मिळणारीं अशींही होतीं. फळांच्या यादींत द्राक्षें, नारिंगें इत्यादि अनेक प्रकारचीं फळें होतीं. नंतर आम्ही ते तुकडे त्याजपाशीं दिले. थोड्या वेळानें ब्लांकेटाखालून फळें बाहेर येण्यास सुरवात झाली. द्राक्षांचे घडचे घड आणि नारिंगें वगैरे इतर फळें भराभर बाहेर पडूं लागलीं. शेवटीं इतकीं फळें बाहेर पडलीं कीं, त्या सर्वांचें वजन केलें असतें तर तें त्या मनुष्याच्या वजनाच्या दुप्पट झालें असतें. तीं फळें त्यानें आम्हांस खावयास दिलीं; परंतु कित्येकांनीं तीं खाण्याचें नाकारलें. त्यांत कांहीं जादू असेल असें ते म्हणूं लागले; पण तो गृहस्थ जेव्हां तीं फळें स्वतःच खाऊं लागला, तेव्हां बाकीच्या सर्वांनीं त्यांजवर खुशाल ताव मारला. त्यापासून कोणाला कांहीं इजा वगैरे पोहोंचली नाहीं.

शेवटीं त्यानें कांहीं सुंदर गुलाबाचीं फुलें काढलीं. प्रत्येक फूल अगदीं पूर्ण फुललेलें असून नुकतेंच तोडल्यासारखें दिसत होतें. त्यावरील दवांचे बिंदूही जसेच्यातसे असून सर्व पाकळ्या अगदीं ताज्या दिसत होत्या. एखादी पाकळीसुद्धां गळलेली नव्हती अगर चुरून खराबसुद्धां झाली नव्हती. तीं फुलेंही कांहीं थोडीं थोडकीं नव्हतीं. भाराभर फुलें त्यानें आणलीं होतीं. तो जावयास निघाला त्या वेळीं 'हें तुम्हीं कसें केलें' असा प्रश्न मीं त्याला केला; तेव्हां तो हंसून म्हणाला, 'ही सर्व हातचलाखी आहे. दुसरें कांहीं नाहीं.' त्याची विद्या कोणतीही असो; पण ती हातचलाखी मात्र खास नव्हे. हात-चलाखीनें कांहीं इतकीं फळें येणें शक्यच नव्हतें.

अशाच प्रकारच्या दुसऱ्याही अनेक गोष्टी माझ्या प्रत्यक्ष अवलोकनांत आल्या आहेत. हिंदुस्थानांत कांहीं काळ तुम्ही फिरलां तर असल्या शेंकडों गोष्टी तुमच्या पाहण्यांत येतील. मला वाटतें, प्रत्येक देशांत असल्या प्रकारच्या गोष्टी घडत असतील. आतां या गोष्टी घडतात हें खरें असलें, तरी त्यांत गप्पाहि पुष्कळ असतात, हें कबूल केलें पाहिजे; पण एक गोष्ट

अवश्य लक्ष्यांत बाळगली पाहिजे, ती ही कीं, खोटें झालें तरी तें खऱ्याची नक्कल असतें. मुळांत कांहीं खरें असेल तरच त्याच्या नकला उत्पन्न होणार ! ज्याला मुळांतच अस्तित्व नाहीं अशा एखाद्या घटनेची नक्कलतरी कशी निपजेल ? अशा अनेक नकला होतात यावरून त्यांत कोठेंतरी सत्यांश असला पाहिजे, हें उघड दिसतें. एका खऱ्याबरोबर शेंकडों नकला पिकत असतील; पण मुळांत एकतरी खरें असलें पाहिजे ना ?

हजारों वर्षांपूर्वी असले प्रकार हिंदुस्थानांत हंमेश घडत असत. किंबहुना सध्यापेक्षां त्यावेळींच हे चमत्कार अधिक घडत असत. माझा एक असा समज आहे, कीं एखाद्या देशांत लोकसंख्या फार वाढली म्हणजे त्या देशांतील आध्यात्मबल कमी होतें. मनुष्यें थोडीं आणि देशाचा विस्तार मोठा असें असलें म्हणजे त्या ठिकाणीं आध्यात्मबलही अधिक असावें असें मला वाटतें. चमत्कारिक दिसणाऱ्या प्रत्येक गोष्टीचें संशोधन व पृथक्करण करून त्याच्या मूलभूत सिद्धांतांस पोंहोंचावयाचें अशी हिंदूंची पूर्वापार पद्धत असल्यामुळें असल्या प्रकारांच्या मुळांशीं काय आहे, याचाही शोध लावण्याचा यत्न त्यांनीं केला. हा शोध करतांकरतां अनेक महत्त्वाचे सिद्धांत त्यांनीं शोधून काढले. याचा अर्थ इतकाच कीं असल्या चमत्कारांचा मुळापर्यंत शोध लावून त्यांनीं त्याचें एक सर्वांगपूर्ण असें शास्त्र बनविलें. यांतील कित्येक गोष्टी सामान्य मनुष्याच्या नजरेनें चमत्कारिकशा भासल्या, तरी त्या नैसर्गिक नियमांस सोडून घडत नाहींत, ही गोष्ट या पूर्वीच्या शोधकांच्या लक्ष्यांत आली होती. अलौकिक अथवा निसर्गबाह्य अशी एकही गोष्ट या विश्वांत घडून येत नाहीं. ज्याप्रमाणें आपल्या सामान्य व्यावहारिक गोष्टी निसर्गसिद्ध नियमांस अनुसरून घडतात, त्याचप्रमाणें हे चमत्कारही त्याच नियमांनीं बांधलेले आहेत. सामान्य सृष्टिरचना जशी नियमबद्ध आहे, त्याचप्रमाणें ही चमत्कारांची सृष्टीहि नियमबद्ध आहे. एखाद्या मनुष्याला जन्मतःच कांहीं विशेष सामर्थ्य असलें, तर त्याला घडवितांना ब्रह्मदेवानें कांहीं विक्षिप्तपणा केला असेल असें वाटण्याचें कारण नाहीं. असल्या चमत्कारांचा सांगोपांग अभ्यास करून ते करण्याचें सामर्थ्य आपल्या अंगीं आणणें अशक्य नाहीं. कोणालाही हें साधण्याजोगें आहे. या शास्त्राला त्यांनीं राजयोग असें नांव दिलें आहे. या शास्त्राचा अभ्यास करणारे हजारों लोक हिंदुस्थानांत आहेत; इतकेंच नव्हे, तर साऱ्या राष्ट्राच्या

रोजच्या धर्मविधींतही या शास्त्रांतील कित्येक प्रक्रियांचा अंतर्भाव झालेला आहे.

हें सारें अचाट सामर्थ्य मानवी मनांतच वास करीत आहे, असा या शास्त्राचा मूलसिद्धांत आहे. मनुष्यांत व्यक्तरूपाला आलेलें मन, हें विश्वव्यापी मनाचा अंश आहे. प्रत्येक मनुष्याचें मन एकाच मनांतून उद्भूत झालेलें असल्यामुळें, एका मनाचा दुसऱ्या मनाशीं नित्यसंबंध आहे. तसेंच एखादें मन जगाच्या कोणत्याही कोपऱ्यांत राहत असलें, तरी त्याचा संबंध सर्व जगाशीं कायम असतो.

विचारसंक्रमणाचा एखादा चमत्कार तुमच्या अवलोकनांत कधीं आला आहे काय ? एखादा मनुष्य या ठिकाणीं एखाद्या गोष्टीचा विचार करीत असला, तर दुसऱ्या एखाद्या ठिकाणीं असलेल्या मनुष्याच्या मनांत बरोबर तोच विचार प्रवेश करतो. ही गोष्ट कांहीं काकतालीयन्यायानें घडते असें नाहीं. हा एक प्रकारचा अभ्यास आहे. आपल्या मनांतील विचारांची प्रेरणा दुसऱ्याच्या मनांत करण्याचा अभ्यास करावा लागतो. हा अभ्यास दोन प्रकारचा असतो. दुसऱ्याच्या मनांत आपल्या मनांतील विचार प्रेरावयाचा आणि दुसऱ्याच्या मनांतील विचाराचें ग्रहण करावयाचें. प्रेरकानें एका बाजूनें कांहीं विचाराची प्रेरणा केली, कीं दुसरीकडे ग्राहकही तयार राहतो आणि त्या अतिथीचें स्वागत करतो. प्रेरकाकडून निघालेला विचार, ग्राहकाच्या मनांत जशाचातसाच शिरतो. अंतर कितीही मोठें अथवा लहान असलें, तरी विचार-संक्रमणाच्या क्रियेंत त्यामुळें कांहीं अडथळा होत नाहीं. प्रेरकाकडून विचार निघाला कीं तो ग्राहकाच्या चित्तांत प्रवेश करतो आणि ग्राहकालाही बरोबर त्याचें ज्ञान होतें. जर माझें मन अथवा तुमचें मन हीं प्रत्येकीं निराळीं असतीं —जर प्रत्येक मन अभेद्य तटानें दुसऱ्या मनापासून अगदीं विभक्त झालेलें असतें— तर एका मनांतील विचारांचा प्रवेश दुसऱ्या मनांत कधींही झाला नसता. मी आतां भाषण करीत आहें आणि आपण तें ऐकत आहां. या क्रियेंतही विचारसंक्रमण होत आहे. या क्रियेचें शास्त्रीयस्वरूप काय आहे तें पाहूं. या क्रियेंत माझे विचार जसेच्यातसेच आपल्या मनांत प्रवेश करीत नाहींत. माझ्या मनांतला विचार तोंडावाटे बाहेर निघाला, कीं बाहेरील आकाशतत्त्वांत ( Ether ) विरून स्पंदरूप होतो. ते स्पंद आपल्या कर्णद्वारें आपल्या मेंदू-

कडे जातात आणि तेथें आपण त्या विरलस्पंदांस एकत्र केलें, म्हणजे पुन्हा त्यांना त्यांचें जड विचाररूप प्राप्त होतें. माझे विचार आपल्या मनांत प्रवेश करतात ही एक क्रिया झाली; परंतु ही क्रिया होण्यास तिच्या पोटांत दुसऱ्या दोन क्रिया व्हाव्या लागतात. प्रथम विचारास स्पंदरूप प्राप्त होतें आणि नंतर स्पंदरूपाचें पुन्हा विचाररूपांत रूपांतर होतें. यावरून माझे विचार आपणांस सरळ रस्त्यानें न पोहोंचतां वेड्यावांकड्या लांबच्या पल्ल्यानें येऊन पोहोंचतात; परंतु प्रेरणेनें झालेलें विचारसंक्रमण सरळ मार्गानें होतें.

जगांतील सर्व मनांचा परस्परांशीं संबंध असून, सर्व मनांचा विश्वव्यापी मनाशीं संबंध आहे असें जें योग्यांचें म्हणणें आहे तें खरें असावें असें यावरून दिसतें. असा परस्परसंबंध सर्वत्र असल्यामुळें प्रत्येक मन विश्वव्यापी आहे, असा योग्यांचा सिद्धांत आहे. तुमचें मन, माझें मन आणि जगांतील सारीं मनें हीं त्या विश्वव्यापी मनाचीं लहान लहान शकलें आहेत. एखाद्या प्रचंड समुद्रावर ज्याप्रमाणें लहान लहान लाटा सर्वत्र उठलेल्या असतात, त्याचप्रमाणें विश्वव्यापी मनावर आपलीं मनें हीं लहान लहान लाटांसारखीं उठलीं आहेत. अशा रीतीनें सर्व मनांचा परस्परांशीं संबंध असल्यामुळें त्यांतील विचारांचेंही संक्रमण सरळपणें होऊं शकतें.

आपल्याभोंवतीं प्रत्येक क्षणीं काय घडामोडी होत आहेत, याकडे क्षणभर लक्ष्य देऊं या. आपल्याभोंवतीं जें अफाट जग पसरलें आहे, त्याचा अंमल आपणावर एकपक्षीं सुरू आहे. आपल्या चालकशक्तींतील कांहीं भागाचा व्यय आपल्या शरीराच्या संरक्षणार्थ आपण करीत असतों, आणि बाकीच्या साऱ्या शक्तीचा व्यय रात्रंदिवस दुसऱ्यांवर अंमल चालविण्यांत खर्ची पडत असतो! आपलें शरीर, आपलें मन, आपले सद्गुण, आपले दुर्गुण आणि आपल्या धार्मिक भावना, या एकसारख्या आपल्या बाहेरील जगावर अंमल चालवीत असतात. एखाद्या प्रत्यक्ष उदाहरणानें ही उपपत्ति अधिक चांगली समजते कीं काय हें पाहूं. एखादा मनुष्य तुमच्याकडे येतो; तो चांगला विद्वान आहे हें तुम्हांस ठाऊक असतें. तो एखादा तास तुमच्याशीं एखाद्या विषयावर भाषण करतो; त्याची भाषा गोड आणि विचार सुंदर असतात; पण त्याचें तुमच्यावर यत्किंचित्‌ही वजन पडत नाहीं. तो निघून गेला म्हणजे तुम्ही अगदीं पहिल्यासारखे थंड असतां. जणुंकाय कोणी मनुष्य आलाच नव्हता! इत-

क्यांत दुसरा एखादा मनुष्य येतो; थोडा वेळ चार वाक्यें बोलतो; त्यांत तादृश माधुर्य नसतें; कदाचित् व्याकरणाच्यासुद्धां चुका असतात; पण तुमच्या मनावर तो मोठा परिणाम करतो ! असल्या प्रकारच्या गोष्टी अनेकवार आपल्या अनुभवास आल्या असतील. एखाद्या मनुष्याचें वजन दुसऱ्यावर पडतें यांत शब्द आणि विचार यांचा फारच थोडा भाग असतो–सुमारें एकतृतीयांश असतो असें म्हणूं; आणि बाकीचें कार्य त्या माणसांतील पुरुषत्वामुळें घडून आलेलें असतें. त्या विशिष्ट व्यक्तींत जें कांहीं तेज–अथवा शास्त्रीय भाषेंत बोलावयाचें म्हटलें तर चुंबकत्व ( Magnetism )–असतें, तेंच तुमच्यावर अंमल बजावीत असतें. तुमच्याशीं तो भाषण करीत असतां त्याचें चुंबकत्व बाहेर पडत असतें व तुमच्या मनाला ओढीत असतें.

एखाद्या कुटुंबांत पांचचार कर्तेसवरते पुरुष असतात. त्यांपैकीं कांहींचा उद्योग यशस्वी होतो आणि बाकीच्यांचा होत नाहीं. असें कां ? ज्यांचा उद्योग यशस्वी होत नाहीं ते दुसऱ्या कोणाच्या तरी गळीं त्या अपयशाचें खापर बांधीत असतात. एखाद्या कामांत यश येत नाहीं असें वाटल्याबरोबर–अमक्या तमक्याच्या अमुक कृतीमुळें माझा डाव फसला असें ते म्हणूं लागतात. स्वतःच्या अपशयाचा वांटा स्वतःच उचलण्याची फार करून कोणाची तयारी नसते. आपल्या हातून कसलीच चूक झाली नाहीं असें भासविण्याचा आपला सर्वांचा यत्न असतो. जो काय दोष असेल तो दुसऱ्या एखाद्या मनुष्याचा अथवा विशिष्ट परिस्थितीचा आणि हेंही जमण्यासारखें नसेल तर साऱ्या अपयशाचें श्रेय उचलण्यास बिचारें नशीब तयार आहेच ! 'काय करावें, आमचें नशीब' असें म्हटलें म्हणजे भागलें. एखाद्या कुटुंबांतल्या मुख्य कर्त्या पुरुषाला अपशय आलें तर त्यानें असा विचार करावा कीं, दुसरे कित्येक जे आपला कुटुंबभार उत्तम रीतीनें उचलीत आहेत तें कां ? कित्येक जण यशस्वी आणि दुसरे अपेशी, असें कां ? या गोष्टी प्रत्येक व्यक्तीच्या कर्तबगारीवर आणि विशिष्टत्वावर अवलंबून असतात असें आपणांस आढळून येईल.

मानवकुलाच्या एखाद्या मोठ्या भागाचें धुरीणत्व ज्यांकडे होतें अथवा आहे, अशा मनुष्यांच्या चरित्राचा विचार केला तरीही हेंच तत्त्व आपणांस आढळून येईल. त्यांचें विशिष्टत्व–असामान्यत्व–त्यांच्या उपयोगीं पडत असल्याचें दिसून येईल. पूर्वी होऊन गेलेल्या मोठमोठ्या तत्त्ववेत्त्यांचीं चरित्रें पहा.

त्यांच्या ग्रंथांचा सूक्ष्ममतें आढावा काढला तर आपणांस काय आढळून येतें ? जगांत जितके तत्त्ववेत्ते आजपर्यंत होऊन गेले, त्यांच्या साऱ्या ग्रंथांचा निष्कर्ष काढिला तर खरोखर अगदीं अस्सल आणि नवीन अशीं विचाररत्नें फार तर मूठभर सांपडतील. कित्येक ग्रंथकार, मोठे म्हणून स्वतःच्या काळीं नांवाजले गेले होते, त्यांचा कीर्तिडिंडिम आजतागाईत आपल्या कानांवर येत आहे; पण त्यांचे ग्रंथ पाहिले तर त्यांवरून ते एवढे मोठे विशाल बुद्धीचे असावेत असें आपणांस वाटत नाहीं. त्यांच्या ग्रंथांचा खरा दर्जा पाहिला तर सरासरीच लागेल. तथापि स्वतःच्या हयातींत त्यांनीं मोठें नांव मिळविलें हें मात्र खरें. या त्यांच्या कीर्तीचें रहस्य पाहूं गेलें तर तें त्यांच्या विचारसौंदर्यांत नसून त्यांच्या व्यक्तिविशेषांत होतें असें आपणांस आढळून येईल. त्यांचे विचार अथवा त्यांचीं भाषणें, हें त्यांच्या कीर्तीचें कारण नव्हे. तीं आपल्यासमोर आजही आहेत, आणि जर ही कीर्ति केवळ विचारांवर अगर भाषणांवर अवलंबून असती तर त्यांच्या ग्रंथांनीं आपल्या मनासही जिंकलें असतें, पण तसें होत नाहीं; त्या अर्थीं आतां जें कांहीं अदृश्य स्थितीस गेलें आहे, तेंच त्यांच्या कीर्तीचें रहस्य असलें पाहिजे. मनुष्याला जें कांहीं यश मिळतें त्यांत बुद्धीच्या वांट्याला तृतीयांश आणि व्यक्तिविशिष्टत्वाच्या वांट्याला बाकीचा दोन तृतीयांश भाग येतो. हें मीं अगोदर सांगितलेंच आहे. आपल्यावर अत्यंत परिणाम व्यक्तिविशिष्टत्वाचाच होतो. केवळ कृतीचा होत नाहीं. व्यक्तिविशिष्टत्व हें कारणरूप असून कृति कार्यरूप आहे. कारणाचें अस्तित्व असलें कीं कार्य घडावयाचेंच. व्यक्तित्व शिल्लक आहे तोंपर्यंत कृति आपोआपच घडत राहते. महत्त्व जें काय आहे तें कृतीला नसून व्यक्तीला असतें.

आपल्या साऱ्या शिक्षणक्रमाची दिशा या मूलभूत तत्त्वाला धरून ठरविलेली असावी. विद्यार्थिगणांतून व्यक्तिविशेष तयार करावयाचे, हा शिक्षणाचा उद्देश असावा. पण आपला शिक्षणक्रम पाहिला तर त्याचा उद्देश बाह्य लखलखीतपणा उत्पन्न करण्याकडे असतो. प्रेक्षकाचे डोळे दिपले म्हणजे झालें. पण अशा स्थितींत आंतली पोकळी कशी भरून निघणार ? मनुष्याची वाढ व्हावी, त्यानें दिवसेंदिवस विस्तार पावावें हा शिक्षणाचा हेतु आहे. आपल्या आसपासच्या मनुष्यांना भारून टाकील अशा प्रकारचे जादुगार आपण निर्माण केले पाहिजेत. अशीं माणसें हीं चालतीं बोलतीं विद्युदुत्पादक यंत्रेंच होत. हीं

जेथें जातील तेथें यशस्वी होतीलच. ज्याच्यांत कांहीं विशिष्टत्व—असामान्यत्व—निर्माण झालें आहे असा मनुष्य कसल्याही धंद्यांत पडला तरी आपल्या विद्युच्छक्तीनें भोंवतालीं चैतन्य उत्पन्न करून सर्वत्र यश संपादील.

आतांपर्यंत सांगितलेल्या सर्व गोष्टी आपणा सर्वांच्या सामान्य अनुभवांतल्या आहेत. तथापि या सर्व गोष्टी अमुक अमुक नियमा अन्वयें घडतात असें मात्र सांगतां यावयाचें नाहीं. सगळ्या जडशास्त्रांचे नियम आपण पालथे घातले तरी त्यांत हे नियम सांपडावयाचे नाहींत. हायड्रोजनचे परमाणू घ्या, ऑक्सिजनचे घ्या आणि त्यांत वाटेल तर कार्बन मिसळा. त्यांत हें व्यक्तिविशिष्टत्व सांपडावयाचें नाहीं. हें व्यक्तिविशिष्टत्व कांहीं औरच आहे. आपलीं सारीं शास्त्रें येथें लंगडीं पडतात; तथापि या गोष्टी कांहीं काल्पनिक आहेत असें नाहीं. आपल्या डोळ्यांसमोर त्या प्रत्यहीं घडत आहेत. त्यांवरून आपली पक्की खात्री होते कीं मनुष्यांत हालचाल करणारें त्याचें विशिष्टत्व हेंच आहे. लोकांवर वजन पाडणारेंही हें विशिष्टत्वच होय. हेंच विशिष्टत्वच सदोदित कार्य करीत असतें आणि तें करीत असतां दुसऱ्यांच्या हृदयाला चटका लावून आपण निघून जातें. तें निघून गेलें म्हणजे मागें ज्या त्याच्या खुणा शिल्लक उरतात त्यांना बुद्धि वगैरे नांवें आपण देतों. त्यांनीं लिहिलेले ग्रंथ हेही त्या विशिष्टत्वाच्या खुणांसारखेच आहेत. त्यांवरून आपणांस त्या विशिष्टत्वाबद्दल पुसटपुसट कल्पना मात्र आहेत. आतां आणखीही कांहीं उदाहरणें पहा. जगांत ज्यांनीं प्रत्यक्ष धर्मकार्य केलें ते महात्मे आणि ज्यांनीं मोठमोठे महत्त्वाचे ग्रंथ लिहिले ते पंडित, यांची तुलना करून पाहिल्यास आपणांस एक गोष्ट विशेषेंकरून आढळून येईल. ती ही कीं, पंडितांनीं मोठमोठे ग्रंथ निर्माण केले ही गोष्ट खरी; पण आपल्या साऱ्या हयातींत मूठभर लोकांतील तरी चैतन्य त्यांनीं जागृत केलें असें आढळावयाचें नाहीं. उलट पक्षीं महात्म्यांनीं ग्रंथ लिहून ठेवले नसले तरी देशचेदेश त्यांच्या हयातींत त्यांच्या मागें धांवत होते. याचें कारणही त्या त्या व्यक्तींतील विशिष्टत्व हेंच होय. तत्त्वदर्शी पंडितांतील विशिष्टत्व अंधुक असल्यामुळें त्यांजकडे कोणाचीं मनें फारशीं ओढलीं गेलीं नाहींत, आणि उलट पक्षीं महात्म्यांचें विशिष्टत्व तेजोमय असल्यामुळें लक्षावधि लोक पतंगासारखे तेथें येऊन पडले. पंडितांतील सारें विशिष्टत्व त्यांच्या बुद्धींत अवतरलें होतें. यामुळें आपली व त्यांची भेट होते

ती बुद्धीच्या सरहद्दीवर होते. त्यापलीकडे आपण त्यांच्या हृदयांत शिरूं शकत नाहीं. उलटपक्षीं महात्म्यांचें विशिष्टत्व अत्यंत अंतर्वर्ती असल्यामुळें त्यांची भेट म्हणजे त्यांच्या अंतरात्म्याची भेट घेणेंच होय. पंडितांच्या अंतरात्म्याची व आमची भेट कधींच होत नाहीं, यामुळें त्यांजबद्दल फारसें प्रेमही आपणांस वाटत नाहीं. उलटपक्षीं महात्म्यांची भेट म्हणजे त्यांच्या अंतरात्म्याची भेट होत असल्यामुळें आपलें मन त्यांजकडे अनिवार्यपणें ओढ घेऊं लागतें. पंडितांचें विशिष्टत्व बुद्धीच्या सरहद्दीवर येऊन बसलेलें असतें. आपला मध्य-बिंदु सोडून कांहीं अंतरावर येऊन तें आपली भेट घेतें. बुद्धि हें इंद्रिय आहे—ही मानवी हृदयांतील एक बनावट चीज आहे. तिचा स्पर्श म्हणजे रसायन-शास्त्रांतील एखाद्या पदार्थाचा स्पर्शच होय. तो हळूहळू कार्य करीत असतो आणि योग्य परिस्थिति सांपडल्यास कोठें एखादी अंधुक ज्योति निर्माण करतो; अथवा अनुकूल परिस्थितीच्या अभावीं स्वतः नाहींसा होतो. उलट-पक्षीं महात्म्यांचें विशिष्टत्व त्यांच्या मध्यबिंदूंतच असल्यामुळें त्यांची भेट होण्याबरोबर आपल्या हृदयांतही प्रकाश निर्माण होतो. एक मोठी मशाल पेटली असली म्हणजे जसे तीवर हजारों दिवे लागतात, त्याचप्रमाणें एक महात्मा लक्षावधि लोकांस आपल्या दर्शनमात्रें जागृति आणतो.

ज्या नियमांनीं मनुष्यांतील हें विशिष्टत्व वाढीस लागतें, ते नियम आपण शोधून काढले आहेत, असें योगशास्त्राचें म्हणणें आहे. त्या नियमांकडे योग्य लक्ष्य पुरवून व त्यांनीं आंखून दिलेल्या मार्गानें जाऊन हें विशिष्टत्व प्रत्येक मनुष्याला प्राप्त करून घेतां येण्यासारखें आहे, असें योगशास्त्र सांगत आहे. सर्व शिक्षणमार्गांचें रहस्य हेंच आहे. या नुसत्या उपपत्ती आहेत असें समजूं नये. या शुद्ध व्यवहार्य गोष्टी आहेत. या उपपत्ती प्रत्यक्ष आचाराकरितांच निर्माण झाल्या आहेत. तसेंच या उपपत्ती एखाद्या विशिष्ट स्थलीं अथवा एखाद्या विशिष्ट कालींच लागू पडतात असें नाहीं; तर त्या कालस्थलातीत शास्त्राच्या उपपत्ती आहेत. त्या सर्व स्थलीं आणि सर्व कालीं एकसारख्याच लागू पडतात. कोणी संसारी असो वा संन्यासी असो; श्रीमंत असो वा दरिद्री असो; लौकिक कामधंद्यांत पडलेला असो वा कसलाही उद्योग करीत असो; त्यानें आपलें विशिष्टत्व पक्कें करणें—त्याचें स्वरूप दृढतर करणें—हेंच त्याला श्रेयस्कर आहे. त्याच्या आयुष्यांत त्याचें कांहीं मोठें कर्तव्य तें हेंच. जडविश्वाचे नियम

जडशास्त्रांनीं सिद्ध केले आहेत; पण त्यांहून त्यांचें दुसरें सूक्ष्मस्वरूपही आहे हें आपणांस आतां निश्चितपणें ठाऊक झालें आहे. वास्तविकपणें जडविश्व, सूक्ष्मविश्व, अंतःसृष्टि इत्यादि भेदच खोटे आहेत. हे केवळ शब्दभेद आहेत. जें कांहीं आहे तें एकच आहे. "**सर्वं खल्विदं ब्रह्म**" हा सिद्धांत आतां आपणांस अवगत झाला आहे. आपल्या अस्तित्वाला कशाची तरी उपमा समजुतीसाठीं द्यावयाची म्हटलें तर त्याला शंकूची उपमा देतां येईल. शंकु मुळाशीं अत्यंत रुंद आणि जड असतो व शेवटाकडे निमुळता होत जाऊन शेवटीं केवळ बिंदूसारखा होतो. आपला जडदेह हा या शंकूच्या तळासारखा आहे. त्यापुढें तो निमुळता होत जातो. त्याचें स्वरूप त्यापुढें निरुंद होत जातें, आणि शेवटीं जें बिंदुवत् अस्तित्व असतें, त्याला आपण जीवात्मा (Spirit) म्हणतों. ही रचना ज्याप्रमाणें एका पिंडांत अनुभवास येते त्याचप्रमाणें ती ब्रह्मांडांतही असते. 'जें पिंडीं तेंच ब्रह्मांडीं' हा सिद्धांत आपणांस ठाऊक आहेच. ब्रह्मांडरचनाही याच नमुन्याबरहुकूम रचली गेली आहे. केवळ जडविश्व हा विश्वशंकूचा तळांतील भाग असून तो पुढें निरुंद होत जातो; आणि शेवटीं जें विश्व अत्यंत सूक्ष्मरूप उरतें, त्याला आपण ईश्वर असें म्हणतों.

एखाद्या वस्तूंत जें कांहीं सामर्थ्य आपल्या प्रत्ययास येतें, तें त्या वस्तूंतील जडरूपांत नसून तिच्या सूक्ष्मरूपांत असतें. बाह्यतः जड भाग हालचाल करतांना दिसला तरी ती हालचाल ज्या शक्तीमुळें होते ती शक्ति त्या वस्तूच्या सूक्ष्मरूपांतर्गत असते. एखादा मनुष्य मोठें ओझें उचलतो त्या वेळीं त्याच्या हाताचे स्नायू फुगलेले दिसतात. त्याच्या एकंदर शरिरांत त्या वेळीं हालचाल सुरू झालेली असते. शरिरांतील स्नायूंत केवढी मोठी शक्ति आहे असें त्या वेळीं आपल्या मनांत येतें. पण खरोखर पाहिलें तर हें सामर्थ्य स्नायूंचें नसून आंतील ज्ञानतंतूंचें असतें. ज्ञानतंतूंचें गुप्त सामर्थ्य स्नायूंच्या द्वारें प्रत्यक्ष रूपानें प्रकट होतें. यांपैकीं एखादा ज्ञानतंतु नष्ट झाला तर त्या भागांतील सामर्थ्यही नष्ट होतें असा अनुभव आहे. आतां ज्ञानतंतूंत जें सामर्थ्य असतें तें त्याहूनही अधिक सूक्ष्म अशा स्वरूपाच्या वस्तूंतून आलेलें असतें. ही अधिक सूक्ष्म वस्तु म्हणजे विचार हीच आहे. अत्यंत सूक्ष्मरूप हेंच शक्तीचें अधिष्ठान आहे. शक्ति जडवस्तूंच्याद्वारें कार्यकारी झाली म्हणजे आपणांस दिसूं लागते; आणि ती सूक्ष्मरूपांत असली आपणांस दृग्गोचर होत नाहीं. स्थूलवस्तु हालचाल करूं लागली म्हणजे

शक्तीचा प्रत्यक्ष प्रत्यय येतो आणि त्यामुळें ती शक्ति त्या स्थूलरूपांतच असावी असा भ्रम पडतो. स्थूलवस्तु हें शक्तीचें अधिष्ठान नसून तिचें प्रकट होण्याचें एक द्वार मात्र आहे. अत्यंत सूक्ष्मरूपांतील शक्ति आपल्या प्रत्ययास येत नाहीं याचें कारण, तेथील शक्तिस्पंद अत्यंत झपाट्याचे असतात; इतके कीं, आपली स्थूलदृष्टि त्यांवर स्थिर होऊं शकत नाहीं. या सूक्ष्मरूपाचें नियमन करतां येईल अशी कांहीं युक्ति आपणांस सांपडली तर स्थूलरूपाचें नियमनही आपणांस सहज करतां येईल हें उघड आहे. एखाद्या तळ्याच्या तळभागांतून बुडबुडा वर येत असला तर तो पृष्ठभागावर येऊन फुटेपर्यंत आपणांस दिसत नाहीं. त्याचप्रमाणें शक्तीचें रूप अत्यंत सूक्ष्म असतें, तोंपर्यंत त्याचा प्रत्यय आपणांस येत नाहीं; पण तीच शक्ति आपलें मूळ अधिष्ठान सोडून स्थूलाकडे येऊं लागली म्हणजे तिचा प्रत्यय येऊं लागतो. अधिष्ठानापासून तिचें अंतर जों जों वाढत जातें, तों तों तिचें स्वरूप अधिक स्थूल होत जातें आणि त्यामुळें तिचा प्रत्यय आपणांस अधिक उघड रूपानें होतो. विचार निर्माण कसा होतो आणि केव्हां होतो ही गोष्ट आपल्या लक्ष्यांत कधींच येत नाहीं; पण अधिष्ठान सोडून तो बराच लांब आला म्हणजे त्याचा प्रत्यय आपणांस येतो; आणि तोच स्थूल-रूपांत प्रकट झाला म्हणजे जड डोळ्यांनाही दिसूं लागतो. आपल्या विचारां-वर आणि कृतींवर आपला ताबा चालत नाहीं अशी तक्रार आपण वारंवार करीत असतों. जर विचाराचा प्रत्यय येण्यापूर्वी त्याच्या मुळाशींच त्याचें नियमन आपणांस करतां आलें, तर विचारांचें आणि त्यांचेंच प्रत्यक्ष रूप ज्या कृती त्यांचेंही नियमन आपणांस एकाच वेळीं करतां येईल. जर कोणत्या तरी साधनांच्याद्वारें आपणांस शक्तीच्या सूक्ष्मरूपाचें पृथक्करण करतां येईल, त्यांचें स्वरूप निश्चितपणें जाणतां येईल व त्यावर ताबा चालवितां येईल, तर आपल्या मनावरही आपला ताबा चालूं शकेल. ज्या मनुष्याला स्वतःच्या मनावर ताबा चालविण्याचें सामर्थ्य प्राप्त झालें तो मनुष्य इतर मनांवरही ताबा चालवूं शकेल. अंतर्बाह्य शुचिता आणि उच्च नीतिमत्ता यांचें प्रतिपादन धर्मानें एवढ्या अट्टाहासानें कां केलें आहे हें आतां आपल्या लक्षांत आलें असेलच. जो मनुष्य अंतर्बाह्य शुद्ध आणि नीतिमान् असतो तो मनोनिग्रही अवश्य असतोच; कारण अंतर्बाह्य शुद्धि आणि नीतिमत्ता हीं मनोनिग्रहावांचून प्राप्त होणें शक्यच नाहीं. सर्व मनें हीं एकाच विश्वव्यापी मनांतून अंशरूपानें उद्भवलीं अस-

त्यामुळें एका मनावर ताबा मिळवितां आला, तर तद्द्वारा विश्वव्यापी मनावर ताबा मिळविणें अशक्य नाहीं. मातीच्या लहानशा ढेंकळावरून मोठ्या ढिगाची कल्पना सहज होऊं शकते. स्वतःच्या मनावर ताबा कसा चालवावा या विद्येचें रहस्य ज्यानें एकवार हस्तगत करून घेतलें असेल, त्याला विश्वव्यापी मनावरही अवश्य ताबा चालवितां येईल.

याच प्रश्नाला आणखीही एक व्यवहार्यरूपाची बाजू आहे. आपणांस जीं अनेक प्रकारचीं शारीरिक दुःखे भोगावीं लागतात तींही मनोनिग्रहानें टळण्याजोगीं आहेत. जर शक्तीच्या सूक्ष्मरूपावर आपणांस जय मिळवितां आला, तर अनेक मानसिक दुःखांचा परिहारही आपणांस करतां येईल. त्याचप्रमाणें अनेक प्रकारच्या कार्यांत आपणांस जें अपयश प्राप्त होतें तेंही टाळतां येईल. सूक्ष्मशक्तीवर आपणांस जय मिळवितां आला, तर त्याचा उपयोग प्रत्यक्ष व्यवहारांतही अनेक प्रकारें खास करतां येईल; पण व्यवहार बाजूला ठेवून याहून या प्रश्नाचें जें अधिक उच्चरूप आहे त्याकडे वळूं.

आतां एका उपपत्तीविषयीं कांहीं माहिती आपणांस मी सांगणार आहें; पण त्या उपपत्तीबद्दल सांगोपांग चर्चा करण्याचा माझा विचार नसून, तीसंबंधीं कांहीं अंतिम सिद्धांत मात्र आपणांस मी सांगणार आहें. मानवकुलांतील एखाद्या शाखेची वाढ ज्या प्रकारें झाली असेल त्याच प्रकारानें त्या शाखेंतील प्रत्येक मनुष्याची वाढ त्याच्या बाल्यापासून होत असते; अत्यंत रानटी स्थितींतून बाहेर पडून बऱ्याच प्रकारच्या परिणतावस्थेला पोहोंचलेली अशी एखादी शाखा पाहिली, तर तिच्या पहिल्या स्थितीपासून तों थेट चालू अवस्थेपर्यंत जितक्या प्रकारच्या अवस्थांतरांतून ती गेली असेल, तितक्या अवस्थांतरांतून तिच्यांतील प्रत्येक व्यक्ति आपल्या बाल्यापासून जात असते असें आपणांस आढळून येईल. यांतील व्यष्टि आणि समष्टि यांच्या वाढींत कालांतराचा मात्र भेद असतो. जी परिणतावस्था प्राप्त करून घेण्याकरतां समष्टीला हजारों वर्षें लागलीं, तीच स्थिति कांहीं थोड्याशा वर्षांच्या अवधींत व्यष्टीला प्राप्त होते. त्या शाखेंतील एखादें लहानसें मूल पाहिलें तर त्याच्या ठिकाणीं शुद्ध रानटीपणाची स्थिति आढळून येईल. एखाद्या फुलपांखराला मूल सहज लीलेनें चिरडून टाकतें. हा रानटीपणाचा मूळ अंश आहे. त्या मानवशाखेच्या आरंभकालींच्या स्थितीसारखी ही बाल्यावस्था असते. बाल्य जाऊं लागून वय जसजसें

वाढत जातें, तसतशी त्या शाखेची विशिष्ट पद्धतीची वाढ त्याच्या ठिकाणीं दिसूं लागते; व शेवटीं त्याचें स्वरूप म्हणजे साऱ्या शाखेच्या संकलित रूपाची लहानशी प्रतिमाच होऊन बसते. शाखेला जी स्थिति प्राप्त करून घेण्याला हजार वर्षें लागलीं, तीच स्थिति त्या व्यष्टीनें थोड्याशा वर्षांच्या अवधींत प्राप्त करून घेतली. हा सिद्धांत आपण चांगला ध्यानांत ध्या; म्हणजे जें मी पुढें सांगणार आहें तें आपणांस बरोबर समजेल. आतां सगळें मानवकुल ही एकच शाखा आहे अशी कल्पना करूं; अथवा सर्व जीवजाति ही एक शाखा आहे असें म्हणूं. या जगांत जितक्यांना जीव आहे—मग तो मनुष्यप्राणी असो अथवा पशु असो—त्या सर्वांची मिळून एकच शाखा आहे अशी कल्पना करूं. ही सारी शाखा—समष्टि—एका विशिष्ट साध्याकडे धांव घेत आहे. तें साध्य म्हणजे पूर्णत्व हेंच होय. सर्व जग कोणत्या साध्याकडे धांव घेत आहे, हें कांहीं स्त्रीपुरुषांच्या लक्ष्यांत आगाऊच आलेलें असतें. अशीं मनुष्यें इतरां-करितां वाट पाहात बसत नाहींत. पुनःपुन्हां जन्म घेण्याचा त्यांस कंटाळा आलेला असतो. सर्व मनुष्यजात मुक्तावस्थेंस पोहोंचेपर्यंत थांबण्यास त्यांना अवकाश नसतो. यामुळें अशीं स्त्रीपुरुषें धांवपळ करूं लागतात, आणि जें अंतर चालून जाण्यास साऱ्या मनुष्यजातीस लक्षावधि वर्षांचा काळ लागणार, तेंच अंतर तीं थोड्याशा वर्षांच्या अवधींत चालून जातात. जर एखाद्या लहानशा बेटावर अगदीं रानटी स्थितींतलीं अशीं कांहीं मनुष्यें नेऊन सोडलीं व त्यांना जगण्यापुरतें मात्र अन्न मिळेल अशी व्यवस्था केली तर कालगतीनें आपली स्थिति तीं आपणच सुधारूं लागतील व कांहीं विशिष्ट प्रकारची समाज-रचना तयार करतील. अशा रीतीनें अगदीं रानटी अवस्थेंतील ही मनुष्यांची टोळी केवळ स्वबळानें संस्कृतावस्था निर्माण करील. आतां अशा स्थितींतल्या मनुष्यसंघाला कांहीं विशेष प्रकारची मदत मिळाली तर त्याची वाढ अधिक लवकर होईल हें उघड आहे. झाडांच्या वाढीलाही अशा रीतीनें आपणांस मदत करतां येते हा तर आपला सामान्य अनुभव आहे. झाडांना कोणत्याही प्रकारचें खत वगैरे घातलें नाहीं आणि त्यांची कांहीं विशेष जोगवण केली नाहीं तर तीं वाढावयाचीं थांबतात असें नाहीं. केवळ नैसर्गिकपणें त्यांची वाढ होणारच; पण त्याला अवधि लागणार हें उघड आहे. उलटपक्षीं त्यांच्या वाढीला आपण कांहीं हातभार लावला तर तीं लवकर वाढतात याचें प्रत्यंतरही आपणांस

येतेंच. आपल्या सर्व प्रकारच्या उद्योगांत हेंच तत्त्व आपण लागू करीत असतों. कृत्रिमरीत्या व्यवहारांतील सर्व वस्तूंची वाढ झपाट्यानें करण्याचा आपला यत्न अव्याहत सुरू आहे. मग जी गोष्ट आपणांस झाडांच्या बाबतींत आणि इतर बाबतींतही साध्य होते, तीच गोष्ट मनुष्याच्या ठिकाणीं कां साध्य होऊं नये ? अवश्य होईल. अशाच रीतीनें मानवकुलांतील एका सबंध शाखेची उत्क्रांति झपाट्यानें करतां येईल. मानवकुलांतील सद्गुरु गांवोगांव आणि देशोदेश कां फिरतात ? याचें कारण हेंच कीं, अशानें एखाद्या सबंध शाखेची उत्क्रांति शक्य होते. अशाच रीतीनें एका एका व्यक्तीची उत्क्रांति अधिक जलद होईल काय ? होय, अवश्य होईल. उत्क्रांतीच्या गतीला कांहीं अमुक मर्यादा आहे असें नाहीं. एखाद्या मनुष्याची वाढ साऱ्या आयुष्यांत अमुक एका मर्यादेपर्यंतच व्हावी आणि त्याच्या पलीकडे ती जाऊंच नये असा कांहीं नियम नाहीं. एक मनुष्य पूर्णावस्थेच्या किती जवळ जाईल हें ठरविण्याचें माप आपणांस कोणीं दिलेलें नाहीं. त्याच्याभोंवतीं तशी अनुकूल परिस्थिति असेल तर जीवनक्रमाच्या एखाद्या लहानशा अवधींतही तो चमत्कार करून दाखवील. आपली अखेरची मर्यादा एकच. तेथें पोंहोंचल्यावर मात्र वाढ खुंटेल. ती मर्यादा म्हणजे पूर्णत्व हीच. असो. या उपपत्तीचा एकंदर मथितार्थ हा कीं अत्यंत पूर्णावस्थेला पोंहोंचलेला मनुष्य–एकंदर शाखेचा रस्ता प्रकाशित करणारा उज्ज्वल दीप–निर्माण करण्यास सामान्यतः जर एक लक्ष वर्षें लागतील असें मानलें तर त्या शाखेची उत्क्रांति झपाट्यानें झाल्यास, असा मनुष्य त्या शाखेंत आजच निर्माण होईल. सर्व योग्यांचें म्हणणें हेंच आहे. जगांत जे महात्मे आणि धर्मप्रवर्तक आजपर्यंत होऊन गेले ते याच जातीचे दीप होते. लक्षावधि मनुष्यांची उत्क्रांति होण्याची वेळ आल्याबरोबर त्यांचा रस्ता या उज्ज्वल दीपांनीं प्रकाशित झाला. एकाच आयुष्यांत पूर्णत्व पावलेलीं माणसें हींच. जगाच्या साद्यंत इतिहासांत असे अवतार सर्वत्र आणि सर्व काळीं जन्मास आले आहेत. फार लांब कशाला, परवांच एक मनुष्य असा होऊन गेला कीं, साऱ्या मनुष्यजातीनें एका आयुष्यांत जी कर्तबगारी केली असती ती त्यानें एकट्यानें एकाच आयुष्यांत–याच चालू आयुष्यांत–करून दाखविली. आतां येथें हेंही अवश्य लक्ष्यांत ठेवलें पाहीजे कीं, ही वाढसुद्धां कायद्यास अनुसरूनच होत असते.

जर या कायद्यांची समग्र माहिती आपणांस मिळाली, आपण ती ऐकली, तिचा पुरा शोध केला आणि त्याप्रमाणें अक्षरशः वागलों तर काय? याच क्षणीं मुक्ति, हें ओघालाच आलें. आपली वाढ झपाट्यानें होईल? आणि याच जन्मीं आपण पूर्णत्व पावूं. आपल्या जीवनक्रमांतील अत्युच्च रहस्याचें हें शास्त्र आहे. मनाचा अभ्यास करून आणि त्याच्या ठिकाणीं गोचर होणाऱ्या शक्तीचा अभ्यास करून करावयाचें काय? पूर्णत्व मिळवावयाचें हेंच. या अभ्यासाचें अंतिम साध्य हेंच आहे. कोणाला पैशाची मदत करणें, कोणाला कपडेलत्ते वांटणें अथवा कांहीं इतर मार्गांनीं कोणाच्या जीवितयात्रेच्या मार्गांतील निवडुंग नाहींसें करणें या बाबी केवळ उपांगांसारख्या आहेत.

मनुष्यांतील पूर्णत्व व्यक्त करणें हा या शास्त्राचा उपयोग आहे. या शास्त्राच्या अभावीं त्याला स्वतःचा रस्ता तोडावयास लक्षावधि वर्षें लागतील. त्या अवधींत त्याला कित्येकांचें खेळणें होऊन बसावें लागेल. एखादा लांकडाचा ओंडका समुद्रांत पडला म्हणजे प्रत्येक लाटेबरोबर तो जसा खालींवर आणि इकडेतिकडे होतो, तसें त्याला डुबकत पडावें लागेल. 'उठा, सशक्त व्हा' असें हें शास्त्र आपणांस सांगत आहे. हा कार्यभाग स्वतःच्या शिरावर घ्या, इतके दिवस ही कामगिरी तुम्हीं प्रकृतीकडे सोंपविली होती, पण आतां ती आपल्या हातीं घ्या, आणि एकाच उडीनें हा संसारसमुद्र उल्लंघून जा. या शास्त्राचें सांगणें हेंच आहे.

मनुष्याचें ज्ञान एकसारखें वाढत आहे आणि त्याबरोबर त्याचें सामर्थ्य आणि सुख हींसुद्धां वाढत आहेत. एखाद्या सबंध शाखेच्या दृष्टीनें हें म्हणणें खरें आहे. अगदीं अक्षरशः खरें आहे. पण व्यक्तीबद्दलही असेंच म्हणतां येईल काय? अंशतः होय असें उत्तर आम्हांस द्यावें लागेल. पण येथें एक निराळाच प्रश्न उपस्थित होतो. तो हा कीं, व्यक्तीची मर्यादा ठरविण्याला तुमच्याजवळ काय साधन आहे? कोण मनुष्य किती वाढला आहे हें ठरविण्याचा एखादा कांटा तुमच्याजवळ आहे काय? आपणा सामान्य मनुष्यांना कांहीं थोड्याशा अंतरापलीकडे दिसत नाहीं. पण मी एक मनुष्य असा पाहिला आहे कीं, शेजारच्या खोलींत काय चाललें आहे हें त्याला डोळे मिटून दिसतें. तुम्ही कदाचित् म्हणाल कीं, यावर आमचा विश्वास बसत

नाहीं, पण त्याच मनुष्यानें तुम्हांला स्वतःला तसलें सामर्थ्य तीन आठवड्यांत प्राप्त करून दिलें तर? असल्या गोष्टी शिकविणें कठीण नाहीं. दुसऱ्याच्या मनांत काय चाललें आहे हें जाणण्याची कला अवघ्या पांचच मिनिटांत साध्य होते. या गोष्टी प्रत्यक्ष अनुभवाच्या पुराव्यानें सिद्ध होण्याजोग्या आहेत.

जर या गोष्टी पुराव्यानें सिद्ध होत आहेत तर वाढीची मर्यादा तरी कशी ठरवावी? जर या खोलीच्या कोपऱ्यांत बसलेल्या मनुष्याच्या मनांतील विचार एखाद्याला समजले तर शेजारच्या खोलींतील मनुष्याच्या मनांतील विचारही कां समजूं नयेत? किंबहुना विश्वाच्या कोणत्याही भागांतील मनुष्याचे विचार त्याला कां कळूं नयेत? नाहीं म्हणावयाला आम्हांला कांहीं अधिकार नाहीं. हें शक्यच नाहीं असें म्हणण्याची आमची कांहीं छाती नाहीं. फार झालें तर, 'हें कसें होतें तें आम्हांस समजत नाहीं' इतकेंच आपणांस म्हणतां येईल. तुम्ही केवढेही बडे जडशास्त्री असा, हें अशक्य आहे असें तुम्हांस ठांसून सांगतां येणारच नाहीं. 'आम्हांला ठाऊक नाहीं' इतकेंच पाहिजे तर म्हणा. शास्त्रें कशीं निर्माण होतात? प्रत्यक्ष घडणाऱ्या गोष्टी जमा करणें, त्यांची जातवारी लावून त्यांना त्यांच्या विशिष्ट पंक्तींत बसविणें, नंतर त्यांवरून सिद्धांत काढणें आणि शेवटीं सत्य शोधून काढणें, या पद्धतीनें शास्त्रें निर्माण होतात आणि वाढतात. पण प्रत्यक्ष घडणाऱ्या गोष्टी मुळांतच जर आपण अशक्य कोटींत बसवूं लागलों तर शास्त्र निर्माण तरी कसें होणार? 'अमुक गोष्ट झूठ, अमुक गोष्ट घडणें शक्यच नाहीं' अशा रीतीनें प्रत्यक्ष घडणाऱ्या गोष्टींची वासलात आपण लावूं लागलों तर भावी शास्त्राचा उच्छेद आपण मुळांतच केला असें होत नाहीं काय?

मानवी मनाचें सामर्थ्य अचिंत्य आहे, 'नर करणी करे तो नरका नारायण होत' हा आम्हां हिंदूंचा पहिला सिद्धांत आहे. हिंदूंच्या मनोभूमिकेची रचना कांहीं विशिष्ट तत्त्वांस अनुसरून झाली आहे. एखाद्या विशेष गोष्टीकडे त्यांचें चित्त वेधलें तर त्याच गोष्टीचें चिंतन ते करतील. कांहीं काळपर्यंत बाकीच्या जगाचें भानच त्यांस जणुं काय नाहींसें होतें. अनेक प्रकारच्या शास्त्रांची जन्मभूमि हिंदुस्थान हीच आहे ही गोष्ट आपणा सर्वांस ठाऊक आहे. गणित-शास्त्र प्रथम तेथेंच निर्माण झालें. एक, दोन, तीन इत्यादि आंकड्यांची

इंग्रजी नांवेंही संस्कृत नांवांवरून बनविलीं आहेत. त्याचप्रमाणें बीजगणिताचा जन्मही हिंदुस्थानांतच झाला. न्यूटन जन्माला येण्याच्या अगोदर हजारों वर्षे गुरुत्वाकर्षणाचा नियम हिंदु लोकांस ठाऊक होता.

यावरून हिंदु लोकांची मनोभूमिका कशा प्रकारची आहे, याची कल्पना आपणांस होईल. भारतीय इतिहासांतील एका काळीं आर्यांचें सगळें चित्त मानवी मनाच्या सामर्थ्याचा शोध लावण्यांत गुंतलें होतें. हा विषयही अत्यंत चित्ताकर्षक असाच आहे. कारण हें शास्त्र सिद्ध झालें तर आपल्या सर्व आकांक्षा पुऱ्या होण्यास अगदीं जवळचा मार्ग सांपडल्यासारखेंच झालें, असें त्यांस वाटलें. 'कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम्' अशी शक्ति मानवी मनाला आहे, आणि हें सामर्थ्य म्हणजे काकतालीयन्याय असें नसून निश्चित नियमानुसारें या गोष्टी घडतात. याबद्दल पूर्वकालीन आर्यांची इतकी बालंबाल खात्री झाली होती कीं, बाकीचे सर्व विषय सोडून याच शास्त्राचा शोध ते करूं लागले. मंत्रतंत्र, जादुटोणे इत्यादि प्रकार या विलक्षण गोष्टी नसून तें शुद्ध शास्त्र आहे असें त्यांनीं सिद्ध केलें. ज्याप्रमाणें इतर भौतिक शास्त्रांचे सिद्धांत त्यांनीं त्यापूर्वी स्थापित केले होते, त्याचप्रमाणें या गोष्टीही विशेष नियमांस अनुसरूनच घडतात असें त्यांनीं सिद्ध केलें. या स्थितीचा परिणाम साऱ्या आर्यशाखेवर अनिवार्यपणें घडून आला. इतर भौतिकशास्त्रांवरील आर्यशाखेचें लक्ष्य इतकें उडून गेलें कीं, तीं शास्त्रें मागें पडत पडत सर्वथा नष्ट होण्याच्या मार्गाला लागलीं. त्यांचें सारें लक्ष्य या एकाच शास्त्राच्या वाढीकडे लागलें. योग्यांचे निरनिराळे पंथ उपस्थित झाले, आणि निरनिराळ्या मार्गांनीं या शास्त्राचा शोध त्यांनीं चालविला. कित्येकांनीं प्रकाशकिरणांचा अभ्यास सुरू केला. निरनिराळ्या रंगांच्या प्रकाशकिरणांचा परिणाम शरिरावर कोणत्या प्रकारचा होतो, हें ते शोधून काढूं लागले. कांहीं विशेष रंगांचीं वस्त्रें मात्र वापरावयाचीं, कांहीं विशेष रंग कृत्रिम रीतीनें एखाद्या स्थलाला देऊन तेथेंच राहावयाचें आणि विशेष रंगांचे पदार्थ मात्र खावयाचे अशा रीतीनें ते राहूं लागले. कित्येकांनीं ध्वनींचा अभ्यास केला. कानांत गुडद्या घालून आंतून येणारा ध्वनि ऐकावा व मग गुडद्या टाकून पुनः त्याच ध्वनीकडे लक्ष लावावें असा अभ्यास ते करूं लागले. कित्येकांनीं निरनिराळ्या वासांचा अभ्यास केला. अशाच रीतीनें ज्ञानेंद्रियांच्या सर्व विषयांच्या अभ्यासाला सुरवात झाली.

या सर्व प्रकारच्या अभ्यासांच्या मुळाशीं एकच हेतु होता. कोणत्या तरी रीतीनें वस्तुमात्राच्या सूक्ष्मरूपाचें शोधन करणें हाच हेतु या अभ्यासांत होता. यांपैकीं कित्येकांनीं विलक्षण सामर्थ्य खरोखरच प्राप्त करून घेतलें होतें. कित्येकांनीं हवेंत उडण्याचा यत्न केला. एका पाश्चात्य पंडितानें मला सांगितलेली एक गोष्ट ऐकण्याजोगी आहे. ही गोष्ट त्याला ज्यानें सांगितली तो गृहस्थ एका काळीं सिलोनचा गव्हर्नर असून त्यानें ती प्रत्यक्ष पाहिली होती. एकावर एक आडवे ठेवलेले असे कांहीं लांकडाचे तुकडे रचून सर्वांच्या-वर एक सपाट फळी ठेविली होती, आणि त्या फळीवर एका मुलीला मांडी घालून बसविण्यांत आलें होतें. कांहीं वेळ त्या मुलीला तेथें बसविल्या-नंतर एक मनुष्य पुढें आला आणि त्यानें फळीखालचे लांकडाचे तुकडे हळूहळू काढण्यास सुरवात केली. शेवटीं त्यानें सर्व तुकडे काढून घेतले तरी मुलगी तशीच फळीवर बसली होती आणि ती फळी हवेंत अधांतरीं तरंगत होती. यांत कांहीं तरी कपट असावें असें गव्हर्नर यास वाटून त्यानें आपली तरवार झपाट्यानें त्या मुलीच्या बैठकीखालून फिरविली. पण मुलीच्या बैठकीखालीं कांहीं घट्ट पदार्थ असल्याचें आढळून आलें नाहीं. ही गोष्ट अनेक लोकांच्या नजरेसमोर घडून आली असल्यानें अविश्वसनीय मानतां येत नाहीं. मग हें काय असावें असा प्रश्न सहजच उपस्थित होतो. ही कांहीं तरी जादू असावी काय? ही जादूही नव्हे आणि अजब करणीही नव्हे. चकित होण्याजोगें असें यांत कांहींसुद्धां नाहीं, हीच यांतली लक्ष्यांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. अशा गोष्टी घडणें अशक्य आहे असें एकही हिंदु तुम्हांस म्हण-णार नाहीं. हिंदूंना या गोष्टीचें कांहींच कौतुक वाटत नाहीं; इतक्या त्या यांच्या आंगवळणीं पडल्या आहेत. एखाद्या शत्रूबरोबर लढाई झाली तर पूर्वीचे हिंदु असें म्हणत कीं, एखादा योगी येऊन या साऱ्या शत्रूंची धुळदाण उडवून देईल. हा विश्वास साऱ्या हिंदूंच्या हाडींमासीं खिळून गेलेला आहे. नुसत्या तरवारींत काय सामर्थ्य आहे? सामर्थ्याचें वसतिस्थान जीवात्मा हेंच आहे असा आम्हां हिंदूंचा पक्का विश्वास आहे.

आतांपर्यंत केलेलें विवेचन बरोबर असेल तर या दिशेनें प्रयत्नांची शिकस्त करून पाहण्याच्या योग्यतेचें हें शास्त्र आहे यांत संशय नाहीं. पण कोणत्याही शास्त्राचा अभ्यास करून त्यांत पारंगतता संपादन करणें म्हणजे शिळोप्याच्या

गोष्टी नव्हत. भौतिकशास्त्रांनाही जर ही गोष्ट लागू आहे, तर मानसशास्त्राला तर ती विशेषच लागू असली पाहिजे. तथापि असलें सामर्थ्य अंगीं आणणें म्हणजे कांहींच कठीण नाहीं असें पुष्कळांस वाटत असतें. एकाद्याला पोटापुरते चार पैसे मिळवायला किती मेहनत करावी लागते? धनवान् होण्याला किती प्रयास पडतात? या गोष्टींचा कांहीं विचार करा. एखाद्याला विद्युत्शास्त्राचा अभ्यास करावयाचा असला अथवा कोणाला एंजिनियर व्हावयाचें असलें तर केवढी मेहनत करावी लागते! पाठशाळेंतील शिक्षण संपल्यानंतरही जन्मभर या कलांचा अभ्यास करावा तेव्हां त्यांत पारंगतता प्राप्त होईल.

बहुतेक भौतिकशास्त्रें ज्या वस्तूंचें विवेचन करतात त्या वस्तू जडरूपाच्या असतात. एका प्रकारें त्या स्थावर वस्तू असतात. त्यांच्यावर तुम्हीं कितीही आणि कसलेही प्रयोग करून पाहिले तरी त्यांच्याकडून कांहीं विरोध व्हावयाचा नाहीं. एखादी खुर्ची तुम्हीं फोडून तोडून तिचें कणशः पृथक्करण केलें, तरी ती कांहीं नको म्हणणार नाहीं अथवा पळूनही जाणार नाहीं. पण या शास्त्राचा विषय म्हणजे मन; आणि मन हें वाऱ्याइतकेंच स्थिर! त्याला जरा स्पर्श करावयाची खोटी कीं तें काशीहून निघतें तें थेट रामेश्वर गांठतें! आतां आनंदाच्या शिखरावर आणि क्षणांत दुःखाच्या डोहांत! सदासर्वदा त्याचे रंग न्यारेच. अशा स्थितींत तें असतां त्याचा अभ्यास करावयाचा, त्याच्या साऱ्या वृत्तींची छाननी करावयाची आणि त्याचें नियमनही करावयाचें! मग या शास्त्राचा अभ्यास कितपत सोपा असेल तें तुम्हीच ठरवा. या शास्त्राचा अभ्यास सदोदित कात्रीच्या दोन पात्यांत राहून केला पाहिजे. जरा इकडे तिकडे अंग हालविण्याची सोय नाहीं. मला शेंकडों लोक एक प्रश्न विचारीत असतात कीं, तुम्ही अभ्यासाचा मार्ग कां दाखवीत नाहीं? त्यांना उत्तर इतकेंच कीं 'महाराज, ही चेष्टेची गोष्ट नाहीं. या मार्गावर आरूढ होणें म्हणजे चमचमीत मिष्टान्न-भक्षण नव्हे. मी भाषणें करतों, आपण तीं ऐकतां आणि घरीं जातां. दुसऱ्या दिवशीं पहावें तों वक्ता आणि श्रोता दोघेही आपापल्या ठिकाणीं परीटघडी-सारखे कोरे. मग तुम्ही म्हणतां "यांत कांहीं तथ्य दिसत नाहीं" याचें कारण पाहूं गेलें तर इतकेंच कीं त्यांत कांहीं 'तथ्य' पाहण्याची इच्छाच नसते. मला या शास्त्रांतली कांहीं विशेष माहिती आहे असें नाहीं. आहे ती अगदीं पुसट पुसट आहे. पण ही तुटपुजी माहिती आपलीशी करून घेण्यास या आयुष्याचीं

तीस वर्षें सतत खर्ची पडलीं आहेत. आणि आज सद्दा वर्षें ही तुटपुंजी माहिती मी लोकांस देत आहें. तीस वर्षें अनंत यातना सोसून आणि हाडांचीं काडें करून मीं थोडीशी माहिती पैदा केली. कित्येक वेळां चोवीस तासांपैकीं वीस तास एकसारखा अभ्यास मला करावा लागे. कित्येक वेळां साऱ्या रात्रीं एखादा तास मी आंग आडवें करीत असें. कित्येक वेळां सारी रात्र माझा अभ्यास चाले. कित्येक वेळां मी अशा जागीं राहीं कीं, तेथें मनुष्याचा शब्द अथवा श्वासही ऐकूं येऊं नये. कित्येक वेळां मला एखाद्या अंधाऱ्या गुहेंत राहावें लागे. या साऱ्या गोष्टींचा क्षणमात्र आपल्या चित्तांत विचार करा, आणि इतकें करूनही मला जो लाभ झाला आहे तो जवळ जवळ 'नाहीं' इतक्याच योग्यतेचा आहे. या सागरस्वरूपशास्त्राच्या किनाऱ्यापर्यंतसुद्धां गेलों असेन अथवा नसेन. त्याच्या लाटांची खळाळीही माझ्या कर्णपथावर नीटशी येत नाहीं. या पुरातनवस्त्राच्या एका दशीचाही लाभ मला अद्यापि झालेला नाहीं. मला जो कांहीं लाभ झाला तो इतकाच कीं, हें शास्त्र खरें आहे, अफाट आहे आणि अतर्क्य आहे, इतकी मात्र माझी बालंबाल खात्री झाली आहे.

जर या शास्त्राचा अभ्यास कोणास खरोखरच करावयाचा असेल तर आपल्या धंद्यांत यश मिळण्यासाठीं जी धडपड तो करतो आणि जी चिकाटी तो दाखवितो त्याहून अधिक धडपड करून अधिक प्रमाणाची चिकाटी त्यानें दाखविली पाहिजे. धंद्यांत आपणांस किती दक्षता ठेवावी लागते आणि कसें दोरींत बांधल्यासारखें वागावें लागतें तें पहा. बाप मरो, आई मरो, बायको मरो अथवा पोर उलथून जावो, धंद्याला खळ म्हणून नाहींच. आपलें अंतःकरण दुभंग होण्याची वेळ असली तरी धंदा म्हटला कीं अंतःकरणाला कसाबसा बांध घालून वेळेवर हजर राहिलेंच पाहिजे. अशा वेळीं प्रत्येक क्षण म्हणजे अंतःकरणांत एक एक बाण खोंचला जात आहे असें वाटत असतें! पण करणार काय? धंदा तो धंदाच! त्याला तुमचें अंतःकरण वगैरे कांहीं समजतच नाहीं. आपण सर्व लोक याच रीतीनें वागत असतों आणि हें असेंच असलें पाहिजे असेंहि म्हणतों!

जगांतल्या कोणत्याही धंद्याला न लागणारें अंतःकरणाचें काठिन्य या शास्त्रांच्या अभ्यासाकरितां पाहिजे. धंद्यांत यश मिळविणें याला कांहीं मोठी कर्तबगारी लागतेच असें नाहीं. पुष्कळ मनुष्यें तें करूं शकतात. पण या

अभ्यासांत यश मिळविणारा लाल मात्र विरळाच सांपडावयाचा. कारण हा अभ्यास करूं जाणाऱ्यांत जे कांहीं प्रकृतिविशेष असतील त्यांवरच यशापयशाची सारी मदार असते. धंद्यांत तरी सारेच नशीब काढतात असें कोठें आहे? पण पुष्कळांचें उखळ पांढरें झालें नाहीं तरी त्यांत भाजीभाकरीची तरी सोय लागते. त्याचप्रमाणें या मार्गांत पडणारांसही त्यांतील सर्वस्वाची प्राप्ति न झाली तरी शास्त्र खरें आहे आणि अभ्यासानें त्यांत कोणी तरी पूर्ण यश संपादन करील इतकी पक्की खात्री होण्याइतकी प्राप्ति तरी त्याला होईल.

आतांपर्यंत केलेलें विवेचन हें या शास्त्राची नुसती रूपरेषा दाखविण्यापुरतेंच आहे. या शास्त्राची सत्यता पटण्याला कांहीं साक्षीपुराव्याची जरूर नाहीं. स्वतःचें सत्यत्व सिद्ध करण्याची त्या शास्त्राचीच तयारी आहे. त्याला तुम्ही वाटेल त्या रीतीनें तावून सुलाखून घ्या. वाटेल तर त्याची तुलना दुसऱ्या कोणत्याही शास्त्राबरोबर करा. जगांत अनेक प्रकारचे ढोंगी आहेत, नाका-डोळ्यांचे वैदू आहेत, जादुगार आहेत, फसवे आणि लफंगे आहेत आणि या शास्त्रांत तर त्यांचा सुळसुळाट विशेषच आहे. असें कां? याचें कारण इतकेंच कीं, ज्या धंद्यांत कमाई अधिक, त्या धंद्यांत भामट्यांचा आणि खिसेकापूंचा सुळसुळाटही अधिक. पण एखाद्या धंद्यांत लुच्चेगिरी अधिक प्रमाणावर चालली तरी त्यामुळें तो धंदाच खोटा—त्याज्य—असें म्हणतां येत नाहीं.

आतां लक्ष्यांत ठेवण्यासारखी एकच गोष्ट सांगावयाची राहिली, ती ही कीं, चमत्कारांबद्दल बौद्धिक विवेचन ऐकणें आणि त्यासाठीं लागणाऱ्या बुद्धीच्या मलखांबावरील उड्या पाहणें हें थोडा वेळ सुखदायी वाटत असलें तरी त्याचा प्रत्यक्ष उपयोग मात्र फारसा नाहीं. जर कोणाला अभ्यास करण्याची इच्छा असेल तर नुसतीं व्याख्यानें जन्मभर ऐकून कांहींही फायदा होणार नाहीं. या गोष्टी व्याख्यानांनीं उमजण्यासारख्याच नाहींत. अभ्यास करावयाचा म्हणजे जडबुद्धीच्या पलीकडे उडी मारून जीवात्म्याची गांठ घ्यावयाची आहे. जीवात्माच जीवात्म्याची गांठ घेऊं शकेल. जर अभ्यास करण्याचा तुम्हांपैकीं कोणाचा पक्का निश्चय असेल तर त्याला मदत करण्यास मी आनंदानें तयार आहें.



# हिंदुस्थान अज्ञानग्रस्त देश आहे काय ?

[ हें व्याख्यान अमेरिकेंतील "बोस्टन ईव्हिनिंग ट्रॅन्क्रिप्ट" पत्रांत जसें प्रसिद्ध झालें तसेंच घेतलें आहे. व्याख्यानांतील मुद्दे व त्यांवरील संपादकीय टीका अशा रीतीनें हें प्रसिद्ध झालें आहे. ]

स्वामी विवेकानंद हे डेट्रॉइट येथें नुकतेच गेले होते आणि तेथें त्यांची छापही चांगली बसली. सर्व प्रकारचे लोक त्यांच्या व्याख्यानास जमले होते आणि त्यांतही विशेषतः धंदेवाले अधिक असून स्वामीजींचें विचारगांभीर्य आणि त्यांची तर्कशुद्ध विवेचनपद्धति यांचा परिणाम श्रोत्यांच्या मनावर फारच चांगला झाला. गर्दी तर इतकी लोटली होती कीं व्याख्यान नाटकगृहांत झालें म्हणून बरें; नाहींतर इतर कोणत्याही ठिकाणीं इतक्या श्रोत्यांची सोय लागली नसती. इंग्रजी भाषेवरील त्यांचें प्रभुत्व वाखाणण्यासारखें असून त्यांना तनु आणि मन या दोहोंच्याही सौंदर्याची जोड मिळाली आहे. डेट्रॉइट येथील पत्रांनीं त्यांच्या भाषणांचा रिपोर्ट बराच सविस्तरपणें प्रसिद्ध केला आहे. "डेट्रॉइट ईव्हिनिंग न्यूज" म्हणतें कीं, या शहरीं स्वामीजींनीं जितकीं व्याख्यानें दिलीं त्यांत नाटकगृहांतील व्याख्यान सर्वांत उत्कृष्ट वठलें, असें सामान्य लोकमत आहे. स्वामीजींना जें कांहीं सांगावयाचें होतें तें त्यांनीं अगदीं स्पष्ट शब्दांनीं सांगितलें. नाटकगृहांतील त्यांच्या व्याख्यानाचा मोठा गुण म्हटला म्हणजे संदिग्धतेचा पूर्ण अभाव हाच होय. येशुख्रिस्तानें सांगितलेला धर्म आणि सध्याचा ख्रिस्तीधर्म हे परस्परांपासून भिन्न आहेत असें स्पष्ट शब्दांनीं त्यांनीं श्रोत्यांच्या मनांवर बिंबविलें. ते म्हणाले, "या दृष्टीनें विचार केला म्हणजे मी स्वतः ख्रिस्तधर्मानुयायी आहें पण ख्रिस्ती नाहीं असें म्हणेन." जो फरक ख्रिस्तधर्मांत आणि ख्रिस्तीधर्मांत आहे तोच सनातन हिंदुधर्मांत आणि सध्याच्या–प्रचलित–हिंदुधर्मांत आहे, ही गोष्टही त्यांनीं मोकळेपणानें सांगितली. ते म्हणाले, "मी सनातन हिंदुधर्मानुयायी आहें, पण मी प्रचलित हिंदुधर्माभिमानी नाहीं." त्यांच्या भाषणांतील आणखी एका महत्त्वाच्या मुद्यासंबंधानें बोलतांना ते म्हणाले, "आम्हांला ख्रिस्ताच्या मिशनरींची–धर्मप्रचारकांची जरूर आहे. असे ख्रिस्ताचे प्रचारक शेंकडोंच काय, पण हजारों आले तरी आमच्या देशाला ते हवेच आहेत. ख्रिस्ताच्या वर्तनक्रमाचें रहस्य प्रत्यक्ष आचरून दाखवून त्याचा प्रवेश हिंदूंच्या हाडींमासीं

करून देणारे प्रचारक आम्हांस पाहिजेत. ख्रिस्तानें सांगितलेल्या संदेशाचा घोष प्रत्येक खेड्यापाड्यापर्यंत ऐकूं गेला पाहिजे." या त्यांच्या म्हणण्यावर आक्षेप घेण्याची इच्छा कोणास होईल असें वाटत नाहीं.

मुख्य मुद्यासंबंधानें इतकी स्पष्टता दाखविल्यानंतर इतर कोणत्याही बाबीसंबंधीं त्यांच्यांत व आमच्यांत मतभेद असला तरी त्या बाबी केवळ किरकोळ तपशीलाच्या आहेत असें म्हटलें पाहिजे. मूर्तिपूजकांच्या देशांतील एका मूर्तिपूजक प्रचारकानें आमच्या देशांत येऊन वरील उद्गार यथार्थपणें काढावे याहून आम्हांस अधिक लज्जास्पद तें काय असणार ? ग्रीनलंडच्या बर्फांतील रहिवाशांपासून तों हिंदुस्थानच्या रहिवाशांपर्यंत सर्वांना आम्ही आध्यात्मिक ज्ञानदान करतों अशा बढाया मारणारांस वरील शब्दांची यथार्थता पाहून खरोखर लाजच वाटली पाहिजे. सध्या ज्या अनेक 'सुधारणा' जगभर चालू आहेत त्यांची दशा वास्तविक अशीच आहे. ज्यांत लज्जास्पद भाग नाहीं अशी 'सुधारणा' बहुधा कोणतीच नसेल. ख्रिस्तीधर्माचा उद्भव ज्याच्यापासून झाला, त्या अवतारी पुरुषाबद्दल जें कांहीं सांगावयाचें होतें तें अत्यंत योग्य शब्दांनीं स्वामी विवेकानंद यांनीं सांगितलें व नंतर सध्यांच्या ख्रिस्ती धर्मप्रचारकांसही त्यांनीं समजुतीच्या चार गोष्टी सांगितल्या. मूर्तिपूजक आणि रानटी देशांत आम्ही ख्रिस्ताच्या चरित्राचा प्रसार करीत आहों, असें भासविण्याचा यत्न जे कोणी करीत असतील त्यांनीं या योग्य आणि अधिकारयुक्त उपदेशाचा विचार करावा हें उचित आहे. ख्रिस्त एक वेळ म्हणाला "सोनें अथवा चांदी यांचा संग्रह करूं नका, अथवा पितळेचाही संग्रह करूं नका, अथवा आंगरखे आणि जोडे यांचाही संग्रह करूं नका. जो कोणी श्रम करतो त्याचा योगक्षेम आपोआप चालतो." स्वामी विवेकानंद यांच्या आगमनापूर्वी हिंदूंच्या धार्मिक ग्रंथांशीं ज्यांची थोडीबहुत ओळख झाली असेल त्यांना स्वामींच्या शब्दांत आणि वरील ख्रिस्तवचनांत विलक्षण साम्य आढळून आलें असेल. सामान्य व्यवहारांतील कार्यापासून तों धार्मिक गोष्टीपर्यंत सध्या जी व्यापारी बुद्धि आमच्यांत दिसत आहे, त्या वणिग्वृत्तीबद्दल पौर्वात्यांच्या मनांत किती तिटकारा वसत आहे, हें स्वामींच्या शब्दांत आपणांस दिसून येतें.

आमच्या देशांतून जे शेंकडों मिशनरी–प्रचारक–परदेशांत जात असतात, त्यांनीं हा मुद्दा अवश्य लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे. रानटी देवांची पूजा

करणाऱ्या पौर्वात्यांस सुधारण्यासाठीं जे धांव घेतात, त्यांनीं स्वतःच्या सांगण्या-प्रमाणें स्वतः वागून दाखविणें प्र म अवश्य आहे. या जगांतील राज्याला, मोठेपणाला, मानमरातबाला भुलू नका, या सर्वांना तुच्छ समजा, असें त्यांच्या गुरूचें सांगणें त्यांनीं प्रथम पाळिलें पाहिजे.

शुद्ध नीतिदृष्ट्या विचार करतां हिंदुस्थान हा देश साऱ्या पृथ्वीवरील देशांत अत्यंत नीतिमान् आहे असें भाई विवेकानंद यांचें मत आहे. आज तो देश स्वतंत्र नसला तरी त्यांतील धार्मिकता अद्यापि कायम आहे असें त्यांस निश्चितपणें वाटतें. नीति म्हणजे काय आणि अनीति म्हणजे काय याची व्याख्या करतांना ते म्हणाले, "अहंकार ही अनीति आणि विश्वव्यापकपणा ही नीति. हिंदु लोकांच्या दृष्टीनें नीति आणि अनीति यांच्या व्याख्या अशा आहेत." त्यांच्या एकंदर भाषणांतील मुख्य मुद्दा हाच. साऱ्या व्याख्यानाची इमारत ह्याच पायावर उभारली गेली होती. त्यांच्या भाषणाचा विषय हाच होता असें म्हटलें तरी चालेल. हिंदूंचें म्हणणें असें आहे कीं, "स्वतःकरितां घर बांधणें आपलपोटेपणाचें–अहंकाराचें–चिन्ह आहे, म्हणून तें कृत्य अनीतीचें आहे. अतिथींची सोय व्हावी आणि परमेशपूजन व्हावें याकरितां घर बांधावें. स्वतःकरितां अन्न शिजविणें हें पापमूलक आहे. 'देवद्विजां अर्पुनि अन्न जें उरे। तें शेष सेवी मग पाप त्या नुरे॥ ते पापिये केवळ पाप अक्षिती। आत्मार्थ जे पाक अनेक निर्मिती॥' याकरितां अन्न शिजविणें तें अन्नार्थी लोकांकरितां शिजवावयाचें असा हिंदूंचा समज आहे. जर एखादा अतिथी दारापाशीं आला तर हिंदु प्रथम त्याला जेवूं घालील आणि नंतर आपण खाईल. हिंदूंचा हा स्वभाव तुम्हांला पेशावरपासून कन्याकुमारीपर्यंत एकसारखा आढळेल. कोणत्याही घरापाशीं तुम्ही गेलां तरी ओली कोरडी भाकर आणि आंग आडवें करण्यापुरती जागा हीं तुम्हांला अवश्य मिळतील."

"जातिभेद आणि हिंदुधर्म यांचा एकमेकांशीं अर्थाअर्थी संबंध नाहीं. प्रत्येक मनुष्याचा धंदा वंशपरंपरेनें ठरलेला असतो. सुताराचा मुलगा सुतार, सोनाराचा सोनार, आणि भिक्षुकाचा भिक्षुक."

"प्राणदान आणि विद्यादान यांचें महत्त्व हिंदूंच्या दृष्टीनें फार मोठें आहे. तथापि त्या दोहोंतही विद्यादान अधिक पुण्यकारक गणिलें आहे. कोणीं एखाद्याचा जीव वांचविला तर तें कृत्य पुण्यकारक तर खरेंच; पण कोणीं

विद्यादान केलें तर तें कृत्य निःसंशय अधिक पुण्यकारक गणिलें जातें. पैशासाठीं विद्यादान करणें हें कृत्य पापात्मक समजलें जातें. विद्या ही कांहीं वाणसवद्यासारखी दे घे करण्याची वस्तु नाहीं, असा आमचा समज असल्यामुळें पैशाकरितां विद्यादान करणाराकडे लोक तुच्छतेच्या दृष्टीनें पाहतात."

"सुधारलेले देश अथवा सुधारणा-संस्कृति-( Civilization ) या शब्दाचा अर्थ तरी काय?" हा प्रश्न स्वामींनीं अनेक देशांतील लोकांस केला. ते सारी अमेरिका फिरले आणि हा प्रश्न येथेंही त्यांनीं अनेक ठिकाणीं विचारिला होता. त्याला कित्येकांनीं उत्तर दिलें, "आम्ही जसे आहों त्या स्थितीला सुधारणा—संस्कृति-( Civilization ) म्हणावें." परंतु या उत्तरानें स्वामींचें समाधान झाल्याचें दिसत नाहीं. एखाद्या राष्ट्रानें समुद्रावर वर्चस्व स्थापिलें, पंचमहाभूतांना वश केलें, आणि मनुष्याच्या सुखसाधनांची अत्यंत वृद्धि केली तथापि स्वतःवर ताबा चालवितां येणें ही अत्युच्च संस्कृति आहे, ही गोष्ट अशा राष्ट्रांच्या स्वप्नींहि आली नसेल. राष्ट्रांत अशा प्रकारच्या विभूति निर्माण होणें ही संस्कृतीची पहिली खूण आहे. ही खूण हिंदु राष्ट्रानें आजपर्यंत अनेकवार पटविली आहे आणि सध्याही तें पटवीत आहे. पृथ्वीच्या पाठीवरील दुसऱ्या कोणत्याही देशानें या कामीं आर्यावर्ताची बरोबरी केलेली नाहीं, असें स्वामीजींचें म्हणणें आहे. त्यांच्या मताप्रमाणें हिंदुस्थानांत पहिलें स्थान आध्यात्मिक उन्नतीस दिलें असून दुसरें स्थान ऐहिक श्रेष्ठत्वाचें आहे. "सर्व सृष्टीचा अभ्यास करावयाचा तो सुखसाधनें वाढविण्याकरितां नसून सृष्टपदार्थांतील परमात्मरूप पाहण्याच्या दृष्टीनें करावयाचा," असा हिंदूंचा स्वभाव आहे. हिंदूंच्या या संस्कृतिविशेषामुळेंच ते अत्यंत सोशिक बनलेले आहेत. दुःखें सहन करण्याला जणुं काय मर्यादाच नाहीं असें त्यांस वाटतें. दैवाचे अनेक दुर्विलास ते आनंदानें सहन करतात. आपलें ज्ञान आणि आध्यात्मिक बल हीं पृथ्वींतील सर्व लोकांहून निःसंशय श्रेष्ठ आहेत अशी त्यांस पूर्ण जाणीव आहे. अशा प्रकारची ज्या देशाची आणि लोकांची कुलपरंपरा, तिकडे जवळचे आणि दूरदूरचे संत, महंत आणि तत्त्ववेत्ते धांव घेतात आणि आपले देह तेथें ठेवितात हें योग्यच आहे.

या व्याख्यानाच्या आरंभीं स्वामी म्हणाले, "मला अनेकांनीं अनेक प्रश्न विचारले आहेत. त्यांपैकीं कांहीं उत्तरें मी खासगी रीतीनें देईन, पण

त्यांपैकीं तीन प्रश्न असे आहेत कीं, त्यांचीं उत्तरें व्यासपीठावरून दिलेलींच बरीं. ते तीन प्रश्न असे :—'हिंदु लोक आपलीं मुलें गंगानदींतील सुसरींपुढें टाकतात हें खरें काय ?' 'जगन्नाथाच्या रथाच्या चाकाखालीं ते आपणास चिरडून घेतात हें खरें काय ?' 'ते विधवा स्त्रियांस जिवंत जाळतात हें खरें काय ?' पहिला प्रश्न तर स्वामींस विचारार्हसुद्धां वाटला नाहीं. कोणत्याही देशांतले लोक दुसऱ्यांबद्दल जे अनेक पोरकट प्रश्न विचारीत असतात त्यांपैकींच हाही एक आहे असें त्यांचें मत दिसलें. हा प्रश्न ऐकून स्वामीजी नुसते हंसले; हेंच त्याचें उत्तर. त्याच वेळीं एक श्रोता म्हणाला कीं, 'विशेषतः मुलीच गंगेंत टाकल्या जातात, असें सांगतात. असें कां ?' त्यावर स्वामी म्हणाले, 'मुलींचीं शरीरें कोंवळीं लुसलुशीत असतात. सुसरींना आपलें भक्ष्य चघळण्यास सोपें जावें म्हणून मुलीच टाकतात !' दुसऱ्या प्रश्नाला उत्तर देतांना स्वामी म्हणाले, 'जगन्नाथाचा रथ ओढणें हें अत्यंत पुण्यकर्म आहे असें पुष्कळ यात्रेकरूंस वाटतें. रथ ओढण्यासाठीं मी मी म्हणून कित्येक धक्काबुक्की करून पुढें सरतात. त्या गर्दींत एखादा मनुष्य पाय घसरून पडला तर त्यावरून रथ गेला असणें संभवनीय आहे. अशी गोष्ट एखादे वेळीं घडली म्हणजे पुष्कळ वेळां पराचा कावळा होऊन परकीयांच्या कानांवर जातो आणि तेही दचकून मागें सरतात.' तिसऱ्या प्रश्नाला त्यांनीं उत्तर दिलें कीं, ही गोष्ट निवळ खोटी आहे. विधवा सती जात असत हें मात्र खरें. अनेक प्रकारें समजूत घालण्याचा यत्न झाला असतांही एखादी स्त्री ऐकेनाशी झाली तर तिला परवानगी मिळत असे. आपला नवरा जेथें गेला तेथें आपणही जावें हीच इच्छा तिच्या ठिकाणीं अत्यंत बळावलेली असे. अशा स्थितींतही संत लोक त्यांना आत्महत्येपासून परावृत्त करण्याची शिकस्त करीत असत. शेवटीं अशा स्त्रीनें एक दिव्य करावयाचें असे. तें केल्यानंतर तिला परवानगी मिळे. आपला हात अग्नीच्या ज्वालांत धरून कोळसा होईपर्यंत जी स्त्री तोंडावर दुःखाचें यत्किंचित् चिन्हही न दाखवितां तो जळूं देई, तिलाच परवानगी मिळत असे. पतीच्या पाठोपाठ कोणत्यातरी रीतीनें देहपात करणाऱ्या स्त्रिया एकट्या हिंदुस्थानाच्याच वांट्यास आल्या असें नाहीं. अशा स्त्रिया सर्व देशांत आणि सर्व कालीं झाल्या आणि आहेतही. याला तुम्ही आततायित्व म्हणा अगर दुसरें कांहीं म्हणा. पण या गोष्टी सर्वत्र घडल्या आहेत हें मात्र खरें. हिंदुस्थानचे लोक विधवांना जाळीत नाहींत, अथवा चेटकिणींनाही जाळीत नाहींत.'

या उत्तरांतील शेवटचा फट्कारा चांगलाच झणझणीत आहे. चेटकिणी म्हणून निरुपद्रवी वृद्ध बायांना युरोपांत पूर्वकालीं जाळण्यांत येत असे, हें इतिहासज्ञांस सांगावयास नकोच. या हिंदुतत्त्वज्ञांच्या प्रमेयांबद्दलच्या अधिक खोल उद्घाटनांत पडण्याचें कारण आम्हांस नाहीं. त्यांतील मुख्य मुद्दा इतकाच कीं, जीवात्म्यानें परमात्मरूप व्हावें हेंच त्याचें साध्य आहे. रा. मुझुमदार यांनीं ज्या कार्यास आरंभ केला त्याची पूर्ति स्वामी विवेकानंद यांच्या हस्तें व्हावी हें योग्यच आहे. अनेक दृष्टींनीं स्वामी विवेकानंद ही व्यक्ति अलौकिक आहे यांत संशय नाहीं. बाकी हिंदुधर्माच्या दृष्टीनें व्यक्तीला महत्त्व नसून तें कार्याला असतें. सर्व धर्मांच्या परिषदेंत विवेकानंद यांस प्रत्येक दिवशीं अखेरपर्यंत राखून ठेवीत असत. या युक्तीनें लोक शेवटपर्यंत बसून राहात. एखादे दिवशीं उकाडा जास्त असावा आणि त्यांतच एखाद्या वक्त्यानें आपलें कंटाळवाणें चऱ्हाट वळीत असावें. असें झालें म्हणजे श्रोतृसमूहांत मोठाले खाडे पडण्यास सुरवात होई. इतक्यांत सेक्रेटरींनीं उठून जाहीर करावें कीं, समाप्तीच्या आधीं स्वामी विवेकानंद लहानसें भाषण करणार आहेत. या युक्तीनें हजारों लोक अखेरपर्यंत चित्रासारखे बसून राहात. पांच हजार लोक हातांतील पंखे हालवीत आनंदानें आणि उत्कंठेनें वाट पहात असत. विवेकानंदांचें पांच सात मिनिटांचें भाषण ऐकण्याकरतां तास दोन तास चऱ्हाटानें बांधून घेण्याची शिक्षा ते आनंदानें सोसावयाचे. अत्यंत सुंदर पक्वान्न शेवटीं वाढावयाचें ही आचाऱ्यांची जुनी युक्ति सभेच्या अध्यक्षांस पूर्णपणें अवगत होतीसें दिसतें.



# सामाजिक परिषदेंतील प्रास्ताविक भाषणावर टीका



"परमेश्वरानें हिंदी लोक निर्माण केले आणि युरोपियन लोकही त्यानेंच निर्माण केले; पण मिश्रसंतति ( Mixed Breed ) निर्माण करणारा दुसराच कोणी असला पाहिजे" असे शब्द एका नास्तिक इंग्रजानें उच्चारिले असल्याचें आमच्या कानीं आलें होतें.

न्या. रानडे यांचें सामाजिक परिषदेपुढील प्रास्ताविक भाषण आम्हांपुढें असून त्यांत हिंदी सामाजिक परिषदेच्या सर्व आकांक्षांचें प्रतिबिंब दिसत आहे. पूर्वकालीं मिश्रविवाह किती झाले, याची लांबलचक यादी त्यांत दिली आहे. पूर्वकालीन क्षत्रिय किती उदारधी होते याबद्दलही बरीच चर्चा केली आहे, आणि विद्यार्थ्यांना सुबोध केला आहे. या व्याख्यानाची भाषा खरोखर हृदयंगम आणि सभ्य असून त्यांत न्यायमूर्तींची कळकळही चांगली व्यक्त झाली आहे.

व्याख्यानाच्या शेवटीं शेवटीं पंजाबांतील एका नव्या जोमदार संस्थेबद्दल उल्लेख असून त्या संस्थेचें काम चालू राखण्याकरितां एखादा शिक्षकवर्ग निर्माण करण्याबद्दल जो उपदेश केला आहे, तो पाहून मात्र आम्हांस अत्यंत आश्चर्य वाटलें. ही नवी संस्था म्हणजे आर्यसमाज हीच असावी असें आम्हांस वाटतें. आर्यसमाजाला न्यायमूर्तींनीं केलेला उपदेश पाहून आम्हांस आरंभींच्या वाक्याची आठवण झाली आणि असें म्हणावेंसें वाटलें कीं "परमेश्वरानें ब्राह्मण निर्माण केले आणि त्यानेंच क्षत्रियही निर्माण केले; पण संन्याशांना कोणीं निर्माण केलें ?"

जगांत जितके धर्म प्रचलित आहेत त्यांत संन्यासी हे सांपडावयाचेच. प्रत्येक धर्मानें कोणत्याना कोणत्या प्रकारचे संन्यासी निर्माण करून ठेविले आहेत. हिंदुधर्मातच केवळ संन्याशांचा भरणा आहे असें नाहीं; ख्रिस्ती आणि बौद्ध धर्मातही तो आहे; एवढेंच नव्हे, तर इस्लामी धर्मालाही आपल्या आज्ञा बाजूला ठेवून या संन्याशांना आपल्या पोटांत जागा द्यावी लागली. सगळें मुंडण करणारे, कांहीं भागाचें मात्र मुंडण करणारे, जटाधारी, आंखुड

केंसाचे इत्यादि अनेक प्रकार या संन्याशांत आढळतात. त्याचप्रमाणें कोणाचीं वस्त्रें आकाशी रंगाचीं तर कोणाचीं भगवीं, तिसऱ्याचीं पिवळीं, ख्रिश्चन संन्याशांचीं काळीं आणि इस्लामी संन्याशांचीं निळीं वस्त्रें, असेही अनेक भेद त्यांत आहेत. त्यांपैकीं कित्येक नानाप्रकारें स्वतःचा छळ करून घेण्यांतच भूषण मानतात; दुसरे कित्येक असे आहेत कीं, शरीरें धष्टपुष्ट बनविणें हेंच त्यांचें काम. त्याचप्रमाणें पूर्वकाळीं वीरसंन्यासीही असत. ज्याप्रमाणें पुरुषांत हे प्रकार आढळतात, त्याचप्रमाणें स्त्रियांतही संन्यासिनींचा वर्ग आहे. न्या. रानडे हे सामाजिक परिषदेचे अध्यक्ष तर आहेतच; पण दाक्षिण्याचेही ते मोठे चहाते असावे असें वाटतें. श्रुति आणि स्मृति यांत आढळून येणाऱ्या संन्यासिनी त्यांनीं सर्वथैव पसंत पडल्या आहेत असें दिसतें. ब्रह्मचर्यव्रतानें राहिलेल्या आणि अनेक राजांच्या दरबारीं जाऊन पंडितांशीं वादविवाद करणाऱ्या स्त्रिया पूर्वकाळीं होऊन गेल्या. प्रजा निर्माण करणें हा जो ब्रह्मदेवाचा मुख्य हेतु त्या हेतूच्या आड अशा स्त्रिया आल्या नाहींत असेंही न्या. रानडे यांस वाटत असावें. त्याचप्रमाणें पुरुषसंन्याशांच्या ठिकाणीं अनुभवाचा आणि वैचित्र्याचा जो पूर्ण अभाव न्यायमूर्तीस दिसतो, तसा तो स्त्रियांच्या ठिकाणीं त्यांना दिसत नाहीं. यावरून ब्रह्मचारिणी स्त्रिया त्यांच्या पसंतीस उतरल्या असाव्या असें अनुमान करून त्यांबद्दल अधिक विचार करण्याचें प्रयोजन आम्हांस नाहीं.

न्यायमूर्तींचा निकराचा हल्ला फक्त पुरुषावरच आहे. त्या हल्लयांतून तो बिचारा कसा पार पडतो, हें आपणांस पाहणें आहे. संन्यासधर्म जो आज साऱ्या देशांत आणि साऱ्या धर्मांत बोकळला आहे त्याचें उगमस्थान हा आमचा विचित्र हिंदुस्थान देशच असावा, अशाबद्दल बहुतेक विद्वानांची एकवाक्यता झाली आहे. एकंदरीनें प्रथमपासून हा देश विचित्र असल्यामुळें त्याला सध्या ‘सामाजिक’ सुधारणेची जरूर भासूं लागली आहे.

वेद जितके जुने आहेत तितकेच गृहस्थाश्रमी आणि ब्रह्मचारी हेही जुने आहेत. ‘सर्व प्रकारच्या अनुभवानें युक्त’ असा सोम पिणारा गृहस्थाश्रमी ऋषी असो, अगर ‘अनुभवशून्य’ ब्रह्मचारी असो; यांत आद्यस्थान कोणाला द्यावें हें आतां ठरविणें शक्य नाहीं. धर्ममार्गाच्या आरंभकालीं यांपैकीं कोणती जात आधीं निर्माण झाली हें आज ठरविणें अत्यंत दुष्कर आहे. कदाचित्

न्यायमूर्तीच हें ठरवून शेवटचा निकाल अचूक आपल्या हातांत टाकतील! पाश्चात्य संस्कृत पंडितांचीं विधानें बाजूस ठेवून केवळ आपल्याच बुद्धीनें न्यायमूर्ति हें काम करतील; पण तोंपर्यंत तरी आपणांला हें कोडेंच राहणार. कोंबडी आधीं कीं अंडें आधीं या अनंतकालाच्या कोड्याच्या जातीचेंच हेंही एक कोडें आहे. मग न्यायमूर्ति तें उकलतील तो सुदिन!

या दोन जातींपैकीं कोणतीही आधीं आणि कोणतीही मग निर्माण झाली असली तरी त्यांचा परस्परांशीं यत्किंचित्‌ही संबंध नाहीं. दोघांचे मार्ग एक-मेकांपासून अत्यंत भिन्न आहेत.

यज्ञयागादि कर्मे हींच ज्याप्रमाणें कर्मकांडांत प्रमुख आहेत, त्याचप्रमाणें ब्रह्मचर्य हें ज्ञानकांडांत प्रमुख आहे. उपनिषद्ग्रंथ ज्यांनीं निर्माण केले, त्यांत पशूंचा वध करणारे याजी कोणीच नव्हते, असें कां? एका बाजूला पाहावें तों गृहस्थाश्रमी ऋषी आढळतात, आणि त्यांचा तो अर्थशून्य क्रियाकलापही आढळतो. तो केवळ अर्थशून्य असता तरी बरें होतें; पण तो क्रियाकलाप भयंकरही आहे. नीतीबद्दल त्याच्या कल्पना अत्यंत अंधुक अशा दिसतात हें कोणासही कबूल करावें लागेल. दुसऱ्या बाजूला ब्रह्मचारी आढळून येतात. त्यांना मनुष्यजातींचा अनुभव असेल अथवा नसेल; पण तो नसला तरी सनातनधर्माच्या अखंड झऱ्याला पाट फोडण्याचा उद्योग ते करीत असल्याचें दिसून येतें. ज्या झऱ्याचें पाणी आकंठ पिऊन जिनेंद्र बुद्धापासून तों आद्यशंकराचार्य, रामानुज, कबीर, चैतन्यापर्यंत अनेकांस तृप्तींचा लाभ झाला, त्या झऱ्याला पाट फोडणारे ब्रह्मचारी होते. याच झऱ्याच्या पाण्यानें अनेकांना जी अमोघ शक्ति प्राप्त झाली, तिच्या जोरावर त्यांनीं अनेक प्रकारच्या आध्यात्मिक आणि सामाजिक सुधारणा आजवर घडवून आणल्या आहेत. त्या सुधारणांच्या प्रतिबिंबाच्या प्रतिबिंबाचें पाश्चात्य प्रतिबिंबही इतकें जोमदार आहे कीं, त्याच्या जोरावर आमचे समाजसुधारक वीर संन्याशांवर आज शस्त्र चालवूं पहात आहेत!

आजकालची स्थिति पाहिली तर एक प्रश्न असा उद्भवतो कीं, या भीक-माग्या संन्याशांना या हिंदुस्थानांत प्राप्ति तरी कितपत होत असावी? समाज-सुधारकांची प्राप्ति आणि त्यांचे नागरिकत्वाचे हक्क यांची तुलना या गोसा-वड्यांच्या प्राप्तीशीं, आणि हक्काशीं केली तर?—यापुढें दुसराही एक प्रश्न

उद्भवतो. स्वत्व विसरून केवळ परहितार्थ जीं कामें ढोलकें न पिटतां संन्यासी करीत असतात, त्यांशीं सुधारकांच्या कामगिरीची तुलना केली तर? एकंदरींत या डोईमुंड्यांना स्वतःच्या मोठेपणाच्या जाहिराती लावण्याची विद्या अजूनही साध्य झाली नाहीं हेंच खरें!!

आपलें जीवित क्षणभंगुर आहे, मायामय आहे, निवळ स्वप्नवत् आहे हें ज्ञान हिंदुमुलाला पहिल्या दिवसाच्या दुधाच्या चिरटोळीबरोबरच पाजलें जातें! पाश्चात्यांचेंही मत तंतोतंत हेंच आहे. मग दोघांत फरक कसा उत्पन्न होतो? याच मताचा आधार घेऊन पाश्चात्य मूल म्हणतें, "जीवित क्षणभंगुर आहे, याकरितां जीव जाईपर्यंत चैन भोगून घे; जग तर बोलून चालून दुःखाची अंधारकोठडी; याकरितां त्यांतली मिळेल तितकीच चैन आपली म्हण." हिंदु मूल म्हणतें, "हें जग निवळ बुडबुड्यासारखें पोकळ—खोटें—आहे. जीवात्मा आणि परमात्मा याच सत्य वस्तू आहेत. याकरितां खोटें टाक आणि खऱ्याच्या मागें लाग."

जोंपर्यंत हिंदी राष्ट्राच्या मनाची ही स्थिति कायम आहे, तोंपर्यंत आमच्या या आंग्लमय झालेल्या बंधूंस यशःप्राप्तीची कितपत आशा आहे बरें? जोंपर्यंत ही स्थिति कायम असेल तोंपर्यंत या विश्वांतील साऱ्या वस्तूंचा त्याग करून स्वतःच्या मुक्तीची वाट चालूं पाहणारीं स्त्रीपुरुषें या देशांत दिसणारच. परमेश्वर करो आणि देशाची हीच मनःस्थिति कायम राहो.

यांनीं आमच्या संन्याशांविरुद्ध जें प्रमाण म्हणून उभें केलें आहे, त्याचें तरी स्वरूप काय आहे? तें शुद्ध मढें आहे. पूर्वीं प्रॉटेस्टंट लोकांनीं जें प्रमाण उभें केलें होतें आणि जें आमच्या बंगाली सुधारकांनीं त्यांजपासून उसनें घेतलें होतें, त्याचेंच हें प्रेत आमच्या मुंबईकर बंधूंनीं नटवून सजवून पुढें आणलें आहे. "संन्याशाला बायकापोरें नसल्यामुळें आयुष्यांतील अनेक प्रकारच्या अनुभवांची प्राप्ति त्याला होत नाहीं. याकरितां तो कच्चा राहतो." मुंबईपर्यंत गेलेलें हें कुजकें मढें शेवटीं आरबी समुद्रांत आतां तरी कायमची जलसमाधि घेईल अशी आम्हांस फार आशा आहे.

आतां येथें आणखीही एक गोष्ट नमूद करण्यासारखी आहे. ती ही कीं, बहुतेक पाश्चात्य आईबापांनीं आपलीं पोरें याच संतसंतिणींच्या (Monks and Nuns) ताब्यांत देऊन त्यांस सुशिक्षित केलें होतें. 'अनेक प्रकारच्या अनुभवांच्या प्राप्तीची' इच्छाच त्यांना झाली नाहीं कीं काय नकळे.

आमच्या सुधारकमंडळींनीं दुसरेंही एक कारण पुढें केलें आहे. " परमेश्वरानें आम्हांस अनेक प्रकारच्या वासना आणि शक्ती दिल्या आहेत, त्या उपयोगाकरितां आहेत. याकरितां संन्याशानें प्रजावृद्धि न करणें हें पातक आहे. " खाशी ! आपणांला परमेश्वरानें चोरीची, जारपणाची, दुष्टत्वाची, लुटारूपणाची, फसवेगिरीची अशा अनेक वासना दिल्या आहेत. समाजाचें रूप कायम राहावयाचें असेल तर त्याकरितां या सर्वांचीच अत्यंत आवश्यकता आहे. मग तो समाज सुधारलेला असो अगर रानटी असो. यांची वाट कशी लावावयाची ? यांचा प्रसारही ' खूप जोरसे ' करावयाचा कीं काय ? अनेक प्रकारचे अनुभव माणसाला हवेत म्हणतां तर त्यांत हेही अवश्य पाहिजेत. आमच्या सामाजिक सुधारकांची परमेश्वराशीं अगदीं पक्की गट्टी–लंगोटी मैत्री –झाली आहेसें दिसतें. त्यांना जसे त्याचे सर्व हेतू कळतात तसे ते दुसऱ्या कोणास कळल्याचें ऐकिवांत नाहीं. त्या अर्थी या प्रश्नालाही उत्तर त्यांनींच दिलें पाहिजे; आणि तें उत्तर ' होय ' हेंच येणार. विश्वामित्र, अत्रि आणि इतर ऋषी यांचें अनुकरण करून व्याघ्ररूपी बनावयाचें, कीं वशिष्ठाचें अनुकरण करून स्त्रियांबद्दलचा ' सर्व प्रकारचा अनुभव ' घेऊन शेंकडों पोरें जन्मास घालावयाचीं ? गृहस्थाश्रमी अनेक ऋषिवर्यांची मोठी कर्तबगारी जी काय दिसली ती शक्य त्या रीतीनें उदारपणें पोरें ' जन्मविण्यांत ' आणि आकंठ सोमपान करण्यांत मात्र दिसली. आम्हींही यांचेंच अनुकरण करावयाचें कीं धर्मप्राप्तीकरितां ब्रह्मचर्य अत्यावश्यक आहे किंबहुना धर्माचा तो पायाच आहे—असा दुदुंभि ज्यांनीं वाजविला त्यांच्यामागें जावयाचें हा मोठा प्रश्न आम्हांपुढें आहे.

आतां सुधारकांच्या हत्याराला बळी पडणारा आणखीही एक वर्ग आहे. तो वर्ग म्हणजे खोट्या ब्रह्मचाऱ्यांचा. ब्रह्मचर्यव्रताचें पालन ज्यांच्याकडून शिस्तवार झालें नाहीं त्यांचा. सुधारकांच्या दृष्टीनें हे लोक दुर्बळ आणि भेकड.

पण ब्रह्मचर्यव्रत जर खरोखर मान्य करावयाचें असेल तर आर्यावर्तातील केवढ्याही मोठ्या गृहस्थाश्रम्यापेक्षां असला खोटा ब्रह्मचारीही मोठाच समजला पाहिजे. जो घोड्यावर चढेल तो पडेल या म्हणीप्रमाणें तो खरोखर मोठाच होय. ज्यानें समरभूमीचें स्वप्नांतही दर्शन घेतलें नाहीं–घेण्याची

इच्छाच ज्याला झाली नाहीं—त्यापेक्षां समरांगणांतून वार खाऊन पळून आलेला योद्धाही अधिक शूर नव्हे काय ?

आमच्या सामाजिक सुधारककंपूच्या अंतर्गत गुहांत प्रकाश पाडणारा एखादा दिवा जर पैदा झाला आणि त्या प्रकाशांत सुधारकांतील कर्तव्यभ्रष्टांची यादी जर करतां आली, तर आपल्या कर्तव्यापासून घसरलेल्या सुधारकांची यादी संन्याशांच्या यादीपेक्षां निःसंशय मोठी होईल ! हा दिवा म्हटला म्हणजे आपलीच सदसद्विवेकबुद्धि; ती पाजळून सुधारकांनीं हें टिपण तयार करून पाहावें.

'अनेक प्रकारच्या अनुभवांची' चर्चा येथवर केली. आतां दुसऱ्या बाजूच्या 'अनुभवांचा' विचारही अवश्य केला पाहिजे. केवळ स्वतःच्या हिंमतीवरच आयुष्य क्रमावयाचें, सर्वांच्या मदतीचा धिक्कार करावयाचा, सर्व प्रकारच्या वादळांत एकट्यानें तोंड द्यावयाचें, कोणत्याही लौकिक फळाच्या अपेक्षेशिवाय सर्व कर्में करावयाचीं, आणि कर्तव्य म्हटलें कीं त्यांत भलेंबुरें म्हणावयाचें नाहीं; या अनेक प्रकारच्या 'अनुभवांची' वाट काय ? सर्व आयुष्यभर आनंदी आनंद ! सर्वच मोकळेपणा ! गुलामासारखें राबविणारीं, खोट्या ममतेचीं आणि खोट्या मोठेपणाचीं सोंगें हवींत कोणाला ? तीं तुमचीं तुम्हांलाच लखलाभ असोत. हा आयुष्यक्रम फक्त संन्याशालाच प्राप्त होणारा आहे. आतां धर्माचें कसें काय हाही एक विचाराचा प्रश्न आहे. धर्म हवा कीं नको ? त्यानें मरावें कीं जगावें ? जर त्याला जगावयाचें असेल तर त्याला त्याचे रक्षक शिपाई अवश्य हवेतच. हा रक्षक शिपाई ब्रह्मचारी हाच. त्याच्या साऱ्या आयुष्यक्रमाचा हेतु एकच—धर्म. तो परमेश्वराचा पट्टेवाला. जोंपर्यंत एखाद्या धर्माला असले रक्षक असतील तोंपर्यंत तो धर्म सलामत राहणारच.

क्याथोलिक पंथी ब्रह्मचाऱ्यांच्या हल्ल्यापुढें प्रॉटेस्टंट अमेरिका आणि इंग्लंड यांचीं हाडें कां खिळखिळीं होऊं लागलीं आहेत याचा विचार करा.

रानड्यांच्या नांवाचा डंका ! सर्व सुधारकांच्या नांवाचा डंका ! !—अरेरे हिंदुस्थाना, **आंग्लीभूत** (Anglicised) हिंदुस्थाना, बाळा, एक गोष्ट मात्र विसरूं नको हो ! या हिंदु मानवकुलांत एक एक कोडें असें आहे कीं, त्याचा स्पर्शही तुला अथवा तुझ्या पाश्चात्य गुरूंना झालेला नाहीं. मग तें सोडविण्याचा वायदासुद्धां नको ! !

---

# आर्यावर्ताचा जगाला संदेश



( पुढील टिपणें स्वामीजींच्या दप्तरांत आढळलीं. त्यांच्या मनांत एक ग्रंथ लिहावयाचा होता आणि त्याकरितां त्यांनीं बेचाळीस मुद्द्यांची यादी तयार केली होती; पण दुर्दैव आमचें कीं, उपोद्घाताच्या समाप्तीबरोबरच ग्रंथाचीही समाप्ति झाली. पुढील टिपणें जशीं सांपडलीं तशीं दिलीं आहेत. )

१. पाश्चात्यांना मीं पोहोंचविलेला संदेश कोणास धीटपणाचा वाटेल; पण माझ्या देशबांधवांना जो संदेश द्यावयाचा आहे तो धीटतर आहे.

२. अनेक प्रकारांमुळें आश्चर्यजनक अशा पाश्चात्य देशांत चार वर्षें घालविल्यांमुळें आर्यभूमीबद्दल माझ्या मनांत अधिक स्वच्छ प्रकाश पडला आहे. यामुळें त्या भूमींतील अंधाऱ्या जागा कमी दिसूं लागून उज्ज्वल भाग अधिक उज्ज्वलतेनें दिसूं लागले आहेत.

३. एकंदर पाहणी करतां हिंदुलोक अवनत होत आहेत हें म्हणणें खरें नाहीं.

४. अनेक मानवी शाखांचें एकीकरण कसें होईल हें कोडें हिंदुस्थानाप्रमाणेंच सर्व देशांतही आहे; पण येथें त्याचें क्षेत्र अधिक विस्तृत आहे.

५. भाषासौकर्य एकछत्री राज्य, आणि सर्वांहून विशेषतः धर्म, हीं एकीकरणाचीं साधनें आहेत.

६. इतर देशांत ही एकीकरणक्रिया जबरदस्तीच्या मार्गानें करण्यांत आली आहे. एखाद्या विशिष्ट शाखेचे संस्कार दुसऱ्या एखाद्या शाखेवर जबरीनें लादावयाचे; या जबरीचा परिणाम त्या शाखेचें अकाल तारुण्य, वार्धक्य आणि शेवटीं नाश अशा प्रकारें होत आहे.

७. आर्यावर्तांत या कोड्याचें स्वरूप प्रथमपासूनच अत्यंत विस्तृत झालें आहे, आणि या देशाचे उपायही सौम्यपणाचे आहेत. अगदीं आरंभापासून दुसऱ्यांच्या चालीरीती आणि धर्म यांबद्दल सहिष्णुता हिंदूंत वसत आहे.

८. ज्या ठिकाणीं हें कोडें अल्प प्रमाणाचें होतें आणि एकीकरणक्रियेला लागणारें सामर्थ्य मोठें होतें, त्या ठिकाणीं परिणाम असा झाला कीं, देशांतील निरनिराळ्या लहान लहान पण जोमदार शाखांतील जिवटपणा नाहींसा झाला. तो जिवटपणा फक्त त्या सामर्थ्यवान् प्रमुख शाखेंत मात्र राहिला. लहान लहान शाखांचा उपयोग प्रमुख शाखेंतील थोड्याशा लोकांनीं स्वहितार्थ करून घेतला

आणि बाकीच्या सामान्य समूहास त्यांनीं तसेंच कुजत पडूं दिल्यामुळें, त्याच्या वाढीचा मार्ग बंद झाला. शेवटीं प्रमुख शाखेंतील जोमही कालांतरानें कमी होत गेला आणि तिची जागा भरून काढण्याची हिंमत कोणत्याच शाखेच्या अंगीं नसल्यामुळें, हा अत्यंत विशाल आणि बाह्यतः अभेद्य दिसणारा डोल्हारा कोसळून पडला. उदाहरणार्थ, ग्रीस, रोम, नॉर्मन.

९. एकभाषा ही एक सोयीची बाब आहे हें खरें; पण त्यालाही वरील आक्षेप आहेच. बाकीच्यांचा जोम नष्ट होईल ही भीति येथेंही आहेच.

१०. अशा अनेक प्रकारच्या भानगडींत सोईचा एकच मार्ग आहे. सर्वांना पवित्र वाटेल अशी महाभाषा तयार करणें आणि बाकीच्या भाषा त्याच भाषेच्या शाखा म्हणून जगविणें. संस्कृत भाषेनें हेंच कार्य केलें.

११. द्राविडी भाषांचा उगम संस्कृतांतून झाला असेल अगर नसेल; पण त्यांचें चालू व्यवहार्यरूप अशा प्रकारचें झालें आहे हें मात्र खरें. हळूहळू त्या आपल्या मूळ ध्येयाकडे एकसारख्या धांव घेत असूनही स्वत्वाचें रक्षण त्यांनीं आजपर्यंत केलें आहे.

१२. मूळ समानकुलत्व शोधून काढणें. ही शाखा म्हणजे आर्य.

१३. मध्य आशियांत बाल्टिक समुद्रापर्यंत आर्य या नांवाचें अगदीं निराळें असें मानवकुल होतें कीं काय याबद्दल भवति न भवति.

१४. हा अमुक कुळाचा नमुना म्हणून ज्या शाखा दाखविण्यांत येतात, ते नमुने अगदीं शुद्ध राहिले आहेत कीं काय ? शाखा सदोदित मिश्र होत्या.

१५. गौरकुल आणि कृष्णकुल.

१६. ऐतिहासिक कल्पना सोडून सामान्य मनुष्याच्या दृष्टीनें व्यवहार्यरूपाचा विचार. आर्यांच्या पुरातन ग्रंथांवरून त्यांची वसति तुर्कस्थान, पंजाब व वायव्य-तिबेट यांच्या दरम्यान होती.

१७. यांत अनेक शाखा आणि उपशाखा असल्यामुळें त्यांच्या एकीकरणाचा यत्न झाला. या शाखा आणि उपशाखा यांची संस्कृति निरनिराळ्या परिमाणांची होती.

१८. ज्याप्रमाणें संस्कृत हें भाषेच्या सामान्य पायाच्या जागीं आलें, त्याचप्रमाणें आर्य हें कुलत्वाच्या सामान्य पायाच्या जागीं आलें; आणि याच रीतीनें

ब्राह्मणत्व हें इतरांस आदर्शवत् झालें. संस्कृतींच्या निरनिराळ्या परिमाणांचें व त्याचप्रमाणें समाजरचना आणि राज्यरचना यांचेंही ध्येय ब्राह्मणत्व हेंच.

१९. आर्यावर्तांचें अखेरचें साध्य—ब्राह्मणत्व.

२०. वतनवाडी केली नाहीं. अहंकार बाळगला नाहीं. कोणत्याही राजाला अथवा कायद्यांना नमून राहिले नाहींत. नीति हाच राजा आणि कायदा.

२१. वंशपरंपरा ब्राह्मणत्व—अनेक शाखांनीं प्रयत्न करून पूर्वी ब्राह्मणत्व मिळविलें आणि सध्यांही मिळवीत आहेत.

२२. ज्यांनीं खरीं महत्कृत्यें केली, त्यांनीं कसलाच हक्क सांगितला नाहीं. आळशी आणि कवडीमोल लोकांनीं हक्कांचीं भांडणें केलीं.

२३. ब्राह्मणत्व आणि क्षत्रियत्व यांचा अधःपात. कलियुगांत ब्राह्मण मात्र उरतील असें वर्णन पुराणांत आहे. हें म्हणणें अक्षरशः खरें आहे; दिवसें-दिवस त्याचा खरेपणा अधिकाधिक उघड होत आहे; तथापि ब्राह्मणही अगदींच थोडे उरले आहेत, आणि तेही फक्त हिंदुस्थानांत.

२४. ब्राह्मण व्हावयास मध्यंतरीं क्षत्रियत्वाची पायरी लागते. कित्येकांनीं पूर्वजन्मींच ही पायरी ओलांडली असेल; पण त्याचें स्वरूप चालू जन्मांत दिसलें पाहिजे.

२५. या एकीकरणाच्या रचनेचा नकाशा धर्मांत सांपडणारा आहे.

२६. एकाच कुलाच्या निरनिराळ्या शाखांचे देव तेच आहेत. या देवाच्या संज्ञा एकच आहेत. बाबिलोनियन कुलाचे ' बेल ' देव अथवा हिब्रु कुलाचे ' मोलाक्स. '

२७. सर्व देवांचें एकरूप ' बेलमेरोडाक ' या देवांत व्हावें याबद्दल बाबिलोनियनांचे प्रयत्न आणि त्याचप्रमाणें सर्व ' मोलॉक्स ' चें ' यावा ' किंवा ' याहू ' या देवांत रूपांतर करण्याबद्दल इझरलाइट लोकांचे यत्न.

२८. इराणी व हिब्रु लोकांकडून बाबिलोनियनांचा नाश. त्यांनीं बाबिलोनियन पुराणें आपलीं केलीं; आणि स्वतःला योग्य असें त्याचें रूपांतर करून शुद्ध एकेश्वरी धर्म निर्माण केला.

२९. ज्याप्रमाणें एकसत्ताक राजपद्धति हुकुमाची अंमलबजावणी जारीनें करते, त्याचप्रमाणें एकेश्वरी धर्मही एकीकरणाचें काम आवेशानें करतो; पण त्यांची वाढ अल्पवयांत खुंटते, आणि त्यापासून पुढें क्रौर्य आणि छळ कर-

ण्याची बुद्धि यांचा उदय होतो. याच्या तडाक्यांत सांपडलेलीं राष्ट्रें जितक्या झपाट्यानें उदयाला आलीं तितक्याच झपाट्यानें अस्तही पावलीं.

३०. हिंदुस्थानानें वरील अडचणींत चोख उत्तर दिलें "**एकं सद्विप्रा बहुधा वदंति ।**" यापुढें जी कांहीं संस्कृतीची वाढ आर्यावर्तात झाली तिचें ब्रीदवाक्य हेंच. साऱ्या कमानींतला मध्यवर्ती धोंडा हात्र.

३१. याचा परिणाम वेदांत्याची अत्यंत आश्चर्यजनक सहिष्णुता.

३२. मग आज मुख्य कर्तव्य काय? या निरनिराळ्या मूलतत्त्वांचा नाश होऊं न देतां त्यांचा एकमेळ करावयाचा आणि त्याची एकी करावयाची.

३३. ज्या धर्माची इमारत एखाद्या व्यक्तिविशेषाभोंवतीं बांधली गेली असेल, अशा धर्माकडून ही कामगिरी होणें शक्य नाहीं. मग तो व्यक्तिविशेष सामान्य मनुष्यवर्गातील असो अथवा स्वर्गीय असो.

३४. अद्वैतमताचें याच दृष्टीनें अत्यंत महत्त्व आहे. हें तत्त्वानुगामी आहे; व्यक्त्यनुगामी नाहीं. असें आहे, तथापि संसारी आणि एकांतिक भक्त या दोघांसही त्यानें सारखेंच कर्मस्वातंत्र्य दिलें आहे.

३५. सर्व काल हें असेंच चालू आहे. या दृष्टीनें पाहतां आमचें पाऊल एकसारखें पुढेंच पडत आहे. मुसलमानी सत्तेच्या अवधींतील अवतारी पुरुष.

३६. पूर्वकालीं आपली दिशा काय आहे याची जाणीव आम्हांस पूर्णपणें होती आणि सध्या ही जाणीव नष्ट झाली आहे, केवळ या दृष्टीनें पाहतां आमचें पतन झालें आहे.

३७. भविष्यकाळीं हें सर्व जुळून येणार आहे. एकाच शाखेच्या वर्चस्वामुळें कांहीं थोडासा काळ तरी राष्ट्राचा विलक्षण उत्कर्ष पूर्वी घडून आला. येथें आतां जी एकीकरणक्रिया चालू आहे आणि निरनिराळ्या शाखा आप्तपणाच्या संबंधानें आणि समानकल्पनांनीं एकत्र मिसळत आहेत, त्यायोगें पुढें जी भव्य राष्ट्रीय इमारत उठणार आहे, तिचा नकाशा माझ्या मनश्चक्षूंपुढें दिसत आहे. भविष्यत्काळचें आर्यावर्त म्हणजे तारुण्यांतील जोमानें मुसमुसलेलें आणि पृथ्वींतील एकंदर राष्ट्रपंक्तीच्या मुकुटमण्याच्या जागीं बसण्याच्या योग्यतेचें होईल. असें असूनही सर्वांत अत्यंत जुनें असें राष्ट्रही तेंच राहील.

३८. हा मार्ग आम्हीं कसा चालावा? स्मृतिशास्त्रांच्या आधारानें उत्पन्न झालेल्या चालीरीती या मोठ्या आडकाठ्या आहेत. पण श्रुतींची गोष्ट मात्र अगदीं

वेगळी आहे. कालाच्या ओघाबरोबर स्मृती बदलल्या पाहिजेत. या कायद्या-बद्दल आतां शंका राहिलेली नाहीं.

३९. वेदान्तधर्माचा प्रसार एकट्या हिंदुस्थानांतच न करतां तो बाह्य-देशींही केला पाहिजे. आमच्या विचारांनीं परकीयांच्या मनोघटनेंत प्रवेश केला पाहिजे. हें काम लेखांनीं न होतां मनुष्यामार्फत झालें पाहिजे.

४०. कलियुगांत दान हेंच खरें कर्म आहे. कर्मानें पूर्वशुद्धि झाल्यावांचून ज्ञानप्राप्ति होणें नाहीं.

४१. ऐहिक आणि आध्यात्मिक ज्ञानाचें दान.

४२. संन्यास–संन्यासी–राष्ट्राची मागणी.

---

## उपोद्घात

माझ्या प्रिय देशबांधवांनो, परकीय राष्ट्रांना मीं दिलेला संदेश धीटपणाचा असेल तर तुम्हांस द्यावयाचा संदेश त्याहूनही अधिक धीटपणाचा आहे. प्राचीन आर्यभूमीचा संदेश नवीन पाश्चात्य राष्ट्रांस पोंहोंचविण्याच्या कामांत मीं आपली शिकस्त केली. हें कार्य माझ्या हातून बरें घडलें कीं वाईट घडलें याचा निवाडा भविष्यकाल खचित करील. पण भविष्यकालाच्या या प्रचंड ध्वनीचा सूक्ष्म पण स्पष्ट नाद आजच ऐकूं येऊं लागला आहे. हा नाद दिवसें-दिवस बळावत आहे. भविष्यत्कालीं बनणारें आर्यराष्ट्र सध्याच्या हिंदुस्थानाला जो संदेश देत आहे त्याचा हा पूर्वध्वनि आहे.

ज्या अनेक मानवशाखांचें अवलोकन मीं केलें, त्यांत अनेक प्रकारच्या आश्चर्यजनक संस्था, कौतुकास्पद चालीरीती आणि सत्ता व सामर्थ्य यांचें प्रदर्शन हीं नजरेस पडण्याचें भाग्य मला प्राप्त झालें. यांत एक गोष्ट मला विशेषेंकरून आढळली, ती ही कीं, चालीरीती, संस्कृती आणि सामर्थ्य-प्रदर्शन यांत बाह्यतः अनेक प्रकार दिसत असले, तरीं त्यांच्या पोटांतील मानवी अतःकरण एक रूपाचेंच आहे. त्याचें रूप सर्वत्र सारखेंच असल्याचा प्रत्यय येतो. एकाच प्रकारच्या आनंदानें अथवा दुःखानें तें आनंदी अथवा कष्टी होतें. त्यांतील सामर्थ्य अथवा दुबळेपणा याचें स्वरूप सर्वत्र एकसारखेंच आहे.

त्याचप्रमाणें चांगलें आणि वाईट हींसुद्धां एकाच ठिकाणीं नांदतात असें सर्वत्र आढळून येतें. या दोहोंमुळें समाजाचा ताजवा समतोल राहिला आहे.

आणि या सर्वांचा अधिष्ठाता जीवात्मा हाही सर्वत्र एकरूपच आहे. ज्याला त्याच्या भाषेंत बोलतां येईल, अशा प्रत्येकाचें म्हणणें काय आहे, हें त्याला पूर्णपणें समजतें. या जगांतील प्रत्येक मानवशाखेंत कांहीं स्त्रीपुरुषरत्नें अशा स्वरूपाचीं आहेत कीं, त्यांच्या अस्तित्वामुळें परमेश्वराचा आशीर्वाद त्या त्या शाखेला प्राप्त होतो. महाराजा अशोकानें एकदां असें म्हटलें होतें कीं "प्रत्येक भूमींत ब्राह्मण आणि श्रमण आहेत." या शब्दांचें प्रत्यंतर आजही दिसतें.

ज्या पाश्चात्य भूमींतील अनेकांनीं केवळ प्रेमानें प्रेरित होऊन मला आपला म्हटलें, त्या भूमीचा मी फार ऋणी आहें. असें प्रेम केवळ शुद्ध आणि निःस्वार्थी अंतःकरणाचेंच द्योतक आहे. तथापि ज्या भूमीनें मला जन्म दिला तिच्याशीं एकनिष्ठ राहणें हें माझें आद्यकर्तव्य आहे. माझ्या देशबांधवांनो, मित्रांनो, जर मला हजारों जीव असते तर प्रत्येक क्षणीं ते सगळे जीव तुमच्या चरणीं अर्पण करून त्यांचें मीं सार्थक केलें असतें.

हा देह, हें मन आणि हे आध्यात्मिक विचार हे मला केवळ याच देशापासून प्राप्त झाले आहेत, आणि जर कोणत्याही कामीं मला यशाची प्राप्ति झाली असेल, तर ती सारी तुमचीच आहे. मित्रांनो, त्या यशाचे मालक तुम्हीच; मी नव्हें. खुद्द माझें असें या जगांत काय आहे म्हणाल, तर दुर्बलता आणि अपयश. अनेक कारणांनीं अनेक प्रसंगीं चित्त आपल्या मध्यबिंदूपासून घसरतें, याचें कारण मीच. जन्मापासून हजारों सच्चरितांच्या गोष्टी प्रत्यहीं कानावर पडणें हें भाग्य या देशांत प्रत्येकाप्रमाणें मलाही उपलब्ध होत असतां जर माझें हृदय दुबळें झालें, जर त्या गोष्टीपासून शिकावयाचें तें मीं शिकून घेतलें नाहीं तर तो दोष माझाच नव्हे तर कोणाचा? तो कमकुवतपणा माझाच.

धन्य! माझी मातृभूमि धन्य आहे!! जो कोणी या पवित्र भूमीवर उभा राहील—मग तो तिचाच पुत्र असो अगर कोणी परकीय असो—त्याला जगांतील अत्यंत पवित्र आणि अत्यंत उच्च हृदयांतून उद्भवणारे विचारतरंग आपल्याभोंवतीं घिरट्या घालीत आहेत असा प्रत्यय येईल. मनुष्यत्व म्हणून ज्याच्याजवळ आहे त्याला हा प्रत्यय अवश्य येईल. त्याचें अंतःकरण अवनत होऊन पशुत्वाची बरोबरी पावलें असेल तर मात्र गोष्ट वेगळी. आज हजारों वर्षें हीं पवित्र अंतःकरणें पशूंचे देव बनविण्यांत गुंतलीं आहेत. त्यांनीं आपल्या कार्याला आरंभ केव्हां केला हें इतिहास-पुराणें सांगूं शकत नाहींत. माझ्या मातृभूमीचें

सारें वातावरण आध्यात्मिक विचारांनीं दुमदुमून गेलें आहे. नीति आणि अध्यात्म यांची जन्मदात्री हीच भूमि. आपल्या पशुवृत्तीला एकसारखें चिकटून राहण्याचा यत्न मनुष्य करीत असतां तशाही स्थितींत मध्यंतरीं विसाव्याच्या जागा त्याला येथें सांपडतात. ही वृत्ति सोडून तो '**न जायते म्रियते वा कदाचित्** ।' अशा पदवीला जात असतां त्याला योग्य मार्गदर्शकही येथेंच भेटतात. सर्व लौकिक सुखांचें माहेरघर असें म्हणण्याचा एक काळ या भूमींत होता. आतां दुःखांचा पेला कांठोकांठ भरून वाहत आहे; तथापि ऐहिक सुखें येथें भरून उरलीं असतां, भर तारुण्याच्या भरांत, यशोदुंदुभि साऱ्या जगभर दुमदुमत असतां आणि जगांतील सर्व सत्ता या राष्ट्राच्या हातीं एकवटली असतां, त्या वेळींही या सर्व पाशांचा उच्छेद करून मायाभ्रमांतून प्रथम बाहेर पडलेलें राष्ट्र हेंच. सुख आणि दुःख, सामर्थ्य आणि दौर्बल्य, संपत्ति आणि विपत्ति, हास्य आणि अश्रु, जीवित आणि मृत्यु इत्यादि द्वंद्वांचे परस्परविरोधी प्रवाह उच्छृंखलपणें वाहत असतां अनंत शांति आणि स्थैर्य यांस प्राप्त करून देणारें कर्मसंन्यासाचें तत्त्व प्रथम याच मानवसमुद्रांतून बाहेर पडलें. ज्या भूमींत जीवित आणि मृत्यु यांचीं अगम्य कोडीं सोडविलीं गेलीं, ती भूमि हीच. जन्मभर सुखाच्या मागें अट्टाहास करून लागावें आणि हें करीत असतां दुःखांचे पर्वत मात्र डोक्यावर पडावे, हीच मानवी जीविताची चालू स्थिति आहे. असल्या जीवितांत हरघडी प्रत्ययास येणाऱ्या अगम्य कोड्यांस उत्तर याच भूमींतून मिळालें आहे. अशा प्रकारचा प्रयत्न पूर्वी कोठें झालेला नाहीं आणि याहून सरळ उत्तर दुसऱ्या कोठून मिळणारही नाहीं. जन्म होणें हेंच मोठें दुःख आहे आणि जीवितयात्रा ही सत्यवस्तूची छाया मात्र आहे, हा शोध प्रथम येथेंच लागला. धर्माला प्रत्यक्ष आणि व्यवहार्यरूप आहे हें प्रथम याच भूमींत निदर्शनास आलें. ज्याप्रमाणें इतर देशांतील स्त्री-पुरुषें ऐहिक सुखोपभोगार्थ संसारसमुद्रांत निःशंकपणें उड्या घेतात, आणि आपणाहून अधिक दुर्बल अशा बांधवांवर मनसोक्त अंमल चालवितात, त्याचप्रमाणें अनंतसुखाच्या प्राप्तीकरितां कसल्याही यातनांच्या समुद्रांत स्वतःचा कडेलोट करून घेणारीं स्त्री-पुरुषें प्रथम याच भूमींत पैदा झालीं. याच भूमींत मानवी अंतःकरण विस्तार पावत पावत इतकें मोठें झालें कीं, त्यांत केवळ मनुष्येंच मावलीं असें नाहीं, तर पशुपक्षी, झाडेंझुडपें आणि दगड यांचाही त्यांत अंतर्भाव झाला. अत्यंत

उच्च प्रतीच्या देवाधिदेवांपासून तों गवताच्या पातीपर्यंत सर्वांचा समावेश एक मानवी अंतःकरण करूं शकतें आणि स्वतः अनंतरूप राहतें, ही गोष्ट प्रथम येथेंच सिद्ध झाली, 'सर्व विश्व मीच आहें, त्यांत कोठेंही खंध नाहीं, त्यांत उडणारी प्रत्येक नाडी माझीच नाडी आहे' अशा प्रकारचा अभ्यास मनुष्यप्राण्यानें प्रथम याच भूमींत केला.

हिंदुस्थानदेश अवनत झाला आहे, अज्ञानग्रस्त झाला आहे, अशा मोठमोठ्या आरोळ्या आपणा सर्वांच्या कानांवर आजपर्यंत अनेक वेळां आल्या आहेत. ही गोष्ट खरी आहे अशी माझीही समजूत एका काळीं होती. पण आज? अनुभवाच्या उच्च शिखरावरून केलेल्या अवलोकनानें, अननुकूल पूर्वग्रहांचें डोळयांवरील पटल गळून पडल्यानें आणि परकीय देशांच्या भडक रंगांतील चित्रांची वस्तुस्थिति पाहिल्यानें माझी पहिली समजूत अगदीं चुकीची होती हें मी कबूल करतों. माझा सारा अभिमान बाजूला ठेवून अवनतशिरानें मी सांगतों कीं, माझ्या मातृभूमीसंबंधाची माझी समजूत अगदीं चुकली होती. हे आर्यांच्या पवित्र भूमि, अवनतीनें तुला कधीं स्पर्शही केला नाहीं! हजारों राजदंड येथें मोडले गेले आणि सामर्थ्य आणि सत्ता हीं चेंडूसारखीं या हातांतून त्या हातांत उडालीं, पण राजदंडाचा स्पर्श येथें लहानशा जनसमूहास मात्र होत होता. त्याचा परिणाम एकंदर जनसमूहावर फारसा कधींच झाला नाहीं. त्याच्या चालू प्रवाहांत कधीं खंड पडला नाहीं. हा प्रवाह कधीं मंद, तर कधीं चंड आणि कधीं स्वप्नासारख्या अर्धवट स्थितींत तर कधीं संपूर्ण जागृदवस्थेंत होता. अत्यंत देदीप्यमान अशीं कित्येक शतकें माझ्या नजरेस पडतात त्या वेळीं माझी दृष्टि दिपून जाते, आणि हृदय कंपायमान होतें. या साऱ्या सांखळींत एखादा दुवा मलिन दिसला तर दुसरा अत्यंत तेजोमय दिसतो. अहाहा! पहा, ही माझी माता आपल्या धीरोदात्त गतीनें एक एक पाऊल पुढेंच टाकीत आहे. तिच्या गतीला अडथळा करण्याचें सामर्थ्य कोणाला आहे! मनुष्याला त्याच्या पशुवृत्तींतून बाहेर ओढून स्वानंदसाम्राज्याच्या सिंहासनावर बसवावयाचें हेंच तिचें इष्ट कार्य आहे. हें इष्ट कार्य ती करीत आहे आणि तिच्या कार्यांत विघ्न करण्याला या जगांतच काय, पण स्वर्गांत अगर इतर कोठेंही कोणी जन्मास आला नाहीं!!

माझ्या प्रिय देशबांधवांनो, उपनिषत्कालापासून साऱ्या जगापुढें आपण एक सूत्र मांडिलें आहे, '**न धनेन न प्रजया त्यागेनैकेन अमृतत्वमानशुः।**'

धनानें नव्हे आणि संततीनेंही नव्हे, तर केवल त्यागानेंच अमृतस्थितीची प्राप्ति होते. तेव्हांपासून आम्ही साऱ्या जगाला आव्हान करून या तत्त्वाचें मिथ्यात्व सिद्ध करा म्हणून सांगत आहों. अनेक मानवशाखांनीं या आमच्या आव्हानाचा स्वीकार केला आणि तृष्णातृप्तीच्या उत्तरानें हें कोडें सोडविण्याचा यत्न करून पाहिला. पूर्वी ज्यांनीं हा यत्न करून पाहिला, त्यांचा आज कोठें मागमूसही राहिला नाहीं. तृष्णातृप्तीचें उत्तर आम्हांस देण्याच्या नादीं पडून त्यांनीं जो यत्न केला, त्यामुळें उत्पन्न झालेल्या दुष्टत्वाच्या आणि दुःखाच्या झंझावातांत तीं राष्ट्रेंच नामशेष झालीं. कनककामिनीच्या मागें लागून दुसऱ्या कशाची प्राप्ति होणार! जीं राष्ट्रें आज हाच यत्न फिरून करीत आहेत, त्यांचा पाया पोखरून गेला आहे आणि तीं आज पडूं कीं उद्यां पडूं, इतकाच विचार करीत आहेत. अखेरीस युद्ध कीं अखेरीस शांतता हा प्रश्न अजून भिजत पडला आहे. शेवटीं मेंदूचा जय होईल कीं स्नायूचा जय होईल, हें अजून कोणीं सांगितलें नाहीं. शेवटीं संसार कीं संन्यास कामाला येईल, याचें उत्तर अजून कोणीं दिलेलें नाहीं. आपण आपलें कोडें सोडवून स्वस्थ बसलों आहों. सुखपर्वतावर आरूढ झालों असतां अथवा दुःखसमुद्राच्या तळाशीं गेलों असतांही आपण आपल्या ध्येयास चिकटून बसलों आहों. कालाच्या अंतापर्यंत त्यालाच चिकटून बसण्याची आपली इच्छा आहे. आपलें उत्तर एकच. त्याग—कर्मसंन्यास—हेंच.

जीवनक्रमाची आर्यांची रचना याच तत्त्वास अनुलक्षून झालेली आहे, त्यांच्या साऱ्या साहित्याचें मंथन केलें, तर त्यांत हेंच सार सांपडावयाचें. साऱ्या जीवितयात्रेचा हेतु एकच. नराचा नारायण कसा होईल, या एकच प्रश्नाचें उत्तर आर्यभूमी अनेक प्रकारांनीं देत आहे. हा तिचा क्रम अखंड चालू आहे. राज्य मोंगलांचें असो, तुर्कांचें असो अगर इंग्रजांचें असो, त्याची फिकिर तिला नाहीं. तिचा एकच उद्योग अखंड चालू आहे.

आर्यराष्ट्राच्या इतिहासांत असा एकही काळ सांपडावयाचा नाहीं कीं, ज्यांत जग हालवून सोडणारा कोणीच ब्रह्मनिष्ठ येथें नव्हता. असा काल कोणीं मला दाखवून द्यावा. आतां एवढी गोष्ट खरी कीं त्यांच्या आगमनाप्रीत्यर्थ कोणीं कर्णे वाजविले नसतील अगर शिपायांची सलामीही झडली नसेल. तिचें कार्य

अशा स्वरूपाचें आहे कीं, त्यांत असल्या गडबडीचें आणि प्रदर्शनाचें कामच नाहीं. त्या कार्याचा संबंध मूक अशा आध्यात्मिक वस्तूंशीं असतो. रात्रीं पडणाऱ्या दंवाचा आवाज जसा कोणाला ऐकूं येत नाहीं, त्याचप्रमाणें आमच्या या आर्यमातेचा सर्व कारभार अगदीं निःशब्द होत असतो. त्याच्याबद्दल कोठेंही कांहीं गडबड ऐकूं यावयाची नाहीं; पण असल्या निःशब्द कार्यांतच या पृथ्वीवरील अत्यंत सुगंधी फुलें फुलतात. हें कार्य स्वभावतःच केवळ शांततारूप असल्यामुळें अनेकप्रकारच्या अनुकूल परिस्थिति त्यासाठीं जमून याव्या लागतात आणि अशी परिस्थिति जमली म्हणजे तिच्या कार्याला बाहेर देशींही सुरवात होते. खुद्द आर्यावर्तासंबंधानें म्हणाल तर हें कार्य येथें अखंड चालू आहे. तार्तर, इराणी, ग्रीक किंवा अरब लोकांनीं राज्यलोभानें ज्या ज्या वेळीं या भूमीचा संबंध परराष्ट्रांशीं आणिला, त्या त्या वेळीं अध्यात्मविद्येचा लोंढा जगभर पसरला गेला, ही गोष्ट इतिहासज्ञांस विदित असेलच. आज आपणापुढेंही असाच प्रसंग आहे. समुद्रावर आणि जमिनीवर इंग्रजांनीं दळणवळणाचे मोठमोठे राजमार्ग खुले केले असून त्या लहानशा बेटांतील लोकांच्या अजब कर्तबगारीमुळें पुन्हा एकवार आपला जगाशीं संबंध आला आहे; आणि अशा स्थितींत आमच्या आर्यभूमीच्या कार्याला पुन्हा एकवार प्रोत्साहन मिळावें हें रास्तच आहे. हे माझे शब्द आपण नीट ध्यानांत धरा. आतां नुकता कोठें आरंभ झाला आहे. याहून मोठ्या गोष्टी अद्यापि पुढेंच आहेत. सध्यां चालू झालेल्या कार्याचा परिणाम हिंदुस्थानाबाहेर काय होईल हें नक्की जाणणें माझ्या अटकळीबाहेरचें आहे. तथापि अत्यंत निश्चयात्मक अशी एक गोष्ट मात्र मी सांगतों. सध्यांच्या जडवादाच्या गर्तेतून आपला उद्धार व्हावा यासाठीं लक्षावधि—होय लक्षावधि—लोक चातकासारखे वाट पाहत बाहेरदेशीं राहिले आहेत. कनककामिनीचें चालू युग त्यांना त्या गर्तेकडे झपाट्यानें ढकलून नेत आहे. तिकडच्या अनेक सामाजिक सुधारकांस आतां हें पक्कें कळून चुकलें आहे कीं, आपल्या अनेक सुधारणांना आध्यात्मिक बळ प्राप्त व्हावयाचें असेल, तर अत्युच्च प्रतीच्या वेदान्ताच्या साहाय्यावांचून तें होणें नाहीं. असो. यासंबंधीं एक स्वतंत्र लेख शेवटीं मला लिहावयाचा आहे. याकरितां देशांतल्या देशांत जो कार्यभाग आपणांस कर्तव्य आहे, त्याकडे आधीं वळावें हें इष्ट आहे.

अध्यात्मज्ञानाचा प्रसार करावयाचा इतकीच आपली कामगिरी नाहीं; तर देशांत परस्परविरोध स्वभावाचीं जीं अनेक तत्त्वें आहेत, त्यांचें एकीकरण करणें हाही आपला कार्यभाग आहे. निरनिराळ्या शाखांना एकत्र व एकजीव करणें हा कार्यभाग प्रत्येक राष्ट्राला केव्हांना केव्हां करावयाचा असतोच.



# थिऑसफीसंबंधीं कांहीं स्फुट विचार

चालू सालीं थिऑसफीचे अनुचर आनंदोत्सवांत निमग्न झाले आहेत असें दिसतें. गेल्या वीसपंचवीस वर्षांत त्यांनीं जी काय कर्तबगारी केली तिच्यासंबंधीं वर्णनात्मक असे अनेक लेख लिहिलेले अनेक वर्तमानपत्रांचे अंक आज आम्हांपुढें आहेत.

हिंदुलोक उदारमतवादी नाहींत असें म्हणायला आतां तरी कोणी पुढें येईल असें वाटत नाहीं. फार काय सांगावें, मतौदार्य दाखविण्याच्या भरांत कित्येक वेळां त्यांनीं आपली फसगतही करून घेतली आहे. अशा स्थितींत ते जुन्याचे अभिमानी आहेत असें म्हणावयाचें धाडस कोण करील? अमेरिकन ब्रह्मविद्येच्या वृक्षावर बांधलेल्या या कलमाचा जयजयकार करण्यास कितीतरी तरुण हिंदु अहमहमिकेनें पुढें येत आहेत! या अमेरिकन ब्रह्मविद्येचीं विशेष महत्त्वाचीं अंगें म्हटलीं तर गडबड आणि धडपड; आणि एखाद्या ठिकाणीं डाळ शिजत नाहींसें वाटलें तर महात्म्यांच्या बंदुकांचा गोळीबार.

सर्व विश्वाचें अस्सल ईश्वरी ज्ञान आपणांपाशीं आहे असें थिऑसफिस्ट लोक निक्षून सांगत आहेत. फारच आनंदाची गोष्ट. वाटेल तें करून तें ज्ञान गुप्त ठेवावयाचें असा त्यांचा संकल्प आहे, हें तर आमच्या आनंदांत आणखी भर पाडण्यास साधन झालें आहे. या ज्ञानगंगेचा ओघ जर आम्हां दुर्बळ पामरांवर—आणि त्यांतल्या त्यांत हिंदूंवर—एकदम कोसळला तर मात्र आमची धडगत दिसत नाहीं. थिऑसफी या शब्दाचा सध्याचा अर्थ म्हटला तर मिसेस बेझंट हाच. मॅडम ब्लॅव्हॅट्स्की आणि ऑल्कॉट यांची ब्रह्मविद्या आतां जरा कोंपऱ्यांत जाऊन बसली आहे आणि बेझंटबाईंची विद्या पुढें आली आहे. बेझंटबाईंचे उद्देश स्तुत्य आहेत आणि त्यांचा उत्साह व चिकाटी हीं वाखाणण्यासारखीं आहेत हें कोणीही कबूल करील.

थिऑसफीला ज्याप्रमाणें भगत पुष्कळ मिळाले आहेत, त्याप्रमाणेंच तिच्यावर टीकेचा भडिमार करणारेही पुष्कळ आहेत. खुद्द आमच्याविषयीं म्हणाल तर आम्हांला थिऑसफीचें कार्य सर्वथा चांगलेंच आहे असें वाटतें. आमच्या दृष्टीनें त्यांत दूषणास्पद असें कांहींच नाहीं. थिऑसफीच्या ज्या

कांहीं कार्यांचा प्रत्यक्ष उपयोग होत आहे, तीं कार्यें अर्थात् चांगलीं आहे-तच त्यांबद्दल वाद असण्याचें कारण नाहीं. पण आज जें वाईट म्हणून दिसतें आहे तेंही चांगलेंच आहे. कांहीं लोकांच्या दृष्टीनें तें वाईट असेल; पण आमच्या दृष्टीनें परंपरया तें चांगलेंच आहे. अनेक प्रकारच्या लोकांची—भुव-नांची—माहिती थिऑसफिस्टांना आहे. जणुंकाय ते स्वतः जाऊन ते लोक पाहूनच आले आहेत! त्या लोकांत राहतात कोण, त्यांत दरींखोरीं कोठें आहेत, तेथली हवा कशी आहे वगैरे गोष्टींबद्दल माहिती त्यांजकडून आप-णांस मिळण्याजोगी आहे. भुतेंखेतें जिवंत थिऑसफिस्टांशीं बोलतात! या साऱ्या प्रकारांची माहिती आपणांस त्यांजकडूनच प्राप्त होण्याजोगी आहे. खरे ज्ञानी या सदराखालीं पास होण्याला थिऑसफीसारखें साधन आम्हांला तरी दुसरें ठाऊक नाहीं. या ज्ञानरसाची पिचकारी शरिरांत मारून घेतली कीं एक प्रकारचे विलक्षण जंतु कांहीं लोकांच्या मेंदूंत तयार होतात, आणि त्यामुळें आपण पूर्ण ज्ञानी आहों असें भासविण्याचा अधिकार जणुं काय त्यांस प्राप्त होतो.

थिऑसफी काय अथवा दुसरी एखादी संस्था काय, ती जें कांहीं सत्कार्य करीत असेल, त्याला विरजण घालण्याची आमची इच्छा नाहीं. तथापि 'अति सर्वत्र वर्जयेत्' एवढें म्हणण्याचा अधिकार आम्हांस पोंहोंचतो. 'अति तेथें माती' हा अनुभव आमच्या लोकांना पूर्वकालीं अनेकवार येऊन चुकला आहे. लखनौच्या 'ॲडव्होकेट' पत्रांत थिऑसफीबद्दल जी लेखमाला येऊन गेली तीवरून लखनौच्या लोकांच्या मनःस्थितीचें अनुमान काढावयाचें म्हटलें तर तें फारसें अनुकूल येईल असें आम्हांस वाटत नाहीं. थोडक्यांत इतकेंच म्हणावयाचें कीं ती लेखमाला पाहून आम्हांला अतिशय खेद झाला. मूर्ख-पणानें विध्वंसक टीका करून एखाद्या कार्याची माती करावयाची हें खोडसाल-पणाचें आहे खरें; पण मिथ्या स्तुतीची रेलचेल उडविणें हेंही तिरस्करणी-यच आहे.

या अमेरिकन झाडाचें जें हें कलम हिंदुस्थानांत आलें आहे, त्याची स्वादिष्ट फळें तरी कोणतीं आहेत? अमेरिकेंतल्या भूतविद्येच्या भाषेंतील शब्दांबद्दल येथें कांहीं संस्कृत शब्दांचा भरणा झाला. अमेरिकेंत कांहीं भुताटकीचे खेळ दाखविले जात, त्यांची जागा येथें महात्म्यानीं पटकावली आहे. तितडे कर्ण-

पिशाचें वश होतीं, त्याऐवजीं येथें महात्म्यांकडून संदेश येतात. अमेरिकेंतील झाडाचें कलम येथें आणून लाविल्यावर त्याला जीं नवीं फळें आलीं तीं हींच.

'ॲडव्होकेट' पत्रांत लेख लिहिणाराला या सर्व गोष्टींची माहिती असेलच असें आम्ही म्हणत नाहीं; पण आमचें हिंदु राष्ट्र आणि त्याचे थिऑसफिस्ट हे एकच आहेत असें भासविण्याची खटपट मात्र त्यानें करूं नये. थिऑसफीचा जो देखावा दिसत आहे, त्यांतून आरपार नजर आम्हीं फेंकली आहे. आमच्या हिंदु राष्ट्राला या देखाव्याची बरोबर किंमत आरंभापासूनच कळून आली आहे. मॅडम ब्लॅव्हॅट्स्की हिनें स्वामी दयानंद सरस्वती यांस या जाळ्यांत गुंतविण्याचा यत्न केला होता; पण त्या महापुरुषानें तिला झिटकारून दिल्यापासून आमच्यांतील बहुतेकांस या विद्येचें खरें रहस्य कळून चुकलें आहे.

'ॲडव्होकेट' मधील लेखक थिऑसफीला कितीही भाळला असला तरी या कलियुगांतही अनेक सद्गुरू खुद्द आमच्यांत आहेत आणि आम्हां लोकांनाही अध्यात्मविद्येचें ज्ञान पुरेसें आहे, हें त्यानें नीट ध्यानांत धरावें. अध्यात्मविद्येसाठीं रशियन किंवा अमेरिकन भुतांच्या ओंजळीनें पाणी पिण्याची आम्हांला यत्किंचितही गरज नाहीं.

ही लेखमाला हिंदु आणि हिंदुधर्म यांना अत्यंत अपमानकार आहे असें आम्ही स्पष्ट म्हणतों. पाश्चात्य देशांतून आगबोटी भरून धर्माचीं पोतीं इकडे आणण्याची आम्हां हिंदूंना गरज नाहीं आणि इच्छाही नाहीं, हें असल्या लेखकांनीं खूप ध्यानांत ठेवावें. दुसऱ्या हजारों वस्तू त्यांजकडून घेण्यांत जो अपमान आम्हांस सोसावा लागत आहे, त्यांत या नव्या अपमानाची आणखी भर कशाला ?

बाहेरून धर्म यावा अशी जर कोणाची स्थिति असेल, तर ती पाश्चात्यांचीच आहे. ती गरज आजपर्यंत आम्हीं पुरी पाडीत आलोंच आहों. थिऑसफीनें तिकडे जर कांहीं कार्य केलें असलेंच तर तें हेंच कीं हिंदुधर्माच्या वाटेंत तिनें डोंगर मात्र उभे करून ठेविले आहेत. तिनें ज्या अनेक प्रकारच्या हातचलाख्या तिकडे केल्या, त्यामुळें हिंदूंच्या धर्माच्या प्रसाराला अडथळा मात्र झाला. एडविन आर्नोल्डसारख्या कवीला अथवा मोक्षमुल्लरसारख्या

भट्टाला एकीकडे शिव्या द्यावयाच्या आणि दुसऱ्या बाजूनें त्यांच्याच कच्छपी लागून त्यांच्या मार्फत पाश्चात्य लोकसमूहाला आपल्या भजनीं लावावयाचें, आणि विश्वज्ञानाचा गड्डा कायतो आपणांजवळच आहे असें भासवायाचें; या हातचलाख्या सदरहू लेखकास माहीत असल्या पाहिजेत. असलें अजब ज्ञान सातासमुद्रांत दडवून ठेवण्यासारखें गुप्त ठेवलें जाणार हें ऐकून कोणाचाही जीव खालीं पडल्यावांचून राहणार नाहीं. आंब्याचीं झाडें उत्पन्न करण्याची फकीरी विद्या अथवा गारुड्याचे खेळ हीच कायती हिंदूंची ब्रह्मविद्या असा समज पाश्चात्य राष्ट्रांत उत्पन्न करण्याचें कार्य मात्र थिऑसफीनें चोख बजाविलें आहे हें कबूल केलें पाहिजे. हिंदुधर्माची वाढ पाश्चात्य देशांत होण्याला थिऑसफीनें जी काय बिनमोल मदत केली ती हीच !

तथापि थिऑसफीनें सर्व देशांत सद्यःफलदायी अशी एक कामगिरी करून ठेविली आहे. प्रोफेसर कॉक यांनीं क्षयरोगावर एक पिचकारीचें औषध तयार केलें आहे. त्या औषधाची पिचकारी रोग्याच्या फुप्फुसांत मारिली तर त्यांतले रोगजंतु निराळे करतां येतात असें म्हणतात. त्याचप्रमाणें समाजाच्या फुप्फुसांत थिऑसफीच्या औषधानेंही एक कामगिरी बजाविली आहे. ती ही कीं, अध्यात्मविद्येचे खरे आणि निःसीम भक्त कोण व ढोंगी, गारुडी, भ्रमिष्ट, अवनत कोण यांचीं निवड करण्यास सुलभ झालें आहे.



# डॉ. पॉल ड्यूसन



( ब्रह्मवादींत लिहिलेला, इ. स. १८९६ )

आज या गोष्टीला सुमारें एक तप होत आलें. जर्मनींतील सुप्रसिद्ध प्रोफेसर लॅसन, हे एका अपरिचित भाषेबद्दल एक व्याख्यान देत असतां एक विद्यार्थी तें ऐकत होता. या विद्यार्थ्याचा बाप पाद्याचा धंदा करून आपल्या कुटुंबाचा चरितार्थ चालवीत असे. त्याला आठ मुलें असून आमचा हा विद्यार्थी त्यांपैकींच एक होता. त्या दिवशीं प्रो. लॅसन हे संस्कृत भाषेबद्दल माहिती सांगत होते. या व्याख्यानाला हजर राहणाऱ्या विद्यार्थ्यांस कांहीं फी द्यावी लागत नसे. युरोपखंडांत संस्कृताचा प्रचार वाढत असला, तरी संस्कृतविद्येचें ज्ञानदान हें गुरूच्या चरितार्थाचें साधन अद्यापि होऊं शकत नाहीं. कदाचित् एखाद्या विश्वविद्यालयानेंच त्या गुरूला हाताशीं धरलें, तर मात्र गोष्ट वेगळी.

संस्कृतविद्येचें बीज ज्या थोर पुरुषांनीं प्रथम जर्मनींत नेलें, त्यांपैकीं प्रो. लॅसन हे जवळजवळ शेवटचेच पंडित होत. हे जर्मन पंडित खरोखरच असामान्य कोटीपैकीं होते असें म्हणणें भाग आहे. आर्यविद्येचा प्रसार जर्मनीमध्यें करण्यांत त्यांना कसल्याही प्रकारचा लौकिक फायदा नव्हता. त्यांचा मोठा फायदा म्हटला, तर त्यांच्या स्वतःच्या शुद्ध आणि निःस्वार्थी अंतःकरणाचें समाधान हाच. कविकुलगुरु श्रीकालिदास यांच्या अभिज्ञानशाकुंतलाचा कांहीं भाग, प्रो. लॅसन हे त्या दिवशीं सांगत होते. ह्या वेळीं तेथें अनेक विद्यार्थी जमले होते; पण आमच्या या तरुण विद्यार्थ्याइतकें दुसऱ्या कोणाचेंही चित्त त्या विषयाकडे वेधलें गेलें नव्हतें. नाटकाच्या ज्या भागाचें विवरण पंडित लॅसन करीत होते, तो भाग अत्यंत चित्तवेधक होता खरा; पण ज्या भाषेंत तें नाटक लिहिलें गेलें ती भाषा पॉल ड्यूसन याला अधिक चित्तवेधक वाटली. विषयापेक्षां भाषासौंदर्याचा परिणाम त्याच्या चित्तावर अधिक झाला. युरोपीय पंडितांना अपरिचितपणामुळें या भाषेंतील व्यंजनें आणि जोडाक्षरें उच्चारण्यासही कठीण जातात आणि तोंडें वेडींवांकडीं करावीं लागतात; आणि इतकें करूनही उच्चारांतील बोबडेपणा सर्वथा नष्ट होत नाहीं; प्रो. लॅसन यांसही ही अडचण होतीच; पण तशा स्थितींतसुद्धां भाषेच्या मूळ गांभीर्याचा

परिणाम पॉल ड्यूसन यांजवर झाल्यावांचून राहिला नाहीं. त्याला त्या भाषेनें पुरतें मोहून टाकलें. व्याख्यान संपल्यावर पॉल घरीं आला; पण रात्रभर त्याच्या मनांत ती भाषा घोळत राहिली. त्याच्या चित्ताला जी तळमळ लागली, तिनें त्याची झोंपही उडवून नेली. त्या दिवसापर्यंत जी भूमि त्याला सर्वथैव अज्ञात होती, त्या भूमीच्या एखाद्या सुंदर भागाचें दर्शन आपणास होत आहे असें त्याला वाटलें. अनेक देशांचीं अनेक प्रकारचीं चित्रें त्यानें पाहिलीं होतीं; पण या नव्या चित्रांतील रंगांच्या मिश्रणानें त्याचें चित्त आनंदांत आणि आश्चर्यांत बुडून गेलें! हें चित्र त्याला केवळ अपूर्व वाटलें.

पॉल ड्यूसन हा तरतरीतपणाबद्दल नांवाजलेला विद्यार्थी होता. तो मोठा पंडित होईल, आणि कीर्तीचाच नव्हे तर विशेषतः द्रव्याचा लाभ करून घेईल अशी त्याच्या आप्तेष्टांस फार आशा होती. या त्यांच्या आशेचा भंग होण्याची वेळ आली काय? आजचें व्याख्यान त्या बिचाऱ्यांच्या आशेच्या रस्त्यांत आडवें पडलें. पॉलला ध्यानीं, मनीं, स्वप्नीं, संस्कृतावांचून कांहीं दिसेना. त्या वेळच्या युरोपीय पंडितांपैकीं बहुतेकांच्या कानांवरून या भाषेचें नांवही गेलें नव्हतें. त्या भाषेच्या अध्ययनानें द्रव्यलाभाची यत्किंचित् आशा आजसुद्धां नाहीं हें मीं पूर्वीं सांगितलेंच आहे; पण पॉलच्या मनांत हें वेड इतकें पक्कें भरलें कीं, त्याला संस्कृतभाषेवांचून दुसरें कांहीं सुचेनासेंच झालें. आम्हां भारतवर्षियांना या मनःस्थितीचें रहस्य सध्यातरी समजण्यासारखें नाहीं. ज्यांत द्रव्यलाभ नाहीं ती विद्या शिकण्याची खटपट करावयाची? "शांतं पापम्। शांतं पापम्।" द्रव्यलाभाच्या आशेशिवाय एखाद्या विद्येच्या मागें लागणारा वेडा पीर या दुनियेंत असेल, असें आम्हां लोकांस तरी वाटत नाहींसें झालें आहे; पण आजसुद्धां असे वेडे पीर आमच्यांत कांहीं थोडेथोडके आहेत असें नाहीं. काशी किंवा नडिया यांसारख्या ठिकाणीं केवळ संस्कृतविद्येचा अभ्यास करणारे लोक—विशेषेंकरून संन्यासी—आजही पुष्कळ आढळतात. यांत कांहीं तरुण आणि कांहीं अगदीं वृद्धही असतात. अशा वयांत संस्कृतविद्येचें अध्ययन करून द्रव्यप्राप्ती होणें शक्यच नाहीं. तशांतून या विद्यार्थ्यांची सांपत्तिक स्थिति पाहिली, तर तीही समाधानकारक असते असें नाहीं. युरोपीय विद्येचें अध्ययन करणाऱ्या आमच्या हिंदु मुलांची राहणी आणि या विद्यार्थ्यांची राहणी यांत जमीनअस्मानाचें अंतर आहे. तेलवातीच्या

मिणमिण जळणाऱ्या दिव्यापुढें रात्रीच्या रात्री बसून ते हस्तलिखित पोथ्या वाचतात. या दिव्यांचा उजेड तर इतका प्रखर असतो कीं, अलीकडल्या युरोपीय विद्यार्थ्यांची थोड्याच दिवसांत आंधळीकोशिंबीर व्हावयाची. एखाद्या दुर्मिळ हस्तलिखिताकरितां अथवा एखाद्या महापंडिताच्या भेटीकरितां शेंकडो मैल पायांनीं चालत जावयाचें, आणि उदरनिर्वाहाचें साधन म्हणजे चौपदरी, हेंच. अशा दशेंतही, त्यांचें मन त्यांच्या अभ्यासाच्या विषयाबाहेर कधींही भटकत नाहीं; हें आश्चर्य नव्हे काय? असा अभ्यास करतांकरतां कित्येकांचे काळ्यांचे पांढरे झाले तरी अभ्यास अजून चालू आहेच! परमेश्वरकृपेनें असले विद्येचे खरे भोक्ते, आजच्या स्थितींतही आमच्या देशांत आढळतात ही मोठ्या भाग्याची गोष्ट आहे. आमच्या सध्याच्या स्थितींतही ज्या विद्येबद्दल आम्हांस यथार्थपणें अभिमान वाटतो, ती विद्या अशाच पद्धतीनें शिकलेल्या मनुष्यांनीं, इतक्या परिणतावस्थेस नेऊन पोहोंचविलेली आहे. आर्यभूमीच्या अशाच पुत्रांनीं ही कामगिरी करून ठेवलेली आहे. उलटपक्षीं हजारो रुपयांचा खर्च करून, चालू काळीं मिळणारी अनेक प्रकारची मदत घेऊन, आणि कोणत्याही प्रकारची अपेष्टा न सोसतां, आज जे आमचे विद्यार्थी विश्वविद्यालयाचे शिक्के घेऊन बाहेर पडतात, त्यांची विद्वत्ता आणि ही प्राचीन पद्धतीची विद्वत्ता यांची तुलना केली, तर काय आढळून येतें? आपला नित्याचा अनुभवच या प्रश्नाचें चोख उत्तर देईल. विद्येसंबंधीं आर्यावर्ताची जी ख्याती साऱ्या जगांत एके काळीं होती, तीच आजही असावी अशी इच्छा आजच्या विद्यार्थीवर्गास असेल, तर तें काम चालू शिक्षणपद्धतीनें होणें नाहीं. कोणत्याही प्रकारची आशा चित्तांत न धरतां जे श्रम संस्कृतविद्येचे विद्यार्थी करतात, त्याचप्रमाणें अर्वाचीन विद्यार्थ्यांनीं निरलसपणें आणि अहेतुक चित्तानें त्यांचा कित्ता गिरविला पाहिजे. खरी विद्वत्ता अंगीं मुरण्यास, अनासक्तता, अत्यंत उत्साह आणि कोणत्याही अडचणी सोसण्याची शक्ति, हीं आवश्यक आहेत. दुसऱ्या साऱ्या राष्ट्रांस जर्मनी आज मागें सारूं लागला आहे याचें कारण तरी हेंच. अशा प्रकारचा विद्यार्थीवर्ग आज जर्मनींत आहे. पृथ्वींतील साऱ्या राष्ट्रांत जर्मनीनें आज आघाडीची जागा मिळविली, ती अशा विद्यार्थिवर्गाच्या जिवावरच मिळविली आहे. असो.

प्रारंभीं सांगितल्याप्रमाणें पॉल ड्यूसन याला संस्कृतविद्येची गोडी लागली, आणि त्या भाषेचा अभ्यास करावयाचा असा निश्चय त्यानें केला. हा अभ्यास

करावयाचा हें कांहीं सोपें काम नव्हतें. आमच्या जुन्या पद्धतीच्या विद्यार्थ्यांना जे हाल सोसावे लागतात आणि प्रसंगीं उपासमारही होते, तशीच स्थिति ड्यूसनचीही झाली. पण धीर न सोडतां त्यानें अभ्यास केला आणि पूर्वपरंपरेला अनुरूप अशी खरी विद्याही त्यानें प्राप्त करून घेतली. पंडित पॉल ड्यूसन हे कील येथील विश्वविद्यालयांत अध्यात्मविद्येचे अध्यापक असून, साऱ्या युरोपांत त्यांच्या धवलकीर्तीचा परिमल पसरला आहे. डॉक्टर पॉल ड्यूसन यांचें नांव ऐकलें नाहीं, असा हिंदु पंडितही बहुधा क्वचितच असेल! युरोपांत व अमेरिकेंत संस्कृत भाषेचे पंडित मीं अनेक पाहिले. वेदान्ताची अभिरुचीही त्यापैकीं कित्येकांना आहे. तसेंच त्यांच्या बुद्धीची कुशाग्रता आणि त्यांचें संस्कृतावरील निरपेक्ष प्रेम, हीं वाखाणण्यासारखीं आहेत हेंही खरें; पण पॉल ड्यूसन ( देवसेन हें त्यांचें आवडतें नांव ) आणि वृद्ध भट्ट मोक्षमुल्लर हेच काय ते आर्यभूमीचे आणि आर्यविद्येचे खरे निःसीम भक्त आहेत असें मला वाटतें. कील येथें या वेदान्त्याची व माझी भेट ज्या दिवशीं झाली, तो दिवस माझ्या स्मृतिपटावर कायमचाच राहील. माझ्या आयुष्यांत अत्यंत आनंददायक असे जे कांहीं प्रसंग घडले, त्यांपैकींच हा प्रसंगही होय. डॉक्टर पॉल, त्यांची पत्नी आणि कन्या यांजबरोबर जर्मनींत कित्येक दिवस मीं प्रवास केला; आणि त्यानंतर लंडनमध्येंही कित्येक वेळां त्यांची व माझी भेट झाली. या सर्व प्रसंगीं मला अपूर्व आनंदाचा लाभ झाला.

संस्कृतविद्येचा प्रसार युरोपांत झाला त्या वेळीं अगदीं आरंभीं ज्यांनीं या अभ्यासास सुरुवात केली, त्यांनीं तो अभ्यास विशेष कुशाग्र बुद्धीनें केला असें म्हणतां येत नाहीं. हा अभ्यास बहुतांशीं त्यांच्या केवळ लहरीप्रमाणें झाला. त्यांचें ज्ञान अगदीं कोतें, आणि तसल्या अर्ध्याकच्च्या ज्ञानापासून मोठें फळ मिळविण्याची आकांक्षा त्यांनीं धरली होती, यामुळें त्यांजजवळ जें कांहीं थोडें ज्ञान होतें, त्याचा शक्य तितका मोठा बडेजाव त्यांनीं करून दाखविला. संस्कृतविद्येच्या नवीनपणाचा परिणाम त्यांच्या कल्पनेवर अधिक झाला असल्यामुळें, लहानसहान गोष्टींसही त्यांनीं वाजवीपेक्षां अधिक महत्त्व दिलें. शाकुंतल नाटक म्हणजे हिंदुतत्त्वज्ञानाचा मोठा ग्रंथ, असेंही म्हणण्यापर्यंत त्यांची मजल गेली होती. त्या काळीं असे युरोपीय पंडित थोडे होते असें नाहीं; पण या लाटेला अटकाव करणारी दुसरी प्रतिस्पर्धी लाट लवकरच उत्पन्न झाली. या

दुसऱ्या पंडितांच्या दृष्टीनें पूर्वेकडील कोणतीही चीज केवळ त्याज्य--केवळ उपहासास पात्र. पण ज्या भाषेतील विद्येवर टीका करण्याचें व्रत त्यांनीं स्वीकारलें होतें, त्या भाषेचें त्यांचें ज्ञानही अपूर्वच होतें; इतकें कीं, जवळजवळ शून्य. संस्कृताच्या अभ्यासापासून कांहीं फायदा होणार नाहीं अशी त्यांची आगाऊच खात्री झाली होती. केवळ कल्पनातरंगांत वाहत गेल्यामुळें, पहिल्या पिढींतील लोकांस संस्कृतविद्येंत ज्याप्रमाणें गुलाबांचे ताटवे आणि कस्तुरी हीं जिकडेतिकडे दिसत होतीं, त्याचप्रमाणें या दुसऱ्या पिढीला सर्वत्र त्याज्य भाग दिसूं लागला. पूर्वींच्या सर्व पंडितांवर एकसहा ताशेरा झाडण्याचा क्रम त्यांनीं सुरू ठेवला होता, पण त्यांच्या या प्रयत्नांत खरें तथ्य मुळींच नव्हतें; इतकेंच नव्हे तर, हे प्रयत्न धाष्टर्याचेही होते असें म्हटलें पाहिजे. तशांतून संस्कृत भाषेच्या पुरस्कर्त्यांचें अध्ययन शाकुंतल नाटकाच्या पलीकडे फारसें गेलें नसल्यानें, उलटपक्षाच्या धाष्टर्याला अधिकच स्फुरण चढलें; आणखी असें कीं, ज्या श्रोतृगणासमोर या हल्ल्याचें काम चाले, त्याचा अधिकार आणि त्याचें संस्कृत भाषेचें ज्ञान किती होतें म्हणाल, तर त्या भाषेंतील एखादा शब्दही कधीं त्याच्या कानांवर गेला नव्हता. संस्कृत भाषेच्या बऱ्यावाईटपणाचा निवाडा करणारे न्यायाधीश या प्रकारचे आणि वादीप्रतिवादी त्या प्रतीचे ! अशा स्थितींत ज्ञानरसाचा पूर किती वाहत असेल आणि त्यांत कोण वाहून जात असेल, कीं त्यांत सर्वच गटंगळ्या खात असतील, हें कोणी सांगावें ? साराच गोंधळ ! एका सुप्रभातीं आम्ही बिचारे अशरण हिंदु लोक जागे होऊन पाहतों, तों काय चमत्कार सांगावा ! आमचें आमचें म्हणून ज्या चिजा आम्हीं आजवर उराशीं बाळगल्या, त्या साऱ्या चोरीस गेलेल्या ! एक टोळी जी पृथ्वीच्या पोटांतून अचानक उद्भवली, तिनें आमच्या साऱ्या जिनसा पसार केल्या ! दुसरी टोळी आली तिनें आमची शिल्पकला लांबवली ! तिसरीनें आमच्या साऱ्या शास्त्रांचे अवशेष पळविले ! आतां आमचें तें काय राहिलें ? धर्म ? छे ! तोसुद्धां आतां तिसऱ्याच्या ताब्यांत गेला ! धर्माचा उद्भव प्रथम हिंदुस्थानांत झाला म्हणतां ? छे. नांवसुद्धां घेऊं नका ! तोसुद्धां तुम्ही दुसऱ्याकडूनच उसना घेतला आणि आतां लुच्चेगिरीनें वारसदारीचा हक्क सांगतां ! त्या काळीं सर्वत्र हीच धामधूम. सर्वच विद्वान् आणि सर्वच शोधक. सर्व एका लहानशा जाग्यांत नानाप्रकारचे शोध लावूं लागले ! आणि तेथें तर सर्वच अंधार !

यामुळें तें एकमेकांचेच पाय तुडवीत सुटले ! पण ही ज्वराची भावना लवकरच थंडावली, आणि भावी आशेचा अरुणोदय झाला. पौर्वात्य विषयांवर मतें झोंकून देण्याचा काळ आतां राहिला नाहीं. अंगीं गाढी विद्वत्ता आणि अत्यंत कुशाग्र बुद्धि असल्यावांचून या कामाला हात घालणें, म्हणजे आपणच आपलें हंसें करून घेणें आहे, ही गोष्ट पुष्कळांच्या लक्ष्यांत आली. आर्यपरंपरेची नुसती अवहेलना करून तिला तुच्छता आणण्याचा यत्न करणें, हें काम दिसतें तितकें सुरक्षित नाहीं असें त्यांना आढळून आलें. स्वप्नांतही लक्ष्यांत न येणारीं गुह्यें या आर्यपरंपरेच्या पोटीं आहेत, अशी त्यांची खात्री झाली.

या काळानंतर युरोपांत उद्भवलेला संस्कृत भाषेचा विद्यार्थिवर्ग अधिक लीन वृत्तीचा, अधिक सानुकंप आणि अधिक सुशिक्षित असा आहे. ज्यांच्या अंगीं विद्या बाणली आहे, त्यांची स्थिति " **वृक्ष फार लवती फलभारें** " अशी होणें हें वाजवीच आहे. त्याचप्रमाणें त्यांच्या अंगीं सहानुभूति असावी हेंही युक्त आहे. कारण, त्यांचीं अंतःकरणें ज्ञानरसाच्या आकंठ पानानें तृप्त झालेलीं असतात. या जुन्या आणि नव्या पक्षाची सांखळी जुळविणारा कुशल कारागीर भट्ट मोक्षमुल्लर हाच होय. दुसऱ्या कोणाही पंडितापेक्षां या वृद्ध आचार्याचे आम्हां हिंदूंवर अनेक उपकार आहेत. या बहाद्दरानें अत्यंत उत्सानें तारुण्याच्या भारांत हातीं घेतलेलें काम नेटानें करून वृद्धावस्थेंत तें पूर्ण केलें; तें पाहिलें म्हणजे आश्चर्यानें माझें मन थक्क होऊन जातें. कोणाचीही मदत नाहीं अशा स्थितींत जीर्ण झालेलीं हस्तलिखितें उकलावयाचीं, त्यांतली लिपी खुद्द आम्हां हिंदूंसही कित्येक वेळां दुर्बोध, आणि त्याची भाषा अशी कीं, जिचें ज्ञान होण्यास सारा जन्मही पुरावयाचा नाहीं; अशा स्थितींत ज्यानें एवढा प्रचंड उद्योग हातीं घेऊन पार पाडला त्याची खरोखरच धन्य होय ! त्याला एखाद्या जाड्या पंडिताची मदत तर नव्हतीच, 'पण अडक्याचा तीन' वालो एखादा बुभुक्षित पंडितही त्याला सांपडला नव्हता. 'महिन्याकांठीं सात-आठ रुपये खर्च केले तर कोणत्याही विषयांतला एखादा 'विद्वान्' मिळूं शकतो;' अशा अर्थाची एक म्हण अमेरिकेंत आहे. फार झालें, तर प्रस्तावनेंत त्याचे आभार मानावे. अशापैकींही एखादा पंडित मोक्षमुल्लर यांस मिळाला नव्हता. एखाद्या शब्दाचा अथवा वाक्याचा अर्थ सायनाचार्यांनीं काय केला आहे, आणि खरा पाठ कोणता, हें शोधून काढण्यासाठीं त्यांना कित्येक दिवस

आणि कधीं कधीं कित्येक महिनेही निघून जात. ही गोष्ट खुद्द त्यांनींच मला सांगितली. अशा रीतीनें जेथें केवळ घनदाट अरण्य होतें तेथें ज्यांनीं मोठा राजमार्ग निर्माण केला, त्यांची धन्य होय असेंच म्हटलें पाहिजे. हा प्रचंड उद्योग ज्यानें निरपेक्ष बुद्धीनें केला, त्याचे आम्हां हिंदूंवर अनंत उपकार झाले आहेत असें म्हणणें वावगें आहे काय? त्यांच्या अनेक लेखांत त्यांनीं प्रतिपादन केलेलीं सर्वच मतें आम्हांस मान्य होणार नाहींत; आणि कित्येक ठिकाणीं तीव्र मतभेद होईल हेंही खरें; पण असें असलें तरी त्यामुळें त्यांच्या परिश्रमाचें मोल यत्किंचित्‌ही उणें होत नाहीं; मतभेद हे नेहमीं होणारच; पण या एका पंडितानें आमच्या पूर्वजांच्या विद्येचा जितका शोध केला, तिचें रक्षण केलें आणि तिचा प्रसार केला, तितकी कामगिरी आम्हांपैकीं एकाच्यातरी हातून होण्याची आशा होती काय? कीर्तीचा अथवा दुसरा कसलाही लोभ अंतःकरणांत नसतां, केवळ प्रेमाला वश होऊन लीन अंतःकरणानें त्यानें ही कामगिरी बजावली आहे.

प्राच्य विद्यांचा प्रेमानें अभ्यास करणाऱ्या पिढींत अग्रेसरत्वाचा मान ज्याप्रमाणें भट्ट मोक्षमुल्लर यांस आहे, त्याचप्रमाणें त्यांच्या पुढील पिढींत बिनीचा मान देवसेन यांस दिला पाहिजे. आरंभीं या विद्यांकडे ज्यांचें लक्ष्य वेधलें गेलें, त्यांनीं भाषासाम्याच्या दृष्टीनेंच या विद्यांचा अभ्यास केला. प्राचीन कालीं कोणत्या भाषा प्रचारांत होत्या, त्यांचा एकमेकींशीं संबंध कोणत्या प्रकारचा होता आणि कोणत्या प्राचीन भाषांपासून कोणत्या अर्वाचीन भाषा उद्भवल्या, या विषयांकडेच त्यांनीं अधिक लक्ष्य दिलें होतें; पण यामुळें विचाररत्नांच्या प्रभेकडे आणि त्यांतील अध्यात्मभागाकडे यांचें दुर्लक्ष्य झालें. मोक्षमुल्लर यांनीं प्रथम यांतील कांहीं रत्नें वेंचून काढून लोकांस दाखविलीं. त्यांच्या भाषापांडित्याबद्दल लोकांची आगाऊच खात्री झाली असल्यामुळें, त्यांनीं निदर्शनास आणलेल्या विचाररत्नांकडे लोकांचें चित्त आपोआपच वेधलें. भाषांचें साम्य आणि वैषम्य पाहत बसण्याची गोडी डॉ. ड्यूसन यांस नव्हती. प्रथमपासूनच त्यांचा कल तत्त्वज्ञानाकडे विशेष होता. प्राचीन ग्रीक आणि अर्वाचीन जर्मन तत्त्वज्ञानाचा अभ्यास त्यांनीं अगोदरच केला असल्यामुळें, आर्यतत्त्वज्ञानाकडे त्यांचें चित्त एकदम वळलें. उपनिषद्ग्रंथांच्या अत्यंत खोल भागांत त्यांनीं बुडी मारली. अगदीं तळापर्यंत पोहोंचण्यांत त्यांनीं

माघार घेतली नाहीं. त्यांतील तत्त्वज्ञान त्यांच्या कुशाग्र बुद्धीला सर्वथैव पटलें आणि त्याचें पूर्ण समाधान झालें. ज्या धैर्यानें त्यांनीं या कार्याला हात घातला होता, त्याच धैर्यानें त्यांनीं या तत्त्वज्ञानाची अलौकिकता लोकांच्याही नजरेला आणली. वेदान्ताबद्दल ज्या थोड्या पंडितांनीं अत्यंत स्पष्ट असे उद्गार काढले, त्यांत डॉ. ड्यूसन यांची प्रमुखत्वानें गणना केली पाहिजे. आपण वेदान्त-मताबद्दल चार चांगले शब्द बोललों तर जुने नाणावलेले पंडित काय म्हण-तील, हा क्षुद्र विचार त्यांच्या चित्ताला शिवलाही नाहीं. सत्यालाही धैर्याच्या पाठिंब्याची गरज या जगांत लागत असते. तशांतून युरोपची स्थिति तर सध्या इतकी नाजुक झाली आहे कीं, प्रसिद्ध तत्त्वदर्शी आणि पंडित यांना लोकमतास भ्यावें लागतें. युरोपांत आज अशा अनेक प्रकारच्या रूढी आणि अनेक प्रकारचे पंथ अस्तित्वांत आहेत कीं, त्यांजबद्दल यांपैकीं बहुतेक पंडि-तांचा यत्किंचितही पूज्यभाव उरलेला नाहीं; पण तसें स्पष्टपणें बोलून दाख-विण्याची छाती मात्र त्यांना होत नाहीं; इतकेंच नव्हे, तर एखाद्या पंथांतील एखाद्या विक्षिप्त भागासंबंधीं त्यांस बोलावयाचें असल्यास, गुळमुळीत भाषा वापरून आणि विलक्षण द्राविडी प्राणायाम करून, त्यांना आपलें म्हणणें अर्ध्या-कच्च्या भाषेनें सांगावें लागतें. युरोपखंडांत सामान्य लोकमताचें प्राबल्य या प्रकारचें आहें. अशा स्थितींत केवळ सत्यासाठीं लोकमताची यत्किंचित्ही पर्वा न बाळगतां ज्यांनीं आर्यतत्त्वज्ञानाचा प्रसार युरोपांत केला, ते मोक्षमुल्लर आणि डॉक्टर पॉल ड्यूसन धन्य होत ! ज्या असामान्य धैर्यानें त्यांनीं हें कार्य युरोपांत संपादिलें आहे, त्याच धैर्यानें त्यांनीं आमच्या चुकांचेंही माप आमच्या पदरांत घालावें अशी माझी इच्छा आहे. प्राचीन तत्त्वरत्नांत पुढें पुढें भेसळ कशी झाली आणि त्याच तत्त्वांना प्रत्यक्ष व्यावहारिक रूप देण्यांत आम्ही कसे घसरलों, हें त्यांनीं दाखवावें. सध्याच्या आमच्या विपन्नावस्थेंत तर असल्या नरशार्दूलांचीच आम्हांस अधिक गरज आहे. एकीकडे पाहावें तों जुन्याची तरफदारी करणारा एक पक्ष दिसतो. खेड्यापाड्यांतल्या जाखाई-जोखाईचे पूजाविधी हेसुद्धां यांच्या दृष्टीनें मोठ्या शास्त्रांच्या किंमतीचे ठर-तात. जुनें म्हणून जें कांहीं सांपडेल तें रत्न असें यांच्या दृष्टीला भासतें. जुन्याची शुद्ध गुलामगिरी पत्करलेला हा पक्ष हिंदुस्थानांत बराच मोठा आहे. या पक्षाकडून दृष्टि वळवून दुसऱ्या बाजूकडे पहावें, तों एक निराळाच चमत्कार

नजरेस पडतो. या पक्षाच्या मतानें आम्ही लोक अगदीं कुचकामाचे, आमच्यांत कांहींच अर्थ नाहीं. आमच्या साऱ्या इतिहासांत नांव घेण्यासारखा एकही भाग त्यांच्या दृष्टीनें दिसत नाहीं. आमची समाजरचना आणि धार्मिक विधी यांना एकत्र बांधून दारूच्या धडाक्यानें उडविणें शक्य असेल, तर तें कर्महो हे लोक आनंदानें करतील. तत्त्वज्ञान आणि धर्म यांच्या प्राचीन जन्मभूमीची त्यांस यत्किंचित्‌ही कींव यावयाची नाहीं.



# खासगी पत्रें

—:०:—

## पत्र २८ वें

१४, ग्रेकोट गार्डन्स,
वेस्टमिन्स्टर, लंडन

प्रिय—

स्वित्झर्लंडांतून मी परत आल्याला आज तीन आठवडे झाले. लंडनांतील माझें कार्य हळूहळू वृद्धिंगत होत आहे. शिष्यवर्ग हळूहळू वाढत आहे. वेदान्त आणि योग यांची गोडी अमेरिकन लोकांना फारच लागत चालली आहे. सध्यां येथें वीस संन्यासी जाऊन राहिले तरी त्या सर्वांचें काम नीट चालेल, एवढा मोठा शिष्यवर्ग आज येथें तयार आहे. खरीं नाणीं जर भरपूर मिळालीं, तर अमेरिकन संस्थानें दहा वर्षांच्या अवधींत आपण पादाक्रांत करून टाकूं; पण तशीं माणसें आहेत कोठें? तुमच्याइकडे पहावें, तर सारा बाजार मूर्खांनीं भरलेला! ब्रह्मज्ञानाच्या आणि स्वदेशभक्तीच्या बाता मात्र सवाहात माराल! मद्राशांत मात्र कांहीं थोडें स्थैर्य आणि आपलें घोडें पुढें दामटण्याची विद्या आहे; पण पहावा तो प्रत्येक पुरुष चतुर्भुज! प्रत्येकाच्या पायांत सवामणाची बेडी आहेच. अनासक्त राहून गृहस्थाश्रमी होणें हें वाईट आहे असें मी म्हणत नाहीं; पण सध्या आपल्याला जर कशाची अत्यंत जरूर असेल, तर ती ब्रह्मचर्याचीच.

बाळा, आतां मला कशीं माणसें हवींत तें सांगूं का? लोखंडाचे स्नायू, पोलादी ज्ञानतंतू आणि वज्राचीं मनें असलेलीं माणसें मला हवींत. क्षत्रियाचें वीर्य आणि ब्रह्मतेज हीं जेथें एकवटलीं असतील असे नरसिंह मला पाहिजेत. माझ्या नजरेसमोर आज अशीं लक्षावधि मुलें खेळत आहेत. माझ्या आशा पूर्ण करण्याचा अंकुर त्यांच्या ठिकाणीं मला दिसतो. अरेरे! काय करूं आतां? या सुंदर बच्चांचें बलिदान होईल. होमकुंडांत त्यांची पूर्णाहुति पडेल. लग्न! लग्न!! त्या तसल्या होमांच्या धडाडून पेटलेल्या अग्निज्वाला मला दिसत आहेत. हीं माझीं सुंदर लेंकरें त्यांत लोटलीं जात आहेत. परमेश्वरा! या पिळवटलेल्या अंतःकरणांतून निघालेल्या आरोळ्या तुझ्या कानांवर अजून आदळत नाहींत काय? किमानपक्ष शंभर मद्रासी तरी संसारावर अग्नि

ठेवण्याला तयार होतील आणि कमरा बांधून सत्यासाठीं या जगाच्या अफाट रणांगणावर येतील, त्याच वेळीं मद्रासला जागृति येईल. देशोदेशीं फिरून सत्याच्या वतीनें लढाया केल्या पाहिजेत. आजची वेळ अशी आहे कीं, बाहेर-देशीं बजावलेली एक कामगिरी, देशांतल्या हजार कामगिऱ्यांची बरोबरी करील. परमेश्वराची मर्जी असेल तर तसें अजूनही घडून येईल.

भट्ट मोक्षमुल्लर मजवर दिवसेंदिवस अधिक प्रेम करूं लागले आहेत. दोन व्याख्यानें देण्यासाठीं मी लवकरच ऑक्सफर्डला जाणार आहें.

वेदान्तावर एक मोठा ग्रंथ लिहिण्याची तयारी मी सध्या करीत आहें. द्वैत, विशिष्टाद्वैत आणि अद्वैत यांसंबंधींचीं श्रुतिवचनें गोळा करण्यांत मी गुंतलों आहें. संहिता, ब्राह्मणें, उपनिषद्ग्रंथ आणि पुराणें यांतून या तीन मतांना पोषक अशीं वचनें तुम्हीं कोणीं निवडून काढलीं, तर मला फार उप-योग होणार आहे. अशीं वचनें काढून त्यांचें वर्गीकरण करावें आणि त्या त्या सदरांत तीं नमूद करून, ग्रंथाचें नांव, अध्याय, वगैरे आंकडे पुढें लिहावे. ग्रंथरूपानें आपल्या तत्त्वज्ञानाची खूण मागें ठेवल्याशिवाय इकडून निघून येणें मला बरें वाटत नाहीं.

एकशेंआठ उपनिषदें तामीळ लिपींत छापलेलीं असून, तीं म्हैसूर येथें प्रसिद्ध झालेलीं आहेत. या ग्रंथाची एक प्रत प्रोफेसर ड्यूसन यांच्या संग्रहीं मीं पाहिली. देवनागरी लिपींत छापलेला असा एखादा ग्रंथ मिळाल्यास अवश्य पाठवा. न मिळेल तर ती तामीळ प्रत पाठवून तीबरोबर एका कागदावर तामिळ अक्षरें आणि त्यांसमोर नागरी लिपींतील तीच अक्षरें लिहून पाठवावीं, म्हणजे तामिळ अक्षरांची ओळख मी करून घेईन.

मद्रासेंतील अँग्लो–इंडियन वर्तमानपत्रांत प्रमुख असलेल्या ' मद्रास मेल ' पत्रांत, माझ्या राजयोगाच्या पुस्तकावर फार अनुकूल अभिप्राय आला अस-ल्याचें मि० सत्यनाधन यांनीं सांगितलें. त्यांची व माझी भेट लंडनांत झाली. त्या ग्रंथांत जीं कांहीं नवीं विधानें मीं केलीं आहेत, त्यांकडे कांहीं प्रमुख अमे-रिकन इंद्रियविज्ञानशास्त्र्यांचें लक्ष्य वेधल्याचें माझ्या कानांवर आलें आहे. उलटपक्षीं विलायतेंतील कांहीं शास्त्रज्ञांनीं माझी थट्टाही उडविली आहे. झालें तें ठीकच झालें. माझीं कांहीं विधानें भयंकर धाष्टर्याचीं आहेत आणि त्यांपैकीं बरींचशीं विधानें कदाचित् अखेरपर्यंत अर्थशून्यच राहतील! तथापि त्या

ग्रंथांतील कांहीं सूचना अशा आहेत कीं, त्यांकडे अर्वाचीन इंद्रियविज्ञानवेत्त्यांचें लक्ष्य जितक्या लवकर जाईल तितकें बरें. असो. एकंदरीनें झालें तें ठीक, असेंच म्हटलें पाहिजे. माझ्याबद्दल कोणी चार वाईट शब्द बोलल्यास त्याचें मला कष्ट नाहींत. बरी अथवा वाईट–पण या विषयाची सर्वत्र चर्चा व्हावी इतकीच माझी इच्छा आहे.

आपल्या कार्याला नुकता कोठें आरंभ झाला आहे. इतक्यांतच एखाद्या लहानशा अडचणीला भिऊन आपण हातपाय गाळले तर कसें होईल? आतां आपल्या उद्देशाला एकसारखें चिकटून बसलें पाहिजे. 'झालें तें पुष्कळ' असें कधींच म्हणूं नये.

या पाश्चात्य देशांत एखादा मनुष्य आला आणि त्यानें नाना देश पाहिले म्हणजे त्याचे डोळे लख्ख उघडतात. अशा रीतीनें फिरतां फिरतांच माझे साहाय्यकारी मीं मिळविले आहेत. आमच्या हिंदुस्थानांत काय चिजा अपूर्व आहेत आणि कशाची तेथें उणीव आहे याची स्पष्ट ओळख इकडे करून दिल्यावरच मला सध्याचे साहाय्यकर्ते मिळाले आहेत. नुसत्या बडबडीनें इकडे कोणाची डाळ शिजेलसें वाटत नाहीं. खरोखर, दहाबारा लाख हिंदू जर जगभर प्रवास करतील, तर त्यांत आपलें केवढें तरी हित होईल!

आपला,
**विवेकानंद**

---

## पत्र २९ वें

ता. १४ जुलै १८९६

प्रिय डॉक्टर—

किती केलें तरी खुद्द इंग्रजाला इंग्रजी भाषा जशी लिहितां येईल तशी खुबी परकीयाला कधींही साधणार नाहीं. खुद्द इंग्रजांनीं लिहिलेल्या पुस्तकांतील कल्पनांचा प्रसार जितका लवकर होईल, तितका हिंदु 'इंग्रजी' ग्रंथांतील कल्पनांचा होणार नाहीं. त्यांतल्या त्यांत इंग्रजी भाषेंत एखादा निबंध लिहिणें एक वेळ फारसें कठीण नाहीं; पण एखादी गोष्ट लिहिणें हें तर फारच कठीण!

परकीयांकडून आपणांस मदत मिळेल, अशी भलतीच आशा बाळगूं नका. एखाद्या व्यक्तीनें काय अथवा राष्ट्रानें काय आपल्याच पायांवर उभें राहण्यास

शिकलें पाहिजे. स्वतः मेल्यावांचून स्वर्ग दिसत नाहीं ही म्हण सर्वत्र सारखीच लागू आहे. हीच खरी देशभक्ति. ज्या देशाला हें साधन नसेल, त्याची वेळ अद्यापि आली नाहीं असेंच समजलें पाहिजे. त्यानें आणखी कांहीं काळ वाट पाहावी. आपणांस साऱ्या हिंदुस्थानांत प्रकाश उत्पन्न केलाच पाहिजे. या दृष्टीनें आपण आपल्या कार्याला लागलें पाहिजे.

कमळ ही पुनरुत्थानाची खूण आहे. पूर्वीच्या उच्चस्थितीचा अरुणोदय पुन्हा होऊं लागला आहे असें ही खूण सुचविते. ललितकलांत आणि त्यांतही विशेषतः चित्रकलेंत तर आपण फारच मागासलेले आहों. नव्या कल्पना चित्रित करण्याचें आपणांस मुळींच माहिती नाहीं. घनदाट अरण्यांत एखादें ल्हानसें तळें असून, त्यांत कमळें नुकतीच उमलूं लागलीं आहेत असा एखादा देखावा तयार केला, तर किती मनोहर होईल? अशाच प्रकारच्या दुसऱ्या शेंकडों कल्पना चित्ररूपानें मांडतां येण्यासारख्या आहेत; पण हें हळूंहळूं होईल.

पुढच्या रविवारीं मी स्वित्झर्लंडांत जाणार आहें. तेथून पावसाळ्याच्या सुमारास परत येईल, आणि पुन्हां कार्यास लागेन. सध्या मला विश्रांतीची गरज फारच आहे. हें आपणांस ठाऊक असेलच.

परमेश्वराचा तुम्हा सर्वांस आशीर्वाद मिळण्याची इच्छा करणारा,

विवेकानंद.

---

## पत्र ३० वें

६ ऑगस्ट १८९६.

प्रिय—

इतक्यांतच असा घाबरूं नको. धीर सोडूं नको. माझ्या मुला, आपल्या हातून फार मोठमोठीं कार्यें व्हावयाचीं आहेत; मग आतांच जर आपण असे हताश झालों, तर कसें होईल? धैर्य धर.

भट्ट मोक्षमुल्लर यांजकडून मला फारच सुंदर पत्रें येत असतात. भगवान् रामकृष्णाचें एखादें मोठें चरित्र लिहावें, या हेतूनें ते सामग्री जमा करीत आहेत.

आतां वर्तमानपत्रांतल्या ढोलकें पिटणारांचा मला पुरा पुरा कंटाळा आला आहे. जगांतले अनेक मूर्ख काय म्हणतात त्याला कान बहिरे करून, आपण आपल्या कामाला लागावें. सत्याच्या मार्गांत कोणीही आड येऊं शकत नाहीं.

स्वित्झर्लंडांतही मी कांहीं एकाच गांवीं बसून राहत नाहीं. या गांवाहून त्या गांवीं असा मी बहुधा एकसारखा फिरत असतों. एखादा लेख लिहिण्याचें काम माझ्यानें होणार नाहीं, आणि सध्यां तें मला करावयाचेंही नाहीं. सध्या फार वाचनही उपयोगाचें नाहीं. पुढल्या महिन्यांत लंडनांत गेलों म्हणजे तेथलें काम, माझी वाट पाहात बसलेंच आहे. हिंवाळ्यांत मी तिकडे येईन आणि तेथल्या कामाचा कसा काय जम बसतो तें पाहीन.

तुम्हां सर्वांवरच माझें प्रेम आहे. शूर बच्चांनो, आतां कार्याला लागा. आतां 'नाहीं' हा शब्दसुद्धां आपण विसरला पाहिजे. आपल्या कार्याच्या मागें परमेश्वर उभा आहे. त्याची महाशक्ति तुमच्याबरोबर आहे. मग त्यांना आतां उगीच तिष्ठत कां ठेवतां ?

तुम्हां सर्वांचा,
**विवेकानंद**

---

## पत्र ३१ वें

खेत्री, २ एप्रिल.

प्रिय डॉक्टर,

आपलें पत्र आतांच पावलें. माझ्यासारख्या क्षुद्र मनुष्यावर तुम्ही इतकें प्रेम करतां हें पाहून मला धन्यता वाटते. बिचाऱ्याच्या मुलाला देवाज्ञा झाली हें ऐकून मला अत्यंत वाईट वाटलें. ज्याची ठेव त्यानें नेली. "**नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः**" हा सिद्धांत आपणा सर्वांस अवगत आहेच. याकरितां प्रसंगाला मान वांकविणें इतकेंच कायतें आपल्या हातीं उरतें. पूर्ण शांतीनें प्रसंग सोसणें हेंच आपलें काम आहे. तोफांच्या तोंडावर चालून जाण्याचा हुकूम सेनापतीनें दिला, तर तो अक्षरशः पाळणें हेंच शूर शिपायाचें काम आहे. त्याबद्दल कुरकुर करून उपयोग काय ? ती सर्वांतर्यामी दयामय जननीच त्याचें सांत्वन करो. त्याला तिनें आपल्या पोटाशीं घ्यावें हीच इच्छा बाळगणारा,

**विवेकानंद**

---

## पत्र ३२ वें

प्रिय—

आपणांस सध्या अनेक गोष्टींची आवश्यकता आहे. प्रथम सर्व प्रकारच्या व्यवहारांत चोखपणा–अत्यंत चोखपणा–असला पाहिजे. तुमच्यापैकीं कोणी लुच्चा आहे असा माझ्या म्हणण्याचा अर्थ करूं नको. तसें माझ्या स्वप्नांतही येणार नाहीं; पण आम्हां हिंदु लोकांना या बाबतींत कांहीं दुष्ट संवयी लागल्या आहेत. आमच्या एकंदर व्यवहारांत अव्यवस्थितपणा फार असतो. हिशेब रोजच्या रोज लिहून ताळेबंदांत पैचीही चूक राहूं न देणें आणि सर्व व्यवहार शिस्तीनें करणें या गोष्टींची संवयच आमच्या अंगीं नाहीं.

दुसरें असें कीं कोणतेंही काम हातीं घेतलें तर त्याची अव्यभिचारी भक्ति बाणली पाहिजे. तें कार्य उत्तम रीतीनें पार पाडीपर्यंत आपणांस मुक्ति मिळावयाची नाहीं, असें आपणांस वाटत राहिलें पाहिजे. जें मासिक तुम्हीं सुरू केलें आहे, त्याचीच योजना इष्ट देवतेच्या जागीं करा. मग यश कसें येतें हें तुम्हांला दिसेल. अत्यंत पवित्रपणा आणि गुरूच्या ठिकाणीं निःसीम आज्ञाधारकता हींच यशाचीं प्रमुख साधनें आहेत हें विसरूं नको.

एखाद्या धार्मिक वर्तमानपत्राचा परदेशांत मोठा खप होईल अशी भलतीच आशा बाळगूं नका. हिंदूंच्या अंगीं कांहीं सद्गुण आणि कृतज्ञता असेल तर त्यांनींच अशा पत्रांना आश्रय दिला पाहिजे.

तुम्ही आपल्या मासिकांतून वेदान्ताचा प्रसार अवश्य कराच; पण धर्माच्या बाबतींत कांहीं नवी कल्पना कोणीं काढिली अथवा एखादा नवा शोध लागला, तर त्यांचाही समावेश तुमच्या मासिकांत झाला पाहिजे.

मिसेस ॲनि बेझंट यांनीं भक्तीवर व्याख्यान देण्यासाठीं आपल्या थिऑसफीच्या मंदिरांत मला बोलावलें होतें. त्यांच्या बोलावण्याचा स्वीकार करून मीं एक व्याख्यान दिलें. कर्नल ऑल्कॉट हेही हजर होते. सर्व प्रकारच्या पंथांशीं माझी सहानुभूति आहे, हें दाखविण्याकरितां मीं हें व्याख्यान देण्याचें कबूल केलें. आमच्या लोकांनीं एक गोष्ट अवश्य लक्ष्यांत बाळगली पाहिजे; ती ही कीं, धार्मिक बाबतींत गुरुपद आम्हांलाच योग्य आहे, परकीयांना नाहीं. व्यवहारिक ज्ञान मात्र आम्ही त्यांजपासून शिकलें पाहिजे.

मोक्षमुल्लर यांचा लेख मीं पाहिला. मि. मुझुमदार यांच्या छोट्याशा पुस्तकाशिवाय अधिक माहिती त्यांस मिळाली नाहीं ही गोष्ट लक्ष्यांत घेतां,

तो लेख एकंदरीनें बराच चांगला आहे असें म्हटलें पाहिजे. श्रीराम-कृष्णांचें चरित्र ते लिहिणार असल्याचें त्यांनीं मला नुकतेंच कळविलें आहे. या कामीं मीं त्यांना थोडीबहुत मदत केली आहे; पण आणखी बरीच सामग्री तुमच्याकडून आली पाहिजे.

एकसारखें आपलें कार्य सुरू ठेवा. वाटेल तें करण्याची आणि हाल सोसण्याची तयारी तुम्हीं केली पाहिजे. "**मूर्खांमाजी परम मूर्ख। जो संसारीं मानी सुख। संसारदुःखा एवढें दुःख। आणीक नाहीं॥**" हें विसरूं नको.

तुम्हां सर्वांचा,
**विवेकानंद**

## पत्र ३३ वें

वुइंबेल्डन,
इंग्लंड, २२ सप्टें. १८९६.

प्रिय—

प्रोफेसर ड्यूसन यांच्या संगतींत माझा जर्मनींतील काळ फारच सुखाचा गेला. तेथून आम्ही दोघे बरोबर लंडनला आलों. त्यांचा मजवरच फार लोभ जडला आहे.

अद्यापि कितीतरी काम पडलें आहे. उदाहरणार्थ, तुळशीदास, कबीर, नानक आणि दक्षिणेंतील कित्येक साधू, यांचीं चरित्रें अवश्य तयार झालीं पाहिजेत. पण तीं मुद्देसूद आणि रेखींव असलीं पाहिजेत, कशीतरी वेठ वारलेली नसावी.

तुमचा,
**विवेकानंद**

---

## पत्र ३४ वें

लंडन,
ता. २८ अक्टोबर १८९६.

प्रिय—

कोणत्या महिन्यांत मी हिंदुस्थानांत येऊन पोहोंचेन हें आज मला नक्की सांगतां येत नाहीं. त्याबद्दल मी पुढील पत्रीं लिहीन. नव्या स्वामींनीं एका

लहानशा खासगी सभेंत काल आपलें पहिलें भाषण केलें. भाषण चांगलें झालें आणि मलाही तें फार आवडलें. ते पुढेंमागें लवकरच चांगले वक्ते होतील, अशी मला खात्री वाटते.

पुस्तकाचा प्रसार पुष्कळ व्हावा असें वाटत असेल तर हिंदुस्थानांत तीं पुष्कळ स्वस्त दरानें विकल्यावांचून गत्यंतर नाहीं. टाईपही मोठा वापरला तर लोक अधिक खुष होतील. आपल्या पुस्तकाची एखादी स्वस्त आवृत्ति काढतां आली तर ती जरूर काढा. आपलें पुस्तक याहून लवकर बाहेर यावयास पाहिजे होतें. त्यामुळें एक मोठी संधि आपण गमाविली. पण आपल्या हिंदुत्वाला हें अनुरूपच आहे. चोर चोरी करून पळाला म्हणजे दरवाजे बंद करावयचे, हें आपलें फार जुनें ब्रीद आहे. ज्या त्या कामांत आमचें हेंच चालावयाचें आणि यामुळेंच आम्हांस सदोदित नुकसान सोसावें लागतें. वर्षभर बडबड झाल्यावर तुमचें पुस्तक बाहेर आलें. पाश्चात्य लोक तुमच्या पुस्तकासाठीं कल्पांतापर्यंत वाट पाहातच राहतील असा का तुमचा समज आहे? तुमच्या या दिरंगाईमुळें तीन हिस्से गिऱ्हाईक तरी खचित बुडालें. आपला तो—तो तर तुझ्याहून अधिकच आळशी. त्याची छपाई पाहून मला तर ओकारीच आली. असलें रद्दी काम करतां तरी कशाला? यापेक्षां पुस्तकें न छापणेंच बरें. असलीं पुस्तकें लोकांच्या पदरांत बांधणें म्हणजे त्यांना निवळ फसविणेंच आहे. बेहेत्तर, यापेक्षां पुस्तकें छापूं नयेत आणि विकूंही नयेत. लोकांना नाहक कां फसवावें?

मी हिंदुस्थानांत येईन तेव्हां बरोबर मि० सेव्हियर त्यांची पत्नी मिस मुल्लर आणि मि० गुडविन इतके येणार आहेत. सेव्हियर हे बहुधा आल्मोरा येथें कायमचेच राहतील. गुडविन संन्यास घेणार आहेत. तो मजबरोबर फिरत राहणार आहे. आपलीं पुस्तकें बाहेर पडलीं हे खरोखर गुडविनचेच उपकार आहेत. माझीं व्याख्यानें त्यानें लघुलेखनानें टिपून घेतलीं, म्हणून आज पुस्तकें तयार करतां आलीं. मीं हीं व्याख्यानें त्या वेळेच्या स्फूर्तीनें दिलेलीं होतीं, त्यांजबद्दल कसल्याच प्रकारची आगाऊ तयारी मीं केली नव्हती. गुडविन आतां मजबरोबर कायमचाच राहणार आहे. तो निवळ वनस्पतींचा आहार घेतो.

आपला,

**विवेकानंद**

## पत्र ३५ वें

वेस्टमिन्स्टर, ११ नोवें. ९६.

प्रिय—

येथून १६ डिसेंबरच्या सुमारास निघेन. येथून प्रथम मी इटलीस जाईन. तेथें कांहीं दिवस राहून नंतर नेपल्स येथें आगबोटीवर चढेन.

राजयोगाची पहिली आवृत्ति संपून दुसरी छापण्याची तयारी चालू आहे. पहिल्या प्रतीचा खप बहुतेक अमेरिकेंत आणि हिंदुस्थानांत झाला.

तुमचा,
**विवेकानंद**

---

## पत्र ३६ वें

लंडन, २० नोव्हें. ९६.

प्रिय—

डिसेंबरच्या १६ तारखेला येथून निघून इटलीला जाण्याचा माझा बेत निश्चित झाला आहे. तेथून मी नेपल्स येथें जाईन, आणि जर्मन बोट प्रिन्स रीजंट लिओपोल्ड या बोटीनें तिकडे यावयास निघेन. सिलोन येथें ही बोट ता. १४ जानेवारीला पोहोंचावयाची आहे. सिलोनांत कांहीं दिवस हिंडून मग मी मद्रासेस जाईन.

मि. सेव्हियर हे आल्मोराच्या जवळपास एखादी जागा घेणार आहेत. त्या ठिकाणीं आपला हिमालयांतील मठ बांधण्याचा माझा विचार आहे. आमचे पाश्चत्य ब्रह्मचारी आणि संन्यासी बहुधा येथें राहतील. गुडविननें लग्न केलेलें नाहीं. तो जवळ जवळ संन्यासीच झाला आहे. मजबरोबर फिरत राहण्याचा त्याचा बेत आहे.

भगवान् रामकृष्णांच्या जन्मदिवसाच्या आधीं कलकत्त्याला पोंहोंचण्याची माझी उत्कट इच्छा आहे.

आपल्या कार्याला सुरुवात म्हणून दोन मठ प्रथम सुरू करण्याचा माझा बेत आहे. एक कलकत्ता येथें आणि दुसरा मद्रास येथें. त्यांतून तरुण उपदेशक तयार करावयाचा बेत आहे. कलकत्त्याच्या मठाला पुरण्यापुरती द्रव्यसामग्री माझ्याजवळ आहे. पहिला मठ कलकत्त्यालाच निघाला पाहिजे; कारण

भगवान् रामकृष्णांच्या लीलांचें ठिकाण हेंच. ती त्यांच्या अवतारकृत्यांची जागा. मद्रासच्या मठाकरितां लागणारें द्रव्यसाहाय्य बहुधा हिंदुस्थानांतच मिळेल अशी आशा आहे.

वर लिहिलेल्या तीन ठिकाणांतून आपण आपल्या कार्याला सुरवात करूं. मग हळूहळू मुंबई आणि अलाहाबाद इकडे प्रवेश करूं. इतकें काम येथें झाल्यावर हिंदुस्थानांतच काय, पण देशोदेशीं आपण आपले प्रचारक पाठवूं शकूं. पण त्याबद्दल अधिक चर्चा आज कशाला ? परमेश्वराची मर्जी असेल तसें होईल. आतां झटून कामाला लाग.

इंग्रजी भाषेंत एक मासिक सुरू करण्याचा आपला बेत आतां मुक्रर झाला. आतां कांहीं मासिकें देशी भाषांतूनही सुरू केलीं पाहिजेत. अशा प्रकारच्या पत्रांना आश्रय देणारा वाचकवर्ग फारसा मोठा नसावयाचा हें उघडच आहे. आपल्या इंग्रजी मासिकाला हिंदु लोकांनींच प्रथम सांभाळिलें पाहिजे. जगांतील सर्व देशांत एखाद्या पत्राचा प्रसार व्हावयाचा तर त्यांत सर्व देशांतील लेखक पाहिजेत; म्हणजे त्याचा अर्थ इतकाच कीं वर्षाकांठीं एक लाख रुपये खर्च करण्याची तयारी पाहिजे.

एक गोष्ट लक्ष्यांत नित्य बाळगीत जा. ती ही कीं माझें कार्यक्षेत्र एकटें हिंदुस्थानच नसून सारें जग आहे.

तुमचा,
**विवेकानंद**

---

## पत्र ३७ वें

स्विट्झर्लंड,
ता. २६ ऑग० ९६.

प्रिय—

आपलें पत्र आतांच मिळालें. मी सध्या फिरतीवर आहें. सध्या मी डोंगराळप्रदेशांत फिरत आहें. आल्प्स पर्वतांत मीं बराच प्रवास केला, आणि जर्मनीला जाण्याच्या तयारींत आहें. ड्यूसन यांनीं कील येथें मला भेटीला बोलाविलें आहे. तेथून मी इंग्लंडला जाईन. येत्या हिंवाळ्यांत बहुधा मी तिकडे येईन.

—मासिकासाठीं तयार केलेलें ब्रीदवाक्याचें चित्र मला आवडलें नाहीं. तें बेढब तर आहेच; पण त्याशिवाय त्यांत कित्येक गोष्टी निरर्थक घुसडून दिल्या आहेत. अशा प्रकारचें चित्र शक्य तितकें साधें, लहान आणि विशेष हेतूचें दर्शन असें असावें. चित्र पाहिल्याबरोबर त्यांतील भाव लक्ष्यांत आला पाहिजे. बाकीचें काम ठीक चाललें आहे हें मी मोठ्या आनंदानें कबूल करतों.

मला एका गोष्टीबद्दल मात्र कांहीं कानमंत्र सांगावासा वाटतो. हिंदुस्थानांतील दहापांच मनुष्यें एकत्र होऊन कांहीं उद्योग करूं लागलीं म्हणजे जी एक चूक बहुधा नेहमीं करतात, ती चूक त्यांना शेवटीं गोत्यांत घालून कार्याचाही फडशा पाडते. आमच्यांत अद्यापि खऱ्या व्यापारी तत्त्वाचा प्रवेशच झालेला नाहीं. धंदा म्हटला कीं तो धंदाच. तोच त्या वेळीं परमेश्वर. त्यांत स्नेहसंबंध आड येतां उपयोगी नाहीं. हें लक्षण आम्हां हिंदूंत अद्यापि आढळत नाहीं. 'हा माझा अमका; याची भीड कशी मोडावी ?' '**हे कोण बायकोचे साले । तुपावेगळा घांस न गिळे ।**' अशा प्रकारच्या भिडेचें दडपण एखाद्या उद्योगावर पडलें कीं त्याखालीं त्याचा सारा चुराडा होण्याला वेळ किती ? असली भिकारी लाज प्रथम सोडून द्या. हिशेब नेहमीं चोख राखीत जा. आपल्या ताब्यांत जें कांहीं द्रव्य असेल त्याचा हिशेब पैपर्यंत बरोबर ठेविला पाहिजे. ज्या कार्यासाठीं जें द्रव्य जमा झालें, त्याचा उपयोग त्याच कार्याला झाला पाहिजे. उपाशीं मरण्याची वेळ आली तरी प्राणरक्षणार्थसुद्धां त्यांतल्या दमडीलाही बोट लावूं नये. त्या एका कार्याखेरीज दुसऱ्या कशाकडेही त्यांतील एक कवडीसुद्धां वेंचतां उपयोगी नाहीं. याला म्हणतात धंद्यांतला चोखपणा. हा आमच्या अंगीं केव्हां येणार ? भीड तोडावयाला आम्ही केव्हां शिकणार ? दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे चिकाटी. जी गोष्ट हातीं धरली, तिला एकसारखें चिकटून राहावयाचें. ध्यानीं, मनीं, स्वप्नीं ती एकच गोष्ट. त्याच गोष्टीची अव्यभिचारी भक्ति करावयाची. ती गोष्ट सोडून मन दुसरीकडे भरकटलें कीं व्यभिचाराचें पातक घडलेंच. हें मासिक हाच आतां तुमचा परमेश्वर. अशी भक्ति असली तर यश तुमचेंच आहे हें काय निराळें सांगावयास पाहिजे ?

हें मासिक यशस्वी झालें म्हणजे असाच प्रयत्न देशी भाषांतूनही सुरू केला पाहिजे. तामीळ, तेलगु, कानडी इत्यादि भाषांत नवीं मासिकें अगर पत्रें सुरू

केलीं पाहिजेत. मद्रासी लोक हुशार आहेत आणि त्यांच्यांत कर्तबगारीही आहे. पण ज्या भूमींत आद्य श्रीशंकराचार्यांचा जन्म झाला, त्या भूमींतून संन्यस्त-वृत्ति मात्र सध्या पळून गेल्याचें दिसतें.

आपल्यांतील ही वृत्ति मावळली असल्यामुळेंच जागोजाग खाडे पडले आहेत. माझ्या मुलांनीं हे खाडे भरून काढले पाहिजेत. त्यांनीं संसारावर पाणी सोडिलें पाहिजे. इतकें झालें तरच पुढील इमारतीचा पाया तयार होईल.

आतां कार्याला लागा. चित्रांसारख्या किरकोळ बाबींकडे लक्ष्य देण्यास आपणांस फुरसत कोठें आहे? घोडा आपल्या हस्तगत झाला म्हणजे त्याची लगामही हातीं येईल. एखाद्या क्षुल्लक गोष्टीसाठीं मोठें कृत्य लांबणीवर टाकूं नये. मी सदोदित तुमच्या सन्निध आहेंच. यासाठीं कसलीही भीति मनांत न बाळगितां उद्योग करीत जा. मी मेलों तरी माझा जीवात्मा तुमच्या सन्निध राहीलच. बाळांनो, देह आज आहे आणि उद्यां नाहीं. संपत्ति, कीर्ति आणि इतर भोग्यवस्तु यांत तरी चिरकाल टिकणारें काय आहे? आपले सर्व व्यवहार मृत्यूच्या मुखांतच चालू आहेत. मग संसारकूपांत राहून किड्यासारखें मरण्यापेक्षां सत्यासाठीं लढत असतां धारातीर्थीं वीराला उचित असें मरण तरी मिळवूं या. व्हा तर पुढें!

विवेकानंद.

